# स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ नांदेड,
# मानव्य विद्याशाखे अंतर्गत सैनिकशास्त्र विषयात
# विद्यावाचस्पती (Ph.D.) पदवीसाठी सादर केलेला शोध प्रबंध




प्रबंधाचे शीर्षक

# मराठेकालीन यशवंतराव होळकरांचे लष्करी कार्य : एक चिकीत्सक अभ्यास

संशोधक

**महेशकुमार भगवानराव चौरे**

मार्गदर्शक

**प्रोफेसर.डॉ. चंद्रकांत बन्सीधर भांगे**
संशोधन मार्गदर्शक व विभाग प्रमुख
सैनिकशास्त्र,
श्री. शिवाजी महाविद्यालय, परभणी

जानेवारी 2023

# प्रतिज्ञा पत्र

मी प्रतिज्ञा पूर्वक असे जाहीर करतो की, स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठाच्या सैनिकीशास्त्र विषयातील पीएच.डी पदवी करिता सादर केलेला "मराठेकालीन यशवंतराव होळकरांचे लष्करी कार्य; एक चिकित्सक अभ्यास" हा शोध प्रबंध मी स्वत: लिहीलेला असून तो पूर्णत: स्वतंत्र आहे हा शोध प्रबंध मी इतर कोणत्याही विद्यापीठा मध्ये कोणत्याही पदवी करिता किंवा अन्य परिक्षेसाठी सादर केलेला नाही.

संशोधक

**चौरे महेशकुमार भगवानराव**

# प्रमाणपत्र

**चौरे महेशकुमार भगवानराव** यांनी "मराठे कालीन यशवंतराव होळकरांचे लष्करी कार्य:- एक चिकित्सक अभ्यास" या विषया वरिल शोध प्रबंध स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठाच्या मानव्य विद्याशाखे अंतर्गत मिलीटरी सायन्स विभागाच्या पीएच.डी पदवी साठी सादर केलेला आहे.

**चोरे महेशकुमार भगवानराव** यांनी माझ्या मार्गदर्शनाखाली शोध प्रबंध स्वतंत्ररित्या लिहिला असून तो इतर कोणत्याही विद्यापीठातील अन्य पदवीसाठी सादर केलेला नाही.

**संशोधन मार्गदर्शक**

**प्रो.डॉ. सी.बी. भांगे**
**विभाग प्रमुख सैनिकशास्त्र**
श्री. शिवाजी महाविद्यालय, परभणी

# ऋणनिर्देश

आज दोनशे ते अडीचशे वर्षे झालेली असली तरी यशवंतराव होळकर हा विषय इतका प्रेरणादायी राहिलेला आहे. की त्यांच्या विषयी सांगणारा व ऐकणारा या दोघांचीही उत्कंठा संपता संपत नाही. त्यामुळे यशवंतराव होळकर व त्यांच्या कालखंडानंतर मराठेशाहीच्या काळात अनेक शुरवीर मराठा सरदार सेनापती यांनी आपल्या स्वकर्तृत्वावर पराक्रमाचा प्रभाव हा होळकरांच्या एकुण कार्यकाळात उठावदार कार्य केल्याचे दिसून येते. मी निवडलेल्या "मराठेकालीन यशवंतराव होळकरांचे लष्करी कार्य: - एक चिकित्सक अभ्यास" या विषयामध्ये यशवंतराव होळकर यांनी केलेल्या लष्करी मोहिमा ह्या इंग्रजांच्या विरुध्द असोत की शत्रुच्या विरुध्द केलेले लष्करी कार्य असो यांचा अभ्यास करण्यासाठी त्यांच्या लष्करी मोहिमा रणक्षेत्र, किल्ले, इंग्रजांच्या विरुध्द केलेल्या लष्करी मोहिमा अशा अनेक घटनांच्या प्रत्यक्ष, अप्रत्यक्ष भेटी दिल्यानंतर त्यामधून जी मला ऊर्जा, प्रेरणा मिळाली आहे ती संशोधन कार्यासाठी शेवटपर्यंत माझ्या कामास आलेली आहे.

आज पर्यंत होळकरांच्या सुभेदारा वरती काही प्रमाणात एखाद दुसरे संशोधन झाले आहे. परंतु या सरदारांच्या लष्करी मोहिमा, लढण्याची पध्दत, सैन्य संख्या, शस्त्रास्त्रे, लष्करी रणनीती, यशवंतराव होळकर यांनी युध्दामध्ये वापरात आणलेल्या युध्द पध्दतीचा अभ्यास हा सर्वांच्या परिचयाचा परंतु अनभिज्ञता असलेल्या विषयाची मांडणी करताना मला मनस्वी आनंद होत आहे. होळकर घराण्यातील व्यक्तींचा लष्करी इतिहास त्यातल्या त्यात यशवंतराव होळकर यांचा लष्करी इतिहास जगाला समजावा, त्याची ओळख व्हावी, त्यांनी केलेल्या वेगवेगळ्या लष्करी कार्याचा आढावा सर्वांना माहित व्हावा हा हेतू डोळ्यासमोर ठेवून यशवंतराव होळकर यांचा लष्करी इतिहास मांडण्याचा माझा प्रयत्न आहे.

सदरील विषयानुषंगाने संशोधन करत असताना त्या त्या परिक्षेत्राचे निरिक्षण आणि संबधीत होळकरांच्या वारसांना भेटण्याचा आलेला योग हा अविस्मरणीय आहे. यशवंतराव होळकरांच्या समाधी समोर नतमस्तक होवून केलेले वंदन आणि त्यातून मिळालेली ऊर्जा ही कधीही न संपणारी आहे. मुळत: मराठेशाहीच्या इतिहासा मध्ये होळकर घराण्याकडे अधिक दुर्लक्ष झालेले दिसून येते.

तर त्यातच आणखी यशवंतराव होळकरांचा मराठे शाहीला ऊर्जा देणारा लष्करी इतिहास अधिक दुर्लक्षित राहिलेला आहे. इंग्रजांना या देशातून हाकलुन लावण्यासाठी यशवंतराव होळकरांनी

केलेला संघर्ष व देशातील, राजे, राजवाडे, संस्थानिक, यांना यशवंतराव होळकर यांच्याकडून आशा, अपेक्षा वाटणे हे स्वाभाविक आहे कारण यशवतरावांची युध्दनिती, युध्द कौशल्य, नेतृत्व, निष्ठा, मैदानी प्रदेशातील गनिमीकावा, युध्दतंत्र शत्रुच्या सैन्याला युध्दात जेरीस आणणे इत्यादी अशा अनेक प्रकारचे लष्करी कार्य जाणून त्यांचे कार्य त्या कालखंडात दुर्लक्षीलेले दिसून येते.

पेशवे कालखंडातील सर्वात जास्त ग्रंथ संपत्ती ही पुण्यामध्ये भारत इतिहास संशोधन मंडळ, भांडारकर ग्रंथालय, डेक्कन कॉलेज, इंदौरस्थित डॉ. गणेश मतकर यांचे ग्रंथालय, पुरातत्व विभाग इंदौर, महेश्वर येथील कागदपत्रे, भानपुऱ्यातील साहित्य ग्रंथालय, पुराभिलेखागार पुणे, होळकरांच्या राजवाड्यातील ग्रंथ संपदा इंदौर, स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठातील ग्रंथालय, गोविंदराम शुरनर यांचे अहिल्यानगर येथील ग्रंथलाय नांदेड, स्वामी रामानंद तीर्थ महाविद्यालयाचे ग्रंथालय अंबाजोगाई, साहित्य निकतेन ग्रंथालय अंबाजोगाई इत्यादी ग्रंथालयातील सर्व पदाधिकारी कर्मचारी यांचे मी मनापासून आभार व्यक्त करतो. राजाभाऊ जाधव, संतोष राठोड आणि कृष्णा बावळे यांनी टायपिंगचे कार्य मनापासून आणि चांगल्या पध्दतीने करुन दिल्याबद्दल यांचे ही आभार, माझी पत्नी शोभा याने माझ्या संशोधन कार्यासाठी वेळोवेळी प्रकरणाची रुपरेषा कशी असावी यासाठी चर्चा करुन मला सहकार्य केले. तसेच माझी मुले प्रिया, दिशा, चंद्रगुप्त यांनी मला वेळोवेळी इंटरनेटच्या माध्यमातून काही निवडक साहीत्य उपलब्ध करुन दिले. विशेष सहकार्य हे जे मला मोठ्या प्रमाणात संदर्भ ग्रंथ उपलब्ध करुन देण्यात ज्याचा सिंहाचा वाटा आहे असा माझा विद्यार्थी अविनाश धायगुडे याचे विशेष आभार त्याच बरोबर, प्रा. रंगनाथ गोचडे, प्रा. रघुनंदन मोहीते, प्रा. पाराजी शिंपले, प्रा. नामदेव हेडे, प्रा, डॉ. बी.पी. रुद्देवाड, प्रा. पांडे, प्रा. डॉ. ज्ञानेश्वर वडजे, डॉ. अकलोड, प्रा. डॉ. गोरख सोनवणे, प्रा. जितेंद्र देशपांडे, प्रा. विष्णु गोरे, ॲड. विलास पवार, भाऊराव गवळी, किशोर रेणापूरे, यांचे ही मना पासून धन्यवाद.

आपला

**चौरे महेशकुमार भगवानराव**

# अनुक्रमाणिका

**मराठेकालीन यशवंतराव होळकरांचे लष्करी कार्य : एक चिकित्सक अभ्यास**

**१) प्रस्तावना :- (Introduction)**

भारताच्या भूमीमध्ये मध्ययुगीन कालखंडात अनेक सम्राट, राजे, महाराजे होऊन गेले, ज्यांनी आपल्या कर्तृत्वावर स्वत:चे राज्यनिर्माण केले. मातृभूमीच्या रक्षणासाठी अनेकांनी स्वत:चे बलिदान दिले आहे. यामध्ये प्रामुख्याने आपल्याला 17 व्या शतकामध्ये मराठशाहीच्या कक्षा विस्तारण्यासाठी माळव्याच्या सुभेदाराची वस्त्रे पेशव्यांकडून घेवून मराठेशाहीचा झेंडा, अस्तित्व, विस्तार, दबदबा उत्तरेकडे पोहोचविण्यात मल्हारराव होळकर आणि यांच्या घरातील विरांचा सिंहाचा वाटा आहे. उत्तरेकडे मराठेशाहीची मुहुर्तमेढ स्थापित केली. मराठेशाहीची गौरवशाली परंपरा उत्तरेकडे जिवंत ठेवण्याचा प्रयत्न सातत्याने मल्हारराव होळकर यांनी केलेला दिसुन येईल. मराठेशाहीची स्थापना करण्यासाठी ज्यांनी स्थापीत केले होते. असे छत्रपती शिवाजी महाराज स्वप्नील मराठेशाहीचा या कक्षा उत्तरेकडे विस्तारीत करण्याचा यांचा प्रयत्न होताना आपल्याला दिसुन येतो.

मराठेशाहीच्या माध्यमातून मल्हारराव होळकर यांनी स्वत:चे अस्तित्व उत्तरेकडे निर्माण केले. मल्हारावांनी स्वत:च्या राज्यांची स्थापना 26 मे 1728 रोजी केली. या राज्याच्या माध्यामातून अटक पासून ते कटक पर्यंतचे कार्य विस्तार मराठेशाहीच्या नेतृत्वाखाली केलेले आहे. मल्हाररावांच्या नंतर होळकरांच्या गादीवर अहिल्यादेवी होळक्र या विराजमान झाल्य. त्यांनी होळरशाहीच्या माध्यमातून अखंड भारतामध्ये आपल्या राज्याचा व मराठेशाहीचा नावलौकिक व्हावा असे कार्य कर्तृत्व केले. अहिल्यादेवीनी त्याग, तपस्या याच्या माध्यामातून भारतीय इतिहास व संस्कृतीमध्ये अलौकिक कार्य करुन ठेवले आहे. यांनी सबंध भारत देशात हजारो मंदिरे, धर्मशाळा, बारव, पानवटे, पशु-पक्ष्यांसाठी जंगले, पाणी, चारा इत्यादीची व्यवस्था केलेली होती. त्याच बरोबर चारधाम, सातपुरी, बारा ज्योतिर्लिंग, तीर्थस्थानांचा जीर्णोध्दार व नवीन घाट बांधण्याचे कार्य केले आहे. त्यांचा मृत्यू महेश्वर या ठिकाणी 13 ऑगस्ट 1795 रोजी झाला. यांच्या पश्चात होळकरशाहीच्या गादीवर मल्हारराव होळकर यांचे चुलत बंधु तुकोजीराव होळकर विराजमान झाले. तुकोजीराव होळकर यांनी मल्हारराव होळकर यांच्या मार्गदर्शनाखाली सैनिकी शिक्षणाला सुरुवात केली होती. तुकोजीरावांनी सैनिकी मोहिमाध्ये उत्कृष्ट कार्य, पराक्रम, गाजवलेले होते. ज्या प्रकारे अहिल्यादेवींच्या कार्यकाळात राज्यकारभार चालत होता. त्याच पध्दतीने तुकोजीरावांनी पुढे चालु

ठेवला. कालांतराने यांचाही मृत्यू पुण्याजवळ 15 ऑगस्ट 1797 रोजी झाला. यांच्यानंतर गादीवर त्यांचे मोठे पुत्र काशीराव होळकर आले परंतु त्यांच्याकडे नेतृत्व करण्याची आणि राज्यचालवण्याची क्षमता नसल्याने होळकरशाहीच्या राज्याची सुत्रे ही यशवंतराव होळकर यांच्याकडे आली.

यशवंतराव होळकर यांनी आपल्या पूर्वजांचा इतिहास परंपरा रीवाज, शौर्य वाढविण्याचा मानसन्मान ठेवण्याचा सातत्याने प्रयत्न केला आहे. छत्रपती शिवाजी महाराजांनी स्थापन केलेल्या स्वराज्याचा वटवृक्ष करण्याचा होळकर परिवारातील वीरांनी रक्त सांडून मराठेशाहीचा झेडा अखंड भारत देशामध्ये फडकवत ठेवला. यशवंतराव होळकर यांचा उगम हा अशा कालखंडामध्येव परिस्थितीत झालेला दिसुन येतो. की भारतातील अधिकत्तर संस्थानिक, राजे, राजवाडे हे स्वत:च्या राज्याच्या सीमांचे संरक्षण करण्यासाठी आपापसात लढत होते. याच काळात ईस्ट इंडिया कंपनीच्या माध्यमातून इंग्रज संस्थानिकामध्ये फोडा आणि राज्यकराया धोरणाचा अवलंब करुन भारतात आपले पाय घट्ट रोवण्याचा प्रयत्न करत होतो. यशवंतराव होळकर यांची दुरदृष्टी म्हणा किंवा नेतृत्व कौशल्या, यांना या इंग्रजांच्या धोरणाचा अंदाज लक्षात आल्याने त्यांनी भारतातील संपूर्ण संस्थानिकांना आव्हान केले की इंग्रजांना भारताबाहेर हाकलुन लावण्यासाठी सहकार्य करा, एकत्रित या इथे यशवंतराव होळकर यांची अखंड भारताची संकल्पना दिसुन येते.यशवंतराव होळकर यांच्या दृढ ईच्छाशिक्त मुळे इंग्रजांसमोर आव्हान उभे राहिले होते. यशवंतरावांनी मातृभूमीच्या पलीकडे जावून आपल्या कर्मभूमीत स्वतंत्र अस्तित्व होळकरशाही व मराठेशाहीची निर्माण केले परंपरा कायम ठेवून उत्तर भारतामध्ये आपल्या नेतृत्वाचा ठसा उमटवून दाखविला. अखंड भारतसाठी त्यांनी केलेला प्रयत्न राष्ट्रप्रेम,दुरदृष्टी, युध्दकलेत नैपुण्य असणारा यशवंतराव छ.शिवाजी महाराजांच्या गनिमी कावा पध्दतीचा तोही मैदानी प्रदेशात अवलंब करुन शत्रुला (इंग्रज) सळो की पळो करुन सोडले/ याप्रमाणे प्रस्तुत मराठेकालीन यशवंतराव होळकरांचे लष्करी कार्य : चिकित्सक अभ्यास याविषयाच्या अनुषंगाने सविस्तरपणे अभ्यास करण्यात येणार आहे.

**२) अभ्यास विषयाचे महत्त्व :-**

भारतात व्यापारी म्हणून आले आणि राज्यकर्ते झाले अशी रचना इंग्रजांची भारतात वेगवेगळ्या कालखंडामध्ये दिसुन येते. भारतातील संस्थानिकांना आपल्या अंकीत करुन ठेवण्यासाठी इंग्रजांनी फोडा व राज्याला या नीतीचा अवलंब करुन वेगवेगळ्या दशकात देशांतर्गत

राजे, राजवाडे, संस्थानिक यांना आपलया नियंत्रणात ठेवून पुढे मराठेशाहीतील पेशव्यांच्या कालखंडात इंग्रज मराठ्यांच्या पुढे येऊन उभे राहले. याच ध्येय धोरणाला ओळखुन यशवंतराव होळकर यांनी मराठेशाहीला वाचविण्यासाठी इंग्रजांच्या विरुध्द युध्द पुकारले होते. आपल्या सैनयाची शक्ति ओळखून व तोफखान्याचा कारखाना निर्माण करुन तोफा निर्माण केल्या. इंग्रजांच्या विरुध्द संस्थानिकांना एकसंव करण्याचा प्रयत्न केला.

तत्कालीन इतिहासाचा अभ्यास करताना अखंड भारताचे स्वप्न पाहुन अतिशय प्रतिकुल परिस्थितीत इंग्रजांना शह देण्याचा प्रभावीपणे प्रयत्न केलेला आहे. धुरंधर सेनापतीचा इतिहास हा येणाऱ्या भविष्यातील युवा पिढीला, विद्यार्थ्यांना अभ्यासकांना माहित व्हावा या भूमिकेतून व संरक्षण व सामरिक शास्त्र विषयाचा अभ्यासक यशवंतराव होळकरा सारख्या मराठेशाहीतील सरदाराची दुरदृष्टी आणि कुशल सेनानीचा अभ्यास हा लष्करी दृष्टीकोणातून होणे आवश्यक आहे.

3) **संशोधनाचा उद्देश**

प्रस्तुत संशोधनाचा उद्देश हा खलील प्रमाणे आहे.

१) यशवंतराव होळकरांच्या सर्वांगीण कार्य कर्तृत्वाचा अभ्यास करणे
२) यशवंतराव होळकर यांच्या लष्करी व्यवस्थेचा अभ्यास करणे.
३) यशवंतराव होळकर यांच्या युध्दनीती शास्त्राचा अभ्यास करणे.
४) यशवंतराव होळकर यांच्या अखंड भारत संकल्पनेचा अभ्यास करणे
५) यशवंतराव होळकर यांनी लढलेल्या युध्दातील कार्याचा अभ्यास करणे
६) इंग्रजाविरुध्दच्या युध्दातील यशवंतराव होळकर यांच्या कार्याचा अभ्यास करणे.

4) **संशोधन पध्दती :-**

प्रस्तुत मराठेकालीन यशवंतराव होळकरांचे लष्करी कार्य, एक चिकित्सक अभ्यास,या विषयाची गृहितके सिध्द करण्यासाठी संशोधन हे नियोजन बध्द व शास्त्रीय पध्दतीने करण्यात येणार असुन संशोधन अध्ययन हे वर्णनात्मक पध्दतीचा उपयोग करण्यात आलेला आहे.

**5) तथ्य संकलन पध्दती :**

संशोधन अध्ययनासाठी विषय क्षेत्राशी सबंधीत साहित्याचे अभ्यास करण्यात येईल. त्याच बरोबर संशोधन विषयाच्या विविध पैलुंना स्पर्श करणारे प्राथमिक स्त्रोत ऐतिहासकि पत्रव्यवहार, रोजनिशी, व दुय्यम स्त्रोत असणारी ऐतिहासिक संदर्भ ग्रंथ, बखर, दप्तर, नियत कालिके, व्यक्तीगत पत्रलेख, चरित्र, गैरमासिके दुय्यम स्वरुपाची मराठी, हिंदु इंग्रजी भाषे मध्ये उपलब्ध असणारी संदर्भ ग्रंथ इंटरनेट, वृत्तपत्रे, मासिके, प्रकाशित शोध प्रबंध इत्यादीच्या माध्यमातून माहिती संकलित करुन संशोधन करण्यासाठी लिखित साधनांचा उपयोग करण्यात येणार आहे.

**6) संशोधनाची व्याप्ती आणि मर्यादा :**

प्रस्तुत मराठेकालीन यशवंतराव होळकरांचे लष्करी कार्य, एक चिकित्सक अभ्यास या विषयाच्या संशोधनासाठी यशवंतराव होळकर यांचा इ.स.1776 ते 1811 या कालखंडाचा आढावा घेण्यात येणार आहे. उपलब्ध कागदपत्रांच्या आधारावर संशोधन करण्यात येईल. संशोधनाची उद्दिष्टये व शीर्षक लक्षात घेता. या विषयाला यथोचित न्यायदेण्यासाठी वरील गृहित कृत्यांना विचारात घेऊन संशोधन पूर्ण करण्याचा माझा मानस आहे. संशोधनाची सविस्तरपणे मांडणी करण्या करीता एकुण सहा प्रकरणामध्ये विभागणी स्वरुपात ओळखून करुन देण्यात येईल. यामध्ये प्रस्तावना अभ्यास विषयाचे महत्व, उपलब्ध साहित्याचे पुनर्निरिक्षण संशोधनाचा उद्देश, गृहितके, संशोधन पध्दती तथ्य संकलन पध्दती संशोधनाची व्याप्ती आणि मर्यादा त्याच बरोबर माळवा प्रांताची भौगोलिक ऐतिहासिक महत्व, मराठ्यांचे माळवा प्रांतातील सुभेदारी, खासगी जहागीर, आणि त्यांच्या राज्यकारभारा विषय माहिती इत्यादी.

उत्तर भारतातील सुभेदार मल्हारराव होळकर यांचे महत्व आणि कार्य इत्यादीचा थोडक्यात आढावा घेण्यात येणार आहे. दुसऱ्या प्रकरणात यशवंतराव होळकरांचे जीवन चरित्र, तर तिसऱ्या प्रकरणात घेण्यात येईल. चौथ्या प्रकरणामध्ये यशंतराव होळकर यांचे युध्द विषयक धोरण तर पाचव्या प्रकरणात यशवंतराव होळकर यांचे तत्कालीन भारतीय राजकारण व सत्ता संघर्ष व सहाव्या प्रकरणामध्ये मुल्यांकन करण्यात येणार आहे. एकंदरीत संशोधनाची व्याप्ती आणि मर्यादाची ठरविण्यात आलेली आहे.

7) **प्रकरणाची मांडणी :**

या प्रस्तावित संशोधनात पुढील प्रमाणे प्रकरणाची मांडणी करण्यात आलेली आहे.

**प्रकरण पहिले**

**प्रस्तावना :-**

प्रकरण पहिल्यामध्ये विषयाला अनुसरुन गृहीतके उद्दिष्टये, संशोधन पध्दती आणि विषयाचे महत्व सांगण्यात आलेले आहे. त्याच बरोबर या प्रकरणामध्ये मराठेशाहीच्या उत्तरेकडील विस्तारासाठी होळकर घराण्यातील सुभेदार मल्हारराव होळकर यांच्या पासुन ते भारत स्वतंत्र होण्यापर्यचा प्रत्येक व्यक्तीचे थोडक्यात कार्य व राज्यकारभारा संबंधीची माहिती तसेच उत्तर भारत व माळवा प्रांतातील होळकर सत्तेची महत्व मराठेशाहीच्या दृष्टीने थोडक्यात आढावा घेण्यात आला आहे.

**प्रकरण दुसरे :- यशवंतराव होळकर यांचे जीवन चरित्र**

दुसऱ्या प्रकरणामध्ये यशवंतराव होळकर यांचा जन्म, कौटूंबीक माहिती, शिक्षण, वेशभुषा, कार्य कर्तृत्व, नाणी, डाक, व्यवस्था, तोफा बनविण्याचा कारखाना, यशवंतरावांचे नेतृत्व, त्यांचा राज्याभिषेक, राज्य विस्तार, आर्थिक उत्पन्न, यशवंतरावांची युध्दजिज्ञासा इत्यादी विषयी आढावा घेतलेला आहे.

**प्रकरण तिसरे :- यशवंतराव होळकर यांची लष्करी व्यवस्था**

यशवंतराव होळकर यांची लष्करी व्यवस्था यशवंतराव होळकर यांच्या लष्करी व्यवस्थे मध्ये घोडदळ, पायदळ, सैन्य व्युहरचना, युध्दयोजना, प्रत्यक्ष कार्यवाही, आक्रमण, पुरवठा, व्यवस्था, गुप्तहेर व्यवस्था, सैन्य शिबीर, युध्दतत्वे इत्यादींचा आढावा घेण्यात आलेला आहे.

**प्रकरण चौथे :- यशवंतराव होळकर यांची रणनिती आणि लढाई विषयी धोरण**

या प्रकरणामध्ये यशवंतराव होळकर यांची रणनिती व लढाई विषयी त्यांचे धोरण जे शत्रुच्या विरुध्द प्रत्यक्ष कारवाई आक्रमण, सैन्यसंख्या, सैन्याची रचना पुरवठा व्यवस्थ सैनिकांना प्रशिक्षण, गुप्तहेर व्यवस्था सैन्य व्युहरचना इत्यादी घटकांचा आभ्यास या प्रकरणामध्ये करण्यात आलेला आहे.

**प्रकरण पाचवे :- यशवंतराव होळकर यांचे तत्कालीन राष्ट्रीय राजकारणातील सत्ता संघर्ष**

यशवंतराव होळकर यांचा राष्ट्रीय राज करणातील सत्ता संघर्ष हा इंग्रजांच्या विरुध्द दिसुन येतो. त्यांचा वाढता प्रभाव आणि यशवंतरावांची इंग्रजांच्या विषयी असणारी राजकीय भूमिका व त्यांचा काढता प्रभाव इंग्रजांच्या विरुध्द भारतातील विविध संस्थानिकांना इंग्रजांच्या विरुध्द एकत्रित येण्याचे आव्हान व यातुनच अखंड भारताची संकल्पना रुझताना दिसुन येते.

**प्रकरण सहावे :- यशवंतराव होळकर यांच्या लढाया**

यशवंतराव होळकर यांच्या लढाया या प्रकरणामध्ये त्यांनी केलेल्या स्वकियांनी असो की इंग्रजांशी लढायांचा आढावा घेण्यात आलेला आहे. यशवंतरावांनी ज्या इंग्रजांच्या विरुध्द लढलेल्या युध्दाचे वर्णन प्रामाख्याने या प्रकरणामध्ये करण्यात आलेले आहे.

**प्रकरण सातवे :- मुल्यमापन व निष्कर्ष**

या प्रकरणामध्ये विश्लेषणाच्या माध्यमातून प्राप्त आलेल्या तथ्यांच्या आधारे निष्कर्ष, शिफारशीचे प्रतिपादन करण्यात आले आहे तसेच या प्रकरणामध्ये प्रस्तुत संशोधनाचे मुल्यमापन व सारांश मांडण्यात आलेले आहेत.

छत्रपती शिवाजी महाराजांनी स्थापन केलेल्या स्वराज्याचा विस्तार त्यांच्यानंतरही मराठेशाहीच्या नावाने अस्त्विात ठेवण्याचे कार्य त्या त्या कालखंडात मराठेशाहीचे नेतृत्व करणाऱ्यांनी ठेवले. भारतभर मोगलांची सत्तात्यांचे वाढते प्रस्थ, प्रभाव, वाढताना एकेकाळी असे जाणवत होते की मराठेशाही राज्याचे अस्तित्व धोक्यात येते की काय? परंतु मराठेशाहीच्या पडत्या काळामध्ये पेशवा बाळाजी विश्वनाथ यांनी मराठेशाहीला संजीवनी दिली. मराठेशाहीचे नेतृत्व हे साहजिकच पेशव्यांकडे आले. बाळाजी विश्वनाथ पेशव्यांनी बलाढ्य असणाऱ्या मोगल साम्राज्या पासुन मराठेशाहीला वाचविण्याचे कार्य केले. कालांतराने मोगल साम्राज्याच्या मावळतीला सुरुवात झाली आणि मराठेशाही ही उदयोन्मुख होऊ लागली होती. बाळाजी विश्वनाथांच्या पश्चात थोरले बाजीराव पेशवा यांच्या नेतृत्वाखाली मराठेशाहीच्या साम्राज्य विस्ताराला मोठ्या प्रमाणात चालना मिळालेली आपल्याला पहावयास मिळते.

सुभेदार मल्हारराव होळकर यांनी माळवाप्रांताची जबाबदारी स्वीकारुन मराठेशाहीचा विस्तार वाढविण्यामध्ये यांचा मोठा हातभार त्या कालखंडात आहे. त्यामुळे कालांतराने थोरले बाजीराव पेशव्यांनी माळवा प्रांताची सुभेदारी "खासगी" देण्याचा त्यांचा निर्णय योग्य राहिला. यातुनच होळकरशाही ही जन्माला आली. सुभेदार मल्हारराव होळकर यांनी एकनिष्ठेने मराठेशाहीची सेवा केल्याने त्याचेफळ त्यांना होळकरशाही राज्याच्या माध्यमातून मिळालेले आहे. सुभेदार मल्हारराव होळकर यांच्या पश्चात होळकरशाच्या राज्याची धुरा देवी श्री अहिल्याबाई होळकर यांच्याकडे आली यांनी संपूर्ण भारता मध्ये होळकरशाहीच्या माध्यमातून मराठेशाहीचे नाव लौकिक केले.

यशवंतराव होळकर यांच्या युध्दविषयक धोरणांचा, डावपेचांचा, अभ्यास करताना लक्षात येईल की, यशवंतरावांनी एवढ्या प्रखरतेने युध्दधोरणांचा अभ्यास का केला असेल तर त्यांना त्यांच्या मराठेशाहीच्या उत्तरार्धातील काळामध्ये भारतामध्ये इंग्रजांनी लहान मोठ्या संस्थानिकांना ईस्टइंडिया कंपनीच्या माध्यमातुन त्यांच्यावर नियंत्रण स्थापीत करण्याचा प्रयत्न दिसत होता. इतर संस्थानिकांना इंग्रजांच्या साम्राज्य विस्तार धोरणाकडे दुर्लक्ष करुन आपल्या स्वत:च्या राज्याचे संरक्षण कशा पध्दतीने करता येईल. याकडे लक्ष होते, तर यशवंतराव इंग्रजांच्या चाललेल्या हालचालीवर लक्ष ठेवून होते. त्यांच्या दुरदृष्टी व अनुभवातुन असे लक्षात आले की इंग्रज हे ईस्टइंडिया कंपनीच्या माध्यमातून आपल्या राज्यापर्यंत एकना एक दिवस येऊन पोहचणार आणि मराठेशाहीराज्य हे धोक्यात येवू शकते त्या दृष्टीने यशवंतराव होळकर यांनी इंग्रजांच्या विरुध्द आपले लष्करी धोरण, भूमिका घेताना दिसतात.

यशवंतरावांच्या लष्करी कार्याची व्याप्ती ही संपूर्ण भारतभर दिसुन येते. यशवंतरावांच्या कार्यकाळात इंग्रजांच्या वाढणाऱ्या लष्करी कारवाया आणि युध्दजन्य परिस्थितीचा विचार करुन त्यांनी इंग्रजांच्या विरुध्द आपले युध्दविषयक धोरण, डावपेच, भूमिका, सैन्यदलांना प्रोत्साहन, गनिमीकावा युध्द तंत्राद्वारे हल्ले इत्यादी विषयी इंग्रजांच्या विरुध्द युध्दविषयक धोरण ठरवलेले दिसते.

यशवंतरावांनी आपल्या लष्करी व्यवस्थेत आसणाऱ्या विविध सैन्यदलांना शस्त्रसज्ज करण्याचा निर्णय घेतला त्यावेळी यशवंतराव हे इंग्रजांच्या विरुध्द युध्द पुकारणार हे सहज लक्षात येईल. मराठेशाहीमध्ये पारंपारिक पध्दतीने पायदळा पेक्षा घोडदळास अधिक महत्व होते. परंतु यशवंतराव होळकर यांनी घोडदळा बरोबरच पायदळ, सैन्यदलही प्रामुख्याने ठेवले होते. इंग्रजांची युध्दनिती ही

पायदळाच्या माध्यमातून युध्द करण्याची होती. आणि मैदानी प्रदेशातील भूभागावर युध्द लढले जात त्यामुळे यशवंतरावांनी घोडदळाबरोबरच पायदळाचाही इंग्रजांच्या विरुध्द काही काळ युध्दलढण्यासाठी उपयोग केला.

यशवंतराव होळकर यांची युध्दा विषयीची भूमिका ही अभ्यासपूर्ण दिसते, शत्रुची इतंभूत माहिती आपल्या गुप्तहेरा द्वारे आली असता त्यावर शत्रुच्या विरुध्द कोणती युध्दनीती अवलंबवावी या विषयी नियोजन करत शत्रुला कशा पध्दतदीने कोंडीत पकडुन त्याचा पराभव करावा ही भूमिका यशवंतराव आखत यशवंतरावांना इंग्रजांच्या विरुध्द लढताना आपल्या शस्त्रास्त्रा विषयीच्या मर्यादा माहिती असताना सुध्दा इंग्रजांच्या विरुध्द आपल्या घोडदळाच्या सैन्य संख्येवर इंग्रजांचा युध्दात पराभव करु शकतो. हे त्यांच्याकडे असणाऱ्या उच्चप्रतिच्या मनो ‘‘धैर्यावर अवलंबून होते.

आजपर्यंत मराठेशाहीच्या कालखंडामध्ये कोणत्याही नेतृत्वाने किल्ल्याचा आश्रय घेऊन शत्रुच्या विरुध्द युध्द लढलेले नाही. मराठेशाहीच्या उत्तरकालखंडातही यशवंतराव होळकर यांनी किल्याचा आश्रय घेऊन इंग्रजांच्या विरुध्द एकही युध्द लढले नाही, यशवंतरावांनी जी काही युध्दे केली ती घोडदळाच्या माध्यमातून मैदानी प्रदेशातील गनिमीकावा युध्द तंत्राचा वापर करुन युध्दे लढलेली आहेत.

यशवंतरावांची रणनिती ही युध्दामध्ये सर्वांनी एकाच ठिकाणी गोळा होवुन शत्रुसैन्यावर आक्रमण करण्यासाठी नव्हती तर शत्रूच्या सैन्याला वेगवेगळे करुन आपल्या सैन्यदलास विभागण्यात येत असे जरी या युध्दात आपल्या एका सैन्यदलाचा पराभव झाला तरी दुसरे सैन्यदल हे युध्दासाठी तयार असावे ही थकण्याची रणनिती शत्रुच्या विरुध्द यशवंतराव अवलंब करताना दिसुन येतात.

यशवंतरावांना ज्या दिशेला जाऊन शत्रुवर आक्रमण करावयाचे असेल त्या दिशेला कधी जात नसत आपल्या गुप्त हेराद्वारे दुसरीकडे जाण्याची अफवा पसरवत परंतु ज्या दिशेकडे यशवंतरावांना जायचे त्या दिशेची बातमी बाहेर फुटू देत नव्हते हा गनिमीकावा युध्दतंत्राचा वापर यशवंतराव करत

यशवंतराव होळकर एकीकडे इंग्रजांना मैत्रीपूर्ण पत्रव्यवहार करुन दुसरीकडे संस्थानिकांना इंग्रजांच्या विरुध्द युध्दकरण्यासाठी पत्रव्यवहार चालु होता. यशवंतरावांनी शत्रुला गाफिल ठेवून आपली शक्ति व सर्वांना एकत्रीत करुन हल्ला करण्याचे त्यांचे नियोजन दिसते.

यशवंतरावांचे युध्दातील आक्रमण हे अशा पध्ततीचे होते की, शत्रुच्या सैन्यावर गतिमानतेने तुटून पडणे, आक्रमकपणे हल्ला करणे शत्रुसैन्याच्या मनामध्ये भयाचे वातावरण निर्माण करणे जेणे करुन हे सैन्य युध्दाचे रणांगण सोडून पळुन जावे. यशवंतरावांचे सैन्यदल विशेषत: घोडदळ मैदानी प्रदेशातील गनिमीकावा युध्द तंत्रामध्ये तरबेज होते. शत्रुचे जेवढे नुकसान करता येईल तेवढे जास्त नुकसान करावे आणि ते ठिकाण सोडून जावे. अशा प्रकारे आक्रमण करण्याची त्यांची युध्दनीती होती. "यशवंतराव युध्दाच्या वेळी आपले सैन्यदलाची लहान लहान गटामध्ये विभागणी करुन दुर दुर अंतरावर जात असत. शत्रुसैन्यास पेच पडे की हल्ला नेमका कुणावर करावा? जर एखाद्या सैन्यदलाच्या गटावर शत्रुने हल्ला करण्यास पुढे आला असता त्या सैन्यदलास आपला पाठलाग करण्यास लावत जेणे करुन शत्रुसैन्याची एकत्रीत सैन्य संख्या कमी होत आणि दुसऱ्या गटाने शत्रुच्या दुसऱ्या सैन्यदलावर हल्ला करावा त्यामुळे शत्रुची शक्ति कमी, कमकुवत व्हावी, त्यांच्यात विस्कळीपणा यावा आणि शत्रुचा रणांगणात पराभव करावा अशा पध्दतीने यशवंरताव होळकर शत्रुवर आक्रमण करण्याची त्यांची भूमिका, रणानितीच्या ठिकाणी दिसुन येते.

यशवंतरावांनी जितक्याही लष्करी मोहीमा असो की शत्रुच्या विरुध्द युध्द असो आपली पारंपारिक पध्दतीने लष्कराची गनिमीकावा युध्दतंत्राची पध्दत सोडलेली नाही यशवंतरावांनी गनिमीकावा युध्दतंत्राच्या लढण्याच्या पध्दतीमध्ये भौगोलिक रचनेनुसार थोडा बदल केलेला आहे. गनिमी कावा युध्दतंत्र हे दऱ्या, खोऱ्यात, डोंगर भागात लढण्याची ही कला यशवंतरावांनी उत्तरभारतातील मैदानी प्रदेशातील सपाटभूमीवर घोडदळाच्या माध्यमातुन गनिमीकावा युध्दतंत्राचा वापर करुन इंग्रजांचा सातत्याने पराभव केला व त्यांना हतबल केले होते. यशवंतराव होळकर यांच्या उत्तम प्रकारच्या लष्करी व्यवस्थेसह त्यांनी मैदानी प्रदेशातील गनिमीकावा युध्दतंत्राचा उपयोग हा त्यास इंग्रजांच्या विरुध्दच्या युध्दात यशस्वी ठरलेले पहावयास मिळते.

यशवंतराव होळकर यांनी गनिमीकावा युध्दतंत्राच्या पध्दतीमध्ये इंग्रजांच्या विरुध्द हल्ला करण्यासाठी त्यांच्या सैनिकांना अचानकपणे हल्ला करुन धक्का देणे,त्यांना चकित करुन सोडणे, समोरचा शत्रु सावरायच्या आत त्यांच्यावर तुटुन पडणे, मैदानी प्रदेशात शत्रुच्या सैन्याला आपला पाठलाग करण्यास लावुन थकण्याची युध्दनीती त्यांच्या विरुध्द वापरणे, शत्रुच्या सैन्यदलात फुट पाडून त्यांच्यावर एकएकट्याने हल्ला करणे त्यांना हतबल करणे त्यांना रणांगण सोडून जाण्यासाठी

प्रवृत्त करणे अशा प्रकारे यशवंतरावांनी मैदानी प्रदेशामध्ये घोडदळाच्या माध्यमातून गनिमीकावा युध्दतंत्राचा वापर केलेला पहावयास मिळतो.

यशवंतरावांनी मराठेशाहीच्या उत्तरकालखंडात संपूर्ण भारतात व लहान मोठ्या संस्थानिक आणि जागितक स्तरावर आपले युध्दातील गुणकौशल्याच्या आधारावर इंग्रजांना सातत्याने पराभव पहावा लागला. एक वेळ अशी आली होती की भारतातुन इंग्रजांना हाकलुन देण्यात यशवंतराव यशस्वी होतात की काय अशी परिस्थिती निर्माण झाली होती. इंग्रजांना वाटत होते की, आपल्या साम्राज्य विस्ताराच्या ध्येय धोरण स्वप्नांमध्ये यशवंतराव अडसर ठरत आहे. भारतातील इंग्रजांचा गव्हर्नर मार्क्विस वेलस्ली यास यशवंतरावांच्या भारतभर झंझावातामुळे इंग्लंडला परत बोलावुन घेण्याची नामुष्की इंग्लंडच्या संसदेवर आली होती. एवढा पराक्रमी, धाडसी यशवंतरावांचे नेतृत्व त्या काळी इंग्रजांच्या विरुध्द प्रभावी ठरले होते.

होळकरशाहीच्या राज्याला साजेल अशा प्रकारचे कार्य भानपुरा या ठिकाणी सामारिक दृष्टीने बांधलेले किल्ले, लष्करी छावणी, त्याच बरोबर, आपल्या राज्याच्या लष्करी व्यवस्थेत इंग्रजांच्या तोडीसतोड, नावली याठिकाणी तोफा ओतण्याचा निर्माण केलेला कारखाना असो की आपले विविध सैन्य दलास लागणारी अत्याधुनिक प्रकारची शस्त्रास्त्रे निर्मिती करण्याकडे त्यांचा कल होता.

यशवंतराव होळकर यांनी होळकरशाही राज्याच्या आखत्यारीत असणाऱ्या 80 परगण्यांच्या संरक्षणाची जबाबदारी यशवंतरावांवर येवून पडली होती. होळकरशाहीला अबाधित व दुसऱ्याच्या हातात जाऊ न देण्यासाठी त्यांनी सातत्याने परकियांशी आणि स्वकियांशी संघर्ष केलेला पहावयास मिळतो.

यशवंतराव होळकर यांनी आपले संपुर्ण आयुष्य हे घोड्याच्या खोगीरावर घालवले आहे. जो पर्यंत माझ्या अंगाखाली घोडा आहे तो पर्यंत संपूर्ण जग हेच माझे घर आहे. अशा पध्दतीची त्यांची घोडदौड, संपूर्ण भारतभर त्याकाळी इंग्रजांच्या विरुध्द युध्दात दिसुन येते. यशवंतरावांनी इंग्रजांच्या विरुध्द भारतातील लहान मोठ्या संस्थानिकांना आव्हान केले होते की, भारतातुन इंग्रजांना हाकलुन लावण्याशिवाय पर्याय नाही. त्यांच्या जोखडातून त्याशिवाय मुक्ती नाही यासाठी राजे, रजवाडे संस्थानिकांनी इंग्रजांच्या विरुध्द युध्दाला सुरुवात करावी व मला त्यांच्या विरुध्द लढण्यासाठी सहकार्यही करावे अशा प्रकारचे आव्हान यशवंतराव संस्थानिकांना सातत्याने करताना दिसतात.

त्यांच्यातील राष्ट्र भक्ती, राष्ट्राभिमान, आपल्या मातृभूमीच्या संरक्षणासाठी सातत्याने इंग्रजांचा पराभव केला. त्यांची असणारी दुरदृष्टी पहाता इंग्रजांना भारतातुन हाकलुन लावल्या शिवाय आपली राज्येही सुरक्षित राहु शकत नाहीत. या परकियांना आपल्या भूमी वरुन हद्दपार करावेच लागेल. या उद्देशाने यशवंतरावांनी आपली लष्करी सैन्यदले शस्त्रास्त्रांनी, तोफखाना दलांनी अत्याधुनिक केलेल्या होत्या.

यशवंतराव होळकर यांनी आपल्या लष्करी व्यवस्थे अंतर्गत असणाऱ्या विविध सैन्यदलापेक्षा घोडदळास जास्त महत्व दिले होते.

यशवंतरावांनी परकियांकडून व स्वकीयाद्वारे शस्त्रास्त्रे खरेदी केलेच पण स्वत:च्या सैन्यदलास इतरांपेक्षा वेगळे शस्त्रास्त्रांनी सुसज्ज करण्यासाठी स्वत:चे शस्त्रास्त्रे निर्मितीचे कारखाने निर्माण केलेले पहावयास मिळतात.

यशवंतराव होळकर यांनी आपल्या सैनिकांना उत्तम प्रकारचे सैनिकी प्रशिक्षण देण्यासाठी प्रशिक्षण केंद्राची निर्मिती केली होती. यशवंतरावांना भारतातील सर्वोत्कृष्ट सेनापती म्हणावे लागेल. कारण त्यांनी विविध सैन्यदलांना त्यांच्या विभागानुसार सैनिकांना प्रशक्षिण देण्याची व्यवस्था केलेली होती.

एकंदरीत यशवंतराव हे आपल्या सैन्यप्रति, युध्दाच्या प्रशिक्षणा प्रति, सैन्याची प्रामणिकता, एकनिष्ठपणा, चपळता, गतिमानता, शत्रु सैनिकांवर आपल्या सैन्यादलांचा प्रभाव असावा त्यांचे मनोधैर्य हे उच्च प्रतिचे असावे यासाठी यशवंतरावांनी आपल्या लष्करी व्यवस्थे अंतर्गत असणाऱ्या विविध सैन्यदलांना प्रशिक्षण देण्याचे कार्य करत होते.

यशवंतरावांनी युध्दासाठी लागणारी वेगवेगळ्या प्रकारची शस्त्रास्त्रे, तोफा निर्माण केल्या होत्या. ज्या यशवंतरावांच्या समकालीन असणाऱ्या इतर संस्थानिकांमध्ये दिसत नाही.

मराठेशाहीच्या संपूर्ण कालखंडाचा विचार करता स्वत:च्या संरक्षणा करिता चिलखतधारी पोशाख, शिरस्त्राण कवच युध्दात वापरण्यासाठी निर्माण केलेला एकमेव मराठा सरदार, होळकरशाही चा राजा, यशवंतराव होळकर हे दिसतात. युध्दावर प्रेम करणारा हा अवलिया मराठेशाहीमध्ये एकटेच यशवंराव दिसतात.

यशवंतराव होळकर यांनी स्वकियांशी होळकरशाही वाचविण्यासाठी आणि मातृभूमीच्या रक्षणासाठी इंग्रजांशी मराठेशाहीच्या उत्तरकार्याकाळात संघर्ष करताना दिसतात. इंग्रजांचा वाढता प्रभाव लक्षात घेता. यशवंतरावांनी संपूर्ण भारतभर घौडदौड केली परंतु त्यात त्यांना यश येताना दिसत नाही. नाऊमेद न होता. यशवंतरावांनी आपल्या स्वत:च्या कार्यकर्तृत्वावर होळकरशाही आणि मराठेशाहीचे संरक्षण करण्यासाठी सातत्याने प्रयत्न केलेले दिसतात.

**प्रकरण पहिले**

# प्रस्तावना

---

1.1 प्रस्तावना

1.2 उपलबध साहित्याचे पुनर्निरक्षण

1.3 संशोधनाचा उद्देश

1.4 संशोधनाची गृहितके

1.5 संशोधन पध्दती

1.6 तथ्य संकलन पध्दती

1.7 संशोधन व्याप्ती आणि मर्यादा

1.8 प्रकरणाची मांडणी

1.9 भौगोलिक ऐतिहासीक पार्श्वभूमी

1.10 मल्हारजी होळकरास सरंजाम खर्चास देणे.

1.11 अहिल्याबाई होळकर यांच्या मृत्यूनंतर होळकरशाहीची राज्य व्यवस्था

संदर्भ सुची

# प्रकरण पहिले

## 1.1 प्रस्तावना :-

त्या त्या सामाजिक कालखंडातील थोर व्यक्तींच्या कार्य कर्तृत्वामुळे मानवी जीवन ढवळून निघत असते. या मानवी जीवनाचा विचार करता 16 व्या शतकामध्ये छत्रपती शिवाजी महाराजांनी स्वराज्याची मुहूर्त मेढ रोवून त्याचा वेगवेगळ्या कालखंडात वटवृक्ष होताना आपल्याला दिसून येतो. मराठेशाहीच्या कालखंडाचा आपण आढावा घेत असताना छत्रपती शिवाजी महाराजां पासून ते पेशव्यांचा कालखंड पहावा लागेल. पेशव्यांच्या कालखंडात मल्हारराव होळकरां सारख्या सुभेदाराला संधी प्राप्त होवून या संधीच सोन करण्यास मल्हाररावांनी वेळ दडवलेला नाही. यातच होळकर यांच्या पिढ्यांचे मराठे शाहीमध्ये काय योगदान आहे हे पहावे लागते. होळकर घराण्यातील यशवंतराव होळकरां सारख्या शूर सेनानीचा अभ्यास करण्यासाठी सुभेदार मल्हारराव होळकर यांच्या पासून थोडक्यात आढावा घ्यावा लागतो. होळकर घराण्यातील अनेक सरदारांनी मराठेशाहीची सेवा ही आपल्या युध्दकौशल्य, नेत्तृत्व आणि युध्दनिती, युध्द पध्दतीच्या जोरावर उत्तर भारतात केलेली आहे.

मध्ययुगीन कालखंडात भारताच्या भूमीमध्ये अनेक राजे, महाराजे, सम्राट, होऊन गेले. ज्यांनी आपल्या स्वकर्तृत्वावर स्वत:चे राज्यनिर्माण केलेले आपल्याला दिसुन येते. मातृभूमीच्या रक्षणासाठी अनेकांनी स्वत:चे बलिदान दिलेले आहे. यामध्ये प्रामुख्याने पहिला बालाजी पेशवा यांच्या नेतृत्वाखाली सुभेदार मल्हारराव होळकर यांनी मराठेशाहीच्या उत्कर्षासाठी उत्तर भारतात. मराठेशाहीच्या कक्षा विस्तारण्यासाठी माळवा प्रांताची जबाबदारी पेशव्यांनी मल्हारराव होळकर यांना सुभेदारीची वस्त्रे देऊन केली. उत्तर भारतात मराठेशाहीचा विस्तार, अस्तित्व निर्माण करण्यात सुभेदार मल्हारराव होळकरांच्या घरातील वीरांचा सिंहाचा वाटा आहे. मराठेशाहीच्या माध्यमातून सुभेदार मल्हारराव होळकर यांनी आपले स्वतंत्र अस्तित्व उत्तरेकडील प्रदेशात निर्माण केले. सुभेदार मल्हाररावांनी माळवा प्रांतात आपल्या राज्याची स्थापना इ.स. 26 मे 1728 रोजी केली. या राज्याच्या माध्यमातून अटक पासून ते कटक पर्यंत मराठेशाहीच्या नेतृत्वाखाली कार्य, विस्तार केलेला आहे. सुभेदार मल्हारराव होळकर यांच्या मृत्यूनंतर त्यांची सून अहिल्याबाई होळकर या माळवा प्रांताच्या गादीवर विराजमान झाल्या. त्यांनी होळकरशाहीच्या माध्यमातून अखंड भारतामध्ये आपल्या राज्याचा आणि मराठेशाहीचा नावलौकिक व्हावा असे कार्य केलेले आहे. अहिल्याबाई होळकर यांनी त्याग,

तपस्या इत्यादीच्या माध्यमातून भारतीय इतिहास व संस्कृती मध्ये अलौकिक कार्य केलेले आहे. अहिल्याबाई होळकर यांनी सबंध भारत देशात हजारो मंदिरे, धर्मशाळा, बारवं, पाणवटे, पशु-पक्ष्यांसाठी राखीव शेती, जंगले, पाणी, चारा इत्यादींची व्यवस्था केली होती. त्याच बरोबर चार धाम-सातपुरी, बारा ज्योतिर्लिंग, तीर्थ स्थानांचा जीर्णोध्दार व नविन घाट बांधण्याचे कार्य केलेले आहे. अहिल्याबाई होळकर यांचा मृत्यू महेश्वर या ठिकाणी 13 ऑगस्ट 1795 रोजी झाला. त्यांच्या पश्चात होळकरशाहीच्या गादीवर तुकोजीराव होळकर विराजमान झाले. तुकोजीराव होळकर यांनी सुभेदार मल्हारराव होळकर यांच्या मार्गदर्शनाखाली सैनिकी शिक्षणाला सुरुवात केली होती. तुकोजीराव होळकर यांनी सैनिकी मोहिमा मध्ये उत्कृष्ट कार्य, पराक्रम, गाजवलेले होते. ज्या पध्दतीने अहिल्याबाई होळकर यांच्या कार्य काळात राज्य कारभार चालत होता त्याच पध्दतीने तुकोजीराव होळकर यांनी पुढे चालवला. कालांतराने यांचाही मृत्यू पुण्याजवळ 15 ऑगस्ट 1797 रोजी झाला. त्यांच्या नंतर गादीवर तुकोजीराव होळकर यांचे मोठे पुत्र काशीराव होळकर आले. परंतु यांच्याकडे होळकरशाहीचे नेतृत्व करण्याचे गुण नसल्याने राज्य चालविण्याची क्षमता नव्हती त्यामुळे राज्याची सुत्रे आप्तस्वकियां सोबत संघर्ष करुन होळकरशाही ची सुत्रे यशवंतराव होळकर यांनी स्वत:कडे घेतलेली दिसुन येते.

यशवंतराव होळकर यांनी आपल्या पूर्वजांचा इतिहास, रुढी परंपरा, शौर्य, मानसन्मान वाढविण्याचा सातत्याने प्रयत्न केलेला दिसतो. छत्रपती शिवाजी महाराजांनी स्थापन केलेल्या स्वराज्याचा वटवृक्ष उत्तर भारतात. वाढविण्यासाठी सुभेदार मल्हारराव होळकर यांच्या पश्चात अहिल्याबाई होळकर, यशवंतराव होळकर व त्यांच्या परिवारातील अनेक वीरांनी आपले रक्त सांडून मराठेशाहीची पताका अखंड भारत देशामध्ये फडकवत ठेवण्याचे कार्य केलेले दिसुन येते. यशवंतराव होळकर यांचा कार्यकाळ हा अशा काळामध्ये व परिस्थितीत झालेला आहे की भारतातील अधिकतर संस्थानिक, राजे, राजवाडे हे स्वत: च्या राज्याच्या सीमांचे संरक्षण करण्यासाठी आपआपसात लढत होते. याच काळात ईस्ट इंडिया कंपनीच्या माध्यमातून इंग्रज हे भारतातील संस्थानिकांमध्ये फोडा आणि राज्यकरा व आपले प्रभुत्व स्थापीत करुन, इंग्रज भारतात आपले पाय घट्ट रोवण्याचा प्रयत्न करताना दिसतात. यशवंतराव होळकर यांची दुरदृष्टी म्हणा किंवा नेतृत्व कौशल्य त्यांना इंग्रजांच्या धोरणाचा व नितीचा अंदाज लक्षात आल्याने यशवंतराव होळकर यांनी भारतातील संस्थानिकांना आव्हान करत होते की इंग्रजाना भारतातून हाकलून लावण्यासाठी सहकार्य करा व एकत्रीत या आपण

सर्वजन मिळून हे कार्य करु तसा प्रयत्न त्यांनी शेवट पर्यंत केलेला दिसून येतो. इथे यशवंतराव होळकर यांची अखंड भारताची संकल्पना दिसुन येते. यश्वंतराव होळकर यांच्या इच्छा शक्तिमुळे इंग्रजा समोर मोठे आव्हाण उभे राहिले होते. यशवंतराव होळकर यांनी मातृभूमीच्या पलीकडे जावून कर्मभूमीत स्वत:चे स्वतंत्र अस्तित्व, होळकरशाही व मराठेशाहीत निर्माण केलेले दिसुन येते. होळकरशाही व मराठेशाहीची परंपरा कायम ठेवून उत्तर भारतात आपल्या नेतृत्वाचा ठसा उमटून दाखविला इंग्रजांचा त्यांनी वेळोवेळी युध्दात केलेला पराभव अखंड भारतासाठी त्यांनी केलेला प्रयत्न त्यांची दुरदृष्टी, राष्ट्र प्रेम, युध्दकलेत नैपुण्य असणारा हा वीर योध्दा यशवंतराव होळकर छत्रपती शिवाजी महाराजांच्या गनिमीकावा युद्ध पध्दतीचा मैदानी प्रदेशात अवलंब करुन शत्रुला सळो की पळो करुन सोडले होते.

प्रस्तुत शोध प्रबंधामध्ये यशवंतराव होळकर यांच्या लष्करी कार्याचा व युध्दाशी संबंध- अभ्यास अभिप्रेत असल्याने या ठिकाणी यशवंतराव होळकरांच्या लष्करातील कार्यकर्तृत्वाचा, कृतीचा आढावा घेण्यात आलेला आहे. यशवंतराव होळकर यांनी प्रारंभीच्या कालखंडात कमी सैन्यदलाच्या बळावरच मोठ मोठ्या शत्रुशी अभूतपूर्व लढा दिलेला आहे. यशवंतराव होळकर यांनी सैन्य दलाचे संघटन, शत्रु सैन्याच्या विरुध्द वापरात आणलेली युध्द नीती. इत्यादीचा एकत्रितपणे अभ्यास करण्यासाठी या शोध प्रबंधाला मराठेकालीन यशवंतराव होळकरांचे लष्करी कार्य, एक चिकित्सक अभ्यास" हे नाव देऊन त्यांचा कालखंड निश्चित करण्यात आलेला आहे. याच्या आधारेच मराठेशाहीतील सैन्य व्यवस्था व त्यांनी युध्दात वापरलेले युध्दतंत्र, युध्दनिती, डावपेच, युध्दकौशल्य, रणनिती, शस्त्रास्त्रे, तोफखाना, बंदुका, धनुधारी दल इत्यादीच्या आधारावर यशवंतराव होळकरांच्या लष्करी कार्यकृतीचा सखोल अभ्यास करण्यात आलेला आहे.

## 1.2 **उपलब्ध साहित्यांचे पुनर्निरक्षण (Review Literature) :-**

यशवंतराव होळकर यांच्यावर वेगवेगळ्या उदा. सामाजिक, राजकीय, धार्मिक इत्यादी दृष्टीकोनातून विविध पुस्तकांमध्ये संदर्भ व अभ्यास करण्यात आलेला आहे. परंतु यशवंतराव होळकरांचा लष्करी दृष्टीकोनातून शोध व अभ्यास झालेल्या नाही हे जाणवते. त्यामुळे यशवंतराव होळकर यांच्या संबंधित लष्करी दृष्टीकोनातून अभ्यास होणे आवश्यक आहे. यशवंतराव होळकर यांच्या सैन्य व्यवस्था, युध्दनीती, शस्त्रास्त्रे, तोफखाना निर्मिती, शिस्त, त्याच बरोबर इंग्रजांच्या विरुध्द

त्यांनी केलेले युध्द व या युध्दात त्यांचा सातत्याने होत असलेला विजय इत्यादी घटकांवर प्रकाश टाकण्यात आला आहे. "यशवंतराव होळकरांचे लष्करी कार्य: एक चिकित्सक अभ्यास" हा विषय निवडताना तत्पूर्वी या विषयावरती संशोधन झाले आहे का? कोणत्या दृष्टीकोनातून संशोधन झाले आहे. याचे अवलोकन केलेले आहे. या शोध प्रबंधामध्ये यशवंतराव होळकरांच्या दुर्लक्षित राहिलेल्या लष्करी दृष्टीकोनातून सविस्तरपणे अभ्यास होणे आवश्यक आहे. त्यामुळे शोध प्रबंधाच्या माध्यमातून विषयाची निवड करण्यात आलेली आहे.

### 1.3 **संशोधनाचा उद्देश :-**

प्रस्तुत संशोधनाचा उद्देश हा पुढील प्रमाणे आहे.

1. यशवंतराव होळकरांच्या सर्वांगीण कार्य - कर्तृत्वाचा अभ्यास करणे.
2. यशवंतराव होळकरांच्या लष्करी व्यवस्थेचा अभ्यास करणे
3. यशवंतराव होळकरांच्या युध्दनिती शास्त्राचा अभ्यास करणे
4. यशवंतराव होळकर यांनी लढलेल्या युध्दतातील लष्करी कार्याचा अभ्यास करणे
5. इंग्रजाविरुध्द युध्दातील यशवंतराव होळकर यांच्या कार्याचा अभ्यास करणे

### 1.4 **संशोधन पध्दती :-**

"मराठेकालीन यशवंतराव होळकरांचे लष्करी कार्य : एक चिकीत्सक अभ्यास" या विषयाची गृहितके सिध्दकरण्यासाठी संशोधन हे नियोजन बध्द व शास्त्रीय पध्दतीने करण्यात येणार असून संशोधन अध्ययन हे वर्णनात्मक पध्दती ने करण्यात आलेले आहे.

### 1.5 **तथ्य संकलन :-**

संशोधन अध्ययनासाठी विषय क्षेत्राशी संबंधीत साहित्याचे वाचन केले आहे. संशोधन विषयाच्या विविध पैलुंना स्पर्श करणारे प्राथमिक स्त्रोत - ऐतिहासीक पत्रव्यवहार, रोजनिशी, दुय्यमस्त्रोता मध्ये ऐतिहासिक संदर्भ ग्रंथ, बखर, दप्तर, रुमाल, चरित्र, नियतकालीके व्यक्तीगत पत्रलेख, त्रैमासिके, मराठी, हिंदी, इंग्रजी भाषेमध्ये उपलब्ध असणारी संदर्भ ग्रंथ, इंटरनेट, वृत्तपत्रे मासिके, प्रकाशित शोध प्रबंध इत्यादीच्या माध्यमातून संशोधनासाठी लिखीत साधनांचा वापर करण्यात आलेला आहे.

## 1.6 संशोधन व्याप्ती आणि मर्यादा :-

"मराठेकालीन यशवंतराव होळकरांचे लष्करी कार्य, एक चिकित्सक अभ्यास" या विषयाच्या संशोधनासाठी यशवंतराव होळकर यांचा इ.स. 1776 ते 1811 या कालखंडाचाच आढावा घेण्यात आला आहे. उपलब्ध असलेल्या संदर्भ ग्रंथ, कागद पत्रांच्या आधारावर संशोधन करण्यात येणार आहे. संशोधनाची उद्दिष्ट्ये व शीर्षक लक्षात घेता. या विषयास यथोचित न्याय देण्यासाठी गृहित कृत्यांना विचारात घेऊन संशोधन पूर्ण करण्याचा प्रयत्न असणार आहे. केवळ प्रस्तुत संशोधनामध्ये यशवंतराव होळकर यांच्या युध्दांचा त्यांच्या भूमिकेचा, लष्करी व्यवस्थेचा शस्त्रप्रणाली, युध्दनिती, इंग्रजाच्या विरुध्द युध्दांचा, संस्थानिकांना एकत्रीत करण्याचे आव्हाण, युध्दाचे वर्णन, युध्द नेतृत्व इत्यादीची सविस्तर मांडणी करुन एकुण सात प्रकरणा मध्ये विभागणी करण्यात आलेली आहे. पहिल्या प्रकरणामध्ये विषयाची प्राथमिक स्वरुपात ओळख करुन देण्यात आलेली आहे. यामध्ये प्रस्तावना उपलब्ध साहित्याचे पुर्ननिरिक्षण, संशोधनाचा उद्देश, गृहितके, संशोधन पध्दती, तथ्य संकलन, संशोधनाची व्याप्ती आणि मर्यादा ज्या विषयावर संशोधन करणार आहे त्या विषयाची पार्श्वभूमी, इतिहास, माळवा प्रांताचे महत्व, वर्चस्व, भौगौलिक स्थिती, माळवा प्रांतातील सुभेदार मल्हारराव होळकर यांना दिलेली खासगी जहागीर, त्यांच्या राज्यकारभारा विषयी थोडक्यात माहिती उत्तर भारतात सुभेदार मल्हारराव होळकर यांचे कार्य इत्यादींचा थोडक्यात आढावा घेण्यात आलेला आहे. दुसऱ्या प्रकरणामध्ये यशवंतराव होळकर यांचे जीवन चरित्र, तिसऱ्या प्रकरणात यशवंतराव होळकर यांची लष्करी व्यवस्था, चौथ्या प्रकरणामध्ये यशवंतराव होळकर यांची रणनीती व लढाई विषयी धोरण, पाचव्या प्रकरणात यशवंतराव होळकर यांचे तत्कालीन भारतीय राजकारण व सत्ता संघर्ष, सहाव्या प्रकरणात यशवंतराव होळकर यांच्या लढाया, सातव्या प्रकरणामध्ये मुल्यमापन व निष्कर्ष मांडण्यात आलेला आहे.

## 1.7 प्रकरणाची मांडणी :-

प्रस्तावित संशोधनात पुढील प्रमाणे प्रकरणाची मांडणी करण्यात आलेली आहे.

### प्रकरण पहिले :- प्रस्तावना

प्रकरण पहिल्या मध्ये विषयाला अनुसरुन गृहीतके, उद्दिष्ट्ये, संशोधन पध्दती आणि विषयाचे महत्व सांगण्यात आलेले आहे. त्याच बरोबर या प्रकरणामध्ये मराठेशाहीच्या उत्तरेकडील

विस्तारासाठी होळकर घराण्यातील सुभेदार मल्हारराव होळकर यांच्या पासुन ते भारत स्वतंत्र होण्यापर्यत होळकर घराण्यातील राज्यकर्त्यांचे थोडक्यात कार्य व राज्यकारभारा संबंधीची माहिती तसेच उत्तर भारत व माळवा प्रांतातील होळकर सत्तेचे महत्व या दृष्टीने थोडक्यात आढावा घेण्यात आला आहे.

**प्रकरण दुसरे :- यशवंतराव होळकर यांचे जीवन चरित्र**

दुसऱ्या प्रकरणामध्ये यशवंतराव होळकर यांचा जन्म, कौटूंबीक माहिती, शिक्षण, वेशभुषा, कार्य कर्तृत्व, नाणी, डाक, व्यवस्था, तोफा बनविण्याचा कारखाना, यशवंतरावांचे नेतृत्व, त्यांचा राज्याभिषेक, राज्य विस्तार, आर्थिक उत्पन्न, यशवंतरावांची युध्दजिज्ञासा इत्यादी विषयी आढावा घेण्यात आलेला आहे.

**प्रकरण तिसरे :- यशवंतराव होळकर यांची लष्करी व्यवस्था**

यशवंतराव होळकर यांची लष्करी व्यवस्था या प्रकरणामध्ये त्यांच्या लष्करी व्यवस्थे मध्ये घोडदळ, पायदळ, युध्द योजना, प्रत्यक्ष कार्यवाही, आक्रमण, पुरवठा, व्यवस्था, गुप्तहेर व्यवस्था, सैन्य शिबीरे इत्यादींचा आढावा घेण्यात आलेला आहे.

**प्रकरण चौथे :- यशवंतराव होळकर यांची रणनिती आणि लढाई विषयी धोरण**

या प्रकरणामध्ये यशवंतराव होळकर यांची रणनिती व लढाई विषयी त्यांचे धोरण, युद्धाची व्याख्या, स्वरुप, व्याप्ती, युद्धजन्य परिस्थिती, युद्धातील भूमिका, रणनिती, आक्रमक धोरण, प्रत्यक्ष कारवाई, पुरवठा व्यवस्था, गणिमीकावा युद्ध तंत्र इत्यींचा आढावा घेण्यात आलेला आहे.

**प्रकरण पाचवे :- यशवंतराव होळकर यांचे तत्कालीन राष्ट्रीय राजकारणातील सत्ता संघर्ष**

यशवंतराव होळकर यांचा राष्ट्रीय राजकरणातील सत्ता संघर्ष हा इंग्रजांच्या विरुध्द दिसुन येतो. त्यांचा वाढता प्रभाव आणि यशवंतरावांची इंग्रजांच्या विषयी असणारी राजकीय भूमिका व त्यांचा वाढता प्रभाव भारतातील विविध संस्थानिकांना इंग्रजांच्या विरुध्द एकत्रित येण्याचे आव्हान व यातुनच अखंड भारताची संकल्पना रुझताना दिसुन येते.

**प्रकरण सहावे :- यशवंतराव होळकर यांच्या लढाया**

यशवंतराव होळकर यांच्या लढाया या प्रकरणामध्ये त्यांनी केलेल्या लढाया ह्या स्वकियांशी असो की इंग्रजांशी यांचा आढावा घेण्यात आलेला आहे. यशवंतरावांनी इंग्रजांच्या विरुध्द लढलेल्या युध्दाचे वर्णन प्रामुख्याने या प्रकरणामध्ये करण्यात आलेले आहे.

**प्रकरण सातवे :- मुल्यमापन व निष्कर्ष**

या प्रकरणामध्ये वर्णनात्मक पद्धतीच्या माध्यमातून प्राप्त झालेल्या तथ्यांच्या आधारे निष्कर्ष, शिफारशीचे प्रतिपादन करण्यात आले आहे तसेच या प्रकरणामध्ये प्रस्तुत संशोधनाचे मुल्यमापन व सारांश मांडण्यात आलेले आहे.

## 1.8 माळवा प्रांताची भौगोलिक, ऐतिहासिक पार्श्वभूमी :-

सातपुड्याच्या दक्षिणेकडे तापी व विंध्याद्रीच्या दक्षिण उतरणीवर नर्मदा असून त्याच्या पलीकडे माळवा प्रांताची सीमा लागते.[1] नर्मदा नदीमुळे दक्षिण भारताची सीमा ही निश्चित झालेली आहे. माळव्याच्या पूर्वेकडे बुंदेलखंड, पश्चिम बाजूला राजपुताना तर उत्तर पूर्वेकडील बाजूला गुजराथ आणि उत्तरेकडील आग्ऱ्याचा सुभाहोता. अशा प्रकारे माळवाप्रांत हा केंद्रस्थानी असल्याने या प्रांताला मध्यभारतात महत्वाचे स्थान प्राप्त झालेले होते. दक्षिणकडे व गुजराथ या प्रांतामध्ये जाण्यासाठी व्यापारासाठी, लष्करी हालचालीच्या दृष्टीने असो की लष्करी भुगोलाच्या आणि भुराजकीय रणनितीच्या दृष्टीने हा मार्ग माळवा प्रांतात महत्वाचा मानला जात असे. माळवा प्रांतात लष्करी छावण्या स्थापीत केल्यावरच राजपूताना किंवा गुजराथ या प्रांताशिवाय बुंदलेखंड या प्रांतावर नियंत्रण स्थापीत करणे शक्य होत होते. माळवा प्रांत कृषी उत्पादन व कापड उद्योगासाठी उपयुक्त असा समृध्द प्रांत होता.

माळवा हा प्रांत भुराजकीय दृष्टीकोनातून महत्वाचा मानला जातो कारण उत्तरेकडील संस्थानिक असो की दिल्लीवर सत्ता चालवणारे असो यांना दक्षिण भारतात जाण्यासाठी माळवा प्रांतातून जावे लागते. त्यामुळे भारताच्या केंद्रस्थानी असणारा हा प्रांत त्या त्या कालखंडात महत्वाचा मानला गेलेला आहे. माळवा प्रांतावर ज्याचे वर्चस्व राहिले आहे त्याचे आजुबाजुच्या प्रदेशावर आणि भौगोलिक व भुराजकीय दृष्टीने महत्वाचा ठरलेला आहे.

दखखनच्या उत्तरेकडील सीमा या कठीण असल्याने दक्षिण आणि उत्तर भारताचे अशा पध्दतीने दोन भाग झालेले होते.[2] उत्तर आणि दक्षिण हे भाग भौगोलिक रचनेमुळे निर्माण झालेले आहे. दऱ्या, खोऱ्यांचा प्रदेश, मोठमोठी शिखरे, नद्या या भागामध्ये असल्याने दक्षिणे कडील उत्तर भागाच्या सीमा ह्या कठीण होत गेल्या त्या काळात नैसर्गीक साधन संपत्ती व जंगले, झाडे मोठ्या प्रमाणात असल्याने माळवा प्रांताचे दोन विभागा मध्ये उप्तर आणि दक्षिण अशी विभागणी झालेली दिसून येईल.

उत्तरेला काही घडामोडी झाल्यास त्याची झळ दक्षिणेला कदाचित बसत होती.[3] उत्तरेकडील मोहिमाह्या मोठ्या प्रमाणात परकीय आक्रमणांनी व्यापलेल्या होत्या. उत्तरेकडे असणारी दिल्लीची सत्ता ही परकियांना आक्रमण करण्यासाठी आकर्षीत करीत असे त्यामुळे बहुतांशी परकीय युध्दाच्या मोहिमा उत्तर भारतात होत होत्या. दक्षिणेचा भाग हा परकीय आक्रमणासाठी दुर अंतरावरचा जंगल प्रदेश असल्याने दक्षिणेकडे होणाऱ्या मोहिमा ह्या परिकियांच्या कमीच झालेल्या दिसतात. ज्यांनी दक्षिणेकडे येण्याचा प्रयत्न केला. किंवा आले तर ते बहुतांशी परत गेले नाहीत. त्यामुळे दक्षिणेला उत्तर भारतातील परकिय आक्रमणाच्या झळा ह्या कमी बसलेल्या दिसून येतात. त्याच बरोबर प्रथम तापी नदी, सातपुड्याच्या भूल भलावणांचा डोंगराळ प्रदेश नर्मदा नदी व शेवटी विंध्याहीची उभी भिंत अशा प्रकारच्या नैसर्गीक सीमा ह्या दक्षिण देशाच्या उत्तरेला आहेत माळव्यामध्ये प्रवेश करण्यासाठी त्यावेळी नर्मदानदीच्या पलीकडे तांडा, भैरव, नालच्छा इत्यादी घाट होते.[4] मोठ्या प्रमाणात डोंगराळ प्रदेश, विंध्याद्री पर्वत इत्यादी नैसर्गीक सीमा असल्याने माळवा प्रांत हा दिल्लीश्वरांच्या दृष्टीने दक्षिणेकडे जाण्यास एकमेव मार्ग होता. परकिय आक्रमण करणाऱ्यांना हा प्रदेश तसा नवाच त्यामुळे यांचे या भागाकडे दुर्लक्ष होते. जाण्यासाठी ह्या खुश्कीचा मार्ग त्यांनी निर्माण केलेला दिसून येईल.

घाट ताब्यात घेणे म्हणजे माळव्याची प्रवेशद्वारे हस्तगत केल्यासारखे होते.[5] विंध्याद्री चढून गेल्यावर उत्तरेच्या बाजूस बेटवा, चंबळ, सिंधु, माही, पार्वती, इत्यादी नद्या माळव्यातून उत्तरेकडे पाहत जातात. माळवा प्रांतातून दक्षिणेकडे वाहणारी नर्मदा नदीमुळे दक्षिण भारताची नैसर्गीक सीमा ही निश्चित झालेली आहे. माळव्यातून उत्तरेकडे वाहत जाणाऱ्या नद्यामुळे या भागातील प्रदेश हा सुपीक झालेला असून कृषी कापड उद्योगासाठी हा प्रदेश अत्यंत अनुकूल बनलेला आहे. दक्षिण व उत्तर भारताला जोडणारा दुवा म्हणजे माळवा प्रांत हा परकीय सत्तेला शह देण्यासाठी किंवा स्वत:ची सत्ता सुरक्षित ठेवण्यासाठी महावाचा भाग होता.[6] माळवा प्रांताची सुभेदारी ज्या संस्थानिकांकडे असेल

त्यांचे दक्षिणेवर नियंत्रण असल्या सारखे होते. रणनितीच्या दृष्टीने माळवा प्रांत हा महत्वाचा मानला जातो. जो कोणी उत्तरेकडून किंवा दक्षिणेकडून येणारा, जाणारा असेल त्यावर या प्रांताच्या प्रमुखाची देखरेख असे. जर उत्तर भारतातून आक्रमण करण्यासाठी दक्षिणेकडे कोणी येत असेल तर त्याला अगोदर माळवा प्रांताच्या प्रमुखा बरोबर संघर्ष करावा लागे त्यावेळी त्याला दक्षिणेत येण्यासाठी सोयीचा येण्याजाण्याचा मार्ग होता.

पश्चिम किनारपट्टी वरील बंदरांना जोडणारे हमरस्ते हे माळव्यातून जात होते.[7] माळवा प्रांत हा मुळातच भुराजकीय दृष्टीने महत्वाचा मानला जात होता. सागरी किनाऱ्यावर जाण्यासाठी व भुप्रदेशातील मार्ग हे माळव्यातूनच जात होते. त्यामुळे या प्रांतावर मोगलांच्या काळापासून या प्रांतावर स्वत:चे नियंत्रण असावे यासाठी प्रत्येक संस्थानिक संघर्ष करताना दिसतात. विंध्य, नर्मदा आणि सातपुडा या नैसर्गीक साखळीने भारताचे विभाजन केले आहे.[8] भौगोलिक रचनेनुसार या भागाची विभागणी झालेली आहे. ही विभागणी नैसर्गीकरित्या झालेली आपल्याला पहावयास आजही मिळते. सातपुडाच्या डोंगररांगा विंध्याही पर्वत आणि नर्मदा नदी इत्यादी मुळे उत्तर आणि दक्षिण असे दोन भाग माळवा प्रांतामध्ये पडलेले दिसून येतात. पलिकडील भाग उत्तर आणि अलीकडील भागाला दक्षिण म्हणतात.[9] मुळातच हा भाग नैसर्गीक दृष्टया हा विभागला गेल्याने उत्तरेकडील भाग हा बहुतांशी मैदानी प्रदेश व सपाट आहे तर दक्षिणेकडील भाग हा डोंगररांगा व जंगलांनी व्याप्त असल्याने या दोन भागाची नैसर्गीक रचना ही वेगवेगळी झाल्याने हा भाग उत्तर आणि दक्षिण यामध्ये विभागला गेलेला पहावयास मिळतो.

दक्षिण व उत्तर हिंदुस्थानातील माळवा प्रांत हा दुवा होता. उत्तरेस दिल्लीच्या पादशाही बुंद्यावर आद्यात करणे किंवा राजपुताना, बुंदेलखंड, गुजराथ, गोंडवाना या भागावर झडप घालण्यास माळवा प्रांत हा मुख्य नाका होता.[10] माळवा प्रांत हा वेगवेगळया प्रांतामध्ये जाण्या येण्यासाठी सोयीचा मार्ग होता. दक्षिणेतून उत्तर भारतातील राजेराजवाडे यांच्याकडे जाण्यासाठी मराठ्यांना माळवा प्रांत हा महत्वाचा होता. दिल्लीची पादशाही असो की वेगवेगळया संस्थानिकां कडून करवसुली, खंडणी गोळा करण्यासाठी, नियंत्रण ठेवण्यासाठी मराठा सरदारांना माळवा प्रांत हा आवश्यक व महत्वाचा वाटत होता. थोरले बाजीराव पेशव्यांनी याचे महत्व ओळखून माळवा प्रांतावर मराठ्यांचे नियंत्रण व कब्जा असावा असे वाटत होते. त्या दृष्टीने दिल्ली व उत्तर भारतातील वेगवेगळ्या प्रांतावर मराठेशाहीचे प्रभुत्व आणि मराठेशाहीचे साम्राज्य विस्तार निर्माण करावयाचे असल्यास माळवा प्रांत हा भौगोलिक

व राजकीय दृष्टया महत्वाचा असल्याने पेशव्यांच्या कालखंडात माळवा. प्रांत आापल्या नियंत्रणाखाली असावा. त्यासाठी युध्द करण्यात आली. शेवटी थोरल्या बाजीरावाने मल्हारराव होळकर यांच्या नेतृत्वाखाली माळवा प्रांतावर आपले नियंत्रण स्थापित करण्यास सातत्याने प्रयत्न चालवले होते. त्या दृष्टीने हे कार्य थोरल्या बाजीरावांच्या आदेशाने मल्हारराव होळकर यांनी या प्रांतावर मराठ्यांचे प्रभूत्व स्थापित केलेले आपल्याला पहावयास मिळते.

अकबराच्या कालखंडा पासून माळवा प्रांता मध्ये मराठ्यांचा प्रवेश होईपर्यंत माळवा प्रांतात मोगलांच्या कार्यकाळात या भागामध्ये शांतता व सुव्यवस्था नांदत होती.[11] छत्रपती शिवाजी महाराजांच्या कालखंडा पासून माळवाप्रांतावर मराठ्यांचे हल्ले हे गनिमी कावा युध्दतंत्राच्या साहाय्याने होत होते. अशा प्रकारचे संदर्भ आढळून येतात. मोगलांच्या कालखंडामध्ये अकबराची सत्ता असेपर्यंत माळवा प्रांतामध्ये यांचे नियत्रंण होते. परंतु थोरल्या बाजीरावांचे उत्तरेकडील ध्येय धोरणे प्रभावी असल्याने माळवा प्रांताकडे मराठ्यांचे लक्ष जास्त प्रमाणात दिसू लागले. या प्रांताचे महत्व ओळखून थोरल्या बाजीराव पेशव्यांनी मल्हारराव होळकर यांच्या नेतृत्वाखाली मराठ्यांच्या नियंत्रणाखाली हा प्रांत आखत्यारित आणला. आणि मल्हाररावांच्या कार्य कर्तृत्वाचा मान ठेवून त्यांना थोरल्या बाजीरावाने खाजगी जहागिरी आणि माळवा प्रांताची सुभेदारी देण्यात आलेली दिसून येते अखेर उत्तर आणि दक्षिणेला जोडणारा माळवा प्रांत हा सुभेदार मल्हारराव होळकर यांच्या माध्यमातून मराठेशाहीच्या नियंत्रणाखाली आलेला दिसून येतो. दक्षिणेमध्ये औरंगजेब विरुध्द मराठ्यांचे युध्द चालु असताना बादशहाला शह देण्यासाठी मराठयांनी माळवयावर आक्रमण चालू केले होते.[12] भुराजकीय व रणनितीच्या दृष्टीने माळवाप्रांत हा महत्वाचा असल्याने मोगलांनी यावर आपले नियंत्रण स्थापित केले होते. दक्षिणेच्या मोहिमेवर एखादा सरदार उत्तरेकडून गेला असता त्यास परत येताना हा मार्ग सुरक्षित व संरक्षित असावा हा त्या मागचा हेतू होता. ज्यावेळी औरंगजेब दक्षिणेमध्ये आला असता त्यावेळी त्याचा परत जाण्याचा मार्ग मराठयांनी माळवा प्रांतावर हल्ले करुन बंद केलेला दिसून येईल. त्यावेळी दक्षिणे येण्याचे मोगलांचे सरदार कचरत असे एवढी दशहत मराठ्यांनी गनिमीकावा युध्द तंत्राच्या माध्यमातून निर्माण केली होती.

आश्चर्याचा धक्का देण्याच्या क्रांतीची पुर्व तयारी आहे असा भास होतो.[13] मराठ्यांनी आपले अस्तित्व उत्तरेकडे वाढविण्याच्या दृष्टीने माळवा प्रांतावर आपले नियंत्रण स्थापन करुन गनिमीकावा युध्दतंत्राच्या मदतीने हल्ले करण्यास सुरुवात केली. त्यामुळे उत्तरेकडून होणाऱ्या व दक्षिणेकडून

जाणाऱ्या शत्रुवर हल्ले केल्याने मराठ्यांनी क्रांतीची पूर्व तयारी चालु झाली आहे. अशा प्रकारचा भास. सर्वांना होऊ लागला. अशा प्रकारच्या आश्चर्याचे हल्ले माळव्यातील मराठ्यांच्या हालचालीमुळे या १७ व्या शतकातील शेवटच्या दशका मध्ये वाढलेल्या दिसतात.[14] मराठशाहीचा विस्तार हा उत्तरेकडे वाढविण्यासाठी व माळवा प्रांत हा भुराजकिय दृष्टीने किती महत्वाचा आहे. त्याचबरोबर भारतातील मोगलांची सत्ता ही कमकुवत झालेली होती. त्यामुळे मराठेशाहीचा दबदबा उत्तर भारतात. निर्माण व्हावा. या दृष्टीने थोरल्या बाजीराव पेशव्यांनी हालचाली चालु केल्या होत्या. त्याला अनुसरुन १७ व्या दशकाच्या शेवटी पेशव्यांच्या कालखंडात मराठा सरदारांच्या नेतृत्वाखाली उतर भारतात. गनिमीकावा युध्दतंत्राच्या सहाय्याने हालचाली व कारवाया केल्या.

स्वराज्याला बळकटी आणावी असा पहिल्या बाजीरावांचा हेतू होता.[15] परंतु ही बळकटी कोणात्या मार्गाने आणता येईल त्या विषयी शाहु महाराजांच्या दरबारा मध्ये मतभेद होते. त्यावेळी कर्नाटक मधील राजकारण पुढे चालवुन निजामाला कमकुवत करुन सोडावे असा ही मत प्रवाह मांडण्यांचा एक गट होता. या गटाचे नेतृत्व श्रीपतराव प्रतिनिधी आणि फतेहसिंह भोसले यांचे होते तर दक्षिणेचा प्रांत आपल्या नियंत्रणाखाली पुर्णपणे आल्याशिवाय उत्तरेकडील राजकारणात हस्तक्षेप करु नये असे दुसऱ्या गटाचे मत होते दुसरा पक्ष हा पहिल्या बाजीराव पेशव्यांचा होता पहिल्या बाजीरावांच्या मते.[16] दक्षिणेमध्ये इतक्या लोकांचे हित संबंध गुंतलेले होते की दक्षिण मिठकंटक करण्यासाठी फार वेळ लागला असता त्यामुळे अनेक अडचणी निर्माण होऊन त्यांना तोंड द्यावे लागले असते. कदाचीत नवीन काही हाती येण्याऐवजी हातचे देखील गमावून बसण्याची शक्यता होती.[17] निजामाच्या नेतृत्वाखाली कार्य करणारे जाधव, निंबाळकर इत्यादी मराठा सरदार मंडळी आपल्या जहागिरीच्या बचावासाठी निकराने लढले असते. अशा परिस्थितीत ज्या ठिकाणी कुणाचे हीत संबंध गुंतलेले नाहीत. अशा उत्तर भारतातील मुलख जिंकुन मराठेशाहीचे वैभव विस्तार वाढवावा या मोहिमे मध्ये मराठ्यांतील धाडसी पराक्रमी शौर्य गाजवणाऱ्या सरदारावर जबाबदारी द्यावी आणि संभ्रम नाहीसा करावा अशा प्रकारची योजना पहिल्या बाजीराव पेशव्यांची होती.

उत्तरेकडील मोगलसत्ता कमकुवत झाल्याने.[18] मोगलांच्या या सत्तेवर हल्ला केल्यास विजय निश्चित आहे बाजीरावांच्या या योजनेला शाहु महाराजांनी मान्यता दिलेली दिसून येते. बाजीरावांच्या या मराठेशाहीच्या उत्तरेकडील विस्ताराला चालना मिळताना दिसुन येते. दिल्लीच्या दिशेने टाकलेले हे पहिल्या बाजीरावांचे धोरण निश्चितच यशस्वी होताना दिसुन येते. पहिल्या बाजीरावाची योजना.[19]

थोरल्या बाजीराव पेशव्यांची मराठेशाहीचा विस्तार हा उत्कर्षाच्या दृष्टीने महत्वाची ठरु शकते अशी त्यांची रचना ही बाजीराव पेशव्यांच्या योजनेतून दिसते. नर्मदा विद्याद्री यांच्या मध्ये असणारी जंगले व डोंगराळ प्रदेश आपल्या ताब्यात घेऊन विद्याद्रितून दक्षिणेकडे येणाऱ्या मार्गावरील सर्व घाट आपल्या ताब्यात घेवून दक्षिणेची कायम स्वरुपी नाकेबंदी करण्यात यावी.

एकदा निजामाचा बंदोबस्त झाला की.[20] दक्षिणेमध्ये मराठेशाही तर उत्तरेला मोगल बादशाही अशा दोनच सत्ता हिंदुस्थानात राहतील हिंदुपद बादशाहीचे ध्येय यशस्वी करण्याकरिता बादशाहीतील हिंदु नागरिक आणि मांडलिक, राजपुत राजे, बाजीराव पेशव्यांना सहकार्य करण्यासाठी मनापासून अत्सुक होते संपूर्ण राज्यकारभाराची जबाबदारी पेशवा बाजीराव यांच्यावर होती.[21] बाजीराव पेशव्यांकडे मराठेशाहीच्या राज्यकारभाराची सर्वसुत्रे आली होती. मराठ्यांच्या साम्राज्य विस्ताराची ध्येय धोरणे वाढविण्यासाठी बाजीराव पेशवे योग्य कार्य करत आहेत. असा मराठ्यांच्या मना मध्ये व छत्रपती शाहुच्या मनामध्ये दिसुन येते. व्यतिरिक्त बाजीराव पेशव्यांकडे उत्तरेकडील मोहीमा काढण्यासाठी धनसंपत्ती, व सैन्याविषयी पेशवा बाजीराव व त्यांचा लहान भाऊ चिमाजी अप्पा या दोघांनी मिळून विचारविनियम करुन उत्तर भारताकडे आपली दृष्टी वळवताना दिसते.

पेशवा बाळाजी विश्वनाथ यांच्या कार्य काळापासून माळवा प्रांतात मराठे हे सक्रिय होते.[22] पेशवा बाळाजी विश्वनाथ यांच्या पूर्वी ही मराठ्यांनी माळवा प्रांता मध्ये प्रवेश केलेला होता. त्यामुळे हा प्रांत मराठ्यांच्या घोड्याच्या टापुखाली आल्याने चांगला परिचयाचा झालेला होता. मराठ्यांचे उत्तरेकडील विस्ताराचे धोरण, आणि आर्थिक वसुली ही त्या पाठीमागची भूमिका दिसुन येते. मल्हारराव होळकर हे कंठाजी कदमबांडे यांच्या सैन्यास शिलेदार असताना मल्हाररावांनी माळवा प्रांतात प्रवेश केलेला होता.[23] मल्हारराव होळकर मराठ्यांच्या नेतृत्वाखाली कार्यकरण्यापूर्वी त्यांनी खानदेशातील कंठाजी कदमबांडे यांच्या सैन्यात प्रवेश करुन स्वत:च्या युध्द कौशल्याच्या आधारावर त्यांना कंठाजी कदबांडे यांच्या सैन्यात बढती देऊन शिलेदार या पदावर कार्यकरण्याची संधी मिळाल्याने मल्हारराव होळकर ह्या परिसरात आपल्या सैन्याची घोडदौड चालू ठेवून माळवा प्रांत हा भाग जवळच असल्याने त्यांना येथील सर्व परिसराची माहिती होती त्यामुळे माळवा प्रांत हा मल्हारररावांच्या दृष्टीखाली आल्याने त्यांनी कित्येक वेळा माळवा प्रांतात प्रवेश केलेला आपल्याला दिसेल. बाळाजी विश्वनाथांच्या कारकीर्दीच्या अखेरिस मल्हाररावाने उदाजी पवार यांच्या सहकार्याने माळव्याचे राजकारण सुरु केले होते.[24] बाळाजी विश्वनाथाच्या नजरेतून मल्हारराव होळकर हा

मराठेशाहीच्या राज्यासाठी फायद्याचा ठरु शकेल. या हेतूने त्यांनी मल्हारराव होळकरांना मराठेशाहीमध्ये कार्यकरण्यासाठी संधी उपलब्ध करुन दिली. मल्हाररावांचा करारीपणा, प्रामाणिकपणा, शौर्य, धाडस, युध्दातील गाजवलेले पराक्रम यांच्या जोरावर मल्हाररावांना बाळाजी विश्वनाथ यांनी माळवा प्रांताची जबाबदारी देण्यात आलेली होती. त्यामुळे मल्हारराव होळकर यांनी उदाजी पवारां सह माळव्याचे राजकारण चालु केले होते. ज्यावेळी पेशवा बाळाजी विश्वनाथ दिल्लीहुन परत येत होते मुद्दाम बाजीरावास उत्तरेकडे ठेवले होते तेव्हा पासून माळव्याचे राजकारण आतल्या आत शिजत होते. इंदुरचा चौधरी नंदलाल मडलोई याला आपल्या बाजूने आणण्या करिता मल्हारराव होळकर आणि उदाजी पवार यांनी इ.स. 1718 पासून सातत्याने प्रयत्न चालवले होते. इ.स. 1728 पासून माळव्याच्या बाबतीत मल्हारराव होळकर.[25] उदाजी पवार, यांच्या बरोबर राणोजी शिंदे यांचे नाव लागले. उदाजी पवार व बाजीराव यांच्या मध्ये बेबनाव निर्माण झाल्याने इ.स. 1728 पूर्वी माळवा प्रांत जिंकिण्याच्या कामी मल्हारराव होळकर यांची तलवार जास्त चमकलेली दिसुन येते. कंठाजी कदम बांडे यांच्या सैन्यात शिलेदार, पदी केलेले कार्य माळवा प्रांता विषयी असलेली माहिती, अनुभव याचा विचार करुन माळव्या मध्ये मराठेशाहीचा अंमल बसविण्यासाठी व सरदेशमुखी व चौथाई वसुल करण्यासाठी बाजीराव पेशव्याने मल्हारराव होळकरास आक्टोबर 1728 च्या काळामध्ये माळव्याची जबाबदारी देण्यातआलेली दिसून येते. मल्हारराव होळकर यांच्या बरोबर मराठा सरदार पेशव्याने दिले.[26] बाजीराव पेशव्यांनी माळवा प्रांतामध्ये व उत्तरेकडे मराठेशाहीचे अस्तित्व व विस्तार करण्यासाठी मल्हारराव होळकरांच्या सोबत बाजीभीमराव, पिताजी जाधव, राणीजी शिंदे, आनंदराव पवार इत्यादी मराठा सरदारांना पाठविण्यात आले होते. या सरदारांनी मराठ्यांच्या राज्याच्या सीमा ह्या उत्तरेकडे वाढवण्यात आणि दक्षिणेकडे होणारे सततचे परकिय आक्रमण थोपविण्यासाठी आपले अस्तित्व त्याच्या भागात निर्माण करावे यासाठी मल्हारराव होळकर यांच्या बरोबर मराठा सरदारांना बाजीराव पेशव्यांनी पाठवले होते.

माळव्या व्यतिरीक्त बुंदेल खंडातून चौथाई, सरदेशमुखी व सुल करावी असा बाजीरावाचा आदेश होता.[27] बाजीराव पेशव्यांची मराठेशाही बद्दलची उत्तरेकडे विस्ताराचे धोरण होते. त्याचबरोबर दिल्लीची सत्ता कमकुवत झालेली होती. त्यामुळे उत्तरेकडील संस्थानिक, राजे राजवाडे यांच्याकडून मराठेशाहीसाठी चौथाई, सरदेशमुखी वेगवेगळ्या प्रांतातून वसुल करावी ज्या प्रांतावर दुसऱ्या कुणाचे नियंत्रण नाही अशा ठिकाणांवर आपले नियंत्रण स्थापन करावे जेणे करुन आपल्या राज्याला आर्थिक

चणचण भासणार नाही. त्याचाच भाग म्हणून बाजीराव पेशव्यांनी आपल्या मराठा सरदारांना बुंदेलखंडातूनही चौथाई, सरदेशमुखी वसुल करण्याचा आदेश देण्यात आला होता. ६ ऑगस्ट 1727 रोजी बाजीराव पेशव्यांनी मल्हाररावाच्या सरंजामासाठी ४ गुजरातेत ६ माळव्यात १ खानदेशात असे एकुण अकरा जिल्ह्यांचे उत्पन्न लावून दिले.[28] उत्तरेकडील मोहिमा मध्ये मराठेशाहीच्या विस्तारासाठी मल्हारराव होळकर यांनी चमकदार कामगिरी केली. चौथाई, सरदेशमुखीच्या वसुली मध्ये मोठ्या प्रमाणात वाढ केल्याने मराठ्यांचे राज्य उत्तरेमध्ये स्थापित करण्यासाठी त्यांचे शौर्य, धाडस, पराक्रम इत्यादी पहाता माळवा प्रांत मराठ्यांच्या आखत्यारित असावा. या दृष्टीकोनातून बाजीराव पेशव्यांनी मल्हारराव होळकरांना वेगवेगळ्या प्रांतातील जिल्हे तोडून माळवा प्रांतासह जिल्ह्याचे उत्पन्न लावून दिलेले होते. माळवाप्रांत हा अकबराच्या कालखंडा पासुन मोगल सभा होता.[29] त्यामुळे मराठयांचे वर्चस्व या प्रांतावर अबाधित राहण्यासाठी हा प्रांत मल्हारराव होळकर यांच्या नेतृत्वाखाली बाजीराव पेशवा यांनी दिला होता. मोगल सैन्य दिल्लीहून दक्षिणेकडे ज्या मार्गाने जात तो मार्ग माळव्यातून जात असल्यामुळे माळवा प्रांतावर मराठ्यांचा विश्वासू सुभेदाराच्या नेतृत्वाखाली हा प्रांत होता. त्यासाठी बाजीराव पेशव्यांनी मल्हारराव होळकर यांच्या नेतृत्वाखाली देण्यात आलेला पहावयास मिळतो. तसेच नद्यांचे घाट हे बंदोबस्ताने राखीले होते. खूशकीचे मार्गही टप्प्या टप्प्याने मुकर झालेले होते.

माळव्यात मराठ्यांचा सुसंघटीत प्रवेश.[30] गुजराथ आणि खानदेश हा प्रांत मराठा सरदारांना व मराठेशाहीला पूर्वीचे सरदेशमुखी आणि चौथाई वसुलीमुळे परिचयाचे झाले होते. त्यामुळे माळवा प्रांत हा शेजारीच असल्याने या प्रांतावर मराठ्यांनी छत्रपती शिवाजी महाराजांच्या कालखंडा पासून शत्रुच्या ठिकाणावर व त्यांच्याकडून चौथाई, खंडणी वसुली करण्याचे उदाहरणे आढळुन येतात. परंतु पेशव्यांच्या कालखंडात तेही थोरल्या बाजीरावांच्या काळात माळवा प्रांताचे लष्करी व भुराजकीय दृष्टीकोनातून महत्व लक्षात आल्याने थोरल्या बाजीरावाने माळवा प्रांतावर आपले वर्चस्व असावे, नियंत्रणात असावे या दृष्टीने त्यांनी सातत्याने प्रयत्न करुन शेवटी मराठ्यांचा माळवा प्रांतामध्ये मराठा सरदारांच्या माध्यमातून सुसंघटीत प्रवेश केलेला आपल्याला दिसुन येतो. पेशवे दप्तरावरुन खालील हिशोब वसुल परगणे.[31] पेशवे दप्तराच्या संदर्भामधून असे निदर्शनास येते की, इंदुर ठाणे लष्कर नागेशंकर छा 17 रबिलाखर व कुसाजी गणेश आणि गोपाळ नारायण अंबेकर व बापुजी प्रभु फौजखर्च 6000 तेथुन मराठ्यांचा प्रवेश माळव्यात होत होता. इ.स. 1732 ता 22 जुलैला माळव्यातील मुलखाची वाटणी होळकर, पवार, शिंदे, यामध्ये होऊन सनदा देण्यात आल्या.

6 ऑगस्ट 1727 रोजी बाजीराव पेशव्याने मल्हारराव होळकरास सरंजामासाठी जिल्ह्याचे उत्पन्न लावून दिले.[32]

राज मंडळ पुणे दरबार ता. 6 ऑगस्ट 1727 रोजी कीर्द सुरु सन तपशील

### 1.9 मल्हारजी होळकरास सरंजाम खर्चास देणे :-

1. 4 प्रांत गुजराथ – महाल - 4, गुजराथ – 1. मौजे मोघे

   2.परगणे बलवद

   3. परगणे खंबाईत

   4. परगणे सवलके

2. 6 प्रांत माळव्यात महाल - 6

   1. आरणिया
   2. परगणे रुणीझा
   3. परगणे पिपलोद
   4. परगणे देवळे
   5. परगणे खाचरोद
   6. परगणे जावरा

३) प्रांत खानदेश – महाल - 1

एकुण - 11

निजामाविरुध्द झालेल्या युध्दात मल्हाररावाने उत्तमकामगीरी केल्यामुळे त्यांचा सरंजाम वाढवुन बाजीरावाने त्यांचा गौरव केला.[33]

श्री सरंजाम राजश्री मल्हारजी होळकर सु।। समान अशरीनम मया अलफ

प्रांत खान्देश पैकी प्रांत माळवा

१ प्र ।। उतराण सालमजकुरी

मोकासा निम्मे जकाती

१ प्र ।। आडवद मोकासा सालमजुकरी

निम्मे जकाती

२) प्रांत जुनर पैकी ता हवेली

१ मौजे आगर

२ मौजे बारव

३. प्रांत गुजरात पैकी

१ प्र. ।। सिनारे

१ प्र ।। जाद

१ प्र. ।। ढवळके

१.प्र. ।। मोघे

१ प्र. बालवव

१.प्र. खंबाईत

१ प्र ढेवले

२ प्र बासवाडानीम

२ प्र रतलानिसे

१ प्र सारंगपुर

प्र पिपलोद

१ प्र खांस रोद

१ प्र जावरे

१ प्र वडदा

१ प्र बडवाई

१.प्र बेटमा

१. प्र झावरा

१. प्र राजगडपटा

१. दिगठाण

१. प्र दिगठाण

१३

कित्ता सनदा

मारवाड

१ प्र. बुंदेलखंड

प्र म्हसवेवार प्र

**प्र।। म्हसवेवार प्र ।।।**

**खानदेश ।।।**

वरील प्रमाणे मल्हारराव होळकारांनी बजावलेल्या मोलाच्या कामगिरीबद्दल मल्हाररावांच्या सरंजामात चांगली वृध्दी करण्यात आली बाजीरावाच्या कालखंडात व त्यांच्या पूर्वीही मल्हारराव होळकर आणि माळवा प्रांताशी त्यांचा संबंध, अनुभव जास्त आसल्याने माळवा प्रांताच्या प्राप्ती करिता मल्हाराव होळकर यांच्यावर बाजीराव पेशव्यांची जास्त भिस्त होती, ६ जुलै १७३५ रोजी मल्हारराव होळकर पुण्याला पेशव्यांच्या भेटीला आले असता स्वत: बाजीराव पेशवा यांनी संगमा पावेतो समोर जाऊन त्यांचा गौरव केला.[34] मराठेशाहीच्या आता पर्यंतच्या कालखंडात मराठा सरदाराच्या स्वागतासाठी, गौरवासाठी स्वत:पुढे जावे असे उदाहरण पहावयास मिळत नाही. बाजीराव पेशव्यांनी मराठेशाहीच्या वाढीसाठी उत्तरेकडे विस्तारासाठी निवड करण्यात आलेले मल्हारराव होळकर हे त्यांच्या ध्येय धोरणात एकदम पुर्णपणे बसलेले व त्यांची केलेली निवड योग्य होती. असेच म्हणावे लागेल. मराठ्यांच्या राज्यासाठी उत्तरेकडून मोठ्या प्रमाणात चौथाई व सरदेशमुखी वसुल करुन पुण्याकडे पाठवत. आपल्या राज्याची आर्थीक भरभराट व्हावी हेतू मल्हाररावांचा असावा. बाजीरावांची योग्य निवड आणि यानिवडीला साजेसे कार्य मल्हारराव होळकर यांच्या हातुन घडत होते. त्यामुळे बाजीराव पेशवा मल्हारराव वर बेहतखुश होते. त्यामुळेच की काय बाजीराव पेशवे पुण्याच्या संगमा पावेतो मल्हाररावांच्या स्वागतासाठी स्वत: आलेले होते. या घटनेवरुन मल्हारराव होळकर यांनी मोलाची कामगिरी मराठेशाहीसाठी केलेली आहे. हे स्पष्ट होते.

मल्हाररावांनी आपल्या पत्नीच्या नावे खाजगी जहागिरीची मागणी केली मागणी ही सहर्ष मान्य करण्यात आली.[35] मराठेशाही मध्ये मराठा सरदारात मल्हारराव होळकर यांचे कार्य राज्याच्या विकासासाठी, विस्तारासाठीचे योगदान मोलाचे आहे. यासाठी बाजीराव पेशव्यांनी मल्हारराव होळकरांवर खुश होऊन त्यांच्या पत्नीच्या नावे खासगी जहागिरी देण्याचे मान्य करण्यात आले. एकंदरीत पहाता. पेशवे कालखंडात मल्हारराव होळकर यांच्या कार्याचा गौरव केला गेला. त्यांना खाजगी जहागिरी देण्यात आली मल्हाररावांच्या योगदानाचा बाजीराव पेशव्यांनी सन्मान केलेला दिसतो. इ.स. 1733 साली गौतमाबाई यांच्यानावे खाजगी जहागिरी देण्याची विनंती करण्यात आली

होती.[36] मल्हारराव होळकर यांना बाजीराव पेशव्याकडुन फौजेच्या खर्चासाठी सरंजाम म्हणून माळव्यातील महाल दिल्याने लगेच मल्हाररावांनी बाजीराव पेशव्यांकडे विनंती केली की माझी सेवा लक्षात घेवून माझ्या पत्नीला खाजगी जहागिरी देण्याची विनंती मल्हाररावांनी केली होती.

मल्हाररावांची विनंती बाजीराव पेशव्यांनी मान्य केली.[37] मल्हारराव होळकरांनी माळवा प्रांतातील खाजगी जहागिरी मिळावीली यासाठी पेशव्याकडे विनंती केली होती. ती मान्य करण्याची शिफारस बाजीराव पेशव्यांनी मल्हाररावाची कामगीरी लक्षात घेवून मान्य केलेली दिसुन येते. खाजगी व दौलत असे दोन्ही प्रथक कायम करुन तुमचे कुटूंब सौ।। गौतमाबाई नावे इनाम देऊन सनद व कपडे पाठविले आहेत.[38] बाजीराव पेशव्यांनी दिलेल्या खाजगी मध्ये मोडत असलेल्या गावांची नावे व उत्पादन पुढीलप्रमाणे 263000 प्र.।। महेश्वर चोळी व प्र.।। इंदुर प्र.।। पैकी हरसोला व प्र.।। सावेर प्र. बरलोई तालुका प्र. देपालपुर पै. तालुके हतोद व पै.।। महतपुर पै.।। जगोही वकरंण माकडोन वगैरे बरहु।। (हुकूम) यादी मखलासीची 299010 दक्षिण प्रांती चंदवड पे. गावे व अंबड पै. कोरेगाव वर्गरे मोगलाई कडील बरहु।। याद.[39] होळकरशाहीत खाजगी अस्तित्वात आली २० जानेवारी १७३४ रोजी बाजीरावाने गौतमाबाईच्या नावे खाजगी जहागिरी दिली.[40] या खाजगीचे उत्पन्न 299010 होते ही जहागीर प्राप्त झाल्यानंतर इंदुर राज्याची खऱ्या अर्थाने स्थापना झाली.[41] मल्हारराव होळकरांचा कंठाजी कदम बांडेच्या सैन्यापासून चालु झालेला प्रवास हा मराठेशाहीच्या उत्तम भारतातील माळवा प्रांताचा सुभेदार पर्यंतचा प्रवास हा संघर्षमय धडाडीचा, युध्दाचा दिसुन येतो. त्यांच्या कार्यकर्तृत्वाचा गुणगौरव म्हणून त्यांना पहिल्यांदा देण्यात आलेल्या. सरंजामपासून ते खाजगी जहागिरी मुळे होळकरशाहीची स्थापना ही माळवा प्रांतात होई पर्यंतचा प्रवास दिसुन येतो.

होळकरांच्या गादीवर असणाऱ्या पुरुषाप्रमाणे त्यांच्यापत्नीकडे खासगीचा अधिकार देण्यात आला.[42] अर्थातच होळकरांच्या गादीवर असलेल्या पुरुषाची मुख्य पत्नीच खासगीची वारस होत असे व खाजगी जहागिरी प्राप्त करुन घेण्यासाठी मल्हारराव होळकरांचा दुरदर्शीपणा आपल्या कुटूंबातचा योग्य राज्यकारभारात प्रवेश आणि त्यांना सहज शिक्षण मिळावे इत्यादी गाठेही अभिप्रत होत्या. गौतमाबाईस खाजगीमुळे राज्यकारभाराचे शिक्षण मिळाले.[43] गौतमाबाई यांनी इ.स. १७६१ साली मौजे पिपल्या गावाविषयी वादनिर्माण झाला त्यावेळी त्यांनी तो वाद यशस्वीपणे मिटवला खाजगी जहागिरीच्या माध्यामातून लग्नसमारंभात भेटी देण्यात येत होत्या. खासगीच्या माध्यमातून गौतमाबाईच्या काळात सावकार व व्यापाऱ्यास व्याजावर कर्ज दिली जात होती. दान, धर्म केले जात

होते. त्याचबरोबर जर दौलतीला पैशाची आवश्यकता पडल्यास गौतमाबाईच्या संमतीने खाजगीच्या जमा असलेल्या पैशातुन दिले जात होते. म्हणजेच मल्हारराव होळकर यांनी खाजगी जहागिरी प्राप्त करुन सर्व प्रकारच्या सोयी करवून घेतल्या खासगीला हात लावण्याचे किंवा त्यांच्या कारभारामध्ये हस्तक्षेप करण्याचे धाडस कुणीही करत नसे.

मल्हारराव होळकर यांनाच खाजगी चा मान दिला गेला.[44] मराठेशाहीत मल्हारराव होळकर यांच्यापूर्वी आणि नंतर जे कोणी मराठा सरदार झाले त्यांच्या पैकी कुणालाही खासगीचा मान मिळाला नाही. यामध्ये प्रामुख्याने भोसले, गायकवाड, शिंदे, जाधव, पवार, इत्यादी मोठमोठ्या मराठेशाहीतील सरदारांना सुध्दा खासगीचा मान त्यावेळी मिळाला नाही. यावरुन लक्षात येते की, बाजीराव पेशव्यांचा कार्यकर्तृत्वावर आणि प्रामाणिक पणावर विश्वास मल्हारराव होळकरयांच्या असल्याचे लक्षात येईल. माळवा प्रांतातील मल्हारराव होळकर यांच्या मराठेशाहीसाठी केलेल्या कार्यावरती व युध्दकौशल्य, नेतृत्वगुणावर बाजीराव पेशवा आणि चिमाजी अप्पा हे खुश होते हे दृष्टीस पडते.[45] पेशवा बाजीराव यांच्या कार्यकाळात मराठ्यांच्या राज्याच्या सीमा ह्या उत्तरेकडे मोठ्या प्रमाणात विस्तारलेल्या होत्या. आणि या सीमा विस्तारण्यासाठी उत्तरेकडील मोहिमांमध्ये मल्हारराव होळकरांचे युध्द कौशल्य, नेतृत्व हे उत्तर भारतात चमकलेले दिसुन येते. यामुळे मराठेशाहीची वैभवशाली परंपरा ही मल्हाररावांनी आपल्या स्वत:च्या कार्यकर्तृत्वावर ठसा उमटल्यामुळे बाजीराव पेशव्यांनी केलेली मल्हाररावांची निवड ही मराठेशाहीसाठी योग्यच आहे. यामुळे बाजीरावपेशवा आणि चिमाजी आप्पा हे मल्हारराव होळकर यांच्या वरती खुश असलेले आढळुन येते.

माळवा प्रांताच्या मोहीमा आणि मल्हारराव होळकर.[46] ज्या ज्या वेळी माळवा प्रांताच्या मोहिमा बाजीराव पेशव्यांनी काढल्या. त्या त्या वेळी बाजीराव पेशव्यांनी मल्हारराव होळकर यांच्या वरती जबाबदारी सोपविण्यात आलेल्या दिसतात. मल्हारराव होळकरांचा अनुभव माळवा प्रांताची माहिति त्या भागातील भौगोलिक घटकांचा अनुभव, गनिमीकावा युध्दतंत्राचा वापर इत्यादी गोष्टींची जाणीवही बाजीराव पेशव्यांना माहित होती. की माळवाप्रांता विषयी कोणता सरदार योग्य राहील आणि यशस्वी होऊ शकतो याची माहिती त्यांना होती त्यामुळे बाजीराव पेशवा मल्हारराव होळकर यांना या प्रांतावर चालुन जाण्याची जबाबदारी देण्यात येत असे.

मराठ्यांनी माळव्यावर कब्जा मिळवून माळव्याची विभागणी ग्वाल्हेरचे शिंदे व इंदुरचे होळकर यांच्यात केली.[47] थोरल्या बाजीराव पेशव्यांच्या ध्येय धोरणानुसार मराठ्यांच्या या उत्तरेकडील भागामध्ये आपले आस्तित्व असावे या दृष्टी कोनातुन बाजीराव पेशव्यांनी मल्हारराव होळकर, राणोजी शिंदे, धारचे पवार यांच्या नेतृत्वाखाली उत्तरेकडील मोहिमा काढुन मराठेशाहीच्या राज्या विस्तारांच्या माध्यमातून करण्यात आला होता. दिल्लीवर आपला कायम दबदबा असावा. असे बाजीराव पेशव्यांना वाटे यातुनच बाजीरावांनी मराठ्यांच्या सरदारांना उत्तरेकडे आपले लक्ष असावे या दृष्टीने गवाल्हेरला शिंदे, इंदुरला होळकर यांना मराठेशाहीचे सुभेदार म्हणून या दोन सरदारांना मराठेशाहीच्या आखत्यारीत स्वतंत्र राज्य स्थापन करण्यासाठी माळवा प्रांताची विभागणी केलेली आपणास दिसुन येते. त्याचबरोबर माळव्यातील ही व्यवस्था भारत स्वतंत्र होईपर्यंत राहीली पहिला पेशवा बाळाजी विश्वनाथाच्या कारकीर्दीत सरंजामशाही पध्दत निर्माण झाल्याने.[48] मराठा सरदार यांनी मराठेशाहीच्या विकासासाठी आपल्या पराक्रमाने मराठेशाहीशी एकनिष्ठ राहुन स्वतंत्र राज्याच्या निर्मितीसाठी त्यांना अनुमती देण्यात आलेली दिसते. त्यापैकीच इंदुरच्या होळकरांचे माळवा प्रांतातील राज्य उभारलेले दिसते.

सुभेदार मल्हारराव होळकर यांना २२ जुलै 1732 रोजी जहागीर मिळाली.[49] मल्हारराव होळकरांच्या कला कौशल्य गुणांना खरी संधी ही पेशव्यांच्या कालखंडातच मिळालेली दिसुन येते. बाळाजी विश्वनाथापासून चालु झालेला मल्हाररावांचा प्रवास हा बाजीराव पेशव्यांच्या कालखंडात त्यानी केलेल्या मराठेशाहीच्या अथक परिश्रमाचे चीज हे मिळालेल्या स्वतंत्र राज्याच्या घटकामध्ये दिसुन येते. मल्हाररावांचा बाजीराव पेशव्यांच्या कालखंडात मोठ्या प्रमाणात उत्तरेकडे त्यांची तलवार चमकताना दिसते. तीथ पासुन चालु झालेला मल्हाररावांचा प्रवास हा होळकरशाहीच्या स्वरुपात सुरु झालेला आपणास पहावयास मिळेल मल्हारराव होळकरांनी स्थापीत केलेली होळकरशाही 220 वर्षे आणि 22 दिवसा पर्यंत टिकली व अस्तित्वात होती या होळकरशाही मध्ये एकुण १४ राज्यकर्ते होवून गेलेले. आपल्याला पहावयास मिळतात. २० मे 1766 रोजी मल्हारराव होळकर यांचा मृत्यु.[50] होळकरशाहीचे संस्थापक मराठेशाहीचे सुभेदार मल्हारराव होळकर यांचा आलमपुर या ठिकाणी मृत्यु झाला.

सुभेदार मल्हारराव होळकर यांच्या मृत्युनंतर अहिल्याबाईने.[51] आपला मुलगा मालेराव याच्या लहान वयातच होळकरशाहीच्या राज्याची सुत्रे हाती घेतली. कालांतराने अहिल्याबाईचा मुलगा

मालेराव हा आजारपणातच इ.स. 13 मार्च 1767 रोजी मृत्यूमुखी पडला. थोरले माधवराव पेशव्यांनी होळकर राज्याचा अधिकारी या नात्याने माळव्याची सुभेदारी अहिल्याबाईच्या स्वाधीन केली.[52] अहिल्याबाई होळकर यांच्यावर एकामागुन एक संकटे येत गेली. पती, सासरा, मुलगा यांचा मृत्यू झाल्याने होळकरशाहीच्या सत्तेची सुत्रे यांच्याकडे आली. होळकर शाहीची राज्यव्यवस्था त्यांनी अखंडपणे पाहिली. अहिल्याबाई होळकर यांनी इ.स. 1757 ते 1795 या कालखंडात आपल्या 28 वर्षाच्या कारकिर्दीत प्रजेच्या हीतासाठी त्यांनी कार्य केले. शेवटी अहिल्याबाई यांचा मृत्यू ३० ऑगस्ट 1795 रोजी झाला.

## 1.10 **अहिल्याबाई होळकर यांच्या मृत्युनंतर होळकरशाहीची राज्य व्यवस्था :-**

### 1.10.1 **पहिले तुकोजीराव होळकर** (1795 **ते** 1797) :-

भालेराव १३ मार्च 1767 रोजी मृत्यू पावलामुळे.[53] मल्हारावाने आपल्या भाऊबंदापैकी पुत्रवत मानलेल्या तुकोजीरावाच्या स्वाधीन फौजेचे कार्य दिले होते. अहिल्याबाई यांच्या मृत्यूनंतर तुकोजीराव होळकर (पहिला) यास होळकरांची गादी सांभाळण्याची जबाबदारी त्यांच्यावर आली तुकोजीराव होळकर यांनी दोन वर्षामध्ये अतुलनीय कामगिरी करुन पेशव्यांचे संरक्षण केलेले दिसुन येते. त्यांचा मंगळवार २५ ऑगस्ट 1797 रोजी मृत्यू झाला. त्यांच्या नंतर वारसा संबधी संघर्ष सुरु झाला. या संघर्षामुळे राज्यात अराजकता व अव्यवस्था निर्माण झाली.[54] प्रामुख्याने या संघर्ष मध्ये पेशवा बाजीराव दुसरा आणि दौलतराव शिंदेयांनीही विशेष होळकरांच्या या वारसा सबंधी विषयात भाग घेतला होता. काशीरा व होळकर यांनी इ.स. 1797 ते 1798 या कालखंडात होळकरांची गादी सांभाळती परंतु शेवटी स्वपराक्रमाने इ.स. 1798 साली पहिले यशवंतराव होळकर यांनी होळकरशाहीची गादी सांभाळली.

### 1.10.2 **पहिले यशवंतराव होळकर (इ.स.** 1797 **ते** 1811) :-

गो.स. सरदेसाई यांच्या मते, पहिले यशवंतराव होळकर हा मराठेशाहीच्या अत्यंत विपन्नावस्थेच्या पडत्या काळात यशवंतराव होळकर हा फार मोठा हिराच अल्पकाळात चमकुन गेला.[55] यशवंतराव होळकराने आपल्या तेजाने त्या काळातील निबिड अंधार हा काही काळापुरता दुरकरण्यात यश मिळवले त्यांच्या या काळामध्ये मराठ्यांच्या राज्यात त्याच्या तोंडीचा सेनानायक कोणीही नव्हता परंतु यशवंतराव होळकरां सारखा पराक्रमी मराठा सरदारास पेशवे, दौलतराव शिंदे,

भोसले सारख्या मराठा सरदारांनी साथन दिल्याने शेवटी हिंदुस्थानाच्या विचारातच वेडा होऊन त्याचा 28 आक्टोबर 1811 रोजी मृत्यू झाला.

### 1.10.3 **दुसरे मल्हारराव होळकर (इ.स.1811 ते 1833) :-**

यशवंतराव होळकर यांच्या मृत्युनंतर त्यांचा मुलगा दुसरा मल्हारराव होळकर याने होळकरशाहीची गादी सांभाळली.[56] दुसरे मल्हारराव होळकर अल्पवयीन असल्याने त्याची आई तुळसाबाई यांनी होळकरशाहीच्या राज्यकारभाराची सुत्रे आपल्या हाती घेतात. मराठेशाही राज्याच्या शेवटच्या काळात. इंग्रज सैन्य अधिकारी जॉन माल्कम व जॉन हिस्लॉपच्या मध्यस्थीने तुळसाबाई, दुसरा मल्हारराव व तात्या जोग इत्यादी मध्ये मैत्रीचातह झाला होता.

होळकरशाहीच्या सैन्यात आणि तुळसाबाई यांच्यात वैमनस्य निर्माण झाले.[57] इंग्रजांनी त्यांच्या कपटनीतीच्या धोरणानुसार होळकरांच्या सैन्यात व त्यांचा सेनापती अमीरखान यास फोडून तुळसाबाईच्या विरुध्द षडयंत्र रचण्यास सांगितले होते. त्यामुळे 20 डिसेंबर 1817 रोजी होळकरांचा सैन्य अधिकारी अमीरखान याच्या संमतीने इंग्रजांच्या कुटनीतीने अमीरखानने शिप्रानदीच्या काठी तुळसाबाई यास ठार करण्यात आले. दुसऱ्या मल्हारावाचा मृत्यू.[58] यशवंतराव होळकरांचा मुलगा दुसरा मल्हारराव याचा मृत्यू, तुळसाबाईचा खुन अमीर खानाने केल्यानंतर झालेला दिसुन येतो.

### 1.10.4 **मार्तंडरावास दत्तक घेतले :-**

मल्हारराव दुसरा यांची पत्नी आणि आई यांनी मार्तंडरावास दत्तक घेतले.[59] मार्तंडरावांनी शुक्रवार १७ जानेवारी 1834 रोजी सुभेदारीची गादी सांभाळली व मार्तंडरावास वारसाबद्दल दरबारातील लोकांना विरोध केला होता. मार्तंडरावास नामधारी ठेवून दुसऱ्या मल्हाररावांची आई केशरबाई सर्व सत्ता आपल्या हातात ठेवतील अशी दरबारातील लोकांना शंका वाटत होती. त्यामुळे विरोध होत होता.

### 1.10.5 **हरीराव होळकर (इ.स. 1834 ते 1843) :-**

हरीराव होळकर यास 17 एप्रिल 1834 रोजी सुभेदाराची गादी मिळाली.[60] हरीराव होळकर यांनी 1834 ते 1843 असे एकुण ६ वर्षे ५ महिने व ७ दिवस राज्यकारभार केला. त्यांचा मंगळवार 24 आक्टोबर 1843 रोजी मृत्यू झाला.

### 1.10.6 **खंडेराव होळकर :-**

हरीराव होळकर यांच्या मृत्यूनंतर.[61] खंडेराव होळकर हे मंगळवार २४ आक्टोबर 1843 रोजी होळकरशाहीच्या सुभेदारीवर विराजमान झाले. काही कालावधीतच त्यांचा मृत्यु हा शनिवार १७ फेब्रुवारी 1844 रोजी झाला.

### 1.10.7 **तुकोजीराव होळकर दुसरे** (1844 ते 1886) :-

खंडेराव होळकर यांच्या नंतर तुकोजीराव होळकर दुसरे यांनी.[62] गुरुवार २६ जुन 1844 रोजी होळकर शाहीच्या गादीवर विराजमान झाले. यांना मोठ्या प्रमाणात होळकर शाहीच्या गादीवर विराजमान होण्याचा जास्त काळ लाभलेला दिसतो. यांचा मृत्यू 17 जुन 1886 रोजी झाला.

### 1.10.8 **शिवाजीराव होळकर (इ.स.** 1886 **ते** 1903) :-

तुकोजीराव होळकर दुसरे यांचा जेष्ठ मुलगा.[63] महाराज शिवाजीराव होळकर हे १७ जून 1886 रोजी होळकरशाहीच्या गादीवर बसले आणि काही कालखंडानंतर त्यांनी ३१ जानेवारी 1903 रोजी स्वत: च्या पदाचा त्याग केला.

### 1.10.9 **तिसरे तुकोजीराव होळकर (इ.स.** 1903 **ते** 1926) :-

महाराज तुकोजीराव होळकर तिसरे.[64] शनिवार ३१ जानेवारी 1903 रोजी होळकरांच्या गादीवर बसले परंतु लवकरच त्यांनी आपल्या मुलाच्या कल्याणाकरिता होळकरशाहीचा २६ फेब्रुवारी 1926 रोजी त्याग केला व त्यांचा मुलगा दुसरे यशवंतराव होळकर हे होळकरशाहीच्या गादीवर विराजमान झाले.

### 1.10.10 **दुसरे यशवंतराव होळकर (इ.स.** 1926 **ते** 1947) :-

दुसरे यशवंतराव होळकर यांची कारकींद अत्यंत लोकप्रिय ठरली.[65] राज्यकारभाराची सुत्रे हाती येताच त्यांनी राज्यकारभारात पूर्ण लक्ष घातले. जनहीताच्या दृष्टीने दुसरे यशवंतराव होळकर यांची कारकींद इ.स. 1947 पर्यत म्हणजे भारताला स्वातंत्र्य मिळेपर्यंत ही अत्यंत लोकप्रिय होती त्यांच्या कारकीर्दीत सार्वजनिक व लोकहीताची कामे फार उत्साहाने पार पाडली गेली. दुसरे यशवंतराव होळकर हे होळकरशाहीचे शेवटचे सुभेदार मानले जातात. यानंतर भारत देशाला

ब्रिटीशांकडून स्वातंत्र्य मिळाले व खरी राजकीय सत्ता ही लोकशाहीच्या सिध्दांता नुसार भारतातील नागरिकांना निवडून दिलेल्या लोक प्रतिनिधींच्या हाती गेलेली आपल्याला दिसते.

### 1.10.11 **होळकरांची वंशावळ**[66] :-

होळकर राजघराणे - वंश वृक्ष

होळकर राजघराण्याचे मूळ गांव - होळ - वर्तमान जिल्हा- सातारा महाराष्ट्र

मालीबा - "होळ" गाँव निवासी इसलिए होळकर आडनाव. मूळ आडनाव-वीरकर

गोपालजी
भवानजी
खंडोजी
महादजी
भीकाजी
संताजी
काशीबा
मल्हारजी



1.10.12 **होळकरांचे राजचिन्ह :-**



होळकरांच्या राजचिन्हामध्ये.[67] छत्री, सुर्य, अश्व, भाला, खंडा, तलवार, गहूँ, अफुचे झाड इत्यादी दिसुन येते. या राजचिन्हामध्ये दिसणारी छत्रीचेकार्य हे मल्हारराव होळकर यांच्यावर छत्र धरलेल्या नागाच्या घटनेशी संबंधीत असत. छत्री खाली सूर्य प्रकाशमान आहे जो होळकर सुर्यवंशी राजघराण्याचे प्रतिक आहे. माळवा भूमीवर अश्ववीरांचे वाहन आहे! सूर्य आणि अश्व हे क्षत्रियांचे चिन्हे आहे! भाला आणि तलवार हे दोन शस्त्र माळवा प्रांताच्या भूमिवर होळकरांच्या राज घराण्याचे गहु आणि अफुची लागवड व उत्पादनाला सातत्याने महत्व दिलेले दिसुन येते. यासाठी यांना यांच्या राजचिन्हामध्ये दाखवण्यात आलेले आहे.

## 1.10.13 **'प्रा होमेशोलभ्या श्री कर्तृः प्रारब्धात' :-**

या वचनामध्ये होळकर शब्द.[68] हा मोठ्या शिताफीने बसवण्यात आलेला आहे. या वचनास शिवपुराणाच्या अनुसार भगवान शिव पार्वतीशी बोलतात की जो प्रयत्न करतो त्याला यश प्राप्त होते. यश प्राप्त झाल्यानंतर ईश्वर त्याला ऐश्वर्य ही प्रदान करतो.

1.10.14 **होळकरांचा ध्वज**[69]




1.11.15 **होळकर राज्याचे गीत**

प्रभो प्रार्थना परिसा आमुची ।[70]

द्या सुख पाळुनी राजाला ।।

देवा आमुचा महाराजांच्या ।

राखी विजयी भाल्या ला ।।

आणि करोनि राज्य निरंतर ।

देवो सुख तो देशाला ।। प्रभौ...।।

होळकर राज्याच्या वाद्य यंत्र.[71] श्रीमंत महाराज यांच्या येण्या व जाण्यावेळी श्री कुल व श्री कुलस्वामीनीच्या कुलदैवत, पालखी निघण्याच्या वेळी हे वरील गीत गाण्यात येते व वाद्य वाजविण्यात येते.

**संदर्भ सुची :-**


1. Jadunath sarkar; Fall of mughal Empire- vol-1, orient longman 50 sundar Nagar, New Delhi-3, 1966 Pag.130.
2. गो.स. सरदेसाई; मराठी दियासत खंड-8, पॉप्युलर प्रकाशन,301 महालक्ष्मी चेंबर्स 22 भूलाभाई देसाई रोड- मुंबई-26, 1993 पृ. 121.
3. कित्ता, पृ-121.
4. प्रा.डॉ. राम इंगळे; होळकरशाहीचा संस्थापक, प्रकाशन विश्वभारती सीताबर्डी, नागपुर-12, 1992, पृ-01.
5. कित्ता, पृ.01.
6. कित्ता, पृ. 01.
7. कित्ता, प्र. 01.
8. प्रा.डॉ. राम इंगळे; मावळते मल्हारराव उदयोन्मुख महादजी शिंदे (1722-1794) प्रकाशन विश्वभारती, धनवटे चेंबर्स सीताबर्डी नागपूर-12,1986. पृ.03
9. डॉ. यादव गुजर; मल्हारराव होळकर आणि त्यांचा काळ, प्रकाशन श्रीराम प्रिंटर्स, गांधीबाग नागपूर, 1991 पृ-13.
10. कित्ता, पृ.13.
11. कित्ता, पृ. 13.
12. कित्ता, पृ. 13.
13. कित्ता, पृ. 15.
14. कित्ता, पृ. 16.
15. कित्ता, पृ. 16.
16. कित्ता, पृ. 16.
17. कित्ता, पृ. 16.
18. कित्ता, पृ. 16.
19. कित्ता, पृ. 16.
20. कित्ता, पृ. 16.

21. कित्ता, पृ. 16.

22. कित्ता, पृ. 16.

23. कित्ता, पृ. 16.

24. कित्ता, पृ. 19.

25. कित्ता, पृ. 19.

26. कित्ता, पृ. 19.

27. वा.वा. ठाकुर (संपा); होळकरशाहीचा इतिहास भाग-1 ला (इ.स. 1693 ते 1797) प्रकाशन, होळकर गव्हेमेंट प्रेस इंदूर. 1944, पृ.27.

28. कित्ता, पृ. 27.

29. कित्ता, पृ. 23.

30. कित्ता, पृ. 19.

31. कित्ता, पृ. 19.

32. डॉ. यादव गुजर; मल्हारराव होळकर आणि त्यांचा काळ, प्रकाशन श्रीराम प्रिंटर्स, गांधी बाग, नागपुर-1991 पृ.23.

33. कित्ता पृ-23.

34. भागवत; होळकरशाहीच्या इतिहासाची साधने खंड-1 पृ.03.

35. कित्ता, पृ.03.

36. कित्ता, पृ.103.

37. कित्ता, पृ.103.

38. कित्ता, पृ.103.

39. कित्ता, पृ.103.

40. डॉ. रघुवीरसिंह; मालवा मे युगान्त (हिंदी) पृ.311.

41. डॉ. यादव गुजर; मल्हारराव होळकर आणि त्यांचा काळ, प्रकाशन श्रीराम प्रिंटर्स, गांधी बाग, नागपुर-1991 पृ. 35.

42. कित्ता, पृ. 36.

43. कित्ता, पृ. 36.

44. कित्ता, पृ. 36.

45. कित्ता, पृ. 36.

46. तर्कतीर्थ श्री लक्ष्मण शास्त्री (संपा); मराठी विश्वकोष खंड-12, प्रकाशन, महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोष निर्मिती मंडळ, ही ब्लॉक एन्साइटमेंट आझाद मैदान मुंबई-01,1985, पृ. 1109.

47. न.र.फाटक, वि.गो. खोबरेकर (संपा); भारतीय इतिहास आणि संस्कृती, जुलै 1976, मुंबई मराठी ग्रंथ संग्राहालय इतिहास संशोधन मंडळाचे त्रैमासिक पृ-95.

48. कित्ता, पृ.95.

49. कित्ता, पृ.96.

50. कित्ता, पृ.97.

51. कित्ता, पृ.98.

52. कित्ता, पृ.98.

53. कित्ता, पृ.98.

54. कित्ता, पृ.99.

55. कित्ता, पृ.99.

56. कित्ता, पृ.99.

57. कित्ता, पृ.99.

58. कित्ता, पृ.100.

59. कित्ता, पृ.100.

60. कित्ता, पृ.100.

61. कित्ता, पृ.100.

62. कित्ता, पृ.103.

63. कित्ता, पृ.103.

64. कित्ता, पृ.103.

65. कित्ता, पृ.103.

66. https://ahilyabaiholkar.in/wp-content/uploads/2021/11/1-1024x781.jpg

67. घनश्याम होलकर; महाराजा यशवंतराव होलकर, नेशन प्रेस ओल्डन-33, न्युनं-6, मॅकनिकोल्स रोड, चेटपेट चेन्नई-31, पृ-201,202.

68. कित्ता, पृ. 202.

69. रामसिंह शेखावत; सुभेदार मल्हारराव होळकर, प्रकाशन छत्रपती, इंदौर 190 उषानगर एक्सटेंशन इंदौर-09, 2012 पृ-253.
70. डॉ. वि.गो. खोबरेकर; महाराष्ट्राचा इतिहास मराठा कालखंड भाग-2 (1707 ते 1818) प्रकाशन महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ मुंबई पृ. 422.
71. प्रा.सु.ह.जोशी; मराठेकालिन शौर्यकथा, डायमंड प्रकाशन 1691 सदाशिवपेठ, शंकर प्रसाद को. हौ.सो. तिसरा मजला टिळक रोड पुणे पृ-113.

## प्रकरण दुसरे

## यशवंतराव होळकर यांचे जीवन चरित्र

---

## प्रकरण दुसरे

## यशवंतराव होळकर यांचे जीवन चरित्र

### 2.1 प्रस्तावना :-

होळकरशाहीचे संस्थापक आणि मराठेशाहीचे सुभेदार मल्हारराव होळकर यांच्या पश्चात होळकरशाही राज्याची सुत्रे, अहिल्याबाई होळकर यांच्याकडे आली. अहिल्याबाईनी 28 वर्ष होळकरशाहीचा राज्यकारभार चालवला हा राज्यकारभार चालवत असताना होळकरशाही राज्याच्या सुरक्षेची, लष्करी व्यवस्थेची जबाबदारी सेनापती म्हणुन तुकोजीराव होळकर यांच्याहाती आली. तुकोजीराव होळकर यांना तीन बायका होत्या. कृष्णाबाई, रखमाबाई, राधाबाई उर्फे यमुनाबाई.[1] तुकोजीराव होळकरांना एकुण चार मुले होती. काशीराव, मल्हारराव, विठोजीराव, यशवंतराव, या पैकी भांबुर्डा हल्ल्यात मल्हारराव दुसरा यांचा मृत्यु झाला. काशीराव होळकरशाहीच्या गादीवर अगोदरच विराज मान झालेला होता. भांबुर्डा हल्ल्यात मल्हाररावाचा मृत्यू झाला. या हल्ल्यातुन यशवंतराव आणि विठोजीराव बचावले आणि त्यांनी पुणे गाठले. तेथुन त्यांनी जेजुरीला प्रयाण केले. होळकरशाही दौलतराव शिंदे व दुसरा बाजीराव पेशवा आपल्या घशात घालण्यासाठी अल्पबुध्दी असणारा काशीरावास आपल्या हाताशी धरुन होळकरशाहीचे राज्य आपल्या नियंत्रणाखाली चालवण्याचा त्यांचा प्रयत्न होता.

मल्हाराव दुसरा याच्या लष्करी छावणीवर शिंदे व पेशव्यांच्या सैन्याने रात्री हल्ला केल्याने त्या हल्ल्यात तुकोजीरावांचा मुलगा मल्हाराव दुसरा याचा मृत्यू झाला.[2] या लष्करी छावणीमध्ये यशवंतराव आणि विठोजीराव होळकर हे दोघेही त्यावेळी उपस्थित होते. त्यावेळी या दोन्ही भावंडानी छावणी सोडून पुण्याकडे रवाना झाले. यशवंतराव होळकर यांच्या आयुष्यातील ही क्रांतीकारक घटना होती. यशवंतरावांच्या अंगी असणारे शौर्य, धाडस, पराक्रम, साहस, उत्साह, इत्यादी असल्याने होळकरशाहीसाठी स्वकर्तृत्वाचा उठाव करण्यास त्यांना संधी प्राप्त झाली यशवंतरावांना या मल्हारगर्दीपासून कळुन चुकले होते की, आपल्याला कुणाचाही आधार नाही, स्वत:ला स्वत:च्या शक्तिवर होळकरशाही वाचवावी लागेल. ज्या सुभेदार मल्हारराव व अहिल्याबाईच्या पुण्यशील घराण्याचे रक्त माझ्या अंगात सळसळत आहे. ते होळकरशाहीचे घराणे माझ्या डोळ्या समोर नामशेष होण्याच्या मार्गावर आहे. त्या घराण्याच्या विशाल स्थावर जंगमाच्या लालसेपोटी शिंदे आणि पेशवे टपुन बसले आहेत. यांना थोपविण्याचे सामर्थ्य हे होळकरशाहीच्या गादीवर बसलेल्या काशीरावामध्ये

नाही. त्यामुळे मला माझ्या मनगटाच्या बळाशिवाय दुसरे कुठेही सहकार्य मिळेल ही आशा दिसत नाही.

मराठेशाहीतील कर्तबगार वीर पुरुष म्हणून यशवंतराव होळकर यांची ख्याती होती.[3] मराठेशाहीच्या खालोखाल होळकर घराण्यातील पराक्रमी, धाडसी, शुरवीर म्हणून यशवंतराव होळकर हे एक कर्तबगार योध्दा होते. यशवंतरावांनी आपल्या स्वत:च्या पराक्रमाने होळकरशाहीच्या दौलतीचे संरक्षण करण्यात यशस्वी झालेले पहावयास मिळतात. यशवंतरावांनी होळकरशाहीच्या राज्यकारभाराची सुत्रे हातात घेऊन होळकरशाहीची लष्करी व्यवस्था वाढविली, मजबुत बनवली. लष्करासाठी अत्याधुनिक शस्त्रास्त्रे उपलब्ध व्हावीत यासाठी त्यांनी तोफा ओतण्याचा कारखाना निर्माण केला. त्याच कारखाण्यात अत्याधुनिक शस्त्रास्त्रे निर्माण करण्यात येत होती. यशवंतरावांनी आपल्या नावाचा शिक्काही तयार केला. इंग्रजांना भारतातुन हाकलुन लावण्याचे त्यांचे हे एकच ध्येय होते. हा प्रयत्न त्यांनी शेवटपर्यंत केलेला दिसतो.

यशवंतराव होळकर यांनी दिल्लीचा बादशहा इंग्रजांच्या तावडीतुन सुटका करण्यासाठी इंग्रजांच्या विरुध्द युध्द केले.[4] त्याला अनुसरुन दिल्लीच्या बादशहाने यशवंतराव होळकर यांना महाराजाधिराज राजराजेश्वर अली बहादूर असा बहुमानाचा किताब देण्यात आला होता, मराठेशाहीच्या उत्तरकालखंडात यशवंतराव होळकर हे एक असामान्य नेतृत्व मराठेशाहीमध्ये उदयास आले. मराठेशाहीच्या या उत्तर काळात यशवंतराव होळकर यांच्या व्यतिरिक्त मराठेशाहीतील दुसरा सरदार त्यांच्या तोडीचा सेनापतीचे उदाहरण सापडत नाही. एवढा, धाडसी, शुरवीर, पराक्रमी होळकरशाहीचा छत्रपती आणि मराठेशाहीचा सरदार होते.

ज्या ज्या वेळी मराठेशाहीच्या इतिहासाचा अभ्यास केला जाईल, त्या त्या वेळी होळकर घराणे व होळकरशाहीचा उल्लेख होणे अनिवार्य आहे.[5] राष्ट्रप्रेमी यशवंतराव होळकर यांच्या विषयी माहिती घेत असताना होळकरशाहीचा प्रारंभिक इतिहास माहिती असणे आवश्यक आहे इ.स. 1727 ते 1948 पर्यंत जवळपास 200 वर्षांपेक्षा जास्त काळ राज्य करणाऱ्या होळकर घराण्यात साधारण 100 वर्ष होळकरशाही गाजविली ती तीन प्रमुख महापुरुषांनी ज्यामध्ये सुभेदार मल्हारराव होळकर, महाराणी, मातोश्री, पुण्यश्लोक अहिल्याबाई होळकर आणि छत्रपती, महाराजा, यशवंतराव होळकर यांच्या पराक्रमाची किर्ती पहाता येते.

## 2.2 कुलवृतांत :-

होळकर हे संपूर्ण भारतातील मराठीशाहीच्या साम्राज्या मध्ये धनगर म्हणून एकमेव राज्यकर्ते होते.[6] खंडुजी वीरकर यांचे चिरंजीव मल्हारी यांचे मुळ गाव मथुरा होते. शेळ्या मेंढ्या राखण्याचा त्यांचा उद्योग होता. यावरच आपल्या कुटूंबाचा उदरनिर्वाह चालवत असे मथुरेहुन ते औरंगाबाद तेथुन निरा, फलटण, साताऱ्याहुन, होळ नावाच्या खेड्यात रहायला आले होळ हे गाव पुणे जिल्ह्यात आहे. होळ नावावरुन वीरकर ऐवजी होळकर हे नाव ओघाने पडले मल्हारीचा मल्हारराव.[7] खानदेशातील तळोदे येथे भोजराज बारगळ हे मल्हाररावांचे मामा होत. मामाच्या गावी मल्हारराव शेळ्या मेंढ्या राखता, राखता, सरदार कदम बांडे यांच्या सैन्य दलामध्ये सामील होऊन वेगवेगळ्या लष्करी मोहीमांमध्ये आपल्या तलवारीच्या जोरावर शौर्य, पराक्रम गाजवुन आपले नेतृत्व उदयास आणले.

निजामाच्या माळव्या मध्ये निजाममुल्कावर मल्हारराव होळकर यांनी कदम बांडे यांच्या सैन्यदलामध्ये राहुन तलवार गाजविली त्याला धार जवळ ठार करण्यात आले. मल्हाररावांचे शौर्य, पराक्रम, पाहुन पेशवा बाजीराव यांनी आनंदी होऊन 500 घोडेस्वारांचा सेनानायकाची जबाबदारी दिली त्यावेळी मल्हारावांनी आपल्या 500 स्वतंत्र घोडदळ दलाचे निशाण (ध्वज) हे कदमबांडे यांचा सन्मान, निष्ठा, प्रामाणिकपणा, यांचा आदर म्हणून लाल व पांढऱ्या रंगाचे त्रिकोणी निशाण (ध्वज) हे होळकर निशाण म्हणून मल्हाररावांनी कायम ठेवले. हे होळकरी निशाण होळकरशाही राज्यामध्ये फडकत होते.

इ.स. 1728 साली मल्हारराव होळकर यांना त्यांच्या कार्य कर्तृत्वाचा सन्मान म्हणून.[8] पेशवा बाजीराव याने बहुमानाची सरंजामी देण्यात आली. कालांतराने पेशव्यांनी इ.स. 1731 मध्ये सत्तर महालांची जहागिरी दिली. जसे जसे उत्तरेकडे मराठेशाहीचा झेंडा फडकत होता, मराठेशाहीच्या राज्याच्या सीमा ह्या विस्तारत होत्या त्यावेळी मल्हाररावांना मराठेशाहीद्वारे पेशवा बाजीराव यांनी सुभेदार म्हणून इंदुरचा परगणा सन्मान म्हणून पेशव्यांनी केला. मल्हारराव होळकर हे महान लढवय्ये होते.[9] मल्हाराव होळकर आपल्या सैन्यदलातील सैनिकांनी युध्दात केलेल्या पराक्रमा बद्दल ढालभर रुपये देऊन बक्षीस म्हणून त्या सैन्याचा गुणगौरव करीत मल्हारराव होळकर यांना मराठेशाही मध्ये त्यावेळी आदराने काकासाहेब म्हणून ओळख होती. मराठेशाहीचा राज्यविस्तार, दिल्लीवर मराठ्यांचा दबदबा, अटक पर्यंत लष्करी मोहिमा काढुन मराठेशाहीचे अस्तित्व प्रभुत्व संपूर्ण भारतात स्थापीत करण्यामध्ये सुभेदार मल्हारराव होळकर यांचा सिंहाचा वाटा होता. त्यामुळेच त्यांना पहिल्या

बाजीराव पेशव्यांनी माळवा प्रांताची सुभेदारी दिल्याने मल्हाररावांना इ.स. 1728 साली होळकरशाही राज्याची स्थापना करता आली.

मल्हारराव होळकर यांचे साधे राहणीमान जरी साध्या पध्दतीचे असले तरी त्यांची महत्वाकांक्षा ही खुपमोठी होती.[10] मल्हाररावांच्या कला गुणकौशल्य युध्दाचे डावपेच, मराठेशाही प्रति निष्ठा, देशाभिमान, स्वच्छ चारित्र्य मराठेशाही राज्याचा संपूर्ण भारतात कीर्ती, इतिहास घडवणारा, मल्हारराव होळकर हा एक कुशल सेनापती, युगपुरुष म्हणून गौरव केला जातो त्यांचा या कालखंडात होळकरशाहीचा संस्थापक, उत्कृष्ट राज्यकर्ता म्हणून मल्हाररावांची इतिहासामध्ये नोंद आहे, मल्हारराव होळकर यांच्या कार्य काळात त्यांच्या आखत्यारीत माळवा, राजस्थानचा काही भाग व महाराष्ट्रातील अंबड, चांदवड इत्यादी भाग होता. मल्हारराव लष्करी मोहीमेवर असताना झांसी जवळ आलमपुर या ठिकाणी त्यांचा मृत्यू 20 मे 1766 रोजी झाला. होळकरशाहीचा संस्थापक या नात्याने मल्हाररावांकडे 16 कोटिरुपये शिल्लक होते. आणि एक कोटी रुपये उत्पन्नाचा मुलुख होळकरशाही राज्याच्या ताब्यात होता.

## 2.3 **अहिल्याबाई होळकर :-**

अहिल्याबाई होळकर ह्या मल्हाररावांच्या कार्यकाळातच राज्याचा कारभार पहात.[11] मल्हाररावांना वाटे की आपली दौलत सांभाळण्यासाठी अहिल्याबाई योग्य आहे. यांच्याकार्य दक्षतेवरुन अनुभवी मल्हाराव यांनी खंडेरावाचा मृत्यु कुंभेरीच्या युध्दात झाला तरी अहिल्याबाईस सती जाण्यापासून रोखले. अहिल्याबाई स्त्री असल्याने युध्दाच्या मोहिमेवर जाऊ शकेल की नाही यासाठी मल्हारावांनी पेशव्यांच्या मंजुरीने अहिल्याबाईनी होळकरशाहीचा राज्यकारभार पहावा आणि तुकोजी होळकर यांनी सरदारी घेऊन सैन्यानिशी पेशव्यांची चाकरी करावी अशा पध्दतीची व्यवस्था करण्यात आली होती. अहिल्याबाई यांचा मुलगा मालेराव यास सरदारीची वस्त्रे मिळवली परतु त्यांना दहा महिन्याचा कालावधीच उपभोगता आला. त्यामुळे 27 मार्च 1767 पासून अहिल्याबाई यांनी होळकरशाहीचा राज्यकारभार आपल्या नेतृत्वाखाली करण्यास सुरुवात केली. राज्याच्या लष्करी व्यवस्थेचे कार्य करण्याची जबाबदारी तुकोजी होळकर यांच्याकडे सोपविण्यात आले. अहिल्याबाई यांनी होळकरशाहीचा मुलकी कारभार व कोष हा आपल्या नियंत्रणाखाली ठेवला होता. तुकोजीराव होळकर यांना 30-06-1767 रोजी सरदारीची वस्त्रे मराठेशाहीद्वारे पेशवा थोरले माधवरावांनी दिली.

## 2.4 तुकोजीराव होळकर :-

सुभेदार मल्हाराव होळकर यांच्या मृत्यनंतर.[12] होळकरशाहीचा सर्व राज्यकारभार हा स्वत: अहिल्याबाई होळकर या जातीने करित होत्या. तर लष्करी मोहिमेवर तुकोजीराव होळकर यांना पाठवित होत्या. अहिल्याबाई होळकर यांचा मुलगा मालेराव यांच्यामृत्यनंतर होळकरशाहीमध्ये दुहेरी राज्यव्यवस्था स्थापीत झाली होती. परंतु कालांतराने इ.स 1795 रोजी अहिल्याबाई यांचा मृत्यु झाल्यानंतर तुकोजीराव हे होळकरशाहीचे मालक झाले होळकरांच्या दौलतीचा संपूर्ण कारभार हा त्यांच्या तुकोजीराव होळकर यांच्या मृत्यूनंतर ही शेवटपर्यंत त्यांच्या वंशजानी चालवला.

## 2.5 कौटूंबिक माहिती :-

तुकोजीराव होळकर हे अहिल्याबाई होळकर यांच्या राज्यामध्ये होळकरशाहीचे सेनापती म्हणून कार्यरत होते.[13] तुकोजीरावांना एकुण तीन बायका कृष्णाबाई, रखमाबाई, राधाबाई उर्फ यमुनाबाई होत्या. राणी कृष्णाबाई यास काशीराव, राणी रखमाबाईला मल्हारराव, राणी राधाबाई उर्फ यमुनाबाई यास विठोजीराव आणि यशवंतराव असे एकुण तुकोजीरावांना चार मुले होती. तुकोजीरावां सोबत लष्करी मोहीमेवेळी रखमाबाई असत तर, इंदौर या ठिकाणी, कृष्णाबाई तर वाफगाव याठिकाणी राधाबाई होत्या.

## 2.6 यशवंतरावांचा जन्म :-

यशवंतराव होळकर यांचा जन्म 3 डिसेंबर 1776 रोजी राधाबाई उर्फ यमुनाबाई यांच्या पोटी झाला वाफगाव ता. खेड जि. पुणे या ठिकाणी झाला.[14] होळकर घराण्यातील कर्तबगार पुरुष म्हणून त्यांची ओळख आहे.[15] मराठेशाहीमध्ये महादजी शिंदे यांच्या पश्चात मराठेशाहीतील पराक्रमी, शौर्य गाजविणारा म्हणून यशवंतराव होळकर यांच्याकडे मराठेशाहीच्या उत्तरार्धात पाहिले जाते.[16] तुकोजी होळकर यांच्या पत्नी राधाबाई उर्फ यमुनाबाई यांच्या पासुन यशवंतराव हा झालेले पुत्र होते.

## 2.7 शिक्षण :-

तुकोजीरावांनी विठोजीराव आणि यशवंतराव या दोघांना.[17] वाफगाव या ठिकाणी 10 वर्षाचे होईपर्यंत ठेवले होते. पुढील लष्करी, व्यवहारिक शिक्षणसाठी मुलांचे संगोपन, संवर्धन व्हावे या करिता पांडुरंग शंकर यांच्याकडे तराना जहागिरीच्या अंतर्गत काया या गावी पाठविण्यात आले. या

गावाची अजुनएक ओळख ही आहे की वराहमिहीर यांची जन्मभुमी म्हणुन हे गाव ओळखले जाते या दोन्ही मुलांच्या शिक्षणाकरिता तुकोजीरावांनी पांडुरंग यास चरितार्थासाठी एक गाव इनाम म्हणून देण्यात आले होते.

यशवंतराव होळकर यांनी अनेक भाषेवर आपले प्रभुत्व मिळवले होते.[18] पांडुरंग शंकर यांनी कायथा या गावी लष्करी प्रशिक्षणा बरोबरच विविध भाषेची ओळख, ज्ञान आत्मसात करायला लावले होते. यशवंतरावांना हिंदी, पार्शीयन, उर्दु, मराठी, संस्कृत, निमाडी इत्यादी भाषा अवगत होत्या. हे विविध ठिकाणी माल्कमने नोंदवून ठेवलेले आहे." कायथा या ठिकाणी यशवंतरावांना व्यवहारिक शिक्षणा बरोबरच लष्करी शिक्षणाचे भरपुर ज्ञान दिले होते.[19] यशवंतरावांना त्याचबरोबर शस्त्रास्त्रांची गुणवत्ता त्याचे कार्य या विषयी माहिती होती त्यांना घोड्यावर बसुन रपेट, तलवार बाजी, निशाने बाजी इत्यादीचा अनुभव यशवंतरावांना आला होता.

यशवंतराव होळकर हे शिपाईगिरीच्या व्यवहारामध्ये वाढत होते.[20] यशवंतरावांचा या काळात होळकरशाहीतील परिस्थिती आजुबाजुच्या प्रांतामध्ये, हा शांत स्वरुपाची नव्हती. रक्तपात, युध्दे, लुटालुट, जाळपोळ यांनी हा काळ व्यापलेला होता. शिपाईगिरी करणे हे थोरल्या सुभेदार मल्हारराव होळकर यांच्या कालखंडापासून होळकरशाही राज्यात होळकर घराण्यातील मुलांचे बाळकडूच होते. शस्त्रास्त्रांचा उपयोग, शिक्षणाचे मार्गदर्शन प्रशिक्षण घेण्यास वडील मंडळीच्या स्वारी, शिकारीवर गेल्यास अनुभवास येत. स्वत:ला कधी अनुभव घेण्याची संधी मिळे, होळकरशाहीच्या राज्यकारभाराचा अभ्यास करण्यासाठी कधी कधी लहान मोठी, जबाबदारी, तपशीलवार पूर्ण ज्ञान घेण्यास अडथळा येत नसे. यशवंतराव हे चौकसपणे निरीक्षण करत होते त्यामुळे त्या गुणांच्या, अनुभवाच्या आधारे, युध्द आणि राज्य हे दोन्ही कार्यकर्तृत्व प्रसंग येतील. त्यावेळी अचुक उपयोगी पडण्या इतके ज्ञान व कला कौशल्य, नैपुण्य यशवंतरावांनी संपादित केले होते.

## 2.8 धार्मिक कार्य :-

यशवंतराव होळकर अध्यात्मिक विचारांसह वैदिक पध्दतीच्या परंपरेचाही त्यांना अभ्यास होता.[21] त्यांच्या बरोबर महादेवाचे भक्त होते. देवी शक्ति त्यांची पुजनीय होती. यशवंतराव ज्या ज्या वेळी दक्षिणेच्या मोहीमेवर येत असत. त्या वेळी. जेजुरी गडावर मल्हारी मार्तंडाचे दर्शन घेण्यास विसरत नसे यशवंतराव आपल्या राजधानीच्या ठिकाणी/भानपुरा स्थित असत त्यावेळी माता

दुधाखेंडीच्या दर्शनाला जात. यशवंतराव होळकर ज्या ज्यावेळी लष्करी मोहीमेस जात असत त्यावेळी मथुरेतील बिहारी जी पुष्कर मध्ये ब्रम्हा, अमृतसर मध्ये गुरु द्वारा, दिल्लीतील कालकाजी मंदिर, हरिद्वार मध्ये ज्वालादेवी, अहिल्याबाई यांनी निर्माण केलेल्या स्थळांचे दर्शन करत भरतपुर युध्दाच्या वेळी यशवंतराव होळकर खंडेराव होळकर यांच्या समाधीचे दर्शन घेण्यासाठी गांगरसौली या ठिकाणी गेले होते, 1805 या वर्षामध्ये अजमेर दर्गाहच्या दर्शनासाठी गेले होते. यशवंतरावांची लष्करी मोहीम ज्याही प्रांतातुन जावयाची त्या प्रांतातील स्थान महात्म्याचे दर्शन घेण्याची त्यांची परंपरा होती.

## 2.9 **यशवंतरावांचा विवाह :-**

यशवंतरावांचा विवाह भिवाजी फणसे यांच्या मुलीशी विवाह झाला.[22] यशवंतरावांना एकुण तीन बायका होत्या दुसऱ्या पत्नीचे नाव कृष्णाबाई, उर्फ केशरबाई, तिसरी पत्नी तुळसाबाई.[23] यांच्याशी विवाह इंदौर या ठिकाणी इ.स. 1800 साली संपन्न झाला. यशवंतराव होळकर यांना इ.स. मार्च 1808 च्या सुरुवातीच्या काळात कृष्णाबाई यांनी मुलास जन्म दिला. त्याचे नाव मल्हारराव दुसरा हे ठेवण्यात आले. यशवंतरावांच्या आई राधाबाई उर्फ यमुनाबाई यांनी भानपुरा शेजारी असणाऱ्या डोंगराच्या शेजारी शिव मंदिरात दान, धर्म केला व यशवंतरावांनी मंदीराचे पुजारी संत ढोलीबाबा यांना एका गावची सनर्देव, एक हत्ती भेट म्हणून यशवंतरावांनी दिले.

## 2.10 **यशवंतरावांची वेशभुषा :-**

यशवंतराव होळकर रंगीत कपड्याचा अंगरखा घालत होते.[24] त्यांच्या हाताच्या बोटामध्ये हीरापन्नाच्या अंगठ्या घातलेल्या असत, त्यांच्या उजव्या हाताच्या मनगटामध्ये एक विशेष प्रकारचे कडे घातलेले असायचे, पायामध्ये त्यांच्या रत्नजडीत (जुती) असायची पहाणाऱ्यास प्रभावीत व आकर्षक दिसायची, यशवंतरावांच्या वेशभुषेला पाहुन आश्चर्य कधी वाटत नव्हते. की हा व्यक्ती सातत्याने लष्करी मोहीमेमध्ये रात्रंदिवस राबत असेल त्यांचा तेजस्वी चेहरा हा तेजाने उजळुन निघालेला दिसत. यशवंतरावांची भाला व तलवारीची चमकच वेगळी होती.

यशवंतराव होळकर यांच्या शौर्य, पराक्रमावरुन दिसायला राक्षसा प्रमाणे अक्राळा-विक्राळ असेल असे वाटे होते.[25] परंतु यशवंतराव दिसायला सुंदर व हसरा, चेहरा, खेळाडू वृत्तीचा हस्य विनोद, बोलण्या चालण्यात सहजपणा होता. जर त्यांच्या मनाविरुध्द एखाद कृत्य घडल्यास त्यांना राग अनावर होत नसे. एवढे शिस्त बध्द त्यांचे जीवन होते. शिस्तीचा उपभोक्ता असणारे नेतृत्वच

अशा प्रकारे आपले रौद्र रुप धारण करतो. त्या पध्दतीने यशवंतरावांचे होते. यशवंतराव हे मध्यम उंचीचे आणि बळकट बांध्याचे होते. यांचे व्यक्तिमत्व हे प्रसन्न होते. कठीण परिस्थितीमध्येही त्यांचे मनोधैर्य कमकुवत व विचालित होत नसे उलट ते उत्साही वाटायचे.

## 2.11 **यशवंतरावांचा बालवयात युध्दात सहभाग :-**

यशवंतराव होळकर यांनी वयाच्या 10 ते 12 वर्षामध्ये युध्दात सहभाग घेतला.[26] राठोडाशी जी होळकरांची एक सफे जंगीची लढाई झाली. त्यामध्ये बखरकाराने यशवंतरावांचा आवर्जुन उल्लेख केलेला आहे, वास्तविक पहाता त्यावेळी यशवंतराव होळकर यांचे वय दहा ते बारा वर्षाचे होते, पुढे बखरकार असे लिहीतो की निमे राहिले त्यांनी हल्ला, बापू होळकराचा गोल उठला हे पाहुन पलटणचा मुकाबला सोडून यांजवर आले. भेळा-भेळ होऊन चार घटका समरंगणी भाला, बंदुक, यांचे काम पडलेच नाही एकमेकांचे गळा हातघालुन घोड्याखाली येऊन तरवार, कटार, दांत अशानिशी रजपुत एक जाऊन दिल्हा, चार पाचशे रांगडे खपू देऊन आपले कडील महाळोजी पिंगळे सारखी दोन तिनशे, नांवाची माणसे कामास आली. यशवंतराव महाराज, बारावर्षाचे वय प्रथम तरवार तेथे केली.

## 2.12 **यशवंतराव होळकर यांचे कार्य कर्तृत्व :-**

यशवंतराव होळकर यांनी ज्याठिकाणी नवीन किल्ले बांधले त्या ठिकाणी नवीन स्मारक, धर्मशाळा, विहरी इत्यादींची निर्मिती केली.[27] जुन्या किल्ल्यांची डागडुजी केली. यशवंतराव होळकर यांनी होळकरशाहीच्या शासन काळामध्ये राज्य चालवताना प्राचीन मंदीरांचा जीर्णोध्दार मोठ्या प्रमाणात करण्यात आला. यशवंतरावद्वारे आर्थिक सहकार्य प्राप्त करण्यासाठी संपूर्ण प्रांतातुन साधुसंत येत. उदा. 3 सप्टेंबर 1808 रोजी यशवंतरावांकडे हरिभक्त पारायण राजाश्री महिपत बुआ शिदानंद, स्वामी दीननारायण, बाबागुरु नरहरी 5 डिसेंबर 1808 रोजी यशवंतराव होळकर यांनी पत्राद्वारे दिला की, जेजुरी गडाच्या पायथ्याशी, छत्री, तलाव, इत्यादींचा जीर्णोध्दार करण्यात यावा. अशा प्रकारचा पत्रव्यवहार करण्यात आलेला होता. यशवंतराव होळकर हे एक होळकरशाहीचे शासकच नव्हे तर राज्यामध्ये नवनिर्मिती करण्याकडे त्यांचा कल होता.[28] यशवंतरावांनी भानपुरास्थित बांधलेला होळकर वाडा असेल, मंदिर, विहीर घाट, इत्यीदींचे उदाहरणे देता येतील. यशवंतरावांनी लष्करी मोहीमेच्या माध्यमातुन वेगवेगळया प्रांतामध्ये त्यांची घोडदौड होत असे. त्यामुळे त्यांच्या नजरेतुन त्या ठिकाणावरती बांधण्यात आलेले. किल्ले, रजवाडे, यांचा अनुभव

आलेला होता. त्यामुळे त्या दृष्टीने यशवंतरावांनी भानपुरास्थित भुराजनिती च्या दृष्टीने सामरिक दृष्टीकोनातुन त्यांनी किल्ले, लष्करी छावण्यांचे ठिकाण, भानपुरा पासुन जवळच नावली या ठिकाणी तोफा ओतण्याचा व शस्त्रास्त्र निर्मितीचा कारखाना स्थापन केला होता. यशवंतराव होळकर यांनी आपल्या होळकरशाही राज्यातील विविध सैन्य दलांच्या हालचाली, कारवाया चालण्यासाठी प्रमुख लष्करी छावणी ही धार्मिक नैसर्गिक आणि प्राचीन ठिकाणावर केलेली पहावयास मिळते, यशवंतरावांनी हिंग्लाजगडाची निर्मिती ही लष्करी दृष्टीकोनातुन केली होती. बडर्गोडा किल्ल्याची डागडुजी करुन त्या किल्ल्यास उपयोगात आणले. या किल्ल्याला पाणी व्यवस्थापनाची कमतरता होती तेंव्हा त्याठिकाणी विहीर खोदुन पाण्याची व्यवस्था करण्यात आली. इंदौर आणि महु या दोन शहरामध्ये जवळच असणाऱ्या "जाम दरवाजा" ची डागडुजी करुन वापरात आणला हा जाम दरवाजा अहिल्याबाई होळकर यांच्या कार्य काळात निर्माण करण्यात आला होता. यशवंतराव यांनी भानपुरास्थित आमबाग या ठिकाणी शिबीर लावण्यात येत असे, आमबागेस लागुन असणाऱ्या उंचडोंगरा शेजारी, यशवंतरावांनी विहीर खोदुन घेतली होती, भानपुरा गावामध्ये रामपुरागेट जवळ एक सुंदर अशी बांधकाम करुन विहीर बनवून घेतली होती. यशवंतरावांनी आपल्या राज्याच्या शेजारी असलेल्या राजस्थान मधील होंक या शहराच्या डोंगरावर उंचठिकाणी असणारी प्रेमी व प्रेमिका यांची प्राचीन काळातील छत्रीचाही जीर्णोध्दार केलेला होता.

## 2.13 **यशवंतराव होळकर यांची नाणी** :-

यशवंतराव होळकर यांनी आपला बंधु जो भांबुर्ड्याच्या हल्ल्यात मरण पावला होता. त्याच्या मुलाच्या नावे खंडेराव याची मुद्रा इ.स. 1799 पासून मुद्रेचा उपयोग करण्यात आला.[29] यशवंतराव होळकर यांनी मल्हारराव होळकर यांचा मुलगा खंडेराव होळकर यांच्या नावाची नाणी (मुद्रा) चा उपयोग करण्यास सुरुवात केली. त्यांच्या नावानेच होळकरशाहीचा राज्यकारभार चालवला जाणार या घोषणेने त्यांनी खंडेरावांची नाणी राज्यात उपयोगात आणण्यास सुरुवात केली. या नाणीचे वर्णन केले असता. या नाण्याच्या वरच्या भागात श्री असे उल्लेख असुन श्री च्या डाव्या आणि उजव्या बाजुला बारिक वर्तुळे आहेत. नाण्याच्या मध्यभागी म्हाळसाकांत चरणी तत्पर मल्हारजी सुत खंडेराव होळकर असा नामोल्लेख करण्यात आलेला आहे. इ.स. 1799 साली स्वत:च्या नावाचा शिक्का यशवंतरावांनी तयार केला.[30] यशवंतराव होळकर यांनी होळकरशाहीच्या राज्याचा कारभार हातात घेतला तेंव्हा त्यांनी स्वत:चा राज्याभिषेक वैदिक पध्दतीने केल्यानंतर यशवंतरावांनी स्वत:च्या नावे

नाणी तयार केली होती. या नाण्याचे वर्णन पुढील प्रमाणे नाणी ही यशवंतरावांनी वर्तुळाकारच केली होती. या नाण्याच्या शिरोभागी, श्री हे अक्षर असून सुर्य किरणे ही पसरताना दिसुन येतात. याचा अर्थ असा घ्यावा लागेल की जो पर्यंत पृथ्वीतलावर चंद्र आणि सुर्य आहेत. तो पर्यंत होळकरशाहीचे राज्य अस्तित्वात राहील असा याचा मतीतार्थ घ्यावा लागतो. दुसऱ्या ओळीमध्ये म्हाळसाकांतचरणी तत्पर असा नामोल्लेख असुन आपल्या कुलदेवता विषयीची श्रध्दा या ठिकाणी दिसुन येईल. तिसऱ्या ओळीमध्ये तुकोजीसुत म्हणजे आपल्या वडिलांविषयीचा आदर, सन्मान केल्याचे दिसुन येते. तर चौथ्या आणि पाचव्या ओळीमध्ये यशवंतराव होळकर असा नामोल्लेख असुन सद्य:परिस्थितीमध्ये होळकरशाही राज्यकारभार चालवणाऱ्या व्यक्तिंचे नाव आहे.

इ.स. 1806 साला पासून यशवंतरावांनी आपल्या नावाचा शिक्का अंमलात आणला.[31] यशवंतराव होळकर यानी एक अन्य प्रकारची नाणी अंमलात आणली होती. ती फारसी पत्रामध्ये आढळुन येते. जुबदतुल उमरा बहादरुल मुल्क फरजंद अरजुमंद आलीजाह महाराजाधिराज राजराजेश्वर जसवंतराव होलकर सुबेदार बहादुर नुसरत जंग फिदवी शाह आलम बादशाह गाजी 1261 इंदोरच्या वंशजाशी संबंधीत 32 नाणी ग्वालियर कोषागारा मध्ये सुरक्षित ठेवण्यात आलेली होती.

## 2.14 **डाक व्यवस्था :-**

यशवंतराव होळकर यांनी होळकरशाहीतील डाकव्यवस्थेमध्ये बदल केलेले पहावयास मिळतात.[32] यशवंतरावांना ज्या प्रमाणे आपल्या देशातील विविध प्रांतातील संस्थानिकांमध्ये इंग्रजांच्या विरुध्द लढण्यासाठी जन जागृती चालवली होती तशाच पध्दतीने आपल्या डाकव्यवस्थेमध्ये गतिमानता येण्यासाठी पत्रांची देवाण घेवाण लवकर व्हावी यासाठी डाक व्यवस्थेमध्ये बदल केले होते, एकमेकांच्या पत्रव्यवहारासाठी जसा आजच्या भाषेत पोस्टमन असतो. तशा पध्दतीचा यशवंतरावांच्या कार्यकाळामध्ये पत्रांची ने आणणाऱ्यास "कासिद" हरकारा संबोधण्यात येत असे, या कासिद हरकाऱ्यास वीस कोस अंतरासाठी 1 रुपया या प्रमाणे मानधन देण्यात येत असे. पाराशर दादाला पेशवा दुसरा बाजीराव यांच्याकडे आपल्या मागण्या घेवून पाठवले.[33] यशवंतराव होळकर यांनी थाळनेर या ठिकाणाी लष्करी छावणी टाकुन आपल्या मागण्या मान्य करण्यात यासाठी पाराशरदादाला पुण्याकडे पाठविण्यात आले होते. त्यावेळी यशवंतरावांनी डाक व्यवस्थेचा संदर्भ आढळून येतो.

## 2.15 **यशवंतरावांचे नेतृत्व** :-

यशवंतराव होळकर यांच्या जीवनामध्ये खरा उठाव इ.स. 1799 मध्ये झाली.[34] यशवंतराव होळकर वयाच्या वीस बावीस वर्षा पर्यंत असे काही ठळक उल्लेखनीय कार्य केले आहे असे दिसत नाही. परंतु पुढील कालखंडाचा विचार केल्यास त्यांच्यातील असामान्य गुण दिसायला लागतात. त्यांच्या या गुणांचे कुणालाही आश्चर्य वाटावे अशा प्रकारचे गुण त्यांच्या कार्यकर्तृत्व वरुन दिसुन येतात. प्रथम वडिलांचे छत्र हारपले. त्यानंतर बंधु मल्हारराव दुसरा यांचा आश्रय सोडण्याची वेळ आली. मल्हारराव दुसरा बंधुचा भांबूडी या ठिकाणी वध झाला नसता तर त्यांच्या पश्चात जे यशवंतरावांनी आपल्या स्वत:च्या हिंमतीवर कर्तृत्व नेतृत्वावर करुन दाखविले ते करण्यासाठी त्यांना लवकर संधी मिळण्याची शक्यता नव्हती. यशवंतरावांनी स्वत:च्या कलाकुशल गुणांच्या आधारावर स्वत:चे नेतृत्व त्यावेळी निर्माण केले. यशवंतरावांच्या चरित्राचा विचार केल्यास कधी कधी असेही वाटते की यशवंतराव होळकर यांची या कालखंडातील योग्यता दुसऱ्या मल्हाराव यास गाठता आली नसती का हाही प्रश्न निर्माण होतो. मराठेशाही, होळकरशाही मध्ये यशवंतरावांचे नेतृत्व हे एक झुंजार लष्करी नेतृत्व म्हणून उदयास आले.

साहसे श्री; प्रतिवसति साहस हे वैभवाचे वस्ती स्थान या सुभाषिता प्रमाणे.[35] यशवंतराव होळकर यांचे संपूर्ण विजय हे त्यांच्या साहसांनी पराक्रमांनी, शौर्यांनी, युध्द नेतृत्व, कलाकौशल्यांनी मिळवून दिलेले आहेत. शौर्य, धाडस हा यशवंतरावांचा स्वभाव धर्म होता ह्या स्वभाव धर्माला त्यांच्या परिस्थितीने वेग देण्याचे कार्य हे त्यांच्यावर आलेल्या संकटानी केले आहे. रघुजी भोसले यांनी केलेला विश्वासघात हा एक यशवंतरावांच्या आयुष्यातील उदाहरण आहे. यशवंतरावांनी हे उदाहरण आपल्या मनामध्ये कायमचे कोरुन आयुष्यभर ठेवले की त्यांनी पुन्हा ते विश्वास घाताच्या फेऱ्यात कधी सापडले नाही. यशवंतराव हे सुरुवातीच्या कालखंडात खानदेशातील भिल्ल, धारचे, पवार, महतपुरचा वाघ त्या नंतर शिंदे, पेशवे, इंग्रज इत्यादीच्या कुटनीतीच्या हालचाली, कारवाया मधुन यशवंतराव सुरक्षित पणे बाहेर पडले.

## 2.16 **यशवंतरावांचा राज्याभिषेक** :-

जानेवारी 1799 रोजी यशवंतराव होळकर यांनी आपला होळकरशाही राज्याचा प्रमुख या नात्याने वैदिक पध्दतीने त्यांनी राज्याभिषेक केला.[36] एक स्वतंत्र राजा, छत्रपती उपाधी धारण केली.

हा राज्याभिषेक सोहळा आनंदाने साजरा करण्यात आला. या राज्याभिषेक सोहळ्यानंतर यशवंतरावांनी राज्याच्या विविध भागावर कार्य करण्यासाठी नवीन नियुकत्या करण्यात आल्या. काही जणांना उपहार स्वरुप भेटी देण्यात आल्या यशवंतरावांनी आपल्या लष्करी व्यवस्थेमध्ये कार्य करणाऱ्या विविध सैन्यदलाना वेतन हे होळकरशाहीच्या खजाण्या मधुन करण्यात आले. होळकरशाहीची राजधानी महेश्वर राज्यकारभार करण्यास सुरुवात केली. होळकरशाहीची जी दीडशे वर्षे सत्ता माळवा प्रांतामध्ये अस्तित्व टिकुन राहीली ती यशवंतरावांच्या पराक्रम शौर्यामुळे.

यशवंतराव होळकर यांनी इ.स. 1798 साली स्वपराक्रमाने गादी हस्तगत केली.[37] यशवंतराव होळकर यांनी होळकरशाही शिंदे व पेशवे यांच्या घशात जाण्यापासुन वाचविण्याचे काम केले. काशीराव होळकरशाहीचे राज्य सांभाळण्यासाठी असमर्थ होता. त्यामुळे त्यांच्या आडुन आपण होळकरशाही चालवावी असा हेतु दौलतराव शिंदे आणि दुसरा बाजीराव पेशवा यांचा होता. परंतु यशवंतरावाने आपल्या स्वपराक्रमावर होळकरशाही चा कारभार हाती घेऊन राज्याची घडी व्यवस्थीत बसविण्याचा त्यांनी प्रयत्न केला. इ.स. 1797 च्या अगोदर होळकरशाही मध्ये जी बंडाळी माजली होती. त्याच्याकडे लक्ष देऊन होळकरशाही चे दुर्देव बिनचुकपणे आकलन करावे अशी यशवंतरावांच्या मना मध्ये असल्याचे जाणवते तुकोजीराव होळकर यांच्या मृत्युनंतर होळकरशाही मध्ये अंदाधुंदी माजली होती. हे तुकोजीरावांच्या मृत्युनंतर काही दिवसांमध्ये मल्हाराव दुसरा याच्यावर झालेल्या हल्ल्यामुळे यशवंतरावांना अनुभवयास आले. होळकरशाहीचा राज्यकारभार चालविण्यासाठी यशवंतराव हा योग्य आहे असा पुष्कळ जुन्या सरदारांना विश्वास वाटत होता, यशवंतरावांनी स्वत:च्या कर्तृत्वाने, या सरदारांचा विश्वास संपादन केला होता. इ.स. 1798 सालच्या उत्तरार्धामध्ये यशवंतरावांच्या बाबतीतील लोकांचा, जुन्या सरदारांचा वाढता विश्वास हा हळुहळु पुष्कळ प्रमाणात लढाऊ सैनिकांच्या टोळ्या यशवंतरावांच्या आखत्यारीत येत होते. यशवंतराव होळकर हे फक्त पेंढाऱ्यांचे पुढारी नव्हते तर होळकरशाहीच्या राज्याला सुसंघटीत करण्यासाठीचे त्यांचे प्रयत्न, ध्येय, हे स्वत:च्या कर्तबगारीच्या धोरणांवरुन लक्षात येते. इ.स. 1798 मध्ये राजकीय अंतरिक्षामध्ये लुकलुकणारा तारा 1799 नंतरच्या कालखंडामध्ये तेजस्वितेने सर्वांना दिपवु लागला.

यशवंतरावांनी राज्य व्यवस्थेमध्ये वेगवेगळे महसुल विभाग निर्माण केले.[38] यश्वंतराव होळकर यांनी होळकरशाहीच्या राज्याची सुत्रे हातात घेतल्यानंतर त्यांनी राज्याची घडी व्यवस्थीत बसविण्या करिता वेगवेगळे महसुल विभागाची स्थापना करुन त्यामध्ये, धार, जावरा, वडीवरा,

रामपुरा, भानपुरा, मेवाड, सागर (बुंदेलखंड) प्रतापगड, देवळे इत्यादी महसुल विभाग करण्यात आले होते. यशवंरावांनी त्याच बरोबर मल्हाराव दुसरा बंधु याचा मुलगा खंडेराव याच्या नावाची नाणी निर्माण केली व 6 एप्रिल 1799 पासून पत्र व्यवहार चालु केला. होळकरशाही राज्यात कोणताही लहान मोठा असा दुजाभाव न करता सर्वांना न्याय सारखाच मिळावा अशी यशवंतरावांची इच्छा होती अहिल्याबाई होळकर यांनी चालवलेल्या राज्यकारभारा सारखा सत्य धर्म पुढे ही सर्वांनी सांभाळावा अशी सक्त ताकीद यशवंतरावांनी आपल्या सरदारांना दिली होती.

### 2.17 यशवंतरावांचा राज्यविस्तार आणि आर्थिक उत्पन्न :-

होळकरशाहीच्या राज्याचा विस्तार हा त्यावेळी 80 परगने यामध्ये विस्तारलेला होता.[39] जो की, दक्षिण विभाग खानदेश, नेमाड, मध्यविभाग, उत्तर विभाग, राजपुतांचा प्रदेश, अन्य विभागाच्या अंतर्गत होते. यामध्ये प्रामुख्याने चांदवड, शिरगाव, अंबड, आडगाव, मौजे वाफगाव, जामगाव, गाळणा, नंदुरबार, सुलतान पूर, भिकनगाव, मर्दाना, सनवाद गाळणा, सेंधवा, देपाळपुर, सुंदरसी, रामपुरा, गरोठ, भानपुरा, चदवांसा, नारायणगड, मल्हारगड, इंदौर, बेटमा, महिदपुर, प्रतापगड, झाबुआ, डुंगरपूर, बांसवाडा, जावरा, पिपलौद, निंबाहेडा, टोंक, कोटा, जयपूर, बुंदी, लाखेरी, इंद्रगड, चिलडगड, नरसिंहगड, कोंटडी, सुनेल किशोर पाट्टन इत्यादी सहीत 80 परगणे हे होळकरशाहीच्या आखत्यारीत होते. यशवंतरावांच्या शासन काळामध्ये आर्थिक उत्पन्नाचे साधन, कर वसुली, वार्षिक कर हे होळकरशाही राज्याच्याच अंतर्गत असणाऱ्या वेगवेगळ्या परगणामधून एकनिश्चित आर्थिक उत्पन्न मिळत होते.

यशवंतराव होळकर यांनी आपल्या पराक्रमाने होळकरशाहीच्या दौलतीची मालकी सिध्द केली.[40] स्वकर्तृत्वावर होळकरशाहीचा राज्यकारभार चालवुन भारतातील विविध संस्थानिक, राजे, रजवाडे, इंग्रजाकडे सर्व करार, पत्रव्यवहार हा यशवंतरावांनी आपल्या नावानेच केले. होळकरशाहीच्या नाण्यांवर मल्हाररावदुसरा यांचा मुलगा खंडेराव यांच्या नावाने नाणी चलनात आणली होती. ती रद्द करुन यशवंतरावांनी स्वत: च्या नावाने नाणी पाडण्यास इ.स. 1805 साला पासून सुरुवात केली. यशवंतरावांनी राज्य चालवताना आर्थिक उत्पन्नाचा काही भाग राज्याच्या विकासासाठी ठेवावा लागत असल्याने यशवंतरावांनी आता आपल्या लष्करी व्यवस्थेमध्ये सैन्यदलातील सैनिकांची संख्या कमी केली होती. त्यांच्याकडे दक्षिणेकडील सैन्यदले होती ती ती त्यांच्या उपजिविकेसाठी त्यांची व्यवस्था लावून दिलेली पहावयास मिळते.

## 2.18 यशवंतरावांची युध्द जिज्ञासा :-

यशवंतराव होळकरांचे तारुण्य हे युध्दाच्याभूमी बरोबरच आपल्या सैनिकांच्या सहवासामध्ये गेले.[41] त्यामुळे यशवंतरावांना आपल्या लष्करातील वेगवेगळ्या सैन्यदलातील सैनिकांचा ते सन्मान करित असल्यामुळे प्रत्येक सैनिक त्यांच्यावर प्रेम करीत, प्रामाणिक पणे निष्ठा ठेवत युध्दात स्वत:च्या जीवाची काळजी न करता शत्रुच्या सैन्यावर तुटुन, पडत आक्रमकतेने प्रहार करत यशवंतरावांना माहीत होते की युध्दात जर आपल्याला विजय प्राप्त करावयाचा असेल तर आपले सैन्यदल सक्षम व सैनिकांचे मनोधैर्य उच्चप्रतिचे ठेवण्यासाठी सैनिकां सोबत आपले जिव्हाळ्याचे संबंध असले पाहिजे. त्याशिवाय आपण युध्दात जिंकु शकत नाहीत.

माल्कमने गौरवाने नोंदवून ठेवले आहे की,[42] यशवंतराव होळकर यांच्या सारखा त्या कालखंडात भालाफेकी मध्ये मराठेशाहीतील दुसरा कोणी नव्हता, यशवंतराव स्वत: उत्तम हिशोब तपासणीस होते, त्यामुळे महसुल, खंडणी, चौथ, सरदेशमुखी वसुल करण्यामध्ये कारकुन त्यांची फसवणूक करण्याची शक्यता कमीच होती. नावली याठिकाणी असणारा तोफा ओतण्याच्या कारखान्यात स्वत: तोफा तयार करण्याचे काम रात्रं दिवस त्यांनी केले. यावरुन यशवंतरावांच्या ध्येयावरची श्रध्दा, निष्ठा, प्रामाणिकपणा सिध्द होतो.

यशवंतराव होळकर हे एक असामान्य व झुंजार सेनानी होता.[43] भारतीय इतिहासामध्ये मराठेशाहीचा उत्तरकालखंड पाहिला असता असे लक्षात येईल की यशवंतराव होळकर हे एक वेगळेच रसायन होते. त्यांचे युध्दातील शौर्य, पराक्रम, धाडस हे युध्दातील चालणाऱ्या गतिमानतेने हालचालीतील वेग, वाऱ्याच्या वेगाने घोडेस्वारी, राकट, कणखर शरिरष्टी, चेहऱ्यावरची तेजस्वी लहर इत्यादीमुळे यशवंतराव होळकर हे आपल्या सैन्यदलातील सैनिकांचे ऊर्जास्थान बनले होते. तर शत्रु सैन्याचा कर्दनकाळ, म्हणून त्यांची ख्याती होती. जीनघर:जीन तख चा अर्थ.[44] यशवंतराव होळकर यांचे संपूर्ण आयुष्य हे घोड्याच्या खोगीरावर गेले आहे. त्यावेळी यशवंतराव म्हणतात की, घोड्या वरील खोगीर हेच माझे घर व हेच माझे सिंहासन अशा प्रकारचा बाणा त्यांनी त्यावेळी स्वीकारला होता, अंगाखाली घोडा व त्यावर मी जोपर्यंत कायम आहे तो पर्यंत संपूर्ण जग हे माझेच आहे, मी ज्या ठिकाणी फौजबंद असेल त्याठिकाणी माझे राज्य आणि सिंहासन अशा प्रकारचा अर्थ हा ‘‘जीनघर: जीन तख्त’’ या म्हणीचा अर्थ घ्यावा लागतो.

**2.19 यशवंतरावांचा प्रिय घोडा :-**

यशवंतराव होळकर यांच्याकडे एकुण तीन घोड्यांचा उपयोग.[45] युध्द, लष्करी मोहीमा साठी केला होता हे खालील प्रमाणे :

1. पहिल्या घोड्याचे नाव- "लंका" होते.
2. दुसरा घोडा हा महाराष्ट्रातील होता त्याचे नाव- "महुआ" होते त्याचा रंग हा लाल व भुरा होता.
3. तिसऱ्या घोड्याचे नाव – "वीरा" होते. हा घोडा फरीदाबाद मधील लष्करी छावणीवर इंग्रजांनी केलेल्या हल्यात गोळी लागुन मूत्यू मुखी पडला.
4. यशवंतरावांकडे एक त्यांनी पाळलेला कुत्रा होता त्याचे नाव – "मोती" होते

**2.20 यशवंतरावांचे आव्हान :-**

यशवंतराव होळकर यांनी भारतातील विविध प्रांतातील राजे, महाराजे, राजवाडे, शासक यांना.[46] इंग्रजांच्या विरद्ध उठाव करण्यासाठी, युद्ध करण्यासाठी. मातृभूमीच्या रक्षणासाठी, देशी आणि काही सत्तांशी सहकार्य करण्याचे आव्हाण केले होते. यशवंतराव होळकर यांनी फ्रेंच शासक, ईरान, आफगाणिस्तान, रुस ईत्यादी परकीय सत्तांशी पत्रव्यवहार करून इंग्रजांच्या विरुद्ध सहकार्य करण्याचे आव्हान करण्यात आले होते. परकीय सत्तांमध्ये आपसात चालणारे युद्ध हे स्वत:च्या राज्याचा साम्राज्य विस्तार व्हावा यासाठी युद्धे होत होती तर यशवंतराव होळकर यांचे युद्ध हे एक आपल्या देशाप्रती प्रेम, अभिमान असणारा व्यक्तिच करू शकतो. हे यावरून लक्षात येते. यशवंतराव होळकर यांनी भारत भूमीच्या रक्षणासाठी भारतातील विविध संस्थानिकांना आणि जागतिक स्तरावरील रंगमंचावर इंग्रजांना भारतातून हाकलून लावण्याचा त्यांनी मनोदय ठेवला होता.

2.21 **यशवंतरावांचे कार्य प्रेरणादायी होते. :-**

यशवंतराव होळकर यांनी स्वत:च्या कार्य कर्तृत्वावर सत्ता स्थापीत केली.[47]

1) संपूर्ण संस्थानिकांमध्ये स्वत:च्या नेतृत्वाचा प्रभाव पाडला.
2) यशवंतराव होळकर हे स्वत:ला भारतभूमीचे सेवक मानत असे
3) यशवंतरावनी आज्ञाधारक, कर्तव्याचा परिचय करुन दिला.

4) यशवंतरावांमध्ये दुसऱ्याशी वागताना मित्र स्नेह भाव होता.

5) यशवंतरावांमध्ये विलक्षण अशी आपल्या लष्करी व्यवस्थेतील विविध दलामध्ये कार्य करणाऱ्या सैन्याची पारख त्यांना होती.

6) राज्यांतर्गत आलेल्या नैसर्गिक संकटावेळी नागरिकांना सहकार्य करणे त्यांचे पुनर्वसन करणे इत्यादी कार्यावर त्यांचे बारिक लक्ष असायचे.

7) माल्कम म्हणतो, यशवंतराव होळकर यांच्यात राज्यचालविणाऱ्याचे आमगुण होते, पृथ्वीतलावर असे क्वचित एखाद दुसऱ्या व्यक्तिचे उदाहरण सापडले.

8) यशवंतरावांचे नेतृत्व हे मानवतावादी आणि नितीमुल्यांवर त्यांची श्रध्दा दिसुन येते.

9) यशवंतराव हे आपल्या लष्करी व्यवस्थेतील विविध सैन्यदला विषयी शिस्तीचे कडक धोरण व अंमलबजावणी करणारे नेतृत्व होते.

10) यशवंतराव होळकर हे धाडसी, पराक्रमी, युध्दात शौर्य गाजविणारे युध्द नेतृत्व, योध्दे होते.

11) यशवंतराव हे राजकीय, युध्द योजना, युध्दनेतृत्व, रणनिती, डावपेच, आखण्यात, पारंगत होते.

12) यशवंतराव हे आपल्या व्यवहारामध्ये निष्कपट होते.

हिंदुस्थानभर आपल्या कवायती फौजांचा टेभा मिरविणाऱ्या इंग्रजांचा नक्षा फक्त यशवंतरावांनीच उतरवला होता.[48] भारतातील या कालखंडामध्ये असणाऱ्या वेगवेगळ्या राजेरजवाडे, संस्थानिक यांनी इंग्रजी सत्तेच्या प्रभुत्वाखाली आपले राज्य चालवण्यास सुरुवात करुन आपल्या राज्याच्या लष्करी व्यवस्थेमध्ये इंग्रजांच्या तैनाती फौजेचा स्वीकार केला होता. परंतु त्या कालखंडात मराठेशाहीतील एकमेव मराठा सरदार आणि होळकर शाहीचा राजा छत्रपती यशवंतराव होळकर यांनी इंग्रजांच्या तैनाती फौजेचा स्वीकार केलेला नव्हता. आपले स्वातंत्र्य यशवंतरावांनी जीवंत असे पर्यंत अबाधित होळकरशाही ठेवणारा हा पुरुषोत्तम होता. यामुळे इंग्रजांना यशवंतरावा बद्दल चीड आणणारे हे कृत्य होते त्यामुळे इंग्रजांनी यशवंतरावांनच्या द्वेषापोटी वेगवेगळ्या उपाध्या दिलेल्या होत्या तेव्हा यशवंतराव हे इंग्रजांना किती सलत होते. हे कल्पनेच्या पलिकडे समजण्या सारखं आहे.

यशवंतराव होळकर यांच्या युध्दनीतीचे भय सर्वांना होते.[49] यशवंतराव होळकर यांनी उत्तरेकडील मैदानी प्रदेशात गनिमीकावा युध्दतंत्राचा उपयोग हा इंग्रजांच्या सैन्या विरुध्द सातत्याने

वापरला इंग्रजांचा सलग पराभव करित गेल्याने इंग्रज सैन्य अधिकारी व सैन्यदलांमध्ये यशवंतराव यांच्या बद्दल भय निर्माण झाले होते. यशवंतरावांची युध्दभूमी वरील आक्रमक कारवाई ही गतिमानतेने शत्रुवर तुटून पडण्याची होती. शत्रुसैन्य जास्त असेल तर त्यास आपल्या पाठीमागे लावुन दुर अंतरापर्यंत थकवा येई पर्यंत पाठलाग करावयासलावी, ज्यावेळी शत्रुसैन्य थकल्यास माघारी फिरत त्यावेळी यशवंतराव आणि त्यांचे सैन्यदल (घोडदळ) पाठलाग करुन हल्ला करत यशवंतरावांची युध्दनितीही शत्रु सैन्याला एकत्रीत असताना त्यांच्यात विस्कळीतपणा, एक एकटे पाडणे व त्यांच्यावर हल्ला करणे अशा प्रकारची युध्दनिती वापरल्याने शत्रुसैन्यामध्ये यशवंतरावांच्या युध्दनितीविषयी भयाचे वातावरण निर्माण होत असे. यशवंतरावांच्या वर्चस्वनिती मुळे इंग्रज भयभीत झाले होते.

सुरुवातीच्या कालखंडामध्ये यशवंतरावांना होळकरशाही व मराठेशाहीमध्ये विरोध झाला. काळानुरुप होळकरशाहीतील प्रजा ही त्यांच्यावर संतुष्ट झाली. माळवा प्रांतामध्ये भिल्लांच्या उपद्रव्यांना लगाम घालुन त्यांना होळकरशाहीच्या राज्यात कायदा व सुव्यवस्था सांभाळण्यासाठी, लष्करी व्यवस्थेमध्ये सैन्यदल उभारुन राज्याच्या संरक्षण कार्यासाठी त्यांचा उपयोग करुन घेण्यात यशवंतराव यशस्वी होताना दिसतात यशवंतरावांच्या एकंदरीत जीवनमानाचा, कार्य कर्तृत्वाचा विचार करता त्यांनी होळकरशाहीला वाचवण्यासाठी पुर्नजिवित करण्यासाठी, अंतर्गत संघर्ष करावा लागला आहे. होळकरशाहीवर दौलतराव शिंद्याचा हल्ला असो की शिंदे - पेशवे यांची होळकरशाही राज्य आपल्या नियंत्रणात आणण्याचा प्रयत्न असो, इंग्रजांच्या विरुध्द सातत्याने संघर्ष, युध्द अशा चारही बाजुने होणाऱ्या आक्रमणाचा सामना करताना अखंड पणे भारतभ्रमण करुन इंग्रजांना सळोकी पळो करुन सोडल्याने यशवंतरावांना मानसिक दृष्टया वयाच्या चौतीस, पस्तीस व्या वर्षी आजाराने घेरले होते.यशवंतराव होळकर यांनी शेवटच्या क्षणापर्यंत होळकरशाहीचे वेगवेगळ्या विभागामध्ये विस्तारीत झालेले राज्य त्यांनी एकत्रित करुन आपल्या नेतृत्वाखाली चालवले हे करत असताना त्यांना वेळोवेळी इंगजांशी आणि स्वकियांशी संघर्ष करावा लागला शेवटी शेवटी आजारपणामध्ये त्यांना कुलदेंवतेच्या दर्शनाची इच्छा ही अपुर्ण राहिलेली दिसुन येते.

इ.स. 1809 च्या जवळपास यशवंतरावांना डोकेदुखी व स्मृतीभ्रंशाचा त्रास होऊ लागला.[50] यशवंतराव होळकर यांचे संपूर्ण जीवनच इ.स. 1797 पासुन 1809 पर्यंत सातत्याने संघर्ष लष्करी मोहीमा, इंग्रजांच्या विरुध्द युध्द, स्वकियांशी, कुटूंबाशी संघर्ष, मानसिक ताणतणाव त्यांनी आपल्या

आरोग्याकडे लक्ष दिले नाही. त्याचा परिणाम त्यांच्या प्रकृतीवर झालेला पहावयास मिळतो. यशवंतरावांचे मनोधैर्य, शौर्य, याच्यावर कधीही परिणाम झालेला आढळत नाही. यशवंतरावांना आजार हा त्यांच्या मेंदु मध्ये गाठ झाल्याने, त्यांना डोकेदुखी, स्मृतीभ्रंश, अधुनमधून शरिर उडणे अशा प्रकारची लक्षणे दिसत होती. अशा प्रकारची गाठ जर वेळीच काढली नाही तर ती वाढत जाते त्यांचा परिणाम हा मृत्युमध्ये होतो तशा प्रकारे यशवंतरावांचा मृत्यु 28 आक्टोबर 1811 रोजी भानपुरा या ठिकाणी झाला.

यशवंतरावांचे अंतिम संस्कार.[51] हे भानपुरास्थित रेवानदीच्या किनाऱ्यावर करण्यात आले. वयच्या चौतीसाव्या वर्षापर्यंत यशवंतराव होळकर यांनी महान स्वराज्य संरक्षक, मातृभूमीच्या रक्षणासाठी, होळकर शाहीचे व मराठेशाहीचे नाव संपूर्ण जगामध्ये व उज्जवल केले यशवंतरावांचे कार्य, कर्तृत्व, शौर्य हे जगभरामध्ये चर्चिले जाऊ लागले. एक देशाभिमानी इंग्रजांची सत्ता, साम्राज्य, विस्तार आपल्या मातृभमीमध्ये स्थापीत होण्यापासुन आपली संपूर्ण शक्ति त्यांना रोखण्यासाठी लावली होती. असा हा मराठेशाहीतील चिरा निखळला. यशवंतरावांच्या प्रित्यर्थ भानपुरा स्थित एका विशाल छत्रीची निर्मिती करण्यात आली आहे.

### 2.22 यशवंतराव स्मृती प्रित्यर्थ छत्रीचे वर्णन :-

भानपुरा पासुन एका मैलाच्या अंतरावर उत्तर-पश्चिम दिशेला विशाल छत्री निर्माण करण्यात आली आहे.[52] या छत्रीच्या चारही बाजुने भिंती उभारलेल्या आहेत. दरवाजा समोरील भींतीवर पन्नास, साठ, फुट उंचीवर हत्तीचे चित्र आहेत. दरवाजा मधुन आत पाहिल्यानंतर सुंदर बाग दिसते. उत्तरेकडील दिशेला तळघर आणि विहीर आहे. जी छत्रीच्या समतल जमीनीपासुन वीस, तीस फुट खाली आहे. तळघरामध्ये जाण्यासाठी विहीरी मधुन जाण्यासाठी एक गुप्त मार्ग आहे या तळघरामध्ये अशा काही खोल्या आहेत ज्या खोल्या मध्ये जाण्यासाठीचा मार्ग हा गुप्त आहे. त्याच बरोबर, या ठिकाणी तोफा मध्ये तोफ गोळे भरण्यासाठी लोखंडी मोठे मोठे गोळे आहेत. ज्यांचा उपयोग हा युध्दाच्या वेळी करण्यात येत असेल. पुढे गेल्यानंतर राजदरबार आहे या राजदरबारामध्ये विविध प्रतिमा लावण्यात आलेल्या आहेत. दररोज या ठिकाणी संध्याकाळी 6 वाजता.[53] बिगुल वाजवुन यशवंतराव होळकर यांना सलामी देण्याची परंपरा आहे. दर रविवारी भानपुरा गावातील प्रमुख रस्त्यांने यशवंतरावांची पालखी मिरवणुकीद्वारे काढुन त्यांच्या समाधी स्थळापर्यंत ही पालखी घेऊन जाण्यात येते.

यशवंतराव होळकर मोठा शुर आणि मर्दानी सेनानी.[54] यशवंतराव होळकर हे मराठेशाहीच्या उत्तरार्धातील पडत्या कालखंडात आपल्या स्वत:च्या शौर्य, पराक्रमावर मराठेशाही, होळकरशाही आणि एकंदरीत संपूर्ण हिंदुस्थानात आपले नेतृत्व, स्थान निर्माण केले आहे. यशवंतरावांचा काळ हा असा होता की या कालखंडात कोणताही शुरवीर पुरुषाची कर्तबगारी, मुत्सुद्देगिरी ही इंग्रजांपुढे अयशस्वी ठरली होती. यशवंतराव दुसरा बाजीराव आणि दौलतराव शिंदे यांच्याशी वागताना बऱ्याच वेळा ते समंजस वाटत होते.[55] परंतु त्या कालखंडात मराठेशाहीच्या कोसळण्याचा वेग एवढा जास्त होता की त्याला सावरण्याच्या नादात यशवंतरावांचा इंग्रजांच्या विरुध्दचा संघर्ष काळ हा एकट्याच्या जीवावर आणि आपल्या सैन्यदलांच्या विश्वासावर, युध्दकौशल्यावर आधारीत डावपेच आखुन प्रचंड प्रमाणात इंग्रजांच्या विरुध्द सातत्याने आक्रमण करत होते. यशवंतरावांचा महत्वाचा कालखंड हा ऑगस्ट इ.स. 1804 च्या सुरुवाती काळापासून इ.स. जानेवारी 1806 पर्यंतचा कार्यकाळ राहिलेला आहे.

माळव्याच्या मोहिमेमध्ये यशवंतराव होळकर यांनी एक सेनापती या नात्याने किर्ती मिळविली.[56] यशवंतराव होळकर यांनी माळवा प्रांतातील केलेल्या वेगवेगळ्या लष्करी मोहीमा मधुन आपल्या युध्दकौशल्याच्या आधारावर आपले नेतृत्व एक मराठेशाहीचा मराठा सरदार आणि होळकरशाहीचा छत्रपती, महाराजा, चक्रवर्ती म्हणून किर्ती मिळविली होती. एवढेच नाही तर यशवंतरावांनी आपल्या लष्करी व्यवस्थेमध्ये वेगवेगळ्या सैन्यदलात सेनापती म्हणून शामराव महाडीक, फतेसिंह माने, जिवाजी यशवंत, अमीरखान या सारखे जीवाला जीव देणारे सहकारी त्यांना लाभले, पाराशर दादाजी सारख्या मुत्सद्दी, परिपक्व सल्लागार हा सुध्दा यशवंतराव आता होळकर घराण्याचे संरक्षक या नात्याने त्यांना ओळखण्यात येऊ लागले. जॉन माल्कम म्हणतो की, यशवंतराव होळकर यांच्यात एक अदभूत तेज, ऊर्जा, चैतन्य सळसळत होते त्यांना निराशा माहित नव्हती. यशवंतरावांना वैयक्तिक संकटे, येऊनही त्यांनी कधी आपले मनोर्धेर्य कमकुवत होऊ दिले नाही. यशवंतराव युध्दाच्या रणक्षेत्रामध्ये शत्रुच्या विरुध्द आक्रमण करताना आपल्या सैन्यासोबत शुध्द च्या प्रदेशात उतरुन शत्रुच्या विरुध्द युध्द लढायचे त्यामुळे यशवंतरावांच्या सैन्यदलातील सैनिकांचे मनोधैय उंचावत, त्वेषाने यशवंतरावांचे सैन्य गतिमानतेने शत्रुवर तुटून पडत यशवंतरावांच्या या युध्द वृत्तीमुळेच त्यांचा युध्दात पराभव होत असताना ही त्यांनी आपल्या लष्करी डावपेच, युध्दनेतृत्वाच्या जोरावर पराजय ही विजयामध्ये बदलवले आहेत. यशवंतराव होळकर यांच्या एवढा मराठेशाहीच्या

उत्तरकालखंडात मैदानी प्रदेशातील गनिमी युध्द तंत्राच्या साहाय्याने लढणारा दुसरा कोणी मराठा सरदार झाला नाही. होळकरांची कैफियत, भवानी शंकर यांची रोजनीशी, होळकरशाहीचा पत्र व्यवहार, पोवाडे इत्यादीचे लक्षपूर्वक अभ्यास केल्यावर यशवंतराव होळकर या शुरवीर, पराक्रमी, राष्ट्र पुरुषामध्ये तेज आहे इत्यादीची कल्पना येते.

शाहीर अनंत फंदी यांनी होळकरशाहीतील अद्विती पुत्र यशवंतराव होळकर यांचे शब्दातुन वर्णन केले आहे.[57]

**"सुभेदार यशवंत कन्हैया सदा फत्तेकरी तलवारी"**

सवाई यशवंतराव होळकर प्रसन्न मल्हारी हस्त शिरी अर्थात मराठेशाहीचे स्वातंत्र्य राखण्याकरिता यशवंतराव होळकर यांनी जीवापाड उद्योग केल्याने मराठेशाहीच्या अखेरचा स्वातंत्र्यवीर म्हणून इतिहासामध्ये नोंदविण्यात आले आहे. यशवंतरावांसारखा घोड्यावर बसणारा मराठेशाहीच्या उत्तरकालखंडात कुणी नव्हता. यशवंतराव होळकर हे घोड्यावर बसल्या बसल्याच खाली जमिनीवर झगरे पेटवून भाकरी भाजावयाचे, भाल्याच्या टोकाने ते परतावयाचे व त्यानेच उचलुन खावयाचे अशा प्रकारे घोड्यावर बसुन रपेट करावयाची एवढा सराव यशवंरावांना घोड्यावर बसुन झालेला होता त्या वेळेस यशवंतरावांचे वय वर्ष चौतीस होते. यशवंतरावांनी होळकरशाहीची सत्ता कुशलतेने स्वीकारली.[58] यशवंतराव होळकर यांनी आपले वडीलांच्या मृत्यु नंतर होळकरशाहीमध्ये अस्थिरतेच्या कालखंडात चारही बाजुने स्वकीय आणि परकीय शत्रु असताना होळकरशाही राज्य बुडताना या राज्याचे नेतृत्व यशवंतराव होळकर यांनी मोठ्या कौशल्याने, धाडसाने, पराक्रमाने स्वीकारले व होळकरशाही राज्याची सत्ता आपल्या हातात घेतली यशवंतरावांनी घोड्याच्या खोगीरावर आपले जीवन वाळवंटासारखे भोगुन संपूर्ण मराठेशाहीच्या स्वातंत्र्यासाठी, स्वराज्यासाठी स्वधर्मासाठी संपूर्ण भारतातील संस्थानिक, राजे रजवाडे यांना एकत्रीत आणण्याचा सातत्याने प्रयत्न केला. इंग्रजांचा सातत्याने एकामागुन एक पराभव यशवंतरावांनी केला यशवंतरावांचे ध्येय हे आपल्या मातृभूमीवरुन इंग्रजांची सत्ता उलथवून टाकण्यासाठी त्यांना याभूमीवरुन हाकलुन लावण्यासाठी मोठ्या प्रमाणात युध्द मोहीमा चालवल्या, या युध्द मोहीमेमध्ये इंग्रजांचा पराभव झाल्याने हताश, हतबल, झाले होते एवढी दहशत यशवंतरावांची होती इंग्रजांना संपूर्णपणे भारतातुन हाकलुन लावावयाचे असेल तर त्यांच्या सारखाच आपल्याकडे अत्याधुनिक पध्दतीचा तोफखाना बंदुका, शस्त्रास्त्रे असायला पाहिजे त्यादृष्टीने यशवंतरावांनी संपूर्ण

मराठेशाहीतील एकमेव हा मराठा सरदार असेल ज्याने आपला स्वत:चा तोफखाना, स्थापीत केला होता. यशवंतराव होळकर यांची मराठेशाहीतील वीर पुरुष म्हणून त्यांची ख्याती अमर राहील.

यशवंतराव होळकर यांचा आपण एकंदरीत कार्यकाळ पाहिला तर यशवंतरावांच्या जन्मापासून इ.स. 1776 ते 1797 वयाच्या वीस व मल्हारगर्दी पर्यंतचा संघर्ष ज्यात त्यांनी आपल्या स्वकीयांशी संघर्ष करावा लागला तो काळ होता. तर दुसरा कालखंड हा यशवंतराव होळकर यांच्या पुरुषार्थाचा मानला जातो तो इ.स. 1797 ते 1806 पर्यंतचा आहे, उत्तरार्धाथाचा कालखंड हा यशवंतरावांच्या जीवनातील शेवटचा भाग आहे. तो म्हणजे इ.स. 1806 ते 1811 पर्यंतचा काळ यशवंतराव होळकर हे वयाच्या 34 व्या वर्षा पर्यंत त्यांचा महत्व पूर्ण कालखंड आहे. अशा पध्दतीने यशवंतराव होळकर यांना एकुण 14 वर्षाचा कालखंड स्वत: चे कार्य कर्तृत्व सिध्द करण्यासाठी कमी कालावधी मिळाला. जर आजारपणातुन मुक्त झाले असते तर इंग्रजांना या भूमीवर राहु दिले नसते. आणि पुढील भविष्यकाळात इंग्रजांची सत्ता भारतात दीडशेवर्ष राहिली नसती परंतु नियतीला हे मान्य नव्हते.

## संदर्भ सूची


1) गोविंदराम शुरनर; आद्यक्रांतीकारी राजे छत्रपती यशवंतराव होळकर, शब्दवेध बुकहाऊस, पहाडे कॉर्नर गारखेडा परिसर औरंगाबाद 2018, पृ-07.
2) न.र.फाटक; श्रीमन्महाराज यशवंतराव होळकर, वि.पु. भागवत मौज. प्रिंटीग ब्युरो खटाववाडी, मुंबई-10, पृ-13.
3) अ.रा. कुलकर्णी; ग.ह. खरे मराठ्यांचा इतिहास खंड-3, महाराष्ट्र विद्यापीठ ग्रंथ निर्मिती मंडळ, कॉन्टीनेन्टल प्रकाशन विजयानगर पुणे-30, 1985 पृ-257.
4) सरदेसाई, कुलकर्णी, काळे; ऐतिहासिक पत्रव्यवहार, समर्थ छापखाना पुणे, 1933, पृ-347.
5) अनिल मिसाळ; रणझुंजार महाराजा यशवंतराव होळकर; ज्ञानकुंज प्रकाशन, मिलिंद निवास, विद्यानगर जत जि. सांगली 04, 2016, पृ-06.
6) प्रा. गणेश मतकर; इंदुरच्या राज्यकर्त्यांचा परिचय, श्री अहिल्या प्रकाशन, सौ कलावती मतकर 135/2 मोती तबेला नं-1, इंदुर-04, 187, पृ-08.
7) कित्ता, पृ-09.
8) कित्ता, पृ-09.
9) कित्ता, पृ-09.
10) कित्ता, पृ-09.
11) डॉ. राम इंगळे; अहिल्याबाई होळकर, विश्वभारती प्रकाशन, धनवटे चेंबर्स नागपुर-12, 1994, पृ-1, 2.
12) कित्ता, पृ-8,10.
13) Col (Retd) NB Bhatangar; The forgotten General, shree sarvottam prakashan-132 Tilak path, indore-07, 2020, PN-28.
14) घनश्याम होलकर; महाराजा यशवंतराव होलकर, नेशन प्रेस, ओल्ड नं. 38, न्युनं-6, मॅकनिकोलस रोड, चेटपेट चेन्नई-31, 2018, पृ-11.
15) यशवंत नरसिंह केळकर; होळकरांची कैफियत, हनुमान छापखाना 300, सदाशिव पेठ, पुणे-2, 1954, पृ-225.
16) www.wikipedia.com

17) गोविंदराम शुरनर; आद्यक्रांतीकारी राजे छत्रपती यशवंतराव होळकर, शब्दवेध बुकहाऊस, पहाडे कॉर्नर गारखेडा परिसर औरंगाबाद 2018, पृ-07.

18) संजय सोनवणी; भारतीय स्वातंत्र्याचा प्रणेता महाराजा यशवंतराव होळकर, प्रकाशन पुष्प, भारत बुक हाऊस, 1788 सदाशिव पेठ, देशमुखवाडी पुणे -30, पृ-125.

19) यशवंत नरसिंह केळकर; होळकरांची कैफियत, हनुमान छापखाना 300, सदाशिव पेठ, पुणे-2, 1954, पृ-225.

20) घनश्याम होलकर; महाराजा यशवंतरव होलकर, नेशन प्रेस, ओल्ड नं. 38, न्युनं-6, मॅकनिकोलस रोड, चेटपेट चेन्नई-31, 2018, पृ-173.

21) न.र.फाटक; श्रीमन्महाराज यशवंतराव होळकर, वि.पु. भागवत मौज. प्रिंटीग ब्युरो खटाववाडी, मुंबई-10, पृ-174.

22) घनश्याम होलकर; महाराजा यशवंतरव होलकर, नेशन प्रेस, ओल्ड नं. 38, न्युनं-6, मॅकनिकोलस रोड, चेटपेट चेन्नई-31, 2018, पृ-175.

23) कित्ता, पृ-175.

24) कित्ता, पृ-172.

25) यशवंत नरसिंह केळकर; होळकरांची कैफियत, हनुमान छापखाना 300, सदाशिव पेठ, पुणे-2, 1954, पृ-3, 4.

26) घनश्याम होलकर; महाराजा यशवंतरव होलकर, नेशन प्रेस, ओल्ड नं. 38, न्युनं-6, मॅकनिकोलस रोड, चेटपेट चेन्नई-31, 2018, पृ-176.

27) यशवंत नरसिंह केळकर; होळकरांची कैफियत, हनुमान छापखाना 300, सदाशिव पेठ, पुणे-2, 1954, पृ-142.

28) Raghubir sinh (ed); waqai-Holkar, publication scheme 57, Mishra Rajajika Jaipur-302001, 1998. PN-95.

29) न.र.फाटक; श्रीमन्महाराज यशवंतराव होळकर, वि.पु. भागवत मौज. प्रिंटीग ब्युरो खटाववाडी, मुंबई-10, पृ-196, 197.

30) कित्ता, पृ-197.

31) अहिल्या स्मारिका सन 1971- राम सेवक गर्ग.

32) घनश्याम होलकर; महाराजा यशवंतरव होलकर, नेशन प्रेस, ओल्ड नं. 38, न्युनं-6, मॅकनिकोलस रोड, चेटपेट चेन्नई-31, 2018, पृ-204.

33) मधुसुदनराव होलकर; होलकरों का इतिहास, प्रकाशन अखिल भारतीय होलकरमहासंघ, डब्ल्यु बी-19, गली नं. -1 शकरपुर दिल्ली-110092, 1992, पृ-384.

34) न.र.फाटक; श्रीमन्महाराज यशवंतराव होळकर, वि.पु. भागवत मौज. प्रिंटीग ब्युरो खटाववाडी, मुंबई-10, पृ-158.

35) कित्ता, पृ-163.

36) मधुसुदनराव होलकर; होलकरों का इतिहास, प्रकाशन अखिल भारतीय होलकरमहासंघ, डब्ल्यु बी-19, गली नं. -1 शकरपुर दिल्ली-110092, 1992, पृ-364.

37) न.चि. केळकर; मराठे व इंग्रज, प्रकाशन मॉडर्न बुकडेपो बाजीराव रास्ता पुणे-2, 1918, पृ-141.

38) गोविंदराम शुरनर; आद्यक्रांतीकारी राजे छत्रपती यशवंतराव होळकर, शब्दवेध बुकहाऊस, पहाडे कॉर्नर गारखेडा परिसर औरंगाबाद 2018, पृ-39.

39) घनश्याम होलकर; महाराजा यशवंतरव होलकर, नेशन प्रेस, ओल्ड नं. 38, न्युनं-6, मॅकनिकोलस रोड, चेटपेट चेन्नई-31, 2018, पृ-187.

40) गो.स. सरदेसाई; मराठी रियासत खंड-8, पॉप्युलर प्रकाशन 301 महालक्ष्मी चेंबर्स 22, भलाभाई देसाई रोड, मुंबई-26, 1993 पृ-374.

41) डॉ. गणेश मतकर; वीरश्रेष्ठ प्रथम यशवंतराव होलकर, नवीन फोटो कॉपी शिवविलास पॅलेस राजवाडा परिसर इंदौर 1999 -पृ-58.

42) संजय सोनवणी; भारतीय स्वातंत्र्याचा प्रणेता “महाराजा यशवंतराव होळकर”, पुष्प प्रकाशन भारत बुक हॉऊस 1788, सदाशिव पेठ, देशमुख वाडी पुणे-30, पृ-125.

43) डॉ. सोमनाथ रोडे; मराठ्यांचा इतिहास 1600 ते 1818, मनोहर पिंपळापुरे, पिंपळापुरे ॲण्ड कं प्रकाशन, हिंदु मुलींचे शाळे जवळ महाल, नागपुर-02, 1998, पृ-224.

44) संजय सोनवणी; भारतीय स्वातंत्र्याचा प्रणेता “महाराजा यशवंतराव होळकर”, पुष्प प्रकाशन भारत बुक हॉऊस 1788, सदाशिव पेठ, देशमुख वाडी पुणे-30, पृ-105.

45) घनश्याम होलकर; महाराजा यशवंतरव होलकर, नेशन प्रेस, ओल्ड नं. 38, न्युनं-6, मॅकनिकोलस रोड, चेटपेट चेन्नई-31, 2018, पृ-118.

46) श्रीकांत बरिंगे; क्रांतीची मशाल पेटवा, ब्लु कॅनन प्रकाशन, नागपुर 2015, पृ-57.

47) प्रा. गणेश मतकर; इंदुरच्या राज्यकर्त्यांचा परिचय, श्री अहिल्या प्रकाशन, सौ कलावती मतकर 135/2 मोती तबेला नं-1, इंदुर-04, 197 पृ-54.

48) संजय सोनवणी; भारतीय स्वातंत्र्याचा प्रणेता "महाराजा यशवंतराव होळकर", पुष्प प्रकाशन भारत बुक हॉऊस 1788, सदाशिव पेठ, देशमुख वाडी पुणे-30, पृ-111,112.

49) प्रा. गणेश मतकर; इंदुरच्या राज्यकर्त्यांचा परिचय, श्री अहिल्या प्रकाशन, सौ कलावती मतकर 135/2 मोती तबेला नं-1, इंदुर-04, 197 पृ-55.

50) कित्ता, पृ-55, 56, 57.

51) नवभारत इंदौर प्लस, शुक्रवार -14 मार्च 1997.

52) गोविंदराम शुरनर; आद्यक्रांतीकारी राजे छत्रपती यशवंतराव होळकर, शब्दवेध बुकहाऊस, पहाडे कॉर्नर गारखेडा परिसर औरंगाबाद 2018, पृ-5.

53) जयसिंग भाऊसाहेब पवार; मराठी साम्राज्याचा उदय आणि अस्त, प्रकाशन अनिल मेहता, अजब पुस्तकालय भाऊसिंगजी रोड कोल्हापुर.

54) श.गो. कोलारकर; मराठ्यांचा इतिहास 1600-1818, श्री मंगेश प्रकाशन श्री शांतादुर्गा निवास 23, नवी रामदास पेठ, नागपुर-10, 1988, पृ-568.

55) प्रा. गणेश मतकर; इंदुरच्या राज्यकर्त्यांचा परिचय, श्री अहिल्या प्रकाशन, सौ कलावती मतकर 135/2 मोती तबेला नं-1, इंदुर-04, 197, पृ-13.

56) कित्ता, पृ-15.

57) कित्ता, पृ-19.

58) कित्ता, पृ-34.

# प्रकरण तिसरे
# यशवंतराव होळकर यांची लष्करी व्यवस्था

---

3.1 प्रस्तावना
3.2 मराठ्यांचे सैन्य संघटन
3.3 मराठ्यांची दीनचर्या
3.4 मराठ्यांचे कुच
3.5 सैन्यदल विभाजन व नियोजन
3.6 यशवंतराव होळकर यांच्या सैन्यातील पदे
3.7 अंगरक्षक दल
3.8 घोडदल
3.9 तोफखाना
3.10 धर्नुधारी दल
3.11 रॉकेट दल
3.12 बंदुकधारी दल
3.13 लष्करी प्रशिक्षण केंद्रे
3.14 शिस्त
3.15 यशवंतराव होळकर यांची शिस्तीची नियमावली
3.16 अनुभवजन्य स्थितीतील वर्तन
3.17 वेतन
3.18 युध्द सन्मान व पदोन्नती
3.19 युध्दविषयक शस्त्रास्त्रे
3.20 शस्त्रांची निवड, आकार, रचना
3.21 शिरस्त्राण व कवच
3.22 यशवंतराव होळकर यांचा विशिष्ट चिलखत
3.23 यशवंतराव होळकर यांचे विविध शस्त्रे
3.24 यशवंतराव होळकर यांचा शस्त्रास्त्र विभाग
3.25 यशवंतराव होळकर यांची तलवार
3.26 सैन्य संख्या
3.27 प्रशासकीय व्यवस्था

संदर्भ सूची

## प्रकरण तिसरे

## यशवंतराव होळकर यांची लष्करी व्यवस्था

### 3.1 **प्रस्तावना :-**

लष्करी व्यवस्थेच्या बाबतीत मराठे हे मोगलांचे मोठ्या प्रमाणात ऋणी राहिलेले आहेत. पराक्रम, धाडस, शौर्य गाजविणाऱ्या मराठा सरदारांना मोगलांच्या कालखंडात उच्च, जहागिरी देण्यात आलेल्या होत्या त्यामुळे मराठा सरदारांना मुस्लिम राज्यकर्त्यांचे पूर्णपणे लष्करी डावपेच माहिती असल्याने मराठ्यांनी पुढे चालुन तेच आत्मसात केलेले दिसतात. मराठा म्हटला म्हणजे त्याला रणांगणाचे बाळकडुच पाजलेले असावयाचे, मराठी फौजेत पायदळापेक्षा, घोडदळाचा भरणाच जास्त होता. पहिल्या पासुन मराठ्यांची लढण्याची पध्दत ही अशी होती की, मराठ्यांना पायदळा पेक्षा घोडेस्वारांचाच उपयोग जास्त होत असे.

छावणी टाकून, खंदक खणून लढण्याची त्यांची पध्दत नव्हती. संथगतीने युध्द करणे हे त्यांना कधी जमले नाही. शत्रु जर आपल्या नियंत्रणात आला तर त्याच्यावर दौड करुन हल्ला चढवावा व एका हल्ल्या मध्ये शत्रु सैन्याचे जेवढे तुकडे पाडता येतील तितके तुकडे पाडावे. जर शत्रु आपल्या नियंत्रणात येण्यासारखा दिसत नसेल किंवा आपल्या पेक्षा शत्रु शक्तिशाली असेल तर शत्रु पासून दूर राहावे व त्याच्या अवती भवती घिरट्या घालुन शत्रुचा रसद पुरवठा लुटून त्याला जेरीस आणावे असा मराठ्यांच्या गनिमीकावा युध्दनितीचा हा भाग होता परंतु जर मराठ्यांना बिकट प्रसंग आलाच तर किल्ला किंवा गढीचा आश्रय घेऊन राहत. या सर्व गनिमी काव्याच्या युध्द तंत्राच्या कामगिरीस घोडदळच विशेष उपयोगी पडणार असल्याने मोगलांच्या कालखंडापर्यंत ही पध्दत मराठ्यांनी उपयोगात आणली.

परंतु इंग्रजांशी युध्द प्रसंग येऊ लागल्यावर पायदळाची आवश्यकता मराठ्यांना भासू लागली. पूर्वीच्या पध्दतीच्या युध्दात तोफखान्याची यांना कधी आवश्यकता युध्दात पडली नाही परंतु ज्यावेळी युरोपियांशी मराठ्यांचा संबंध आल्या पासून मराठ्यांना तोफाखान्याकडे लक्ष द्यावे लागले.

पेशव्यांच्या कालखंडात पेशव्यांची लष्करी व्यवस्था आणि मोगल कालखंडातील लष्करी व्यवस्था यामध्ये फार कमी फरक होता असे दिसुन येईल. यशवंतराव होळकर यांच्या सैन्य प्रमुखांची

निवड ही राज्य हिताच्या दृष्टीने होत होती. यशवंतराव होळकर यांच्या प्रारंभीच्या काळात लष्करी सेवेमध्ये कार्य करणारे सैनिक हे पूर्वी एखाद्या संस्थानिकांच्या फौजे मध्ये सेवेत होते. त्यामुळे या सैनिकांना लष्करासंबंधीचे नियम व कायदे इत्यादी ची माहिती होती. यशवंतराव होळकर यांच्या सैन्य दलाची उभारणी ही बहुतांशी शत्रुपक्षाचा त्याग करुन आलेल्या सैनिकांचीच दिसुन येते. त्यामुळे यशवंतराव होळकर यांच्या लष्करी व्यवस्थेवर मुत्सद्देगिरीचा प्रभाव दिसुन येतो.

मोगलांच्या सैन्य व्यवस्थेचे अनुकरन लष्करी, जहागिरी पध्दत मराठ्यांच्या राज्यात चालु झालेली आपणास पहावयास मिळते. मराठेशाहीतील सरदारांना सरंजाम देण्यात येऊ लागले. त्याचाच भाग म्हणून उत्तरेकडे होळकर, पवार, शिंदे हे दिसुन येतात. यशवंतराव होळकर यांच्या लष्करी व्यवस्थापनाचे पायाभूत तत्व हे पूर्णपणे वेगळे असले तरी यशवंतराव होळकरांना आपल्या सैनिकी व्यवस्थेमध्ये अनेक प्रकारे मोगलांच्या लष्करी व्यवस्थेचे अनुकरण करताना दिसतात. यशवंतराव होळकरांनी सैन्य भरती, पायदळ, घोडदळ, तोफखाना दल, धर्नुधारी दल, बंदुकधारी दल, रॉकेट दल, प्रशिक्षण, युध्द सन्मान, बढती, शस्त्रास्त्रे, सैन्याला वेतन, शिस्त, सैन्य संख्या, प्रशासकीय व्यवस्था इत्यादी बाबतीत यशवंतराव होळकर यांनी आपल्या पूर्वजांच्या मार्गाचे अनुकरण केलेले दिसुन येते.

### 3.2 **मराठ्यांचे सैन्य संघटन :-**

मराठ्यांच्या लष्करामध्ये होळकर, शिंदे, पवार, गायकवाड, पटवर्धन इत्यादी सरदारांना फौजा उभारण्यास सरंजाम व फौज सरंजामी पागा व इतलाखी फौज हे सर्व प्रकार आढळुन येते.[1] थोरल्या बाजीरावांच्या कालखंडात मराठेशाहीच्या राज्याच्या सीमा ह्या संपूर्ण भारतात विस्तारीत करण्याच्या दृष्टीने बाजीरावांनी मराठा सरदारांना आपआपल्या भागामध्ये सरंजाम व जहागिरी दिल्या त्याच बरोबर फौजा उभारण्यास परवानगी दिली. परकीय शत्रुचा मराठेशाहीवर आक्रमण होवू नये. दिल्लीची सत्ता ही कमकुवत झालेली असताना मराठ्यांच्या दबदबा रहावा. मराठेशाहीला उत्तरेकडून मोठ्या प्रमाणात चौथाई, सरदेशमुखी मिळावी. यासाठी मराठा सरदारांना थोरल्या बाजीराव पेशव्यांच्या कालखंडात अधिकार देण्यात आलेले होते. पहिल्या पासुन मराठ्यांची लष्करी व्यवस्था ही अशी होती की पायदळा पेक्षा घोडेस्वारांचा उपयोग मोठ्या प्रमाणात होत असे.[2] मराठ्यांना मोगलांशी लढताना ही पध्दत उपयोगी ठरली. परंतु इंग्रजांशी युध्दाचे प्रसंग येऊ लागल्यावर मराठ्यांना पायदळाची गरज

भासु लागली. त्याच बरोबर तोफखान्याकडे लक्ष द्यावे लागले. शिलेदारी ही पध्दत शिवकालीन असल्याने पुढे हीच पध्दत चालु राहिली. एका पथका मध्ये ५० घोडेस्वार तर दुसऱ्या पथकामध्ये ५०० घोडेस्वारांची संख्या असे प्रत्येक पथक आपल्या मगदुरा प्रमाणे स्वत:चे पथक तयार करत.

## 3.3 **मराठ्यांची दीनचर्या** :-

ग्रँड डफ लिहितो, मराठ्यांचे साहित्य म्हणजे थोडीशी कांदा व भाकरी व एक घोंगडी.[3] मराठे जर एखाद्या मोहिमेवर असताना रात्रीकुठे उतरले तर घोड्याचे लगाम हातात धरुन घोंगडी पसरवून या घोंगडीवर काहीवेळ आराम करत. दिवसा दोन प्रहरी काही खाण्याकरीता, उन्हा पासून स्वत:चे संरक्षण करण्या करीता सैन्य पाच-पाच,सहा-सहा जणांच्या घोळक्याने एखाद झाड असेल त्याच्या सावलीला उतरत, जर मैदानी प्रदेश असेल तर स्वत:कडील भाला जमिनीत रोवून त्या भाल्याला आपला घोडा बांधत व त्या भाल्याच्या टोकापासून एखादी घोंगडी पसरवून देत आणि भर उन्हामध्ये डोके लहानश्या सावली खाली टेकवुन आराम करीत परंतु मराठा सैनिक हा आपल्या तलवारीस मात्र स्वत: जवळून दूर ठेवत नसे. सैन्या जवळ लहान, चपळ काटक तट्टे असत.

एखाद्या राज्यावर हल्ला केला असता. किंवा शत्रुला पराभूत करुन मिळवलेली धन संपत्ती ही जलदगतीने आपल्या सैनिकांद्वारे आपल्या राज्याकडे पोहचचिण्याचे कार्य करित मराठ्यांचे सैन्य हे सुट- सुटीत असल्यामुळे शत्रुच्या सैन्याला यांचा पाठलाग करणे जिकरीचे होई. जर गाठच पडली तर मराठे शत्रुच्या सैन्याला दमवून त्यांचे नुकसान करत.

## 3.4 **मराठ्यांचे कुच** :-

जोन्स लिहितात, मराठे ज्यावेळी कुच करतात. त्यावेळी फौजा टोळ्या- टोळ्यांनी निघतात.[4] मराठे ज्यावेळी मोहिमेवर निघतात त्यावेळी जात असताना त्यांचा मार्ग दोन्ही बाजूने शेतकऱ्यांनी पेरलली शेते असतात. अशावेळी शेताच्या बाजूने केलेल्या कुंपना मधून चिंचोळ्या मार्गाने जात असताना घोडदळ, पायदळ, बुणगे इत्यादींचा लोंढा हा जमिनीवरुन कित्येक मैल वाहत आहे. असा आपल्याला भास व्हावा. असे दृश्य दिसते. या मोहिमे मध्ये घोडदळ, निशाण, नौबत घेतलेले उंट, हत्ती, बैल इत्यादींचा समावेश असे. मराठे हे सुसंस्कृत व शिस्तीचे उपभोक्ते होते.[5] ते युध्दातील शत्रुची परिस्थिती व शक्ती पाहुन जाळपोळ, लुटालुट आणि कत्तल नाराजीने करावी लागे. जर नाही केले तर आपले व आपल्या सैन्याचा सर्वनाश होईल हा एक युध्दातील डावपेचाचा भाग आहे. तो आपण

केला नाहीतर शत्रू या युध्दानितीचा उपयोग करु शकतो. त्यामुळे युध्दाच्या मैदानात हा भाग महत्वाचा ठरतो. जर शत्रू आपल्यावर चाल करुन येत नसेल त्यावेळी त्याच्याशी उदारपणाणे मराठे वागत. खंडणीची वसुली, रोख जडजवाहीर, प्रदेश, आपल्या ताब्यात घेवून शत्रुशी करार करत मोहिमेमध्ये शौर्य गाजवणाऱ्या सैनिकांचा सन्मान पारितोषिक देवून करत. ज्यामुळे सैन्यात उत्साह राहील. अशा प्रकारची प्रथा त्या काळी होती.

### 3.5 **सैन्यदल विभाजन व नियोजन** :-

#### 3.5.1 **सैन्य भरती** :-

यशवंतराव होळकर हे हिंदुधर्माचे अभिमानी जरी असले तरी त्यांनी अन्य धर्मियांचा द्वेष केल्याचे एकही उदाहरण नाही.[6] अमीरखानाला ते आपला सगा भाई मानत होते. अक्षरश: हजारोंचे मुस्लिम सैन्य त्यांच्या पदरी होते. फ्रेंच-इंग्रज, खिस्ती सेनानी व सैनिक ही यशवंराव होळकरांच्या सैन्य दलात कार्यरत होते. त्यांच्या सैन्यामध्ये भिल्लांसह सर्व जाती, धर्माचे सैनिक होते, यशवंतराव होळकर हे वेगवेगळ्या समाज रचनेतून सैन्य भरती करत. राज्याच्या सुरक्षिततेसाठी यशवंतराव होळकर यांनी आपल्या सैन्या मध्ये धनगर, मराठा, राजपूत, जाट, अहीर, पंजाबी, ब्राम्हण, वैश्य, भिल्ल, पेंढारी, पठाण, बंगश, रोहिले, वैरागी, लोहार, तेलंगी इत्यादी जाती धर्माचे सैनिक भरती केले होते. यशवंतराव होळकर सैनिकांमध्ये प्रिय होते.[7] यशवंतराव होळकर यांनी सैन्य दले ही जातीय स्वरुपाची नकरता सर्व धर्मीयांना आपल्या सैन्य दलामध्ये सामावून घेत. युध्दाच्या रणांगणात प्रत्यक्ष सैन्या बरोबर सहभाग घेतल्याने सैन्याचा आत्मविश्वास व उत्साह वाढत असे. यशवंतराव स्वत: आपल्या सैन्यदलाची उभारणी करत त्यामुळे यशवंतरावांकडे येणाऱ्या प्रत्येक सैनिकाला आपल्या सेनापती विषयी आदर, असे यशवंतराव होळकर हे स्वत:चे सैन्य दले-शक्ति वाढवत आणि यांच्या सैन्यामध्ये भवानी शंकर बक्षीच्या व्यतिरिक्त भाऊसिंह अकरानी, गोवर्धन नायक, सरदार अमीरखान, सारंगपूरचे वजीर हुसैन, धारचे श्यामराव महाडीक, पिंपळे बालाजी कमलाकर इत्यादींचा समावेश करण्यात आलेला आपल्याला पहावयास मिळतो. यशवंतराव होळकर यांना सैनिकांची कमतरता कधीच पडली नाही.[8] यशवंतराव होळकरांचा पराक्रम, सैन्याबदल असणारा विश्वास आणि सैनिकांना रोजी राखणारा हाताचा बीन हिशोबी सढळपणा हे गुण शिपाई गिरीला आकर्षुन घेणारे गुण यशवंतराव होळकर यांच्या अंगी प्रबळ असल्याने यशवंतरावांना आपल्या सैन्यदलामध्ये सैन्य भरती

करण्यासाठी सैनिकांची कमतरता कधीच कमी पडली नाही. जरी सैनिक जास्त झाले तर त्यांना आपल्या पदरी बाळगण्याला मागे पुढे पहात नव्हते.

सैन्य भरती संदर्भात यशवंतरावांचे पत्र.[9] पेशजीचे दोन कंपु होते त्यातून निवडक माणसे छाटून सहा पलटणे पुरी जाली व आणिक जागीहुन निवडक माणसांची भरती आणोन सहा पलटणी तेही भरल्या. एकुण बारा पलटणी व सामान दारु गोळ्या सह तैयार आहेत व आणखी ही पाच, सहा पलटणींची भरती आणावयास आफीसर लोक जागोजाग गेले आहेत. फौज मराठी दरोबस्त व काही पठाण आहेत, देशीहुन ही चार, पाच हजार फौज येणार आहे. मसलतशीर फायदा पडल्यास कर्तृव्य ते करावे.

शिंद्याने आपल्या पलटणीतून जो शिपाई कमी केले तेच बहुतेक शिपाई होळकरांच्या पलटणीत येऊन दाखल झाले.[10] दौलतराव शिंदेच्या सैन्यामध्ये असणारे सैनिक हे शिंद्याना सोडून जात होते. सैनिकांना मिळणारा अपुरा पगार त्यामुळे सैनिक शिंद्यांना सोडून जात. यशवंतराव होळकर यांच्या सैन्यदलात काम करणाऱ्या सैनिकाचा कधी पगार थकला आहे असे क्वचित घडत असे यशवंतरावांच्या सातत्याने मोहिमा असायच्या या मोहिमेच्या माध्यमातून मिळालेली धन संपत्ती ही यशवंतराव होळकर सैन्यामध्ये कमी जास्त हिस्सा वाटून देत त्यामुळे यशवंतरावांकडे सैन्य भरतीसाठी कायम दुसऱ्या राज्यातील सैनिकांचा ओढा असे.

होळकराने इंग्लिशांच्या पलटणी फितविण्या करिता एक कवडी ही खर्च केली नाही आणि तरीही इंग्लिशांच्या पलटणीतील शिपाई लोक आपण होऊन होळकरांच्या सैन्यात सामील होऊ लागले.[11] यशंतराव होळकर यांची युध्दनिती गतिमानता एकाग्रता, आक्रमकता, ध्येय- उद्दिष्टये एवढे युध्दाच्या वेळी प्रभावी असायचे की शत्रू सैन्याला ठार करुन युध्दाचा शेवट करत त्यामुळे यशवंतराव होळकरांचे युध्द नेतृत्व, कला कौशल्य गुणांचा कर्तृत्व विकास होत होता. इंग्रजांचा सातत्याने यशवंतरावांनी केलेल्या पराभवामुळे इंग्रजाच्या पलटणीतील भारतीय सैनिकाला यशवंतराव होळकर यांच्याविषयी आकर्षण निर्माण झाले होते. यशवंतरावांच्या शोर्यामुळे त्यांच्या सैन्यदलातील सैनिकांचा आत्मविश्वास, उत्साह दृढ होत होता. यशवंतराव होळकर यांच्या सैनिकांना युध्द मोहिमे मध्ये धनसंपत्ती मोठ्या प्रमाणात मिळत असे तर, इंग्रजांच्या पलटणीत कार्य करणाऱ्या भारतीय सैनिकांना तुटपुंज्या पगारावर काम करावे लागत असल्याने आणि इंग्रजांना पराभूत करणारा एकमेव भारतीय

राज्यकर्ता यशवंतराव होळकर आहे असे इंग्रजाच्या पलटणी मध्ये काम करणाऱ्या सैनिकांना वाटे. त्यामुळे इंग्रजांच्या पलटणीतील सैनिक यशवंतराव होळक्र यांच्या सैन्य दलामध्ये काम करण्यास उत्सुक असत.

यशवंतराव होळकरांनी आपल्या सैन्यात पायदळा पेक्षा मोठ्या प्रमाणात घोडदळ सैन्याची संख्या वाढवली होती. ज्याद्वारे गनिमीकावा पध्दतीद्वारे युध्द करण्यात येत असे.[12] भौगोलिक रचना, शत्रुची युध्दनिती, गतिमानता इत्यादीचा अभ्यास यशवंतरावांनी केलेला दिसुन येईल. उत्तर भारतातील मैदानी प्रदेशाचा विचार करुन यशवंतरावांनी घोडदळास आत्याधिक महत्व दिलेले दिसते. युध्दाच्या रणक्षेत्रावर पायदळाची कृती ही धिम्यागतीने होत असल्याने घोडदळाच्या माध्यमातून शत्रुच्या सैन्यावर गतिमानतेने हल्ला करता येतो. त्याच बरोबर आपल्या सैन्यासह शत्रुवर आक्रमक धोरण अवलंबविता येते. मैदानी प्रदेशातील गनिमीकावा युध्द तंत्राचा शत्रुच्या विरुध्द यशवंतराव होळकर यांनी पायदळा पेक्षा घोडदळाला महत्व दिल्याचे दिसुन येते.

१७ ऑगस्ट 1804 च्या पत्रात मार्किविस वेलस्लीने जनरल लॉर्ड लेक शी होळकरांच्या सैन्याविषयी मीमांसा केली.[13] यशवंतराव होळकर यांच्या सैन्यदलाचे ज्यावेळी इंग्रजांनी निरीक्षण केले. त्यावेळी त्यांना होळकरांच्या सैन्यात पठाण आणि मुसलमान या सैनिकांची मोठ्या प्रमाणात भरती असुन त्यांची एकमेकांना ओळख देखील नसली पाहिजे आणि हे सगळे सैन्य केवळ आपला उदरनिर्वाहाच्या आशेने होळकराच्या सभोवती जमलेले असावेत. असा अंदाज पत्राद्वारे वेलस्लीने जनरल लेक यास कळवलेला दिसतो. यशवंतराव होळकर सातत्याने इंग्रजांचा पराभव करत आहे त्याचे नेमके कारण इंग्रजांनी यशवंतरावांच्या सैन्य दलात भरती झालेल्या सैन्याविषयी आपले मत मांडलेले दिसुन येते.

आरिफखान आणि जंगलीखान हे दोघे यशवंतराव होळकर यांच्या छावणीत उपस्थित झाले.[14] यशवंतराव होळकर यांच्या सैन्यदलात भरती होण्यासाठी आरिफखान आणि जंगलीखान यांनी यशवंतरावांची छावणी मध्ये जाऊन भेट घेतली. त्यावेळी यांच्या सोबत 200 घोडेस्वार, 300 बंदुकधारी तेलंगी हजर होते यशवंतरावांनी या दोघांना प्रतिदिवस दोन रुपये वेतन देवून आपल्या सैन्यदलात सामील करुन घेतले यशवंतराव होळकर यांच्या मोहिमे दरम्यान त्यांच्या सैन्य दलात भरती होण्यासाठी मोठ्या प्रमाणात सैनिक येत असत. उत्तर भारतात यशवंतरावांचा झंझावात पाहुन

अनेक जन यशवंतरावांच्या सैन्यदलात येऊन भरती होत असे. यशवंतरावांचे नेतृत्व त्याकाळी मराठेशाहीत उत्तुंग होते. आरिफखान आणि जंगली खाना सारखे घोडेस्वार व बंदुकधारी सैनिक यशवंतरावांच्या सैन्य दलामध्ये भरती होत असतील तर बंदुकधारी दलाची निर्मिती ही त्या काळात यशवंतरावांनी केलेली दिसुन येते. त्याच बरोबर या सैनिकांना पगार कशा पध्दतीने दयावयाचा याचे आदेश देऊन आपल्या विश्वासु प्रमुखाकडे यांना पाठवून भरती करुन घेण्यास सांगितले जात यशवंतराव होळकर यांना इंग्रजांच्या व आप्त स्वीयापासून धोका. जाणवत असल्याने साहाजिकच प्रामाणिक व कार्यक्षम असे सैन्य दल स्वत: जवळ असावे असे यशवंतरावांना वाटु लागले.[15] यशवंतराव होळकर यांना स्वत:चे संरक्षण आणि आणीबाणीच्या प्रसंगी राखीव सैन्य दल म्हणून सैनिकांचा उपयोग करत यशवंतरावांच्या अंगरक्षका बरोबरच छावणीतील बैठका त्यांचे निवासस्थान त्याठिकाणची व्यवस्था व संरक्षण करण्याची जबाबदारी ही प्रामाणिक व कार्यक्षम सैन्यावर होती. प्रत्येक ठिकाणी काही षडयंत्र द्रोह घडत नाही याची पाहणी करुन त्याचे निवारण करणे हे या सैन्य दलाचे कार्य होते. यशवंतराव होळकर आपल्या मधुर वाणीने नवनवीन विश्वास पात्र सैनिकांची भरती करत ज्यामुळे यशवंतरावांचे सैन्यदल मोठ्या प्रमाणात वाढत जायचे त्याच बरोबर यशवंतरावांच्या उदार स्वभावामुळे त्यांचे सैन्य खूश असायचे ही गोष्ट इंग्रजांना फार उशीरा लक्षात आलेली दिसते.

यशवंतराव होळकर यांचे कार्य कर्तृत्व हे एवढे शौर्य, पराक्रमाचे होते की त्यांनी इंग्रजांच्या विरुध्द भारतीय संस्थानिकांना आणि आप्त स्वकियांना एकत्रीत करण्याचे प्रयत्न चालवले होते. परंतु इंग्रजांची नीती ही धोक्याची असल्याने व भारतीय संस्थानिकांना आपल्या विरुध्द बंड करण्यास लावण्याचे कटकारस्थान करु शकतात. त्यामुळे त्यांनी स्वत:च्या नियंत्रणाखाली एक सक्षम प्रामाणिक सैन्यदलाची भरती करण्याचा निर्णय घेतलेला दिसुन येतो. करारावर येणाऱ्या सैनिकांची भरती ही तीन महिने, सहा महिने, एकवर्ष या काळासाठी सैन्य भरती करण्यात येत होती.[16] यशवंतराव होळकर यांनी आपल्या वेगवेगळ्या सैन्य विभागामध्ये करारावर येणाऱ्या सैनिकांची भरती ही त्या सैन्याची किंवा सेनापतीचा पराक्रम, धाडस, शौर्य, युध्दातील कार्य पाहून त्यांना त्या त्या काळासाठी त्यांची भरती सैन्यदलात करण्यात येत असे. करारावर येणारा सैनिक हा कोणत्या उद्देशाने सैन्यदलात भरती होण्यासाठी येत आहे. त्याच्यावर त्या सैन्याचा कार्यकाल ठरविण्यात येत आसे.

### 3.5.2 **पायदळ :-**

यशवंतराव होळकर यांनी आपल्या सैन्याची स्वदेशी आणि पाश्चिमात्य स्वरुपाची सैन्य व्यवस्था करण्यात आलेली होती.[17] यशवंतराव होळकर यांच्या लष्करी व्यवस्थेत फ्रांसिस सैन्य अधिकाऱ्यांच्या नेतृत्वाखाली सैन्यबटालियन स्थापन करुन या सैन्य दलाचे नामकरण हे महापुरुषांच्या नावावर करण्यात आले होते. यामध्ये प्लुमेट या सैन्य अधिकाऱ्याच्या नेतृत्वाखाली सैन्यदलाचे नाव – "लक्ष्मण" ठेवण्यात आले होते. तर डूंड्रनेक या सैन्य अधिकाऱ्याच्या नेतृत्वा खाली "राम" या सैन्यादलाचे नाव ठेवण्यात आले. डूड यांच्या नेतृत्वाखालील बटालियनचे नाव "खंडोबा" असे सैन्य दलाचे नाव ठेवण्यात आले होते. वरिल सर्व बटालियनचा प्रमुख म्हणून हरनाथ सिंहाला जबाबदारी देण्यात आली होती.

आजपर्यंतच्या इतिहासामध्ये अशा प्रकारच्या सैन्य दलाविषयी वेगवेगळे नामकरण करुन त्या त्या सैन्यदलाचा आत्मविश्वास वाढविण्याचा हा प्रकार यशवंतरावांनी केलेला दिसुन येतो. ज्या भूमीमध्ये आपला जन्म झाला. आपल्या कुल देवतेचा सन्मान ठेवण्याचा आणि श्रध्दा बाळगण्याचा हा एक सैन्यदलाविषयी नामकरण करण्याचा प्रकार या ठिकाणी दिसुन येतो. परकीय सैन्य अधिकाऱ्याच्या नेतृत्वाखाली ही सैन्य दले कार्यरत होती. या सर्वांचा प्रमुख हा भारतीय माणूस असावा यासाठी विश्वासू प्रमुखाची निवड करण्यात आलेली दिसुन येते. यशवंतराव होळकर यांची या ठिकाणी सैन्यदलाविषयी असणारी आस्था, दुरदृष्टी रणनिती इत्यादी दिसुन येते.

### 3.6 **यशवंतराव होळकर यांच्या सैन्यातील पदे :-**

यशवंतराव होळकर यांच्या सैन्यामध्ये असणारे प्रमुख सैन्य अधिकारी.[18]

१) खासा सरदार 2) कॅप्टन 3) लेफ्टनंट 4) सार्जेन्ट मेजर 5) सार्जेन्टस

6) कुमेदान (नेटीव अधिकारी) 7) सुभेदार 8) जमादार 9) हवालदार 10) नाईक 11) डुमर (तम्वरची) 12) फाइफर (बांसरीवाला) 13) शिपाई 14) कारकुन 15) हरकारा 16) भिस्ती 17) मशालची 18) युरोपियन तोपची (रजंकी) 19) सारथी 20) दारु गोळा देणारा आयद खालसी 21) लदुदु गाडी चालवणारा गाडीवान इत्यादी यशवंतराव होळकर यांच्या सैन्यातील प्रमुख पदनाम होते.

### 3.6.1 **रिसालदाराची नावे :-**

यशवंतराव होळकरांच्या सैन्यव्यवस्थेत महत्वाचे सैन्यदल म्हणून ओळखले जात होते.[19] यादलावरच यशवंतरावांनी मोठमोठी युध्दे, शत्रुच्या विरुध्द जिंकलेले दिसुन येतात. त्यापैकीच खालील त्यांची नावे देण्यात आलेली आहेत.

1) अच्छेसिंह 2)हरनाथ सिंह 3) फतेहसिंह माने 4) अमीरखान 5) मुर्तजाखान 6) शामतखान 7) धर्माकुंवर 8) गुजाकुंवर 9) महिपतराय 10) गफुरखान 11) रघुनाथराव 12) गणपतराव 13) राजाभाऊ 14) मलकाना सिंह 15) शोभाराम 16) शेख मोहम्मद आजम 17) बापुजी शिंदे 18) गोमाजी शिंदे 19) डुंड्रनेक 20) खमेह 21) गार्डनर 22) रघुजी होळकर 23) कर्नल लिनियस 24) अम्बोज आरियल 25) खेरलाचा भिल्ल सरदार- झुंजार नायक 26) गोवर्धन नायक 27) अकराणीचा - राणा भाऊसिंह 28) सारंगपुरचा- वजीर हुसेन 29) सरदार शामराव महाडीक 30) बालाजी कमलाकर पिंपळे

### 3.6.2 **कामविसदारांची नावे :-**

यशवंतराव होळकर यांच्या लष्करी व्यवस्थेत कामविसदार जे आपली जबाबदारी पूर्णपणे कर्तृव्य निष्ठा पूर्वक करत होते. ते खालील त्यांचे नावे आहेत.[20]

1) तुळसाजी वाघ 2) फणसे 3) वाघमारे 4) बारगळ 5) लांबहाते 6) बुळे 7) शिंदे 8) भांड

यशवंतरावांच्या कार्यकाळात काही जहागिरीरदार होते हे सर्व अहिल्याबाई होळकर यांच्या कालखंडापासून कार्यरत होते. यांच्या व्यतिरिक्त यशवंतराव होळकर यांनी अन्य लोकांनाही जबाबदाऱ्या सोपविण्यात आलेल्या होत्या. ज्यामध्ये 1) परबता सिंह 2) रघुनाथ सिंह 3) जमीदार शोमकड 4) भैरोसिंह

### 3.7 **अंगरक्षक दल :-**

यशवंतराव होळकर यांचा कालखंड हा धामधुमीचा होता. विश्वासघात, तो मग स्वकीया कडून असो की इंग्रजांकडून त्यामध्ये यशवंतरावांनी स्वत: च्या सुरक्षिततेसाठी अंगरक्षक दलाची निर्मिती केलेली दिसुन येते.[21] यशवंतराव होळकर यांच्या अंगरक्षक दलात शेख अब्दुल्ला नावाच्या

व्यक्तीचा समावेश करण्यात आलेला होता. यशवंतराव होळकर ज्या ज्या वेळी मोहिमेवर असत. त्यावेळी शेख अब्दुल्ला अंगरक्षक दलाचे कार्य हे यशवंतरावांची सुरक्षा सांभाळाणे हे होते. जर यशवंतराव एखाद्या राज्याच्या किंवा सेनापतीच्या बैठकीसाठी जात असत त्यावेळी त्यांच्या भौवती गराडा फिरवून देवून येताच यशवंतरावाने भेटीच्या बैठकीच्या डेऱ्या भौवती आपल्या अंगरक्षकांचा पहारा उभा केलेला असे दगा बिगा होऊ नये यासाठी ही तरतूद अंगरक्षक दलाच्या माध्यमातून केलेली आपणास दिसुन येईल.

### 3.8 **घोडदळ :-**

मराठ्यांच्या मोहिमा ह्या साधारणपणे पावसाळा संपल्यावर विजयादशमीच्या सुमारास सुरु होत.[22] पावसाळा चालू होण्यापूर्वी त्यांच्या मोहीमा संपत, थोड्या बहुतकाळातच पावसाळ्यामध्ये युध्दे चालत, जसे मुकुंदरा खिंडीतील कर्नल मॉन्सन आणि यशवंतराव होळकर यांच्यात पावसाळ्यातील युध्द होय. पावसाळ्यामध्ये घोडदळासाठी मोठ्या छावण्या असायच्या. या छावण्यासांठी निवाऱ्याची जागा, मुबलक खुराक, चारा इत्यादीची तरतूद घोडदळासाठी करुन ठेवलेली असायची यशवंतराव होळकर यांच्याकडे कायमचे घोडदळ बाळगण्या पेक्षा आवश्यकते प्रमाणे घोडदळाची भरती करण्यात येत असे. यशवंतरावांच्या सैन्य विभागात पायदळा पेक्षा घोडदळाला जास्त महत्व होते. उत्तरेकडील मैदानी प्रदेशांत घोडदळाच्या माध्ममातून शत्रु सैन्यावर आक्रमकपणे हल्ला करण्यात येत असे, त्यामुळे यशवंतरावांकडे पायदळा पेक्षा घोडदळाच्या माध्यमातून इंग्रजांचा सातत्याने पराभव केलेला आपल्याला दिसुन येतो.

छत्रपती शिवाजी महाराजांच्या कालखंडापासून पायदळासह घोडदळाची उभारणी करण्यात आलेली होती.[23] शिवाजी महाराजांनी ज्या प्रदेशामध्ये आपल्या राज्याची उभारणी केलेली होती. त्या प्रदेशात पायदळापेक्षा घोडदळ जास्त उपयुक्त ठरलेले दिसुन येते. भौगोलिक रचनेनुसार सह्याद्रीच्या डोंगर रांगा, दऱ्या खोऱ्यांचा जंगलमय प्रदेश असल्याने आणि गनिमीकावा युध्दतंत्राचा उपयोग करुन शत्रु सैन्याला हतबल करणे त्यांच्यावर हल्ला करणे इत्यादीसाठी घोडदळ हे त्या कालखंडात उपयुक्त ठरलेले आपल्याला दिसुन येते. मराठ्यांच्या सैन्याची रचना.[24] ही तुर्की व इराणी घोडदळाच्या पध्दतीची होती, मराठ्यांच्या सैन्य दलात घोडदळाचे अधिक महत्व होते. त्यामुळे घोडयांचेही महत्व

वाढलेले दिसुन येते. सतराव्या शतकामध्ये मराठे शिलेदार व बारगीर हे घोड्यांचे शौकीन होते त्यामुळे यांच्याकडे वेगवेगळ्या जातीच्या देशी, विदेशी घोड्यांचा संग्रह यांच्याकडे असत.

स्वराज्याच्या घोडदळातील घोडे हे वेगवेगळ्या जातीचे असत.[25] मराठ्यांच्या राज्यात घोडदळाला महत्व असल्याने यांच्याकडे वेगवेगळ्या जातीचे घोडे असत. इराक, अरबस्तान इत्यादी देशांमधून चांगल्या प्रतिच्या घोड्यांची आयात करण्यात येत होती. या घोड्यांच्या तोडीचे उत्तम प्रकारचे देशी घोडे हे महाराष्ट्रात काठेवाडी, भीमथडी, गंगथडी अशा प्रकारच्या घोड्यांच्या जाती आपल्याकडे पैदा होत. मात्र मराठ्यांच्या सरदारांची व सैनिकांची ममता ही भीमथडी तट्टयावर विशेष असे. अरबस्तानातून आयात केलेले घोडे धष्टपुष्ट व दिसायला देखणे असायचे परंतु त्यांच्या पेक्षा काटकपणात, चपळतेत भीमथडी तट्टे हे घोडे अरबस्तानातल्या आयात केलेल्या घोड्यावर मात करीत मराठा सरदारांच्या लष्करामध्ये घोडा हा महत्वाचा घटक मानला जात होता.[26] मराठ्यांना आपल्या घोडदळाचे महत्व हे इतर दला पेक्षा जास्त असून या घोडदळाच्या आधारे मराठेशाहीचे साम्राज्य दीड-दोनशे वर्ष टिकुन राहिले. एवढेच नाहीतर यशवंतराव होळकरां सारख्या मराठा सरदाराच्या कार्य काळात त्यांच्याकडे त्यांचे लंका, महुआ जो लाल भुरकट रंगाचा महाराष्ट्रातील घोडा होता. “वीरा” हा घोडा जो फरिदाबादच्या लष्करी छावणीवर इंग्रजांनी हल्ला केला. त्यावेळी इंग्रजांच्या गोळीने वीरानावाचा घोडा हा मरण पावला. उत्तर भारतातील मोहिमा असो की इंग्रजांच्या विरुध्द युध्द असो यशवंतराव होळकर यांचा विजय हा घोडदळामुळेच झालेला आहे.

मराठा घोडदळा बाबतीत कॅप्टन मूर यास असे दिसुन आले की.[27] मराठ्यांच्या सैन्यातील बहुसंख्य घोडे हे घोडेस्वरांच्या मालकीचे होते त्यामुळे त्यांना स्वत:च्या आणि घोड्याच्या सेवेच्या मोबदल्यात घोड्याच्या गुणवत्तेनुसार मासिक वेतन मिळत असे एखाद्या शिलेदाराचा घोडा मारला गेल्यास जखमी झाल्यास सरकार कडून घोडा मालकाला नुकसान भरपाई तर मिळत नसेच परंतु त्याला आपला घोडा आणि भत्ता हे दोन्ही गमवावे लागत म्हणूनच हे दोन्ही टिकविण्या बाबतीत तो घोडेस्वार सातत्याने सावधगिरी बाळगत असत जनरल वेलस्ली म्हणतो की.[28] मराठ्यांच्या सैन्यामध्ये जर पायदळ सैन्य नसेल आणि फक्त घोडे स्वारच असतील तर आम्ही केव्हाच मराठा सैन्याचा पराभव करु शकरणार नाही. कारण आम्ही त्या घोडदलांचा पराभव करायला एके ठिकाणी जावे तो पर्यंत यशवंतराव होळकर हे त्या ठिकाणाहुन निघुन दुसरीकडेच लुटालुट करण्यासाठी पुढे जात गनिमी काव्याने लढणाऱ्या घोडदळा ऐवजी मराठ्यांना पायदळाच्या पलटणी उभारण्यासाठी त्यांना

आपण इंग्रजांनी प्रोत्साहन द्यावे यातच आपले हीत आहे. एकंदरीत पहाता भारतातील संस्थानिकांमध्ये इंग्रजांचे वर्चस्व स्थापन करण्यात जनरल वेलस्ली हा प्रभावी ठरत होता. परंतु यशवंतराव होळकर यांच्या घोड दौडी पुढे इंग्रजांचा निभाव लागला नाही. त्यामुळे त्याने मराठ्यांना पायदलाकडे जास्त ओढा यांचा व्हावा यासाठी प्रयत्न करावेत असे मत मांडतो. यशवंतराव होळकरांची पायदळा पेक्षा घोडदळाची सैन्य संख्या मोठ्या प्रमाणात होती. इंग्रजांना यशवंतरावांचा पाठलाग करणे नामुष्कीचे झाले होते. त्यामुळे पायदळाच्या माध्मयातून आपल्यावरती नियंत्रण ठेवता येईल अशी त्यांची युध्दनिती होती परंतु यशवंतराव होळकरांनी इंग्रजांच्या युध्दनितीला अयशस्वी करुन आपल्या घोडदळाच्या माध्यमातून सातत्याने विजय प्राप्त करताना दिसतात.

यशवंतराव होळकरांकडे उत्तर भारतातील सैन्य मोठ्या प्रमाणात होते त्यातले त्यात घोडदळाचा भरणा जास्त होता.[29] त्याकाळात संस्थानिक, राजेराजवाडे यांच्याकडे मोठ्या प्रमाणात युध्दात गतिमानता निर्माण व्हावी शत्रु सैन्यावर तुटुन पडावे. यासाठी घोडदळ महत्वाचे मानले जात. त्यामुळे त्या त्या परिस्थितीला अनुसरुन प्रत्येक जन आपल्या राज्याकडे सैन्यव्यवस्थेत घोडदळ हे मोठ्या संख्येने ठेवण्याचा प्रयत्न करत त्यामुळे यशवंतराव होळकरांना माहित होते की प्रत्येक संस्थानिकाकडे जावे लागणार आहे. त्यासाठी घोडदळे हे गतिमानतेने जाऊ शकते. एखाद्या युध्दात जर आपल्याला विजय मिळवावयाचा असेल तर शत्रुच्या सैन्यदलावर आक्रमकतेने हल्ला करण्यास घोडदळाचा उपयोग महत्वाचा ठरत असे. पायदळ हे संथगतीने चालणारे युध्दात पायदळाचा प्रभाव कमी पडतो. त्यामुळे घोडदळाला जास्त महत्व यशवंतरावांनी दिले होते. युध्दाच्या रणांगणावर घोडदळ हे शत्रुच्या सैन्यावर आक्रमकतेने हल्ला करु शकते. तेवढयाच गतिमानतेने हे शत्रुच्या सैन्यदलास विस्कळीत करता येते. घोडदळामुळे शत्रुच्या अचानकपणे व एकत्रित हल्ला करता येतो. जे पायदळामुळे शक्य होवू शकत नाही. त्यासाठी यशवंतरावांनी आपल्या सैन्यदलामध्ये पायदळा पेक्षा घोडदळाला जास्त प्रमाणात महत्व दिलेले दिसून येते. यामुळे यशवंतरावांच्या सैन्यात घोडदळाचा भरणा जास्त असल्याचा दिसुन येतो त्यामुळे शत्रुवर लवकरात लवकर विजय प्राप्त करता येतो.

यशवंतराव होळकर यांची भिस्त आपल्या गनिमीकाव्याच्या दीडलाख घोडे स्वरांवरच होती.[30] यशवंतराव होळकरांसाठी आपल्या लष्करी व्यवस्थेमध्ये असणाऱ्या वेगवेगळया दलां मध्ये घोडदळ हे शक्तिशाली बनवलेले होते. यशवंतरावांनी आपल्या राज्याच्या बाहेर चौथाई, सरदेशमुखी,

खंडणी वसुल करण्यासाठी राज्यापासून कोसों मैल जावे लागत. या मोहिमेवर जात असताना त्यांना अवजड साधन सामग्री व मोठ्या पायदळ दलाचा भाग घेऊन जाता येत नसे. यशवंतरावांना खडी फौजही घोडदळाच्या माध्यमातून दुर अंतरावर घेवून जाता येत असे. त्याकालखंडात ज्या सेनापतीकडे मोठ्या प्रमाणात घोडदळ असे त्याची जरब दुसऱ्या राज्यावर आणि शत्रुच्या सैन्यावर बसत होती. यशवंतरावांनी भौगोलिक रचनेचा अभ्यास करुनच घोडदळ सक्षम करण्याकडे लक्ष दिलेले आपल्याला दिसेल.

आपला देश आणि आपली दौलत या सगळ्या बद्दलची भिस्त यशवंतरावांनी आपल्या घोड्याच्या एका खोगिरावर ठेविली आहे.[31] जो पर्यंत या घोड्याच्या पाठीवर आहे तो पर्यंत माझे राज्य ज्या दिशेकडे माझ्या घोड्याचा लगाम खेचील त्या दिशेकडे माझ्या दीड लाख घोडदळाची धाड जाऊन पडेल आणि त्या वेगाने सर्व मुलूख पादाक्रांत करुन टाकील हे यशवंतरावांच्या घोडदळाच्या जीवावर त्यांची भिस्त होती, एवढा आत्मविश्वास यांना होता. आता पर्यंत त्यांनी आपल्या घोडदळातील वेगवान कामगिरीवर यशस्वीपणे कार्य केले. कंपनीच्या प्रदेशांचा नाश करण्याचा प्रयत्न केला.[32] यशवंतरावांचे घोडदळ एवढे गतिमान असायचे की शत्रुच्या सैन्यावर तुटून पडत त्याच गतीने शत्रुला कापुन काढीत आणि शत्रु सेरावैरा पळत सुटे एवढी गतिमानता यशवंतराव होळकरांच्या घोडदळा मध्ये होती. त्यामुळे प्रत्येक युध्दात यशवंतरावांच्या घोडदळाने यशस्वीपणे विजय मिळवलेले दिसतात. त्याच बरोबर संपूर्ण संस्थानिकांना एकत्रीत करुन इंग्रजांना भारताबाहेर घालवून लावण्यासाठी इंग्रजाच्या प्रदेशावर यशवंतरावांनी आक्रमण केले त्यात त्यांना यश पण आले.

यशवंतराव होळकर यांच्या जवळ तोफा, पायदळ हा सरंजाम असे घोडदळ तर त्यांचे मुख्य साधन होते.[33] यशवंतराव होळकर यांच्या सैन्यदलात पायदळ, तोफखानादळ, तर होतेच परंतु त्यांनी घोडदळाला आपले प्रमुख साधन मानले. ज्या ठिकाणी किंवा युध्दात कोणत्या दलाचा कधी केव्हा, कशा पध्दतीने उपयोग करुन घ्यावयाचा याचा अभ्यास यशवंतरावांना होता. त्यामुळे यशवंतरावांनी प्रत्येक युध्द मोहिमेवर जात असताना तोफखाना, पायदळ तर असेच पण ज्यावेळी यादोन्ही दलाचा प्रभाव युध्दावर पडत नसेल त्यावेळी घोडदलाचा उपयोग प्रभावीपणे करावयाचे युध्दात प्रथम तोफखाना चालवुन नंतर पायदळास शत्रुच्या विरुध्द लढण्यास पाठवीत. त्या वेळीही पायदळ निष्प्रभ ठरेल. त्यावेळी शत्रुच्या सैन्यावर आक्रमकपणे घोडदळाद्वारे हल्ला करावयाचा ही यशवंतरावांची

युध्दनिती होती त्यामुळे घोडदळाला ते आपले युध्दातील प्रमुख दल मानत असत. खरतर यशवंतराव होळकरांची सेना म्हणजे तिघांनी बनलेली असे ती म्हणजे सैनिक, घोडा, भाला इत्यादी.

यशवंतराव होळकर यांच्या घोडदळाचे नेतृत्व हे फतेहसिंह माने, भवानी शंकर बक्षी, अमीरखान व शाहमतखान यांच्या नेतृत्वाखाली घोडदळ कार्यरत होते.[34] यशवंतराव होळकर यांच्या सैन्यदलात घोडदळाचे प्रमुख म्हणून वरील सेनापती यांना असणारा घोडदळाचा अनुभव, युध्दात यांच्यावर एखादी जबाबदारी सोपविण्यात आली तर ती जबाबदारी चोखपणे बजावीत असे. त्याच बरोबर यशवंतरावांचे हे विश्वासू घोडदळ प्रमुख होते. यशवंतरावांच्या संकटकाळामध्ये भवानी शंकर बक्षी आणि अमीरखानाने यशवंतरावांना सहकार्य केलेले असल्याने व फतेहासिंह माने घोडदळात निष्णात असल्याने यशवंतरावांनी घोडदळाच्या दलाचे नेतृत्व करण्याची संधी त्यांना देण्यात आली होती. यशवंतरावांनी आपल्या सैन्याचे विभाग करुन ते एकेका सरदाराच्या नेतृत्वाखाली जबाबदारी देऊन या सरदारांना वेगवेगळ्या प्रदेशात पाठवत.[35] हे प्रदेश म्हणजे धार, जावरा, वडीवरा, रामपुरा, भानपुरा, मेवाड, सागर (बुंदेल खंड) इत्यादी ठिकाणी खंडणी, चौथाई वसुल करण्यासाठी पाठविण्यात येत असे यावरुन असे लक्षात येते की यशवंतराव होळकरांचा आपल्या सरदारावर विश्वास किती प्रमाणात होता हे दिसुन येईल.

यशवंतराव होळकर यांच्याद्वारे वारंवार करण्यात येणाऱ्या लष्करी मोहिमामध्ये घोडदळ बाळगणे अधिक खर्चाचे होते.[36] यशवंतराव होळकर यांनी यासाठी उत्तम प्रकारचे घोडे व यांना नियमितपणे पुरवठा व्यवस्था, चांगली साधन सामग्री व घोडदळाला वेतन देण्यासाठी लष्करी मोहिमे मधून मिळालेल्या करांच्या, खंडणीच्या स्वरुपातील उत्पन्न हे काही प्रमाणात सैन्य दलांना देण्यात येत होते. ज्या राज्याकडे आपल्या सैन्य दलात घोडदळ हे पुरेसे प्रमाणात नसते त्या राज्याच्या सैन्यदलाची गतिमानता ही मंदावते कारण प्रत्येक कृती ही गतिमान पध्दतीने चालते व त्याची अधिक काळजी करावी लागते. विजयाचे अमाप पीक विळ्याने कापून घ्यावे लागते ते पीक कोयत्याने कापून जमत नाही. घोडदळाचे अधिक्य हे लष्कराच्या मार्गातील प्रत्यक्ष अक्षर मानले जाऊ नये तथापि अप्रत्यक्षपणे त्यामुळे सैन्य हे दुर्बल होते.[37] कारण घोडदळाच्या दैनंदीन निर्वाहाचे प्रश्न कठीण असतात व खर्चाचाही भाग लक्षात घ्यावा लागतो. घोडदळाला लागणारा रोजच्या रोज चारा, वैरण, खुराक, औषधोपचार त्यांच्या निवाऱ्याची जागा इत्यादी घटकांसाठी मोठ्या प्रमाणात खर्च करावा लागतो. त्यामुळे दहा हजाराचे जादा घोडदळ उभारावयाचे असेल तर तेवढ्याच प्रमाणात त्या खर्चामध्ये पन्नास

हजार अधिक पायदळ ठेवता येते परंतु काळानुसार व परिस्थितीनुसार आपल्या ध्येय धोरणानुसार घोडदळाची उभारणी करावी लागते व त्यांच्या खर्चाचा आराखडा तयार करुनच घोडदळाची निर्मिती करावी लागते. त्या अनुषंगाने यशंतराव होळकर यांच्याकडे पायदळापेक्षा घोडदळाची संख्या जास्त होती त्यामुळे त्यांच्यावर दैनंदिन खर्च मोठ्या प्रमाणात करावा लागत होता.

घोडदळ जर भरपूर असेल तेव्हा विस्तृत मैदाने शोधून मोठ्या हालचालीचे डावपेच पसंत केले जातात.[38] जर शत्रु आपल्या पेक्षा दूर अंतरावर असेल तर आपल्याला शांतता व आराम मिळू शकतो. मात्र शत्रुला त्याचा फायदा मिळू शकत नाही. आपण जागेचे मालक असल्यामुळे शत्रुच्या बगलेवर जाण्याच्या हालचाली ह्या जास्त प्रमाणात बेडरपणे करणे शक्य होते. युध्दात दिशा बदलणे हे आक्रमणाच्या युक्त्या समजण्यात येतात. त्या केवळ घोडदळामुळे सहजपणे अंमलात आणल्या जातात.

## 3.9 **तोफखाना :-**

यशवंतराव होळकर यांच्या लष्करामध्ये पायदळ व घोडदळा बरोबरच तोफखान्याचे महत्व पुढे वाढलेले दिसुन येते.[39] इ.स. 1798 मध्ये अगदी असहाय असलेले यशवंतराव होळकर वर्ष दीड वर्षाच्या अल्पावधीत बलशाली होतात. यांच्या जवळ ब्रिटीश अधिकाऱ्यांच्या नेतृत्वाखाली मोठ्या तोफखान्यासह शस्त्र सज्ज कवायती फौज उभी होते. यशवंतराव होळकर यांच्या उत्तरे कडील लष्करी मोहिमा या प्रचंड वेगाने होत होत्या. या मोहिमेच्या माध्यमातून यशवंतरावाकडे मोठ्या संख्येने सैन्य जमा होत गेले. त्यांची लष्करी ताकद अल्पावधीतच एवढी वाढलेली दिसुन येते की, यशवंतराव होळकर भारताच्या वेगवेगळ्या राज्यात लष्करी मोहिमा काढून आपल्या राज्याचे उत्पन्न वाढविताना दिसतात. कालांतराने आपल्याला इंग्रजांच्या विरुध्द जिंकायचे असेल तर इंग्रजांकडे असणारा तोफखाना हा तशा प्रकारचा आपल्याकडे असल्या शिवाय आपण त्यांच्यावर विजय मिळवू शकत नाहीत, दर दिवशी युध्दाचा प्रसंग उदभवत असल्याने आपल्याकडे युध्दासाठी लागणारी शस्त्रास्त्रे ही प्रभावी नव्हती. त्यामुळे यशवंतराव होळकर यांनी स्वत: भानपुरा नजीक नावली या ठिकाणी तोफा ओतण्याचा कारखाना चालु केला होता. यशवंतरावांनी आपल्या सैन्य दलास अधिक शक्तिशाली व कार्यक्षम बनविण्याचा प्रयत्न केलेला दिसुन येईल.

भारतातील सर्व श्रेष्ठ तोफखाना.[40] यशवंतराव होळकर यांना इंग्रजांच्या तोफखान्याच्या तोडीस तोड आपला तोफखाना असावा असे त्यांना वाटत होते. भारतीय संस्थानिकांमध्ये अशा प्रकारची नवनिर्मिती करण्याची कुणाचीही हिंमत झालेली दिसत नाही. तेव्हा आपल्या सैन्यदलाला लागणारी लष्करी छावणी ही हिंग्लाजगडाचे पुर्ननिर्माण करुन यशवंतरावांनी उभारली हिंग्लाजगडा पासुन जवळच नावली गावी तोफा ओतण्याचा कारखाना उभा केला. हा तोफखाना इंग्रजांच्या तोफखान्याला प्रतिउत्तर देण्यासाठी होता तोफखाना व हा भारतीय संस्थानिकां पैकी सर्वात सर्वश्रेष्ठ तोफखाना होता. तोफा निर्माण करण्यासाठी लागणारी कच्ची सामग्री गोळा करण्यासाठी यशवंतराव होळकर यांनी नावली गावाच्या आजुबाजूला ज्या ठिकाणी मोठ्या प्रमाणात लोहखनिजांचा साठा करण्यात आलेला होता.[41] तोफा बनिवण्यासाठी लागणारे साचे निर्माण करण्यासाठी वापरात येणारे मेण या साठी बालाराम यास यशवंतरावांनी देवळे, प्रतापगडच्या सावंतसिंहाला पत्र पाठविण्यात यावे जेणे करुन उपयुक्त वेळेमध्ये मेण उपलब्ध होऊ शकेल. यावरुन यशवंतरावांची तोफा बनविण्याची आतुरता लक्षात येते. त्यांना उपयुक्त वेळेत तोफा बनविण्यासाठी लागणारी कच्ची सामग्री ही लवकरात लवकर मिळवून तोफा निर्माण कराव याच्या होत्या. ही धडपड त्यांची या ठिकाणी लक्षात येते.

१५ ऑगस्ट 1807 रोजीचे तोफखाना बद्दलचे पत्र.[42] तोफा निर्मितीच्या कामास अनेक दिवस लागल्यास मर्जी राहणार नाही, ढील झाल्यास ठीक नसे यशवंतराव होळकर यांनी भानपुरा जवळील नावली या ठिकाणी तोफा निर्माण करण्याचा कारखाना वेगाने चालु केला. कारण इंग्रजांच्या विरुध्द लढण्यासाठी लवकरात लवकर यशवंतरावांना तोफा उपलब्ध करावयाच्या होत्या त्यासाठी त्यांनी पाचखंडी मेण मागविले होते ते जर लवकरात लवकर उपलब्ध झाले नाही आणि जास्त दिवस लागेल तर आमची मर्जी राहणार नाही. यशवंतरावांची धडपड, ही तोफा ओतण्याच्या कारखान्यासाठी लागणाऱ्या मेणा साठी त्यांचे वरील उदगार होते. जर मेण आणण्यासाठी कुचराई झाली तर सैनिकांना यशवंतरावांची धमकीच होती. यशवंतराव होळकर हे तोफा ढाळण्यासाठी किती उतावीळ व उत्साही होते याची कल्पना त्यांच्या पत्रातील मजुकरावरुन लक्षात येईल. नोव्हेंबर मध्ये यशवंतरावांनी रघुजी भोसले यांच्याकडील एका इसमाला तोफा बद्दल कळविले.[43] भानपुऱ्याला आपण आल्यावर नवीन तोफा जिन्सीच्या 25, पलटणीच्या 100 असे एकुण 125 तोफा निर्माण करुन धातु वगैरेचा सरंजामाचा मेळ पाहून तोफांचा कारखाना चालु करुन आतापर्यंत २५ तोफा तयार झालेल्या आहेत. बाकीच्याही

काही दिवसात तयार होतील असे रघुजी भोसल्यांना इसमाद्वारे कळविण्यात आले होते. यशवंतरावांची इंग्रजा विरुध्दच्या युध्दासाठी भोसल्यांनी यशवंतराव होळकरांना सहकार्य करावे अशी भावना या वरुन कळते.

एकीकडे राज्याचा गाडा सुरळीत व्हावा यासाठी यशवंतरावांचा उद्योग चालु असता दुसरीकडे भानपुऱ्यास तोफा ओतण्याचा कारखाना उघडून बसले.[44] यशवंतराव होळकरांना पूर्ण जाणीव होती की, इंग्रजांची खरी शक्ती ही तोफांमध्ये असुन त्यांच्याशी जर यशस्वी पणे सामना करावयाचा तर त्यांच्या सारखेच उत्तम प्रकारचा कार्यक्षम तोफखाना आपल्या जवळ असला पाहिजे. या भावनेने यशवंतराव होळकर यांनी नवीन तोफा ओतण्याच्या मागे लागेलेले दिसुन येतात. इंग्रजाकडे घोड्यावरुन भरधाव ओढण्याच्या तोफा होत्या हे लक्षात ठेवून यशवंतराव होळकरांनी अशाच प्रकारच्या तोफा तयार केल्याचा पुरावा इंग्रजांच्या कागद पत्रात सापडतो. नावली गावात निर्माण केलेल्या तोफखाना कारखान्यामध्ये यशवंतराव होळकर हे स्वत: तोफांचे परिक्षण आणि निरीक्षण करत होते.[45] इंग्रजांच्या विरुध्द यशवंतरावांनी आपल्या लष्करात तोफखाना हा शक्तिशाली असला पाहिजे. इंग्रजांकडे असणाऱ्या तोफखान्याला आपल्या तोफखानाद्वारे प्रतिउत्तर देता यावे यासाठी यशवंतरावांची धडपड होती त्यामुळेच यशवंतराव दैनंदिन कामातून वेळ काढून तोफखान्याच्या कारखान्यात जाऊन तोफांची संख्या किती झाली. तोफा ओतण्यासाठी कोणत्याही कच्चा मालाची कमतरता नाहीना. ओतलेल्या तोफा ह्या व्यवस्थितपणे बनल्या आहेत का? याचे बारीक लक्ष देवून निरीक्षण करत होते. यशवंतरावांची तोफखाना कारखान्या बदल असणारी आस्था त्यातून त्यांना इंग्रजांना युध्दात हारवण्यासाठी तोफाच ह्या महत्वाच्या ठरु शकतात. त्यासाठी यशवंतराव होळकर यांनी आपल्या तोफा ओतण्याच्या कारखान्यात स्वत: जातीने जाऊन परिक्षण आणि निरीक्षण करत होते. नागेंद्र आझाद लिहितात. एका दिवशी कोटा राज्याचे वकील नावली या ठिकाणी पोहोचले होते तेथे त्यांनी पाहिले की यशवंतराव होळकर हे स्वत: तोफा बनवत आहे.[46] कितीही परिश्रम भारतातून इंग्रजांना हाकलुन लावण्यासाठी त्यांच्या शस्त्रांच्या तोडीस तोड देण्यास आपली शस्त्रास्त्रे म्हणजे तोफा ह्या मध्यम, हलक्या प्रकारच्या असाव्यात ह्या तोफा लवकरात लवकर तयार व्हाव्यात यासाठी या कारखान्यामध्ये रात्रंदिवस तोफा ओतण्याचे काम चालत होते. ह्या तोफा बनविण्यासाठी स्वत: यशवंतराव होळकर या कारखान्यात काम करत होते. मराठा सेनानी, आपल्या ध्येय, उद्दिष्ट या प्रति प्रामाणिक होता. त्यांची या कामाप्रती असणारी निष्ठा ही महत्वाची दिसुन येते.

१५ऑगस्ट 1807 पर्यंत नावली या ठिकाणी 25 ते 30 अत्याधुनिक तोफा तयार करण्यात आल्या.[47] इंग्रजांचे भारतात वाढते प्राबल्य लक्षात घेता. यांच्या सोबत युध्दासाठी लागणाऱ्या तोफा व इंग्रजाची तोफांबद्दल असणारी शक्ती लक्षात घेता. यशवंतराव होळकर यांनी भानपुरा जवळ नावली या ठिकाणी तोफा ओतण्याचा कारखाना बनवला होता. या कारखान्यातून तोफा बनविण्यात आल्याही होत्या त्या बरोबरच यशवंतरावांना महेश्वर जवळ "भिवडा" या भागामध्ये तोफा बनविण्याचा कारखाना स्थापला होता. असे इंग्रजी कागदपत्राच्या संदर्भ ग्रंथातून माहिती मिळते. शक्तिशाली तोफखानाद्वारेच इंग्रजांना पराभूत करण्यात येऊ शकते.[48] असे यशवंतराव होळकरांना वाटत होते. या कारखाण्यामध्ये अत्यंत उष्ण अशा हवामानामध्ये देखील रात्रंदिवस तोफा ओतण्याचे त्यांचे कार्य चालले होते. ब्रिटीशांना त्यांचा तोफखाना प्रत्येक वेळी युध्दात विजय मिळवून देतो.[49] त्यावेळी या वीर यशवंतराव होळकराने मोठ्या प्रमाणात लवकरात लवकर शक्य होईल तेवढ्या सहज नावली या तोफखान्यातून तोफा बनविण्यासाठी सातत्याने प्रयत्न चालवले होते.

यशवंतराव होळकर यांच्या तोफखान्याचा अधिकारी हा माकनसिंह होता.[50] यशवंतराव होळकर यांच्या लष्करामध्ये वेगवेगळया सैन्यदलाचे प्रमुख नेमण्यात आलेले होते तशाच प्रकारे तोफखान्याच्या अधिकाऱ्यांची नेमणूक करण्यात आलेली होती. इंग्रजाविरुध्द लढताना इंग्रजापेक्षा सरस अशा तोफा आपल्याकडे पाहिजेत.[51] यशवंतरावांची युध्दानिती, रणनिती ही प्रत्येक युध्दामध्ये शत्रुच्या सैन्या पेक्षा वरचढ राहिलेली दिसुन येते इंग्रजांच्या तोफा ह्याच त्यांना शत्रुच्या विरुध्द विजय मिळवून देतात हे त्यांच्या लक्षात आल्याने यशवंतरावांनी इंग्रजांच्या तोफा पेक्षा आपल्या तोफा ह्या वरचढ असाव्यात यासाठी त्यांनी वेगवेगळया प्रकारच्या तोफा बनविण्यासाठी त्यांचा कल होता.

तोफावरती महाराजधिराज यशवंतराव होळकर भानपूरा सन 1217 हिजरी अशी अक्षरे होळकरशाहीचे पुरावे उरावे यासाठी कोरली गेली.[52] कोणत्याही राज्याचा प्रमुख असो आपल्या कार्यकाळात आपण केलेल्या विधायक कार्याची ओळख ही वर्षानुर्षे राहावी यासाठी शिलालेखाच्या माध्यमातून आपले कार्य लिहुन ठेवतो आपल्या कार्याची ओळख येणाऱ्या पिढ्यांना व्हावी हा त्याच्या पाठी मागचा इतिहास स्वरुपात जतन व्हावा ही भावना असते. त्याच पध्दतीने मराठ्यांच्या राज्यामध्ये यशवंतराव होळकर यांनी तोफा ओतण्याचा कारखाना निर्माण करुन स्वत: तोफा बनविण्याच्या कामी आले व आपल्या लष्कराला या तोफा शत्रु सैन्याविरुध्द युध्दात विजय संपादन करण्यासाठी बनविल्या या तोफा कुणाच्या कार्यकाळात कुणी बनवल्या, किती बनवल्या या इतिहास स्वरुपात लक्षात

राहाण्यात आपले आणि आपल्या राज्याचे अस्तित्व, कार्यकर्तृत्व माहीत व्हावे ही भावना यशवंतरावांना त्याकाळी सुचली असावी. यामुळे त्यांनी आपल्या नावाने तोफावरती नावे कोरुन ठेवलेली दिसतात. नावली तोफखाना कारखान्यात 200 तोफा बनविण्यात आलेल्या होत्या.[53] यशवंतराव होळकर हे असे प्रथम मराठा सरदार होते ज्यांनी मराठेशाही मध्ये स्वत: च्या हाताने तोफा ओतण्याचे कार्य केले, कारखाना निर्माण केला, स्वत: जातीने त्याची सामग्री परराज्यातून मागवली दैनंदिन कामकाजातून वेळ काढून या कारखान्यात जाऊन निरीक्षण करत. या कारखान्यातुनच त्यांनी वेगवेगळ्या प्रकारच्या २०० तोफा बनवल्या होत्या.

नावली तोफा ओतण्याच्या कारखान्यातून यशवंतरावांनी दोन प्रकारच्या तोफांचे उत्पादन केले होते.[54] यशवंतराव होळकर यांनी ऑगस्ट ते नोव्हेंबर या अडीच महिन्याच्या अल्पावधीतच ढाळलेल्या तोफांचा आकडा पहिल्यावर असे लक्षात येते की, त्यांनी किती जलद गतीने काम चालवले होते हे दिसुन येते. त्यांनी युध्दात गतिमानतेने घेऊन जाण्यासाठी जिनसी (जड) आणि पलटणी (हलक्या) अशा दोन प्रकारच्या तोफा निर्माण केल्या होत्या. इंग्रजांकडे घोड्यावर लादुन घेऊन जाणाऱ्या तोफा होत्या तशा पध्दतीच्या त्यांनी घोडा व बैल या ओढुन घेऊन जाणाऱ्या तोफा निर्माण केलेल्या दिसतात. यशवंतराव होळकरांची लष्करासाठी व युध्दात गतिमानतेने तोफा उपयोगी पडाव्यात आणि इंग्रजावरती त्यांचा उपयोग करावा. या उद्देशाने त्यांनी हलक्या व जिनसी प्रकारच्या तोफा बनविण्यात आलेल्या होत्या. इंदौर संग्रहालयातील तोफ नं. ३५ वर उर्दुभाषा उत्कीर्ण लेख खूप आकर्षक आहे. जिचा मूळपाठ अशा प्रकारे आहे.[55] श्री लक्ष्मीकांत सहाय प्रसाद सरकार महाराजाधिराज अलीजा जसवंतराव होलकर सुबेदार बहादूर नसरत जंग नागनतोप सकता हुजुर मुकाम भानपुरा 1218 हिजरी उत्तीर्ण लेखातून स्पष्ट होते की ही तोफ १२१८ हिजरी मध्ये महाराजा यशवंतराव होळकर यांनी नावली (भानपुरा) या ठिकाणी निर्माण केलेली दिसुन येते. १९ एप्रिल 1811 रोजीच्या पत्रात यशवंतराव होळकर दारुगोळा विषयी वर्णन करतात.[56] यशवंतराव होळकर उल्लेख करतातकी दारु गोळा ५० मण प्राप्त झाला आहे या दारुगोळ्याचे वेगवेगळ्या भागात वाटणी योग्य प्रमाणे करण्यात यावी इंग्रजांच्या विरुध्द पुन्हा एकदा युध्द लढण्याच्या तयारीसाठी यशवंतरावांनी तयारी चालवली होती. हा दारुगोळा त्यांनी हिंडोन या ठिकाणाहून मागवलेला होता.

भवानी शंकर एक मोठी मारतार तोफ घेऊन यशवंतरावांपुढे हजर झाला.[57] यावेळी यशवंतराव होळकर हे मंदसौर या ठिकाणी वसुली करुन सीतामऊ या ठिकाणी आले होते. त्यावेळी

भवानी शंकर मारतार या नावाची तोफ घेऊन हजर झाला. या तोफेची बनावट ही सापासारखी होती. या तोफेमध्ये एकमण दहाशेर एवढे मोठ्या प्रमाणात तोफगोळा या तोफेत वापरण्यात येत होता. त्यांच्याकडे असणारी भवानी तोफ ही मोठी होती ह्या तोफेचा गोळा हा झालरा पाटण्याच्या तळयामध्ये जाऊन पडत असे यास गर्भ भंजनी असेही म्हणण्यात येत होते. यशवंतरावांची तोफखाना नवनिर्मिती विषयी किती प्रेम होते. यावरुन आपल्या निदर्शनास येते. यशवंतराव होळकर हे मृत्युमुखी पडण्याच्या काही दिवसापूर्वी स्वत: नावली या ठिकाणी जाऊन तोफखाना कारखन्याचे निरीक्षण केले होत.[58] देशहीत डोळ्यासमोर ठेवून शत्रुला तोडीस तोड प्रति उत्तर द्यावे या भावनेने यशवंतराव होळकर यांनी तोफा बनविण्याचा कारखाना निर्माण केला व स्वत: त्या कारखान्यात काम करत, मराठेशाही मध्ये अशा प्रकारे कार्य करणारा एकमेव मराठा सरदार असेल यशवंतरावांचे, तोफखाना बद्दलचे प्रेम हे इंग्रजांना भारतातून हाकलुन लावण्यासाठी त्यांच्या विरुध्द युध्दात विजय मिळवणे आवश्यक आहे. या हेतुने यशवंतराव होळकरांनी मृत्युश्य्येवर असताना सुध्दा नावली येथील तोफखाना कारखान्याचे काम कशा पध्दतीने चालु आहे. याचे मन भरुन निरीक्षण करण्यासाठी गेलेले दिसुन येतात. या वरुनच यशवंतरावांचे देशप्रेम, देशहित लक्षात येते. शत्रुच्या शक्तीची इतंभूत माहिती ठेवून त्या दिशेने कार्य करणारी ही एकमेव व्यक्ती मराठेशाही मध्ये या कालखंडात आपल्याला दिसुन येते.

मराठेशाहीच्या कालखंडात यशवंतराव होळकर हे त्या काळातील एकमेव मराठा सरदार होते.[59] ज्यांनी आपल्या लष्कराची गरज ओळखून शत्रुच्या शस्त्रास्त्रे, तोफांमध्ये आधुनिकता येत आहे त्याला अनुसरुन यशवंतरावांनी तोफा बनविण्याचा कारखाना निर्माण केला. आपल्या सैन्य दलाला आधुनिक शस्त्रास्त्रांनी परिपक्व करण्यासाठी केलेला हा त्यांचा प्रयत्न दिसतो. तोफखान्यातील कर्मचाऱ्यांचा उत्साह वाढावा, आपल्या ध्येया प्रती एकनिष्ठ असलेला हा सरदार शत्रुच्या तोफखाण्या बरोबर आपला तोफखाना शक्तिशाली असावा. असा वाटणारा हा सरदार होता. इतिहासकार आणि सैन्य तंज्ञाच्या मतानुसार, होळकरी तोफखाना हा यशवंतराव होळकर यांच्या शासन कालखंडात चांगल्या पध्दतीचा होता.[60] सुभेदार मल्हारराव होळकर आणि अहिल्याबाई होळकर यांच्या शासन कालखंडामध्ये मोठ्या प्रमाणात तोफा निर्माण करण्यात आलेल्या होत्या. त्याच बरोबर त्यांच्या जवळ सैन्य मोहिमेच्या दरम्यान शत्रुच्या तोफा मोठ्या प्रमाणात युध्दात हस्तगत केलेल्या होत्या. यशवंतराव होळकर यांनी त्यांच्या कार्यकाळात निर्माण केलेल्या या तोफा उत्तम प्रकारच्या होत्या. यांनी

वेगवेगळ्या प्रकारच्या बंदुकाही युध्दामध्ये शत्रुच्या हस्तगत केलेल्या दिसतात. परंतु इतिहास साक्षी आहे की, या तोफांच्या विश्वासावर यशवंतराव होळकर यांनी इंग्रजांची झोप उडवली होती.

यशवंतराव होळकर यांच्या सैन्य दलामध्ये जुन्या तोफा ही होत्या. ज्या सुभेदार मल्हारराव होळकर यांनी त्यांच्या कालखंडातील युध्दात हस्तगत केलेल्या होत्या. मोहिमेवर तोफा घेऊन जाण्यासाठी वेगवेगळ्या प्रकारची साधने तयार करण्यात आली होती.[61] यशवंतराव होळकर यांनी मोहिमेवर, युध्दात तोफा वापरण्यासाठी लाकडाचे चांगल्या प्रकारचे पाय आणि लोखंडाची चाके बनविण्यात आलेली होती. तोफांची क्षमता व शक्ती पाहुन त्यांची वेगवेगळ्या गटात विभागणी करण्यात आलेली होती. या सर्व तोफखान्याची जबाबदारी सांभाळणाच्या सैन्याला सर्व प्रकारच्या सुविधा उपलब्ध करुन देण्यात आलेल्या असे त्याच बरोबर यांच्या सोबत मारक क्षमता असलेल्या लहान बंदुका व लहान हलक्या व जड स्वरुपाच्या असणाऱ्या तोफांचे उत्पादन मोठ्या प्रमाणात करण्यात आलेले होते. विशेषत: बैलगाडीने ओढणारा वेगळा तोफखानादल यशवंतराव होळकरांनी निर्माण केला होता. युध्दाच्या रणांगणाचा विचार करुन कोणत्या प्रकारच्या तोफखाना दलाचा वापर करावयाचा याचे ज्ञान हे यशवंतरावांना होते.

तोफखाना हा सैन्याचा सर्वाधिक विध्वंसकारी शाखा असते.[62] तोफखानादल हे ज्या ठिकाणी अस्तित्वात नाही त्या ठिकाणी सैन्यदलाची प्रहार करण्यासाठीची शक्ती ही मोठ्या प्रमाणात घटत असते त्याच बरोबर, तोफखाना हा सर्वात कमी गतिमान असणारे दल आहे. त्याठिकाणी सैन्यदले ही लवचिक स्वरुपाची बनतात. त्याच्या पलीकडे तोफखाना दलाला हातघाईची लढाई करता येत नसल्यामुळे या दलास पायदळाचे संरक्षण द्यावे लागते. तोफखाना दल जर मोठे असेल आणि प्रत्येक ठिकाणी शत्रुचा हल्ला मोडून काढण्या एवढे पुरेसे उपलब्ध पायदळ नसेल तेव्हा तोफाखाना हा सहजपणे शत्रु सैन्याच्या हाती पडतो. सैन्यदलाची ही शाखा अशी आहे की ज्याची मुख्य साधन संपत्ती ही तोफखाना हे शत्रु च्या तोफखाना दलाच्या मुळ मालकाविरुध्द त्वरेने उपयोगात आणता येतात. त्यासाठी तोफखाना हा सैन्याची सर्वाधिक विध्वंसकारी शाखा समजली जाते. त्याच्यासाठी युध्दात तोफखाना वापरताना वेगवेगळ्या प्रकारच्या भागात आपल्या सैन्याला पुरक आणि शत्रु सैन्याला मारक ठरेल अशा पध्दतीने यशवंतराव होळकर युध्दामध्ये वापरताना दिसतात.

### 3.10 धर्नुधारी दल :-

धर्नुधारी दलाचे नेतृत्व हे गोवर्धन नायक, झुंजारसिंह यांच्याकडे होते.[63] यशंतराव होळकर यांनी आपल्या सैन्यदलाची योग्य पध्दतीने रचना केलेली दिसुन येते. यशवंतरावांच्या सैन्यदलामध्ये धर्नुधारी दलाचा एक विशेष असा विभाग होता. युध्दाच्या रणांगणावर शत्रुच्या सैन्या विरुध्द धर्नुधारी दलाचा वापर करणे हे यशवंतराव होळकर यांच्या युध्दनितीचा भाग होता. शत्रुच्या सैन्यदलाची शक्ती, त्यांची शस्रास्त्रे, त्यांची रणानिती, सैन्य संख्या इत्यादी विषयी माहिती आपल्या गुप्त हेरा कडून घेऊनच युध्दात धर्नुधारी दलाचा वापर करावयाचा की नाही हे यशवंतराव होळकरांच्या डावपेचाचा एक भाग होता. यांच्या सैन्याची शक्ती ही एक धर्नुधारी दलाच्या कार्यकर्तृत्वावर प्रामुख्याने होती. यशवंतरावांच्या या धर्नुधारी दलामध्ये मोठ्या प्रमाणात भिल्लांचा समावेश होता. गोवर्धन नायक आणि झुंजार सिंह यांच्या नियंत्रणाखाली धर्नुधारी दल युध्दामध्ये लढत असे

### 3.11 रॉकेट दल :-

यशवंतराव होळकर यांनी आपल्या लष्करी विभागाला नव्या स्वरुपात व्यवस्थिकरण केले.[64] सैन्याच्या वेगवेगळ्या दलामध्ये रॉकेट दल हे एक महत्वाचे सैन्य दल होते. रॉकेट दला द्वारे मारा करणाऱ्या सैन्याचे एक विशेष दल त्याकाळी निर्माण केले होते. रॉकेट दलाचा उपयोग शत्रुच्या विरुध्द करण्यात येत आसल्याने यशवंतरावांच्या सैन्य शक्तिची ही वैशिष्टये आपल्याला दिसुन येतात. रॉकेट दलाची सैन्य संख्या ही विशिष्ट मर्यादीत स्वरुपाची होती.[65] यशवंतराव होळकर यांच्या सैन्य दलामध्ये रॉकेट दलाची सैन्या संख्या ही एकुण १२०० सैनिकांची होती. जे की शत्रुच्या विरुध्द रॉकेटचा वापर करुन शत्रु सैन्याला समूळ नष्ट करण्याची क्षमता या दलामध्ये होती.

### 3.12 बंदुकधारी दल :-

यशवंतराव होळकर यांच्याकडे लष्करी विभागात बंदुकधारी दलाची निर्मिती करण्यात आली होती.[66] सैन्यदलाच्या विभागा मध्ये बंदुकधारी दल होते. आपल्या सैन्याला बंदुकीचे वजन हलके व्हावे यासाठी त्यांच्याकडे असणाऱ्या भानपुरास्थित नावली येथील तोफा ओतण्याच्या कारखान्या मध्ये तोफांबरोबरच, बंदुका बनविण्याचा व बंदुकीच्या पाठी मागचा भाग हा हलका व व्यवस्थित असावा. यासाठी लाकडाचा वापर करण्यात आलेला होता. यशवंतराव होळकरांचे आपल्या सैन्याला लागणाऱ्या शस्रास्त्रांच्या बाबतीत किती बारिक निरीक्षण होते. यावरुन दिसुन येते.

यशवंतरावांचे सैन्य हे दुसऱ्या शस्त्रांच्या तुलनेमध्ये बंदुकधारी दलाचा वापर फार क्वचित ठिकाणी करत शत्रु सैन्य जर आपल्या नियंत्रणात येत नसेल त्यावेळी बंदुकधारी दलाचा उपयोग करत, तरी ही यशवंतराव आपल्या सैन्य दलामध्ये नेहमी मोहिमेवर असताना बंदुकधारी दल सोबत ठेवत. मोहीमेवर असताना जर कोणी आपल्या सैन्यात दाखल होत असेल त्यावेळी त्यास सामील करुन घेत. तशाच प्रकारे आरिफखान व जंगलीखान यशवंतरावांच्या संरक्षणार्थ २०० घोडे स्वार आणि ३०० तेलंगी बंदुकधारी सैन्य सामील झालेले दिसतात. उंटावर बसुन स्वार बंदुकधारी सैन्यदल हे वेगळे बनविण्यात आले होते.[67] यशवंतराव होळकर यांच्या युध्द मोहिमा या वेगवेगळ्या प्रांतामध्ये असायच्या उत्तरेकडील भौगोलिक रचना ही सपाट व मैदानी आसल्याने गुजरात, राजस्थान सारख्या भागात वाळवंट वाळुकामय प्रदेश असल्याने या भागा मध्ये घोडदल, पायदल, हे गतिमानतेने युध्द करु शकत नाही त्यासाठी यशवंतरावांनी उंटदल या दलाचा उपयोग करीत असे. एकंदरीत पाहता यशवंतराव होळकर यांना भौगोलिक रचनेच्या अभ्यासानुसार त्यांनी आपली लष्करी सैन्यदलाची निर्मिती केलेली पहावयास मिळते.

## 3.13 **लष्करी प्रशिक्षण केंद्र :-**

घोड्यावरुन तलवार चालवणे, तोफा एका ठिकाणी कधी व कशा एकत्रित आणाव्यात इत्यादीचे प्रशिक्षण स्वत: यशवंतराव होळकर हे जातीने हजर राहुन मार्गदर्शन करायचे.[68] मराठेशाहीच्या उत्तरार्धात कालखंडामध्ये यशवंतराव होळकर असे मराठा सरदार होते. ज्यांनी आपल्या लष्करातील सैन्यदलास नियमितपणे लष्करी प्रशिक्षण दिले. यशवंतरावांच्या सैन्याची कार्यक्षमता, कार्यकुशलता, निपुणता इत्यादी यशवंतरावांनी सैन्याला लष्करी प्रशिक्षण देण्यासाठी विशेष परिश्रम घेतलेले दिसतात. यशवंतराव होळकर यांनी हिंगलाजगड आणि चंबळनदीच्या भूभागावर स्वत: च्या सैन्याला प्रशिक्षण देत होते. या प्रशिक्षणामध्ये यशवंतरावांनी आपल्या सैनिकांना बनावटी युध्दाच्या माध्यमातून प्रशिक्षण देण्याची सुरुवात केलेली दिसते जेणेकरुन खरोखरच्या युध्दात आपले सैन्य शत्रुच्या सैन्यावर विजयमिळवू शकेल हा त्यांचा उद्देश या ठिकाणी दिसून येतो. यशवंतराव होळकर आपल्या घोडदळाला गनिमीकावा युध्दतंत्राद्वारे कशापध्दतीने युध्द करावयाचे याचे प्रशिक्षण देऊन घोडदळाचा आत्मविश्वास वाढवायचे.[69] उत्तरेकडील भौगोलिक रचनेचा विचार करता घोडदळाला अत्याधिक महत्व त्याकाळी प्राप्त झालेले होते. प्रत्येक राजेरजवाडे दूर अंतरावरच्या युध्दासाठी घोडदळाचा उपयोग करीत. त्यासाठी यशवंतराव होळकर यांनी गरज लक्षात

घेता उत्तरेकडील मैदानी प्रदेशातील युध्दात घोडदळाच्या माध्यमातून गनिमीकावा युध्दतंत्र कशा पध्दतीने शत्रुच्या सैन्याविरुध्द खेळले जावे याचे प्रशिक्षण आपल्या घोडदळाला ते देत त्यामुळे प्रत्यक्ष युध्दाच्यावेळी घोडदळाला आपण घेतलेल्या प्रशिक्षणाचा फायदा प्रत्यक्ष युध्दात होतं होता, त्यामुळे यशवंतरावांच्या घोडदळाचा आत्मविश्वास हा द्विगुणीत होत असे.

सैनिकांची परेड, युध्दाभ्यास, गनिमीकावा युध्दतंत्र, युरोपियन पध्दतीच्या युध्दाचे छोटे छोटे बारकावे हे स्वत: यशवंतराव सैन्यामध्ये जाऊन समजून सांगायचे.[70] यशवंतराव होळकरांनी सैन्याच्या प्रशिक्षणासाठी हिंगलाजगड या ठिकाणी प्रशिक्षण केंद्र लष्करी छावणीच्या स्वरुपात निर्माण केले होते. त्यामुळे स्वत: यशवंतराव या प्रशिक्षण केंद्रामध्ये दैनंदिन कामकाजातून वेळ काढुन आपल्या सैन्याला पायदळास, घोडदळास, युध्द पध्दतीच्या डावपेचांची ओळख स्वत: सैन्यात जाऊन करावयाचे त्यामुळे सैन्याला प्रशिक्षणासाठी हजर राहावे लागे. आपले सैन्य दल हे दुसऱ्या राज्याच्या सैन्यदलापेक्षा सरस असावे असे त्यांना नेहमी वाटे. त्यामुळे आपल्या सैनिकांना यशवंतराव हे वेळ देत असत. यशवंतराव होळकर यांनी एका हात्तीला प्रशिक्षीत केले होते.[71] इंदौर या ठिकाणी यशवंतराव होळकर यांनी प्रशिक्षण काळामध्ये एका हत्तीला विशेषण करुन प्रशिक्षण देण्यात आले होते. जेणे करुन त्या हत्तीच्या समोरुन येणाऱ्या घोडे स्वाराला आपल्या सोंडेद्वारे पकडून फेकावे अशा पध्दतीने प्रशिक्षण हत्तीला त्या काळात देण्यात आले. म्हणजे सैन्य असोकी प्राणी तो युध्दात कामी येणार असल्यास त्यास स्वत: यशवंतराव जातीने हजर राहुन प्रशिक्षण देत सैन्य, युध्द, राज्य, देशावर प्रेमकरणारी व्यक्तीच हे करु शकतो ती व्यक्ती ही यशवंतराव होळकर मराठेशाहीच्या उत्तर कालखंडातून आढळुन येते.

यशवंतराव होळकर आपल्या फौजेच्या तयारीची परीक्षा घेऊ लागले.[72] यशवंतराव आपल्या सैन्याचे प्रशिक्षण केंद्रामध्ये लहान मोठ्या लढाया सैन्यामध्ये लावत असत जेणेकरुन प्रत्यक्ष युध्दात आपल्या सैन्याची हानी होऊ नये, आपले सैन्य आत्मविश्वासाने शत्रुच्या सैन्यावर गतिमानतेने प्रहार करील. त्याचबरोबर आपल्या पायदळ आणि घोडदळास बंदुकांचा, तोफांच्या आवाजांचा सराव व्हावा. यासाठी यशवंतराव शोभारामला तोफा ह्या सैन्याच्या जवळपास आणून तोफ गोळे डागण्यास सांगत. त्यामुळे आपल्या सैनिकांना शत्रुच्या विरुध्द लढाई करताना त्यांनी केलेल्या तोफाखानाद्वारे तोफांच्या आवाजाचा आपल्या सैन्यावर परिणाम होणार नाही. त्यांच्यात जलदगतीने शत्रुसैन्यावर तुटून पडण्यासाठी त्यांचा आत्मविश्वास हा उच्चप्रतीचा राहील असे यशवंतरावांना वाटे त्यासाठी

प्रशिक्षण काळात. बंदुका व तोफेच्या आवाजाचा सराव आपल्या सैन्याला होईल ते प्रत्यक्ष युध्दात न भिता शत्रुवर हल्ला करतील. चंबळनदीच्या किनाऱ्यावर सैन्याला हे महासागराचे स्वरुप आलेले दिसते, दहा ते बारा कोसांपर्यंत यशवंतराव होळकर यांच्या सैनिकांचा विस्तार पसरलेला आहे. यशवंतराव होळकर हे आपल्या प्रशिक्षण केंद्रामध्ये दिवसातून दोन वेळेस जात असत.[73] यशवंतराव आपल्या सैन्याच्या प्रशिक्षणावर जास्त भर देताना दिसतात. जेवढे जास्त प्रशिक्षित सैन्य असेल, तेवढी त्यांच्या मध्ये शिस्त येईल. युध्दातील डावपेच, रणनिती, त्यांना समजेल त्यांचा आत्मविश्वास वाढेल, जेवढा सराव जास्त तेवढा युध्दात कृती करण्यावर आपल्या सैन्याची गतिमानता उच्चप्रतीची होते. यशवंतराव होळकरांचे या लष्करी प्रशिक्षण केंद्रात सैन्याच्या लहान, लहान, घटकांवर, सरावावर, लक्ष असायचे, प्रत्येक सैन्याचा सराव कशा पध्दतीने चालला आहे. सैनिकांच्या सरावा दरम्यान काय चुका होत आहेत. त्या सैनिकांच्या लक्षात आणून प्रशिक्षणा दरम्यान सैन्याकडुन दुरुस्त करुन घेण्यात येत होत्या. यशवंतराव हे खोट्या युध्दात सैन्याला लढवावयाचे या खोट्या युध्दात काय चुका सैन्याकडून होत आहेत. याच्यावर यशवंतरावांचे बारिक लक्ष असायचे या चुका सैन्याला सांगत. अशा प्रकारे मराठेशाही मध्ये एकमेव यशवंतराव होळकर मराठा सरदार मराठेशाहीच्या उत्तरार्धा इंग्रजांना सळो की पळो करुन सोडत होते.

सैनिकांनी प्रशिक्षणा दरम्यान युध्द कौशल्य मिळवावे. या सैन्यांना आपसात लढविणे यासाठी यशवंतराव स्वत: हजर असायचे.[74] मराठेशाहीच्या उत्तरकाळात यशवंतराव होळकर हे एकमेव असे मराठा सरदार होते ज्यांनी आपल्या सैन्याला प्रशिक्षणासाठी लष्करी छावणी उघडून सैनिकांना वेगवेगळ्या प्रकारचे युध्दाभ्यास करण्याचे प्रशिक्षण देत होते. हा एकंदरीत विचार करता यशवंतराव होळकर यांची आपल्या सैन्याप्रती असणारी निष्ठा, प्रामाणिकपणा, हा त्यांच्या लष्करी प्रशिक्षण केंद्राच्या माध्यमातून त्यांची आपल्या सैन्याप्रती असणारी आवड त्यांना देण्यात येणारे प्रशिक्षण, शस्त्रास्त्रे चालवण्याचे प्रशिक्षण, तोफा आणि बंदुकांच्या आवाजाचा सराव आपल्या सैन्याला व्हावा हा दृष्टिकोन फार क्वचितच त्या कालखंडात कमी संस्थानिक व राजे, यांच्याकडे दिसुन येईल. यशवंतराव होळकर यांच्या युध्दातील विजयाचे गमक हे त्यांच्या हिंगलाजगड या ठिकाणी निर्माण केलेल्या लष्करी प्रशिक्षण केंद्रामुळे दिसुन येईल.

### 3.14 **शिस्त :-**

यशवंतराव होळकर यांचे सैन्य संघटन व शिस्तीमध्ये कठोरता दिसुन येते, शिस्त ही त्यांना प्रिय होती.[75] कोणत्याही राज्याच्या लष्करामध्ये शिस्तीला फार महत्व असते. याच शिस्ती मुळे सैन्याला सामर्थ्य व एकजिंसीपणा प्राप्त होतो. या विश्वासा शिवाय सैन्या मध्ये शिस्त असू शकत नाही. सैन्याची कार्यक्षमता वाढविण्यासाठी व टिकविण्यासाठी सैन्याला शिस्तीची आवश्यकता असते. या शिस्तीच्या अभावामुळेच संस्थानिकांचे सैन्यदल हे यशवंतराव होळकर यांच्यापुढे अयशस्वी ठरताना दिसते. या नियमांची काटेकोरपणे अंमलबजावणी यशवंतराव होळकर सैन्याकडून करवून घेत. या नियमांचे उल्लंघन करणारा मग तो सैनिक असो की सेनापती किंवा सैन्य अधिकारी यशवंतरावांच्या कडक शिक्षेतून सुटका शक्य नव्हती. या कडक शिस्तीमुळे सैन्यदलात शिस्त प्रभावीपणे राहिलेली दिसुन येते. यशवंतरावांच्या सैन्यदलात शिस्त ही कडक स्वरुपात दिसुन येते. यशवंतराव होळकर हे विवेकपूर्वक कठोर शिक्षा टाळतात व नुसत्या कडक तंबीवर भागवितात.[76] यशवंतराव होळकर यांची क्रुर कृत्ये हे शोधावी लागतात ती शोधताना असे ही दिसून येते की एखाद्या भयंकर चुकीसाठी कुणाचा प्राण घेतला असता तरी योग्य झाले असते. परंतु यशवंतरावांनी एखाद्या राज्याच्या किंवा शत्रुच्या सैन्याला अशावेळी कडक शिक्षा देण्याचे टाळतात. त्या सैन्याला कडक तंबी देऊन किंवा आपल्या सैन्य दलातील सैन्याद्वारे एखाद्या कामात दुर्लक्ष किंवा चूक झालीतर त्यास कडक शिक्षा नकरता त्यास समज देवून सोडतात.

होळकरशाही राज्याच्या हद्दी बाहेर यशवंतराव होळकर असले की जे काय मनात असेल ते किंवा बाहेर घडले असेल ते मोकळेपणाने भारमलदादास पत्राद्वारे कळवावयाचे. असा यशवंतरावाचा बिनचुक शिरस्ता होता.[77] यशवंतराव होळकर यांच्या मध्ये सुध्दा शिस्त दिसुन येते. आपण एका राज्याचे कारभारी असताना सुध्दा आपली उत्तरेकडील घडणाऱ्या घडामोडीची माहिती भारमलदादास कळवाची हा त्यांच्यातील गुण हा शिस्त असल्याचे प्रकट करतो. मुळात त्यांच्या अंगी शिस्त असल्याने त्यांच्या सैन्यदलात ही शिस्त येणारच कारण यशवंतरावांना शिस्त ही प्रिय होती त्या अनुषंगाने त्यांनी आपल्या प्रत्येक सैन्यदला मध्ये शिस्त असलेली पहावयास मिळते.

फेब्रुवारी मार्च 1806 साली यशवंतराव होळकर पंजाबातून येत असताना.[78] मार्गातील देवस्थाने पाहण्या करीता पाठीमागे राहिले होते प्रथम स्थान हे हरिद्वार जवळचे ज्वालामुखीचे होते. त्या

ठिकाणाच्या राजाची अगोदर परवानगी घेवून मग ते स्थान पाहण्यासाठी यशवंतराव गेले. याठिकाणी ही यशवंतरावांची विनम्रता आणि शिस्त आपल्याला दिसुन येते. एकदा उज्जैन जवळ लष्करी छावणी मध्ये एका सैनिकाने गोळी चालवली होती.[79] उज्जैनच्या लष्करी छावणीमध्ये यशवंतराव होळकर यांच्या बंदुकधारी दलातील सैनिकाने गोळी चालवली ती गोळी यशवंतरावांच्या कपडे धुणाऱ्या महिलेसही गोळी लागली त्यावेळी या घटनेची माहिती यशवंतरावांना समजली त्यावेळी त्यांनी गोळी चालवणाऱ्या सैनिकाला बोलावून घेतले. त्या सैनिकास घटने विषयी खरे सांगण्याचे कारण विचारले तेंव्हा त्यावेळी या सैनिकाने नजर चुकीने गोळी चालवली का याविषयी माहिती विचारण्यात आली त्यावेळी या बंदुकधारी सैन्य दलातील सैनिकाने खरे कारण तर सांगितले नाहीच उलट यशवंतरावांना मोठ्या आवाजात उत्तर देत होता. त्यावेळी यशवंतरावांच्या लक्षात आले की, ही व्यक्ती खोटे कारण तर सांगतच आहे उलट उध्दट पणे मोठ्या आवाजात बोलत आहे. त्यावेळी यशवंतरावांनी क्षणाचाही विलंब न करता त्या बंदुकधारी सैनिकाचे शीर तलवारीने धडावेगळे केले होते. यशवंतराव होळकर हे शिस्तीचे उपभोक्ते होते. त्यामुळे या सैनिकाला आपले स्पष्टीकरण देण्यासाठी संधी देऊन ही हा सैनिक खोटी उत्तरे व बेशिस्तीचे वर्तन करुन आपल्या सेनापतीशी उध्दटपणे बोलत होता. त्यामुळे याच्या बेशिस्तीच्या वर्तनाची शिक्षा त्यास यशवंतरावांनी दिलेली दिसुन येते. शिस्त प्रिय व्यक्तीला अशा प्रकारा बदल आपल्या सैन्य दलातील सैनिकाने बेशिस्त वर्तणूक करणे हे यशवंतरावांना सहन झाले नाही व त्याची शिक्षा त्या सैनिकाला देण्यात आलेली दिसते.

सर जॉन माल्कम यशवंतराव होळकर यांच्या शिस्तीविषयी आपले मत मांडतात.[80] यशवंतराव होळकर यांनी जी लष्करी शिस्तीची उदात्तमुल्ये जोपासली आहेत. त्यास मराठेशाहीच्या उत्तरार्धात कोणत्याही मराठा सरदारा मध्ये तोड नाही त्यांनी मोठ्या विजयानंतर उज्जैन लुटले असले तरी काही चुक झाली नसती परंतु त्यांनी स्वत: कसल्याही प्रकारची लूट तर केली नाहीच पण आपल्या लष्करातील सैन्यदलास त्या लुटीपासून रोखलेले दिसते. एवढा शिस्तीचा उपभोक्ता यशंतराव होळकर आपल्या सैन्यालाही शिस्त लावण्यात यशस्वी झालेले आपल्याला दिसुन येईल. यशवंतराव होळकर यांनी उज्जैन व पुण्यावरील मोठ्या विजया नंतर ही त्यांनी पेंढाऱ्यांना शहरे लुटू दिली नाहीत.[81] ज्या सैनिकांनी शहर लुटण्याचा प्रयत्न केला. त्यांचे हातपाय तोडण्याच्या शिक्षा देण्यात आल्या. इंग्रज एवढे यशवंतरावांच्या विरुध्द असतानाही त्यांनी यांच्या कठोर शिस्तीचे कौतुक केले आहे. याच्या उलट मराठा सरदारांच्या सैन्यातील पेंढाऱ्याचे वर्तन हे उलट होते. खुद्द दौलतराव शिंदे यांच्या

सैन्यातील पेंढाऱ्यांनी पुणे व पुण्याच्या आजुबाजूचा परिसर ते पेशव्यांच्या आखत्यारीत असलेला महाराष्ट्र हा किती निर्दय पणे लुटला याची अंगावर शहारे आणणारी वर्णन जॉन माल्कमनेच केलेली आहेत. पेंढारी सैन्य हे लुटालुटी साठी प्रसिध्द होते परंतु यशवंतराव होळकर यांनी पेंढाऱ्यांच्या या वृत्तीवर शिस्तीच्या माध्यमातून कठोरपणे पायबंद घातलेला दिसतो. यशवंतरावांच्या सैन्य व्यवस्थापन आणि शिस्त याची चुणूक या ठिकाणी दिसुन येते.

यशवंतराव होळकर यांना हडपसरच्या युध्दात विजय मिळाल्यानंतर त्यांनी आपल्या सैन्यदलांना चेतावणी दिली.[82] कोणत्याही सैन्यदलातील सैनिक हा पुण्यामध्ये कुणालाही लुटणार नाही. जो कोणी सैनिक असे कृत्य करेल त्याचे तुकडे-तुकडे करण्यात येतील. त्यांच्या या आदेश, चेतावणी मुळे त्यांच्या लष्करातील कोणत्याही सैन्याने पुण्यामध्ये व त्याच्या आजुबाजूच्या परिसरात लुटालुट केली नाही हे यशवंतराव होळकर यांच्या कडक शिस्तीमुळेच शक्य झाले होते. कोणीही पुण्याकडे गेला आणि एकाही नागरिकाची साधी कवडी जरी लुटली वा स्त्रियांच्या अब्रुला हात घातला तर त्याचे हात पाय तोडून भर रस्त्यात फेकले जाईल.[83] यशवंतराव होळकर यांनी मराठेशाही बद्दल असणारी निष्ठा या ठिकाणी दिसुन येते. सर्व सामान्य नागरिकांना आपल्या सैन्याद्वारे त्रास होणार नाही याची पूर्ण दक्षता त्यांनी घेतलेली दिसते. त्याचबरोबर पुण्यामध्ये रहाणाऱ्या व आजु बाजुच्या परिसरातील महिला यांच्या सुरक्षेची काळजी घेताना दिसतात. यशवंतरावांच्या या आदेशामुळे एखादी अप्रिय घटना या भागामध्ये घडलेली आढळुन येत नाही. सर्व त्यांच्या शिस्तीच्या जोरावर लष्कराची केलेली उभारणी मुळे हे घडले होते. यशवंतराव होळकर यांचे सैन्य हे शिस्तीचे पालन करताना दिसतात.[84] एवढी शिस्त स्वत: यशवंतराव होळकर यांच्या मध्ये होती. त्यामुळेच त्यांचे सैन्य ही शिस्तीचे पालन करताना दिसतात. यशवंतराव होळकर यांनी आपल्या सैनिकांना शिस्तीचे धडे हे लष्करी छावणी मध्ये प्रशिक्षण केंद्रामध्ये दिलेले होते. यशवंतरावांचे शिस्तीचे नियम हे कठोर होते. त्यामुळे त्यांच्या सैनिकांना या कडक नियमांचे पालन करण्याची सवय प्रशिक्षणात देण्यात आली होती. तेव्हा यांचे सैन्य आपल्या सेनापतीच्या आदेशाचे पालन करताना दिसतात. एकदा श्यामराव महाडीक यांनी यशवंतराव होळकरांनी सांगितलेल्या कामाकडे विशेषलक्ष न दिल्याने त्यांना कठोर शब्दात ताकीद दिली की इथुन पुढे कोणत्याही कामामध्ये हलगर्जीपणा सहन केला जाणार नाही अशी समज देण्यात आली होती. त्यामुळे यशवंतरावांची शिस्ती विषयीची तत्परता लक्षात येते.

तशाच प्रकारे यशवंतराव होळकर यांनी भवानी शंकर बक्षी यास कार्य करण्यास सांगितले असता. त्या कामात हल्लगर्जीपणा केल्यामुळे.[85] यशवंतरावांनी भवानी शंकर बक्षी यास त्या कामातुन मुक्त करुन त्याच्या जागी जामदेव भांड यास जबाबदारी देण्यात आली. काही वर्षानंतर पुन्हा त्या कामासाठी भवानी शंकर बक्षी यास काम करण्यासाठी जबाबदारी देण्यात आली. यशवंतरावांनी शिस्तीच्या जोरावरच युध्दामध्ये एका मागुन एक विजय संपादन केलेले दिसतात. जर एखाद्यावर काम करण्याची जबाबदारी देऊन ते काम केले नाही तर त्यास त्या कामातून मुक्त करणे ही शिक्षा देण्यात येत असे. थोड्या कालावधी नंतर त्या कामास बाजूला केलेल्या सैन्य अधिकाऱ्यास पुन्हा जबाबदारी देत म्हणजे त्याने पुन्हा अशी चूक करता कामा नये याची जाणीव त्याला व्हावी. हा हेतु त्यांचा होता. याठिकाणी यशवंतरावांची शिस्त आपल्याला जाणवते. यशवंतराव होळकर यांनी आपला सेनापती अमीरखान याने जेव्हा राजस्थानमध्ये मोठ्या प्रमाणात लुटालुट वर गोंधळ चालवला होता त्यावेळी अमीरखानास नीती मुल्याच्या तत्वावर कार्य करण्याचा सल्ला दिला.[86] अमीरखान हा यशवंतराव होळकर यांचा उजवा हात समजला जायचा त्याने केलेल्या राजस्थानातील लुटीचा व गोंधळाचा यशवंतरावांनी अमीरखानास नीतीमुल्यावर कार्य करावे राज्यातील सर्व सामान्य नागरिकांना त्यांचा फटका बसुनये एखाद्या राज्यातून आपण वसुली करत असाल त्या वेळी आपण आपल्या नीती नियमानुसार, शिस्तीनुसार कार्य करावे हे अमीरखानला यशवंतरावांना सुचवायचे होते.

यशवंतराव होळकर यांनी फितुरी करणाऱ्या लोकांना फितुरीच्या पातका बद्दल काय शासन योग्य आहे हे सैनिकांना समजण्या करीता.[87] आपल्या लष्करातील सैन्य अधिकाऱ्यांची डोकी भाल्याच्या टोकावर खोचून ठेवण्यात आलेली दिसते. कॅप्टन टॉड याने इंग्रजांना लिहिलेले जे फितुरीचे पत्र पकडण्यात आले होते ते त्या फितुरी करणाऱ्या सैन्याच्या डोक्याखाली लावण्यात आले होते. जर अशा प्रकारची फितुरी लष्करातील अन्य सैनिकांनी केली तर त्यांचे ही असेच हाल करुन शिक्षा देण्यात येईल. बेशिस्तीच्या जोरावर वर्तन करणाऱ्या प्रत्येक सैन्याचे असेच हाल होईल अशी धमकीवजा, जरब आपल्या सैन्यातील बंडखोरी करणाऱ्या सैनिकांना एक प्रकारची ताकीद यशवंतराव होळकर यांनी दिली होती.

यशवंतराव होळकर यांच्या सैन्यातील तीन सैन्यअधिकारी यशवंतरावांना सोडून इंग्रजांना जाऊन सामील होऊ इच्छित होते.[88] ही बातमी यशवंतराव होळकर यांना समजली. आपल्या

सैन्यातील तीन सैन्य अधिकारी कॅप्टन विकर्स, कॅप्टन टॉड, कॅप्टन रायन हे तीन अधिकारी गुप्तपणे आपल्या विरुध्द कारवाया करत आहेत. त्यावेळी यशवंतरावांनी लगेचच या तिन्ही सैन्य अधिकाऱ्यांना लष्करी नियमानुसार मृत्यूची शिक्षा देण्यात आलेली आपल्याला पहावयास मिळेल. या घटने नंतर इंग्रज अधिकारी समजून चुकले होते की यशवंतराव होळकर यांच्या विरुध्द गुप्तकारवाया करणे उचित नाही. यशवंतराव होळकरांच्या लष्करातील कठोर शिस्त, नियम किती संवेदनशीलपणे हाताळत होते. आपल्या लष्कराला लाण्यात आलेली शिस्त जर एखादा सैनिक मोडीत असेल. त्यावेळी यशवंतराव होळकर आपल्या लष्करी शिस्तीच्या नियामानुसार त्या सैनिकांना शिक्षा देण्यात येत असे.

विश्वासघात करणाऱ्या सैन्याचे काय परिणाम होतात ते यशवंतरावांनी दाखवून दिले.[89] तीन युरोपियन सैन्य अधिकारी टॉड, रायन, विकर्स यांना उदयपुरच्या जवळ नाहर मगरा, या ठिकाणी शिक्षा देण्यात आली होती. यशवंतराव होळकर यांच्या सैन्य दलात युरोपियन सैन्यामध्ये या तीन सैन्य अधिकाऱ्यांचा शिरच्छेद करुन त्यांची डोकी युरोपियन सैन्यात फिरवून गावाच्या वेशीवर लटकविण्यात आली होती. यावरुन सैन्यात विश्वासघात करणाऱ्या सैनिकांची शिक्षा काय असु शकते हे लक्षात येते. विश्वास घातामुळे शिंदे आणि भोसले यांना इंग्रजांच्या विरुध्द युध्दात हार पत्करावी लागली होती.[90] यशवंतराव होळकर यांना माहित होते की, शिंदे आणि भोसले यांच्या सैन्यदलात असणाऱ्या युरोपियन सैन्य अधिकाऱ्यांच्या विश्वासघातामुळे यांचा पराभव झालेला आहे. त्यामुळे तशाच पध्दतीने इंग्रजांनी यशवंतरावांच्या विरुध्द कट कारस्थान करुन यशवंतराव होळकर यांचा पराभव करावा. परंतु यशवंतरावांनी इंग्रजांच्या या कुटनितीला ओळखून या युरोपियन सैन्य अधिकाऱ्यांना मृत्यू दंडाची शिक्षा दिलेली दिसते.

इंग्रजांच्या सर्व सैन्यदलांना यशवंतराव होळकर यांच्या विषयी प्रत्येक वेळी निराशा हाती लागत होती.[91] तरीही इंग्रजांनी कुटनीतीच्या द्वारे यशवंतराव होळकर यांच्या सैन्यप्रमुखांना यशवंतरावांपासून फोडण्यासाठी सातत्याने प्रयत्न केले. परंतु या प्रयत्नांमध्ये लॉर्डलेक यास यशस्वी होता आले नाही. लॉर्ड लेकने यशवंतरावांच्या सैन्य दलात एखादा फितुरी करणारा, विश्वासघातकी सैनिक, सेनाधिकारी मिळावा यासाठी आमिषे पण दाखविले. परंतु यामध्ये लॉर्ड लेकला यश आले नाही. यशवंतरावा बद्दल असणारी सैनिकांची निष्ठा आणि त्यांची शिस्त यामुळे कोणत्याही सैन्यदलातला सैनिक व सेनाधिकारी यशवंतरावां पासून बाहेर फुटण्याचा विचार करु शकत नव्हता.

इथे यशवंतरावांची स्वत:मध्ये असणारी शिस्त आणि सैन्यदलास प्रशिक्षण काळात लावण्यात आलेली शिस्त ही यावेळी उपयोगी आलेली दिसेल. यशवंतराव होळकर त्यांनी आपल्या सैन्याला सक्त ताकीद दिली की पुणे शहराला उपद्रव देऊ नये.[92] यशवंतरावांनी अशा प्रकारच्या आदेशाचे पालन आपल्या सैनिकांना पाळायला लावली. पुण्यातील बाजार पेठा बंद होत्या त्या उघडण्यास लावल्या. भाववाढीला आळा घालून धान्याचे भाव ठरविण्यात आले. कडकशिक्षेच्या भीतीने ते पाळावयास लावले. यशवंतराव होळकर यांच्या सैन्यातील दोन पेंढाऱ्यांनी शहरामध्ये पुंडाई केली म्हणून. एका सैनिकाचा हात तोडण्यात आला तर दुसऱ्या सैनिकाचे नाक कापून उंटावरुन शहरामध्ये त्याची धिंड काढण्यात आली. अशा प्रकारे यशवंतराव आपल्या सैन्यदलातील सैनिकांनी बेशिस्तीचे वर्तन केल्यास त्याला कठोर शिक्षा देण्यास मागेपुढे पहात नसत हा यशवंतराव होळकरांच्या शिस्तीचा राबता होता.

यशवंतराव होळकर यांचा फर्रुखाबादहून हरनाथसिंहाला आदेश दिले.[93] ज्यावेळी हरनाथसिंह ढीगच्या किल्ल्या जवळ आला होता. त्यावेळी यशवंतरावांनी आदेश दिले होते. त्या आदेशाची अंमलबजावणी हरनाथसिंहाने केली नाही. त्यावेळी यशवंतरावांनी हरनाथासिंहाला चाबकाने मारले होते. त्या शिस्तीच्या जोरावरच यशवंतरावांचा युध्दात सातत्याने विजय होत होता. या कडक शिस्त व नियमामुळे त्यांच्या सैन्यात शिस्त राहिली व प्रभावी ठरलेली दिसुन येते.

### 3.15 यशवंतराव होळकर यांची शिस्तीची नियमावली :-

1. पावसाळ्यामध्ये सैनिकांना वेगवेगळ्या ठिकाणी छावण्या करुन रहावे लागत असे.[94] दसरा (विजया दशमी) संपताच या सर्व सैनिकांना आपल्या छावणीतून बाहेर पडावे लागे.
2. सैन्य अधिकाऱ्यांचे, सैन्याला लागणारी घरे, घोड्यांना पागा, अन्न धान्य, औषधोपचार, घोड्याला लागणारी चारा, वैरण, गवत, जीवनापयोगी वस्तुंचे साठे करुन ठेवावेत व ते सर्व पावसाळा भर पुरतील या पध्दतीने वापरात आणावेत.
3. सैन्यदलामध्ये स्त्रिया, दासी, नाचकरणारे, मद्य यांना पूर्णपणे बंदी होती. लष्करी मोहिमेवर जात असता कोणत्याही सैन्य अधिकाऱ्याला आपला लवाजमा घेऊन जाण्याची परवानगी नव्हती. त्यामुळे सैनिकी हालचाली ह्या सुलभ पणे होत.

4. शत्रुच्या बायका मुलांना हात लावु नये अशा प्रकारची शिस्त शिवाजी महाराजा प्रमाणेच करण्यात आलेली दिसतात.
5. शत्रुच्या प्रदेशातील मिळालेली धनसंपत्ती ही सर्व एकत्रित जमा करावी.
6. मोहिमे दरम्यान सैन्यदलातील सैनिकाने, सैनाधिकाऱ्याने युध्दामध्ये पराक्रम, शौर्य गाजवले असेल तर सन्मान पूर्वक सत्कार करण्यात येत असे.
7. सैन्यदलातील सर्वसाधारण सैनिक असो की सैन्य अधिकारी सर्वांना एक सारखे नियम असायचे.
8. मोहिमे दरम्यान झालेल्या खर्चाचा हिशोब सैन्य अधिकाऱ्यास द्यावा लागत असे.
9. यशवंतराव होळकर यांच्या सैन्यातील गरजा ह्या मर्यादीत स्वरुपात होत्या.

यशवंतराव होळकर यांनी चैन व विलासी पणाला फाटा देऊन स्वत:चा साधेपणा व कष्टमय, संघर्ष, सैन्यासमोर आदर्श ठेवून आपल्या सैन्यदलाकडून लष्करी कार्य करुन घेत असत. जनरल वेलेस्ली म्हणतो की, "संख्या बळ आणि शिस्त या दोन्ही बाबतीत शिंदे आणि पेशवे यांच्या सैन्यापेक्षा यशवंतराव होळकर यांचे सैन्यदल इतके बलशाली होते की युध्दाच्या नेतृत्वा बद्दल शंका नव्हती." इंग्रजांनाही मान्य होते की यशवंतराव होळकर शिस्तीच्या बाबतीत. तडजोड करत नसे तेव्हांच त्यांना प्रत्येक युध्दात विजय मिळत होता.

## 3.16 अनुभवजन्य स्थितीतील वर्तन :-

यशवंतराव होळकर यांनी प्रशिक्षण दिलेल्या हत्तीला इंदौरमध्ये.[95] ज्यावेळी यशवंतराव समोरून त्या हत्तीच्या येत होते. त्यावेळी यशवंतरावांना या हत्तीने सोंडेद्वारा उचलून फेकण्याचा प्रयत्न केला होता त्यावेळी यांनी चित्त्याच्या चपळतेने हत्तीच्या पायावर तलवारीने वार केला होता व पाय कापून काढीला आणि त्याला खाली पाडले. या ठिकाणी यशवंतराव होळकर यांची प्रासंगिकता आणि त्यावेळेचे प्रसंगावधनातील वर्तन हे लक्षात येते. यशवंतराव होळकर हे स्थानिक पराजयाला कायमचा पराजय मानुन हताश होणारे नव्हते.[96] यशवंतरावांचा पिंडच हा युध्दाचा होता. त्यामुळे त्यांना आपल्या देशांतर्गत संस्थानिकाद्वारे एखादा पराभव पत्करावा लागल तरी ते हताश न होता. त्याच जिददीने अजुन युध्दाचा तयारीला लागत असत. जोपर्यंत त्या शत्रुचा पराभव करत नाही तोपर्यंत ते सातत्याने युध्द करत असे. कधी स्वत: चा आत्मविश्वास कमकुवत होऊ दिला नाही. त्यामुळे

सकारात्मकतेच्या दृष्टीने त्यांनी युध्दासाठी लागणारी साधने, सैन्य हे जमा करत होते. त्यांच्या या धडपडीतूनच लक्षात येईल की त्यांचा स्वत: वर असणारा विश्वास, युध्दधोरणा प्रति असणारी निष्ठा ही लक्षात येते. त्यामुळे यशवंतराव हे स्थानिक युध्दातील पराभव कधी कधी स्विकारून ही ते हताश झालेले दिसत नाहीत.

ज्यावेळी सैनिकांना लढाई झेपत नाहीशी वाटल्यास तितकी आवश्यकता नसेल तेंव्हा.[97] आपल्या सैन्यदलांनी रणांगण सोडावे व आगाऊ ठरविलेल्या वेगवेगळया संकेत स्थळावर जाऊन नंतर यशवंतरावांकडे एकत्रित यावे असा कदाचित पूर्व संकेत असल्या प्रमाणे रणांगण सोडून गेलेले सैन्य यशवंतराव होळकर याच्या भौवती गोळा होत होते. माल्कम म्हणतो यशवंतराव होळकर यांच्या मध्ये एक अदभूत चैतन्य असायचे, निराशा यांना माहित नव्हती. पराकोटीची व्यक्तिगत संकटे त्यांच्या वरती कोसळून ही त्यांनी त्यांच्या मनाचे संतुलन, आत्मविश्वास कधी ढळू दिला नाही. यशवंतराव स्वत: युध्दाच्या रणांगणावर आपल्या सैन्याच्या खांद्याला खांदा लावून लढण्याच्या वृत्ती मुळे त्यांनी अनेकवेळा संभाव्य पराभवही विजयामध्ये बदलुन टाकले आहेत. प्रत्येक लढाईत आपल्या सैन्याच्या बरोबरीने ते लढत होते.[98] यशवंतराव होळकर यांनी चंबळ नदी पासुन बनास नदी पर्यंत आणि मुकुंदरा खिंडी पासून ते बियानाच्या खिंडीपर्यत, 8 जुलै पासून 28 ऑगस्ट पर्यंत एकसारखा पाठलाग कर्नल मॉन्सनचा करत होते. कर्नल मॉन्सनच्या पाठलागा मध्ये यशवंतराव होळकर हे आपल्या सैन्या बरोबर स्वत: हजर असायचे आणि प्रत्येक युध्दात आपल्या सैन्यासह शत्रुच्या विरुध्द लढत असे. त्यांच्याकडे असणारा युध्दातील अनुभव व या अनुभवातून त्यांचे वर्तन युध्दाच्या रणांगणावर जलदगतीने शत्रुच्या विरुध्द असायचे.

जनरल पेरॉन याने आपल्या जासुदाला यशवंतराव होळकर यांच्याकडे पाठवले तेंव्हा यशवंतराव आपल्या ढाल व भाल्याकडे बोट दाखवत म्हणाले.[99] मी ढाल सावलीसाठी वापरतो आणि भाला जगण्यासाठी यशवंतराव होळकर हे इंग्रजांचा एका मागून एक पराभव करत चालले होते. यशवंतरावांची भारतातील विजयी घोडदौड थांबविण्यासाठी यांना काही आमिषे दाखवण्याचा प्रयत्न त्यावेळी इंग्रजांनी केला व यशवंतरावांकडे आपल्या जासुद मार्फेत प्रस्ताव पाठवत. परंतु यशवंतराव होळकर हे देश प्रेमाने एवढे भारावून गेले होते की इंग्रजांना भारतातून हाकलुन लावण्यासाठी त्यांनी तयारी चालवली होती. परंतु इंग्रजांच्या या जासुदाला आपल्या अनुभवजन्य स्थितीतील वर्तनाची त्यांनी ओळख करुन दिली. माझी ढाल व भाला हेच माझे राज्य आहे. मला माझे गमावण्याची काही

भीती नाही जो पर्यंत माझा घोडा ज्या दिशेने चालेल. त्या दिशेला माझे अस्तित्व असेल. मला जगण्यासाठी भाला सावलीसाठी ढाल हे इंग्रजांच्या विरुध्दच्या अनुभव स्थितीतील वर्तन होते. जे की यशवंतरावांना इंग्रजांची ध्येय धोरणे या संबंधी ची जाण होती तेंव्हा यशवंतरावांचे वर्तन हे अनुभवातून आलेले दिसते.

### 3.17 **वेतन :-**

यशवंतराव होळकर यांच्या फौजेला तनखा न मिळाल्याचे गऱ्हाणे अधुनमधून बखेडे उत्पन्न करीत होते.[100] त्यातच यशवंतरावांनी जुन्या सैनिकांची हकालपट्टी आणि नव्या सैन्याची भरती अशी उलथा पालथ सुरु झाल्यामुळे यशवंतरावांच्या मागे एक चिंता निर्माण झाली होती. परंतु यशवंतरावांनी उलथा पालथीच्या परिणामांशी सामना करित लष्करी पुर्नघटनेला चिटकुन राहिले. यशवंतरावांचे आता पर्यंतचे आयुष्य हे लष्करामध्ये गेले असल्यामुळे त्यांना सैन्याच्या स्वभावाचे व आवश्यकतांचे उदमज्ञान होते. त्याला अनुसरुन यशवंतरावांनी क्षुब्ध सैनिकांनी समजुत घालून दुसरीकडे आपल्या सैन्यदला मध्ये फेरफार करताना दिसतात. सैन्याचा पगार करायचा आणि सैन्य वाढवा याचे, बघता, बघता कोस दोन कोस, छावणी पसरली.[101] तत्कालीन इतर संस्थानिकांच्या तुलनेमध्ये यशवंतराव होळकर हे आपल्या सैन्याला पगार मोठ्या प्रमाणात देत असल्याने वेगवेगळ्या प्रदेशातील, संस्थानिकातील सैन्य हे यशवंतरावांच्या पदरी लष्करी सेवा देण्यासाठी उत्सुक असायचे शत्रुच्या व इतर राजेराजवाडे, संस्थानिकांच्या लष्करातील सैन्य उपलब्ध होत असल्याने यशवंतरावांना सैन्याची कमतरता कधीही जाणवली नाही. तेंव्हा यशवंतरावांनी आपल्या सैन्या कडून मोठ्या प्रमाणात कार्य करवून घेतले, जिंकलेल्या प्रदेशातुन खंडणी गोळा करावयाची व सैनिकांचा पगार करायचा हा नित्य नियम यशवंतराव करत आले.

यशवंतराव होळकर यांच्या सैन्याचा पगार देणारा अधिकारी हा बक्षी असायचा.[102] कोणत्याही राज्याच्या सैन्य विषयक प्रशासनामध्ये एक अधिकारी नेमलेला असायचा जर आपल्या राज्याच्या लष्करातील वेगवेगळ्या सैन्यदलांमध्ये कार्य करणाऱ्या सैनिकांचा पगार करण्यासाठी निवडलेला असे. त्याच पध्दतीने यशवंतराव होळकर यांनी आपल्या सैन्यदलातील सैनिकांचा पगार करण्यासाठी बक्षी नावाचा अधिकारी याची नेमणूक करण्यात आलेली होती. सैनिकांना वेळेवर त्यांच्या कारारानुसार, कार्यानुसार, पदानुसार वेतन मिळावे ही भावना यशवंतरावांची दिसुन येते.

यशवंतराव होळकर यांनी भवानी शंकर बक्षी यांच्यावरती संपूर्ण सैन्याचा पगार १३ महिन्यांचा हिशोब तयार करावयास सांगितले.[103] यशवंतरावांनी आदेश दिले की प्रत्येक सैनिकाला एक वर्ष चार महिन्याचां पगार देण्यात यावा. यशवंतराव होळकर यांचे या ठिकाणी आपल्या सैनिकांना वेतन मिळावे. १४ महिन्यांचे वेतन देयक असले तरी वेतन देण्यात यावे. असे भवानी शंकर बक्षीयास सांगितले. पुढील एक महिन्याचा पगार सैन्याला देण्यात यावा. म्हणजे सैनिकांना आपल्या लष्करात कार्य करण्यासाठी सैनिक उत्साहाने काम करेल. ही जाणीव त्यांना होती. संपूर्ण लिखापडी केल्यानंतरच यशवंतराव हे आपल्या छावणी मध्ये परतले. मेवाड राज्यात मोहिमेच्या माध्यमातून यशवंतराव होळकर यांनी आपल्या सैन्यदलात सैनिक भरती केले होते. खंडणी आणि लुटीच्या माध्यमातून जमा झालेली. संपत्तीतुन सैनिकांचे वेतन देण्यात येत होते.[104] ज्या ज्या वेळी यशवंतराव होळकरांनी युध्द मोहिमा काढल्या त्या त्यावेळी आपल्या अखात्यारीत असणाऱ्या प्रदेशातुन चौथाई वसुल करत तर काही वेळा दुसऱ्या राज्यातुन खंडणी गोळा करत. युध्द झाले तर युध्दाच्या माध्यमातून शत्रुकडे असणाऱ्या संपत्तीची लूट करत या सर्व प्रकारच्या माध्यमातून जमा केलेल्या संपत्तीचा काही भाग यशवंतराव आपल्या सैन्याच्या वेतनासाठी काढुन ठेवत असत. त्यामुळे यशवंतरावांकडे मोठ्या प्रमाणात सैन्य दलात भरती होण्यासाठी सैन्य उत्सुक असे यशवंतरावांच्या सैन्य दलांना खंड न पडता वेतन देण्याची सोय करण्यात आलेली होती. त्यामुळे सैन्याची कमतरता यशवंतरावांना कधी पडली नाही.

यशवंतराव होळकर यांनी अमृतरावाला सांगितले की शिंदेचा पराभव करुन तुम्हाला पुण्याच्या गादीवर बसविले आहे.[105] पुण्याच्या गादीवर अमृतरावांना बसविण्यासाठी यशवंतरावांना दौलतराव शिंदेच्या सैन्या बरोबर युध्द करावे लागले. या युध्दात यशवंतरावांचा विजय झाला असला तरी यशवंतरावांच्या सैन्य दलास या युध्दामध्ये फार मोठ्या प्रमाणात धनसंपत्ती खर्च झालेली आहे. त्यामुळे मला माझ्या सैन्याला वेतन देण्यासाठी अमृतरावांनी पैशाची जमवाजमव करुन मला देण्यात यावी. जेणेकरुन माझ्या सैन्याला वेतन देण्यात येईल. यशवंतरावांनी कोणाचेही वाईट केले नाही घर, दौलत काही एकन पाहता झाले उत्पन्न ते अगोदर फौज, मग काय असेल ते असो.[106] नाही तरी लहान थोर कार्य सैन्यदल हे सर्व सैन्य परिश्रम करत आहे ते सर्व पोटासाठीच आहे. वेतनाच्या माध्यमातून सर्व मार्ग निघाल्यास सैनिकांना वाटे यशवंतरावांच्या चरणी सैन्य प्राण समर्पून आहेत. त्याठिकाणी संशयाचे कारण नाही. यशवंतरावांच्या सैन्यदलात आलेल्या सैनिकांना वाटे ज्याच्याघरी पात

शिजवायला खापर नव्हते ते हजीनशीन करुन दिले आहे. त्यामुळे अजुनकाय विचार यशवंतरावानी करावयाचा. आरिफखान आणि जंगली खान हे दोन व्यक्ती यशवंतराव होळकर यांच्या छावणीत हजर झाले.[107] त्यांच्या संरक्षणार्थ आफिरखान व जंगली खान त्यांच्याकडे सैन्य दलात सामील होण्यासाठी आले होते. यशवंतरावांनी या दोन्ही व्यक्तींना प्रति व्यक्ती दोन रुपये प्रतिदिवसाला वेतन देण्याचे ठरवून आपल्या सैन्यदलामध्ये सामील करुन घेतलेले दिसुन येईल. यशवंतराव होळकर यांच्या काळात पोटभर अन्न मिळाल्याचे समाधान आहे.[108] हे या शक्तिचे प्रमुख ध्येय असल्याने आपल्या सैनिकांचे वेतन थकणे म्हणजे सैन्याच्या शेषाला, सामोरेजाणे हा होता त्यासाठी आपल्या सैन्यात वेतनासाठी बंडाळी होत असेल तर आपण सैन्यदल ठेवण्यास लायक नाहीत. त्यामुळे यशवंतरावांनी सैन्याच्या रोषाला बळी न जाण्यासाठी त्यांचे नियमित पणे वेतन देण्यात येत होते.

सांडणीस्वार पत्र ने आण करणारे, आजुऱ्याचे (वाटचालीच्या मजुरीचे) शिरस्ते पहाता.[109] वीस कोसाचा एक रुपया याप्रमाणे राजधानीहुन भानपुऱ्यास यावे तो कोसांची सुमारी पहाता एकशे ऐंशी कोस आवघे होतात. त्याचा अजुरा हा विसकोसाचा एक रुपया या प्रमाणे नऊ रुपये होतात. बाकी सहा रुपये जास्त आले ते तुम्ही माघारी करावे इतक्यावर या शिरस्त्या प्रमाणे आजुरदार पाठवणे झाले तर पाठवीत जाणे. यशवंतरावांनी त्यांच्या सांडणी स्वाराला वेतन कोसा प्रमाणे देण्यात यावे. त्यांना वेतन देण्याची पध्दत ही त्यांच्या अंतरावरुन देण्यात यावी असे सांगतात सांडणी स्वाराकडे उलट ते नऊ रुपये आगाऊ आपल्याकडे जमा झालेत ते परत करावे असे सांगतात. यशवंतरावांची आर्थिक ज्ञाना बद्दल, वेतना बद्दल ते किती सजग होते. हे या वरुन दिसुन येते. सेंधवा परगण्याच्या अंतर्गत अमला गावावर यशवंतराव होळकर यांच्या घोडदळाने हल्ला केला.[110] या हल्ल्या मध्ये घोडदळाला ६०० म्हशी आणि ४०० गायी हस्तगत करण्यात आल्या. या सर्वांना विकून यशवंतरावांनी आपल्या सैन्याचा पगार केला होता. यशवंतरावांकडे त्यावेळी १६०० सैनिक होते. हे सर्व सैनिक मल्हारराव होळकर यांच्या कालखंडात १६ रु प्रति महिना या हिशोबाने भरती झाले होते.

यशवंतराव होळकर हे कोणत्याही एका ठिकाणावर आक्रमण करुन खंडणी वसुल करायचे व लगेच दुसऱ्या एखाद्या राज्यावर आक्रमण करण्याचे नियोजन करत.[111] यशवंतराव होळकर हे आपल्या राज्याची आर्थिक तरतुद करण्यासाठी आणि आपल्या सैन्यदलाला वेतन देण्यासाठी यशवंतरावांना वेगवेगळ्या ठिकाणी लष्करी मोहीमा काढून धनसंपत्ती जमा करावी लागत. एखाद्या प्रदेशावर खंडणीसाठी हल्ला केला असता. त्या ठिकाणाहून धनसंपत्ती जमा करुन दुसऱ्या प्रदेशावर

हल्ला करण्यासाठी त्यांचे नियोजन असे. जदुनाथ सरकार मराठ्यांच्या राज्याला बिन भांडवली व्यापार म्हणतात.[112] शिवकालखंडात सैन्याला रोखपगार देण्यात येत होता परंतु नंतरच्या कालखंडात एखादा मराठा सरदार लष्करी मोहिमेवर असला की त्याला खंडणी वसुल करावी लागे. प्रसंगी लूट मिळवून मोहिमेचा खर्च भागवावा लागे आणि आपल्या राज्याला या धन संपत्ती मधील काही वाटा द्यावा लागे. मोहिमे दरम्यान कर्ज करुन घेणारा अव्यवहारी समजला जात होता. पेशवे आणि होळकर यांनी अटकेपार झेंडा लावला. पण कर्ज करुन आले म्हणून पेशवे रघुनाथरावांशी भाऊसाहेबांचा झालेला वाद हा प्रसिध्द आहेच. त्यामुळे जदुनाथ सरकार यांनी वरील उदगार काढलेले दिसतात.

यशवंतराव होळकर यांच्या लष्करा मध्ये सैन्याची नोंदणी, वही मध्ये नोंदविण्यात येत असे.[113] आपल्या सैन्यदलात किती सैन्य दाखल झाले आहे याची नोंद त्या काळात यशवंतराव लिखापडीच्या माध्यमातून ठेवत असत. त्याच बरोबर या सैन्याला वेतन देण्यासाठी या सैन्याच्या अंगठ्याचे निशाण हिशोब वहीमध्ये घेण्यात येत. ज्या वेळी या सैनिकांना वेतन देण्यात येत होते त्या वेळी त्या सैन्यदलाचा प्रमुख सेनापतीची उपस्थिती ही महत्वाची मानली जात असे. सैन्याला वेतन देताना शंका आली तर त्या सैनिकाचे भरती करते वेळी करुन घेतलेले नोंदणी वही व त्याच्या अंगण्याचा ठसा तपासून पहाण्यात येत नंतर त्या सैनिकाला वेतन देण्यात येत असे. यशवंतरावांच्या वेगवेगळ्या विभागातील प्रत्येक सैनिकाला ६० दिवसानंतर वेतन देण्यात येत होते.[114] राज्याच्या हितासाठी वेगवेगळ्या मोहिमा चालत होत्या. या मोहिमेचा कालावधी जास्त रहात असल्याने सैन्याला वेतन दोन महिन्यानंतर देण्याचा पायंडा पडलेला होता. एखाद्या सैन्यदलातील सैनिकाला यशवंतरावांना सोडून जावयाचे असेल त्यावेळी किमान दोन महिने तरी त्यास वेतन मिळे पर्यंत सैन्यदलात रहावे लागत असे हा प्रशासनाचा भाग असला तरी यशवंतरावांचा आपल्या सैन्य विभागाशी संबंधीत नियम बनवलेला आपणास दिसेल.

यशवंतराव होळकर यांनी आपल्या सैनिकांना तीन विभागामध्ये विभागण्यात आले.[115] सैन्याला वेतन देण्यासाठी तीन विभागामध्ये सैन्याच्या कार्यानुसार, व कामगारांना त्यांच्या कामानुसार वेतन देण्याची सोय करण्यात आली होती, 200 रुपये वार्षिक पासुन ते ५०० रुपया पर्यंत यशवंतरावांच्या सैन्यदलातील सैनिकांना वेतन देण्यात येत होते व लष्करात काम करणाऱ्या कामगारांना कामानुसार १५० रुपया पासून ते २५० रुपये पर्यंत वेतन देण्याची व्यवस्था करण्यात आलेली होती. तिसरा हिस्सा सैनिकांमध्ये बक्षीस स्वरुपात वाटण्यात येत असे.[116] एखाद्या मोहिमेवर

गेले असता त्या मोहिमेच्या माध्यमातून मोठ्या प्रमाणात धनसंपततीची वसुली झाली असेल त्यावेळी यशवंराव होळकर हे आपल्या सैनिकांना मिळालेल्या धनसंपत्तीचा तिसरा हिस्सा हा बक्षीस स्वरुपामध्ये वाटत असत त्यामुळे यांच्याकडील सैन्य खुष रहावयाचे मोहीमेवर, युध्दात यशवंतरावांचे सैन्य प्राणपणाने शत्रु सैन्या विरुध्द लढत.

## 3.18 **युध्द सन्मान व पदोन्नती :-**

इ.स. १७९९ मध्ये वेगवेगळ्या प्रांताची जबाबदारी ही आपल्या सैन्य अधिकाऱ्यांना देण्यात आली होती.[117] यशवंतराव होळकर यांनी आपल्या लष्करातील सैन्य किंवा सेना अधिकारी असो त्यास युध्दात शत्रुच्या विरुध्द शौर्य, पराक्रम, उत्कृष्ट, कार्य करणाऱ्या सैनिकाला पुरस्कार देवून सन्मानीत करत. त्याचबरोबर यशवंतराव हे आपल्या सैन्याला मोठ्या प्रमाणात वेतन, बक्षीसे, पदोन्नती इत्यादी देण्याची त्यांच्या सैन्यदलात प्रथा होती. आपल्याकडे असणाऱ्या सैन्याचे मनोर्धर्य, आत्मविश्वास वाढावा. युध्दात चांगली कामगिरी सैन्याने करावी म्हणून सैन्याचा सन्मान करण्याची पध्दत होती. तेंव्हा त्यांच्या सैन्यदलामध्ये कर्तव्यनिष्ठा, नेतृत्वाच्या प्रति आदर हा दिसुन येतो. यशवंतराव महाडीक यांना बढती.[118] यशवंतराव महाडीक यांनी युध्दात चांगली कामगिरी केल्यामुळे यशवंतराव होळकर यांनी आपल्या सेनाधिकाऱ्याला पदोन्नती देऊन 400 घोडे स्वारांची जबाबदारी देण्यात आली. त्यांना एक हत्ती व अन्य उपहार स्वरुपात भेटवस्तु सन्मानपूर्वक देण्यात आले. यांच्याकडे भानपुरा, रामपुरा, जावरा, बडौद इत्यादी ठिकाणाहून महसुल गोळा करण्याची जबाबदारी यशवंतरावांनी दिली आपल्या सैन्यदलातील सैन्याला व सैन्य प्रमुखाला अशा प्रकारे त्यांचा सन्मान करण्याची प्रथा यशवंतरावांच्या काळात होती.

चांगले कार्य करणाऱ्यांना पुरस्कार आणि बेशिस्त पणे वागणाऱ्याला शिक्षा देणे यशवंतरावांच्या शासन नियमां मध्ये होते.[119] यशवंतराव होळकर हे आपल्या सैन्यदलावर प्रेम करायचे. त्यांना माहित होते की, आपले सैन्य दल ही आपली ताकद आहे यांच्या बळावरच आपण आपल्या राज्याची सुरक्षा आणि आर्थिक तरतुद करत आहोत. त्यामुळे यशवंतराव हे आपल्या सैन्य दलातील सैनिकांनी जर युध्दामध्ये उत्कृष्टकार्य शत्रुच्या विरुध्द केले असेल तर त्यास पुरस्काराने सर्व सैन्यासमोर सन्मानीत करत असे. जर आपल्या सैन्यदलातील सैनिक असो वा सैन्य अधिकारी तो बेशिस्तपणे छावणीत वा मोहिमेत, वागत असेल तेव्हा त्यास शिक्षा करण्यास यशवंतराव मागे पुढे

पहात नसत. मग ती शिक्षा कोणत्याही स्वरुपाची असु शकेल. त्यांनी कधी सैन्य व सेनाधिकाऱ्यास शिक्षा व बक्षिस देण्या संबंधी यशवंतराव होळकर यांच्या एवढा निष्पक्षपाती कुणी नव्हता, त्यांनी कधी दुजाभाव केला नाही. आपल्या हाता खालच्या सैन्याच्या वर्तनाविषयी, प्रामुख्याने एखाद्या सैनिकाने विशेष पराक्रम केला असेल तर त्या सैनिका विषयी माहिती सैन्य अधिकाऱ्याने तात्काळ द्यावी अशी व्यवस्था करण्यात आली होती. युध्दात आपल्या सैन्याच्या कार्याबद्दल यशवंतराव होळकर हे माहिती ठेवत असत.

होळकर राज्यातील अधिकारी सेनापती अन्य सेवक यांचे स्वत:चे हीत जोपासायचे असेल तर माझ्या समोर येवून हजर व्हावे मी त्यांना तोच सन्मान देईल जो त्यांना याच्या अगोदर मिळत होता.[120] यशवंतराव होळकर यांनी होळकरशाहीच्या राज्याची सुत्रे हाती घेतली असता. लष्करामध्ये वेगवेगळ्या पदावर कार्य करणाऱ्या सेनाधिकाऱ्यांना आव्हान केले की होळकरशाही मध्ये जो मान सन्मान आपल्याला देण्यात येत होता तोच सन्मान तुम्हाला मी देईल त्यामुळे आपण लष्करामध्ये वेगवेगळ्या पदावर दाखल व्हावे यशवंतरावांची आपल्या राज्या प्रती आणि राज्याच्या सेवेसाठी कार्य करणाऱ्यांना सन्मान देण्याची त्यांची भावना यावेळी दिसुन येते. यशवंतराव होळकर स्वत: एखाद्या लष्करी मोहीमेवर असल्यास. सैनिकांचे चांगले वाईट कार्य यशवंतरावांच्या नजरेतुन सुटत नव्हते.[121] याशिवाय ते स्वत: गुप्तपणे लष्करी छावण्या मध्ये जाऊन माहिती मिळवत या कार्यासाठी यशवंतराव आपल्या गुप्तेहरांचे सहकार्य माहिती मिळविण्यासाठी घेत. यशवंतराव होळकर यांनी मिर्जा अशरफ बेग यांना खुपधन संपत्ती आणि सैन्यातील वरिष्ठ कर्नल हे पद देऊन त्यांचा सन्मान करण्यात आला. अशरफ बेग याने युध्दा मध्ये मोठे शौर्य व पराक्रम व याची समर्पित भावना पाहून याचा सन्मान यशवंतरावांनी केलेला दिसतो.

यशवंतराव होळकर श्यामराव महाडिक यांच्या निधनानंतर हिंगलाजगड या ठिकाणी पोहोचले.[122] आपल्या धनसंपत्तीला पाहिले जे गेल्या वेळी भवानी शंकर आणि श्यामराव महाडीक यांच्या नेतृत्वाखाली हिंग्लाजगडावर पाठविण्यात आले होते, या संपत्ती मध्ये बहुमूल्य आभुषणे याच्या व्यतिरिक्त अन्य आवश्यक वस्तुपण होत्या, परंतु यशवंतराव होळकर यांनी त्या धनसंपत्ती मधील काही हिस्सा काढुन श्यामराव महाडीक यांच्या मुलास देण्यात आला. त्याचबरोबर त्यास वस्त्रे व अन्य भेट वस्तु देऊन त्याचा मान सन्मान केला. आपल्या दलातील एकविश्वासु सैन्य अधिकाऱ्याच्या मृत्यूनंतर त्याच्या जागी मुलास ठेवून त्याचा सन्मान केलेला दिसुन येतो. बारामती जवळ मेड त्याच्या

लढाईत मालोजी घोरपडे जखमी अवस्थेत कैद होते.[123] यशवंतराव होळकर यांनी त्यांची भेट घेतली आणि विचारणा केली की आपण या वयामध्ये फोजेत सामील व्हायाला नको होते. तुम्ही या ठिकाणाहून जाण्यास मोकळे आहात तुम्हाला रवाना करण्यासाठी फतेहसिंह माने यांना आदेश देण्यात आलेले आहेत. यशवंतराव होळकर यांचा शत्रुच्या सैन्या प्रती एवढा आदर, सन्मान त्याच्या वयानुसार ठेवत. त्यामुळे युध्दकौशल्य, नैपुण्य गुणांमध्ये यशवंतराव होळकर वरचढ ठरतात असे दिसेल.

इ.स. 1807 नोव्हेंबरच्या पत्रातील पुढीलवाक्ये यशवंतराव होळकर यांचे आहेत.[124] येथे ही माणसास कमी नाही. वडिलांच्या वेळीची बहुत आहेत. परंतु कालमहात्म्यनुरुप वर्तुन चावा घेतात, ते अर्थी वर्ष दोन वर्ष पावे तो जोवरी त्यांच्या मनाच्या प्रवर्ती होतात तोवरी, त्यांचे मनोगत राखणे प्राप्त आगमनाची ही संधाने येतात आल्यास आव्हेरुन होता संगोपनान ही चालीने होणे तसे होईल. दहा वर्षा मागे सर्व लहान मोठे होते त्यांनी दौलत संरक्षण करण्यात ठेवीली नव्हती. परंतु श्री लक्ष्मी कांताच्या कृपेने जे जाले ते ही प्रख्यात आहे. जुनी माणसे उपद्रव देणारी असली तरी त्यांस सांभाळणे आणि नवीन जोडणे हे राज्य कारभाराच्या व्यवस्थेचे तत्व यशवंतराव यांनी पाळले होते.

जेंव्हा देशातुन इंग्रजांना बाहेर काढण्यासाठीची राष्ट्रव्यापी मोहीम एकट्या यशवंतराव होळकरांनी चालवली होती.[125] त्यावेळी कर्नल मॉन्सन या इंग्रज सैन्य अधिकाऱ्याशी मुकूंदराखिंडी दरम्यान युध्द चालू होते. या युध्दात मॉन्सन बरोबर अमरसिंह हा होता. या युध्दात त्याचा मृत्यू झाला. अमरसिंह हा यशवंराव होळकरांचा शत्रु होता. परंतु यशवंतरावाने उदारतेचा परिचय देत पीपल्या गावामध्ये अमरसिंहाचे स्मारक बनविण्यासाठी दोन एकर जमीन माफी मध्ये देऊन पराक्रमी शत्रुची स्तुत्य व प्रशंसनीय कार्याचा सन्मान यशवंतराव होळकर यांनी त्यावेळी केलेला आहे. पुण्यातील विजया नंतर यशवंतराव होळकर यांनी आपल्या पराक्रमी सैन्याच्या योगयतेनुसार.[126] आपल्या सैन्य दलातील सैनिकांना पदोन्नती देण्यात येत असत. आणि पुरस्कार स्वरुप भेट वस्तु देण्यात आलेल्या होत्या. यशवंतराव होळकर यांनी भवानी शंकर यास राजाची उपाधी देवून एक ध्वज, एकहत्ती, पालखी, घोडा देण्यात आला तर मुर्तुजा खानाला नवाब तर बाजीद अली खानास, "रुस्तम" उद्दौला ही उपाधी देण्यात आली होती. सामतखान आणि नजीबखान यांना नवाब बनविण्यात आले. भेट स्वरुपात वस्तु ही देण्यात आल्या. अच्छेसिंहाला कोकणची जबादारी देण्यात आली तर, रघुनाथरावाला हिंडोणची जबाबदारी सोपविण्यात आली.[127] यशवंतरावांना माहित होते की, कोणत्या सेनापतीला कोणत्या प्रदेशाची जबाबदारी देण्यात यावी यामध्ये त्या सेनापतीचा सन्मान होता जो

यशवंतराव होळकरांनी त्यांच्यावर जबाबदारी सोपवून केलेला दिसतो. भिल्लांचा सरदार झुंझार नायक यास चिखली हे महाराष्ट्रातील गाव यशवंतराव होळकर यांनी जहागिरीच्या स्वरुपात देण्यात आले त्याच बरोबर जमीन ही पुरस्काराच्या स्वरुपात देण्यात आली.[128] सरदारांना त्यांच्या कार्यकर्तृत्वानुसार त्यांचा सन्मान यशवंतराव होळकर यांनी केलेला आपल्याला पहावयास मिळतो. भिल्लांचा झुंझार नायक हा यशवंतराव होळकरांच्या सैन्यदलामध्ये धर्नुधारी दलाचा प्रमुख होता. त्यामुळे त्याच्या योग्यतेनुसार त्याचा मान सन्मान करण्यात आलेला दिसेल. युध्दाच्यावेळी फतेहसिंह माने याने पेशव्यांचा ध्वज उचलुन आणला होता.[129] हा ध्वज यशवंतराव होळकर यांनी पुरंदरेला हे सांगत वापस केला की, आम्ही सर्वजण एक आहोत एकाच प्रभूची लेकरे आहोत. आम्ही विद्रोही नाहीत. ही घटना यशवंतराव होळकर यांची राष्ट्रीय एकात्मता आणि ईश्वरीय आस्थेच्या प्रति गंभीरपणे विचार करायला लावणारे वरिल त्यांचे विधान होते. त्या ध्वजाचा सन्मान करुन परत देण्यात आला. जरि पटका हा आपला मानबिंदु आहे त्याचा सन्मान राखा अशी ताकीद ही यशवंतराव होळकर यांनी फतेहसिंह मानेना कळवली.[130] मराठे शाहीचा ध्वज जरिपटका यासंदर्भात आपली निष्ठा, आदर, सन्मानपूर्वक वंदन, अभिमान आहे. असे आपल्या सेनापतींना यशवंतरावांचा आदेश होता. जरी पटक्याचा मान सन्मान ठेवा अशी सक्त ताकीद देणारा ही यशवंतराव होळकर हा होता. फतेहसिंह माने याने पेशव्यांचा ध्वज हा एका हत्तीवर ठेवण्यात आला.[131] या जरीपटका ध्वजास यशवंतराव होळकर यांच्या सैनिकांनी अपमानीत केले नाही जे की या ध्वजास यशवंतरावांच्या सेनापतीने नम्र पणे वाकून नमस्कार केला आणि सन्मान पूर्वक ध्वज पेशव्यांकडे परत पाठविण्यात आला. यशवंतरावांची संपूर्ण भारतात घोडदौड सुरु असताना आपला प्रभाव, दबदबा वेगवेगळ्या प्रांतावर निर्माण केला होता. परंतु आपल्या मातृभूमीच्या अंगणातील आपले मराठेशाहीच्या राज्याच्या ध्वजा समोर आदरपूर्वक नतमस्तक होणे आणि आपल्या सैन्यदलांनाही या ध्वजाचा सन्मान राखण्यास सांगणे हा त्यांच्या अंगभूत गुणांचा संस्काराचा भाग होता असे दिसुन येईल.

### 3.19 **युध्द विषयक शस्त्रास्त्रे** :-

तत्कालीन परिस्थितीचा विचार करता भारतातील संस्थानिक राजे, राजवाडे यांच्याकडे असणारी लष्करी व्यवस्था आणि त्यांच्याकडे असणारी शस्त्रास्त्रे ही कार्यक्षम व प्रभावी असणारी यशवंतराव होळकर यांच्याकडे सुध्दा उपलब्ध होती.[132] वेगवेगळ्या लष्करी मोहिमेच्या माध्यामातून शस्त्रास्त्रांची वर्णने उपलब्ध होतात. यशवंतराव होळकर यांच्या सैन्याकडे तलवार, भाला, कट्यार,

बाण, बर्चा, ढाल, लहान मोठ्या तोफा अशा वेगवेगळ्या प्रकारची शस्त्रास्त्रे ही पारंपारिक पध्दतीची होती. इंग्रजांकडे असणारी शस्त्रास्त्रे, बंदुका आणि तोफखाना या काळात सर्व संश्यांनिकापेक्षा उच्च प्रतीच्या होत्या, यशवंराव होळकर यांनी उच्च प्रतीचे शस्त्रास्त्रे बनविण्याचा आणि मिळविण्याचा प्रयत्न सातत्याने करताना दिसतात. त्याच अनुषंगाने यशवंतरावांनी भानपुरास्थित नावली या ठिकाणी इंग्रजांच्या तोफखाना सारखा तोफा ओतण्याचा कारखाना स्थापन केला होता. त्याचबरोबर दारुगोळा तयार करण्याचा यशवंरावांनी यशस्वी प्रयत्न केलेला पहावयास मिळतो. मराठेशाहीच्या उत्तरार्धात भारतात इंग्रजाद्वारे उपयोगात येणारी युध्दातील शस्त्रास्त्रे हे आपल्या सैन्यदलाला देण्याचा प्रयत्न यशवंतरावांचा सातत्याने चालु होता.  इंग्रजांच्या आधुनिक शस्त्रांचा यशवंतराव होळकर यांच्यावर प्रभाव जाणवत असे त्याचे महत्व ओळखून तशाच प्रकारची शस्त्रास्त्रे व तोफा बनविण्याचा व ते तयार करण्याचा प्रयत्न त्यांनी केला. समकालीन भारतातील संस्थानिकामध्ये अशा प्रकारचा प्रयत्न झालेला दिसत नाही. यामुळे इंग्रजांच्या विरुध्द मराठे हे युध्दात अयशस्वी ठरलेले दिसतात. यशवंतरावांनी इंग्रजांच्या विरुध्द लढण्यासाठी आपल्या सैन्यदलात आधुनिक पध्दतीने सुरक्षित आणि उत्कृष्ट कामगिरी करण्यासाठी कट्यार, तलवार, भाला, बंदुक इत्यादी शस्त्रास्त्रे विशिष्ट प्रकारामध्ये निर्माण केलेले आढळुन येतात. यशवंतरावांनी तलवार, बर्चा, इत्यादी शस्त्रामध्ये कलात्मक कार्य जरी कमी दिसत असले तरी त्या शस्त्रास्त्रांची मजबुती, संहारक क्षमता ही जास्त होती. त्यामुळे यशवंतराव होळकर यांच्या सैन्यदलात शस्त्रास्त्रांची एक श्रृंखला मोठी असलेली दिसेल. त्याच बरोबर यशवंतरावांचे सैन्य दलेही गनिमीकावा युध्द तंत्रामध्ये पारंगत होते. त्याच बरोबर युध्दाच्या मैदानावर स्वत: पराक्रम, शौर्य गाजविण्यासाठी ओळखण्यात येत होते. यशवंतरावांनी शस्त्रांच्या क्षेत्रामध्ये विशेष परिवर्तन करुन आपल्या सैन्याला लागणारी सुविधा जनक शस्त्रास्त्रे निर्माण करताना दिसतात.

यशवंतराव होळकर हे शस्त्रास्त्रांच्या कलात्मक आणि स्वत:च्या कारीगरीच्या बाबतीत प्रयत्नशील होते.[133] यशवंतरावांनी अशा काही शस्त्रांचा उपयोग केला जो स्वत: त्यांनी कारखान्यामध्ये निर्माण केले होते. या शस्त्रांना चालविण्यासाठी विशेष प्रशिक्षणाची आवश्यकता होती. यशवंतरावांनी तलवार, कट्यार, फरसा, भाला इत्यादी सह बंदुकाही एका विशिष्ट प्रकारामध्ये वजनाने हलक्या बनविण्यात आलेल्या होत्या. अशा प्रकारचे शस्त्रास्त्रे हे असंख्य आहेत जे मोगलकालखंडात निर्माण केलेल्या होत्या परंतु यशवंतराव होळकर यांनी आपल्या सैन्यदलाला लागणारे शस्त्रास्त्रे जशा पध्दतीच्या पाहिजेत तशाच प्रकारच्या सुधारणा करुन युध्दामध्ये उपयोगात आणलेल्या दिसतात.

यशवंतराव होळकर यांच्या सैन्यदलात मोठी शस्त्रास्त्रे ही तलवार, भाला, फरसा अशा प्रकारची शस्त्रास्त्रे ही सरळ लांब होती, तर लहान शस्त्रास्त्रेही घुमावदार आणि संहारक क्षमता जास्त असलेली दिसुन येतात.

## 3.20 **शस्त्रांची निवड :- आकार, रचना**

### 3.20.1 **खांडा :-**

हे सरळ रुंद आणि दोन्ही बाजूनी धार असलेली.[134] खालची बाजू खिळयाच्या आकाराची असे जे दोरीने विशिष्ट रुंदी मध्ये मोडून एका टोकदार भागामध्ये मिळत याची मूठ साधी परंतु घुमावदार पकड असायची रुंद पात्याची, दुधारी व सरळ अशी तलवार



### 3.20.2 **किर्च :-**

बहुतांशी तलवारी सारखी सरळ व पातळ, असे हाताकडे जाण्याची बाजू हल्की व रुंद, यास दोन्ही बाजूने धार असे.



### 3.20.3 **कट्टा :-**

एक प्रकारची कट्यार जी फार लहान होती वळलेल्या तलवारी सारखी असे याच्या मध्ये हाताकडील भाग कोणीच्या रक्षणासाठी प्रामुख्याने बनविण्यात आलेला होता.



### 3.20.4 **बरच्छा :-**

हे विशिष्ट प्रकारचा भाला असून हा फार लांब, याची लांबी १२ फुट किंवा १५ ते १८ फुटापर्यंत असु शकते याचे पाते कमीत कमी २ फुटाचे असते, युध्दात सैनिक यास सरळ व आजुबाजुला कोणत्याही दिशेला शत्रुपक्षात फिरविता येते.



### 3.20.5 **ढाल :-**

शिरस्त्राण कवच, ढाल शिरस्त्राण कवच हे सामान्य पणे मोगलांच्या लष्करातील शस्त्रासारखे होते. ढाल ही कासव, मगरी, गेंड्याच्या कातडीपासून बनविण्यात येते. यशवंतराव होळकर यांच्या प्रमुख सेनाधिकारी यांच्याकडे धातुपासून ढाल बनविलेल्या असत.



### 3.20.6 **पट्टा :-**

सरळ, पातळ, दुधारी तलवार. याच्यामध्ये पंजावर एक प्रकारचा कपडा जोडलेला असायचा हा कपडा संपूर्ण जंजाला बहुतांशी झाकून ठेवण्यात येत असे, विशिष्ट तलवारी व्यतिरिक्त मोगलांच्या तलवारी सारखे तलवारी मोठ्या संख्येने होत्या.



### 3.20.7 सुरा :-

हा एक साधा परंतु विशिष्ट प्रकारचा सुरा, सुरा हा कट्यार मध्ये सर्वात संहारक प्रकारचा मानला जातो.



### 3.20.8 भिडचिर :-

भिडचिर हे शस्त्र मराठयांनी शोधून काढलेले होते.[135] या शस्त्राला मारुपण या नावाने ओळखण्यात येते. सामान्यत: हे शस्त्र हरिण, बाराशिंगी, म्हशीचे शींग या पासून बनविण्यात येते. युध्दामध्ये सैनिक व सैन्य अधिकारी, शत्रु सैन्याच्या वेढ्यामध्ये अडकला असेल किंवा शत्रुने त्या सैन्यास घेराव घातला असेल त्यावेळी याचा उपयोग करण्यात येतो. भिडचिर चा अर्थ हा गर्दीला कापून जाणारा हा होतो.

### 3.20.9 खड्ग :-

खड्ग या शस्त्राचे एकटोक दुसऱ्या बाजूने निघालेले असते हे चाकुसारखे दिसणारा पण असू शकतो. हाता मध्ये तलवारी सारखा याचा वापर करण्यात येतो.



### 3.20.10 **वाघनखे :-**

वाघाचे नख हे हातमोजे यामध्ये शिऊन बसविण्यात आलेले असायचे ज्याच्यावर प्रत्येक बोटाचा दबाव पडेल अशा पध्दतीची त्याची बांधणी करण्यात आलेली असायची.



### 3.20.11 **गुर्री:-**

या शस्त्राच्या पाठी मागचा भाग हा चमडयाचा किंवा दोरीच्या बेल्टचा असतो. एका छोट्या प्रकारचा त्याच्या पात्याची रुंदी ही कुऱ्हाडीच्या पात्याच्या तुलनेत चारपट जास्त असते.

### 3.20.12 **फरसा :-**

होळकरी फरसा हा कुऱ्हाडी सारखा असायचा याच्या पात्याची रुंदी कुऱ्हाडीच्या पात्याच्या तुलनेत चारपट जास्त असते.



यशवंतराव होळकर यांच्या सैनिकांना लागणारी सैन्य सामग्री ही तयार करण्याची जबाबदारी फिरजाखानावर देण्यात आलेली होती.[136] सैन्यदलासाठी लागणारा शस्त्रपुरवठा हा यशवंतराव होळकर यांच्या कालखंडात निर्माण करण्यात आलेला दिसतो. यशवंतरावांना माहित होते की वेगवेगळ्या प्रांतामध्ये असणाऱ्या संस्थानिकांकडे असणारी शस्त्रास्त्रे यांचा अभ्यास युध्दाच्या

मोहिमेच्या माध्यमातून झालेला होता. आपल्या सैन्यदलातील सैनिकांना लागणारी वेगवेगळी शस्त्रास्त्रे ही आपल्या लष्करी कारखान्यात उत्पादन करत होते. आपले सैन्य दुसऱ्या राज्याच्या, सैन्यदलापेक्षा सर्वश्रेष्ठ आणि उत्कृष्ट कार्य युध्दात करता यावे यासाठी यशवंतरावांनी फिरजाखानाच्या नेतृत्वाखाली वेगवेगळ्या शस्त्रास्त्रांचे उत्पादन करण्यात येत.

कटयार, तलवार, भाला, बंदुका इत्यादीचे विशिष्ट प्रकारा मध्ये शस्त्रांचे उत्पादन यशवंतरावांनी केले.[137] पूर्वी सांगितल्याप्रमाणेच यशंतराव होळकर यांनी आपल्या वेगवेगळ्या सैन्यदलास लागणारी शस्त्रास्त्रे उत्पादन करण्यासाठी यांचा ओढा होता. यशवंतरावांची दुरदृष्टी ही आपल्या सैन्यास लागणारी शस्त्रास्त्रे त्या शस्त्रांच्या माध्यमातून आपले सैन्यदले सक्षम करण्याकडे यांचा भर दिसून येतो.

### 3.21 **शिरस्त्राण व कवच :-**

शिरस्त्राण व कवच हे मोगलांच्या लष्करी व्यवस्थेत जशा प्रकारे सैनिकांना होते. तशाच प्रकारे यशवंतराव होळकर यांच्या शासन काळामध्ये वैशिष्टयपूर्ण चिलखतधारी पोशाख होता.[138] पूर्वीच्या शासन कर्त्यांनी या चिलखताचे उत्पादन करण्यास सुरुवात केलेली दिसुन येते. या चिलखतास "चार आईना" म्हटले जात. हे अंगात घाल्यानंतर सैन्याची छाती, पाठ आणि हाडांची सुरक्षा करण्यात येत होती. तलवारीने लढणाऱ्या सैनिकांना कोपऱ्या पर्यंत हात मोजे घालण्याची परंपरा होती. हे बाहुबंद धातुचे बनविण्यात येत असले तरी यामध्ये खांद्याच्या भागाकडे साखळ्या जोडण्यात आलेल्या असायच्या या साखळ्या खांद्याच्यावर पसलेले असून त्यास चिलखताशी जोडण्यात येत असे. कारण शत्रुच्या सैन्याने जर प्रहार हा खांदा किंवा बाहुवर, कोपऱ्यावर केला असता त्या पासून बचाव करण्यात यावा अशी त्याची बांधणी असायची. शिरस्त्राण हे मोगलांच्या कालखंडात मोठ्या प्रमाणात वापरताना दिसतात. यामध्ये गळ्याची सुरक्षा व्हावी या करीता साखळ्या लटकवलेल्या असायच्या अशा पध्दतीने शिरस्त्राण व कवच त्यावेळी शत्रुच्या विरुध्द युध्दात लढण्यासाठी हा पेहराव परिधान करण्यात येत.

### 3.22 **यशवंतराव होळकर यांचा विशिष्ट चिलखत :-**

यशवंतराव होळकर यांचा चिलखत हा भारतातील राजे, राजवाडे, संस्थानिक यांच्या मध्ये वैशिष्टये पूर्ण तेसाठी प्रसिध्द राहिलेला आहे.[139] यशवंतराव होळकर यांनी स्वत:साठी विवेक पूर्ण

चिलखत बनवला होता. त्यांचा चिलखतधारी पोशाख हा बाण, तलवार, बंदुकीच्या गोळ्या झेलण्यासाठी सक्षम होता. योध्दाच्या डोक्यावर ठोस आवरणासह हात, पाय झाकण्यासाठी हा चिलखतधारी पोशाख फिरणाऱ्या प्लेटाद्वारे निर्माण केलेला होता. ज्यामध्ये असंख्य धातुचे मिश्रण करण्यात आले होते. त्यामुळे हलक्या तोफांचा गोळा ही यावर काही परिणाम करत नव्हता. हा चिलखतधारी पोशाख घातल्यानंतर यशवंतराव होळकर यांच्या शरीराचा कोणताही भाग दिसत नसे. त्यांच्या कंबरेला दारुगोळा ठेवण्यासाठी कलात्मक पध्दतीने रकाना बनविण्यात आलेला दिसतो. शत्रुला समोर पहाण्यासाठी त्रिकोणी जाळी लावलेली प्लेट दिसते ज्याला झाकण्यात येत असे. चिलखता सोबत ठेवलेली बंदुक, ढाल, तलवार ही त्या योध्दाला दर्शविते. अशा पध्दीतीने यशवंतराव होळकर यांनी युध्दात लढण्यासाठी शत्रु पासून आपल्या शरीराचे संरक्षण करण्यासाठी स्वत:साठी अशा विशिष्ट प्रकारचा चिलखतधारी पोशाख बनवुन घेतलेला दिसून येतो.

## 3.23 **यशवंतराव होळकर यांचे विविध शस्त्रे :-**

भोपाळ स्टेट संग्रहालयामध्ये यशवंतराव होळकर यांची अनेक शस्त्रास्त्रे आहेत.[140] ज्या मध्ये वेगवेगळ्या प्रकारची शस्त्रास्त्रे खड्ग, दुधारा, तैगा, तलवार, अशाच प्रकारे कट्यार जमधर, जमदादू, चिलनुमा, त्रिकोण युक्त खंजीर, गुज, फरसा इत्यादी प्रमुख शस्त्रास्त्रे आहेत. बंदुकांचे वेगवेगळे प्रकार ही यामध्ये दिसुन येतात.[141] त्याचबरोबर बंदुकामध्ये तौडदार, मॅन्टालॉक, दगडकला फिलंट लॉक, बंडल कैरावाईन, मस्कट, टोपीदार बिचेस्टर बंदुक इत्यादी आहेत.

## 3.24 **यशवंतराव होळकर यांची तलवार :-**

यशवंराव होळकर यांच्या कालखंडातील विविध शस्त्रास्त्रे.[142] जसे यशवंतरावांची तलवार ही लंडनच्या संग्रहालया मध्ये व्हिक्टोरिया व अल्बर्ट संग्रहालय लंडन याठिकाणी ठेवण्यात आलेली असून या तलवारीची बनावट सोने आणि स्टीलद्वारे करण्यात आलेली आहेत. या तलवारी मध्ये 276 हिरे, 378 मोती ३८ पन्ना इत्यादीद्वारे विशेष कलात्मक कार्यानुसार जोडण्यात आलेली आहेत. ही तलवार इ.स. 1800 मध्ये इंदौर या ठिकाणी बनविण्यात आलेली होती. या तलवारीची लांबी 94.5 सेमी एवढी असून ही तलवार लंडन येथील संग्रहालयात दक्षिण आशिया विभागातील खोली क्र. ४१ च्या २२ नंबर केस मध्ये ठेवण्यात आलेली आहे.

### 3.25 सैन्य संख्या :-

यशवंतराव होळकर यांच्या फौजेची संख्या मोठी का व्हावी हे चिंताजनक कोडे मात्र इंग्रज नीट सोडवीत नाहीत.[143] यशवंतरावांचे शौर्य, साहस यावर इंग्रजांशी लढण्याच्या चिकाटीवर लोकांचा विश्वास होता. त्याच बरोबर वारंवार वाढणाऱ्या सैन्य बळाची ही गुरु किल्ली होती. यशवंतरावांचे नेतृत्व प्रभावी होते. त्यांचा उद्देश स्पष्ट आणि प्रामाणिक होता. त्यामुळे यशवंतरावांना सैन्य दलात काम करण्यासाठी सैनिकांची कमतरता कधी पडली नाही. संपूर्ण भारतातील संस्थानिकांना यशवंतरावांकडून अपेक्षा होत्या की भारतातून इंग्रजाना हाकलून लावणारा एकमेव यशवंतराव होळकर हा आहे. लोकांना यांच्यावर विश्वास होता. त्यामुळे इंग्रजांना यशवंतरावांच्या वाढत्या सैन्यदलाचे कोडे सोडवता आलेले नाही. यशवंतराव होळकर हे महेश्वर येथे वास्तव्य करत असताना.[144] त्यांच्या सैन्य दलामध्ये 800 घोडे स्वार आणि १५०० पायदल सैन्य यांच्या आखत्यारीत होते. इंग्रज अधिकारी गर्व्हनर जनरल लॉर्ड वेलस्लीच्या माहिती नुसार यशवंतराव होळकर यांच्या कडे सैन्य संख्या.[145]

1) २८ पलटणी - १४ युरोपियन सैन्य अधिकाऱ्याच्या नेतृत्वाखाली होत्या.

2) ५०० रोहिले 3) २५००० घोडदळ 4) १०० तोफा होत्या.

हिज हाईनेस महाराजा तुकोजीराव होळकर द्वितीय या पुस्तकामध्ये एम. डब्ल्यु बर्वे पृष्ठ क्रमांक ८९ वर लिहीतात की यशवंतराव होळकर यांच्या जवळ.[146]

1) 10 बटालियन 2) 5000 रोहिले 3) 12000 मराठा घोडेस्वार

4) 15000 पठाण घोडेस्वार 5) 98 तोफा

एशियाटीक वार्षिक अहवालानुसार.[147] इ.स. 1802 मध्ये एकंदरीत यशवंतराव होळकर यांच्या सैन्यामध्ये १ लाख ४४ हजार सैनिक होते जनरल वेलस्ली म्हणतो. संख्या बळ व शिस्त या दोन्ही बाबतीत शिंदे आणि पेशवे यांच्या पेक्षा यशवंतराव होळकर यांचे सैन्य इतके बलशाही होते की लढाईच्या नेतृत्वा बद्दल शंकाच नव्हती. यशवंतराव होळकरांचे सैन्य हे 300 घोडेस्वार आणि 800 सैनिक हे हिंग्लाजगडाच्या संरक्षणा करिता तत्पर होते.[148] यशवंराव होळकर यांचे साम्राज्य हे खोगिरावर होते. यांच्याकडे 60000 घोडेस्वार आणि मनात भरणारा तोफ खान्याचे पथक नेहमी सज्ज असे.

### 3.26 **प्रशासकीय व्यवस्था :-**

यशवंतराव होळकर यांच्या कार्यकाळा मध्ये वेगवेगळया प्रशासकीय विभागाची व्यवस्था करण्यात आली होती.[149]

१) मुकुंदराव यांना जमादार (ट्रेजरी व ज्वेलर्स)

२) भवानी शंकर बक्षी व श्यामराव महाडीक – प्रशासकीय व्यवस्था

३) मराठी व अन्य भाषेमध्ये येणाऱ्या पत्र व्यवहाराचे वाचन आणि लेखन कार्यासाठी भाषातज्ञ कारकून इत्यादी ठेवण्यात आले होते.

### 3.26.1 **प्रशासकीय व्यवस्था पहाण्याची जबाबदारी :-**

प्रशासकीय व्यवस्था पहाण्याची जबाबदारी खालील लोकांवर सोपविण्यात आली होती.[150]

१) भारमलदादा 2) पाराशरदादा 3) बापू होळकर 4) मेहरबान सिंह 4) तात्या होळकर

5) जमना लाल 6) मोहन लाल 7) सदानंद पंडित 8) गंगाराम कोठारी 9) रामसिंह

इत्यादी प्रशासकीय व्यवस्था पहाण्याचे कार्य करीत होते.

### 3.26.2 **प्रशासकीय व्यवस्थेचे वेगवेगळे विभाग :-**

यशवंतराव होळकर यांनी प्रशासकीय व्यवस्था ही वेगवेगळ्या विभागामध्ये करण्यात आली होती.[151]

1) अर्थविभाग 2) महसुल विभाग 3) न्याय विभाग 4) हाऊस विभाग

हे वरील विभाग राजवाडे आणि घोडेस्वारा करिता कार्यरत होते.

### 3.26.3 **लष्करी विभाग :-**

यशवंतराव होळकर यांच्या लष्करातील सैनिकांची नोंद ठेवणे हे यांच्या लष्करी नियमानुसार होते.[152]

१) यशवंतराव होळकर यांच्या सैन्याशिवाय युध्दाच्या वेळी करारावर येणाऱ्या सैन्याच्या नावाची यादी तयार करण्यात येत असे.

२) सैनिकांना बंदुक किंवा तलवार, सैनिकी पोशाख, कमरबंद, पायदा, चमड्याचा बेल्ट, लालटोपी (पगडी) खाकी वर्दी इत्यादीची सोय करण्यात आलेली होती.

३) घोडेस्वारांना भाला, तलवार व अन्य उपयोगी शस्त्रास्त्रे पोशाखा सहित उपलब्ध करुन देण्यात येत.

४) पायदळ सैन्यामध्ये बरेच सैनिक आपली पारंपारिक शस्त्रास्त्रे स्वत:ची सोबत घेऊन सैन्य दलात भरती होत.

५) सैनिकांची नोंद, वहीमध्ये करण्यात येत होती. घोडेस्वार, पायदळ, तोफखाना व इतर कार्य करणाऱ्याची, जबाबदारी सांभाळणाऱ्या लोकांची संख्या ही डोकी मोजून करण्यात येत होती.

६) सैन्याला वेतन देते वेळी त्यांच्या अंगठ्याचा ठसा हिशोबाच्या वहीमध्ये घेण्यात येत होता. सैन्याला वेतन देते वेळी सैन्य अधिकारी हजर असायचा जर एखाद्या सैन्याचा संशय वाटत असेल त्यावेळी त्या सैन्याची नोंदवही मध्ये घेण्यात आलेल्या अंगठ्याच्या ठशाची तपासणी करण्यात येत असे.

७) सैनिकांना २० दिवसानंतर वेतन देण्याची प्रथा होती.

८) प्रत्येक सैनिकांना तीन भागामध्ये विभागण्यात येत असे.

९) सैनिकांना २०० रुपये वार्षिक पासुन ते 500 रुपया पर्यंत वेतन देण्यात येत होते.

१०) सैन्यदलामध्ये कार्य करणाऱ्या कामगारांना इतर कामासाठी १५० रुपये पासून २५० रुपयापर्यंत वेतन देण्याचे नियोजन करण्यात आले होते.

**संदर्भ ग्रंथ :-**


1) तर्कतीर्थ श्री. लक्ष्मणशास्त्री जोशी (संपा); मराठी विश्वकोष खंड-12, महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ, मुंबई. 1976, पृ-1184.
2) कित्ता, पृ-1184.
3) प्रा.डॉ. राम इंगळे; होळकर शाहीचा संस्थापक, विश्वभारती प्रकाशन, सीताबर्डी नागपूर-12,1992, पृ-81,82.
4) कित्ता, पृ-90.
5) कित्ता, पृ-93.
6) डॉ. गणेश मतकर; सांस्कृतीक इतिहास आणि होळकर राज्य, प्रकाशन नविन फोटो कॉपी शिव विलास पॅलेस राजवाडा परिसर इंदौर, 1999,पृ-68.
7) कित्ता, पृ-68.
8) Rajkumar(ed); Maratta Military systems, common welth publishers, 4831/24 Prahlad street, Ansari road Darya Ganj New Delhi-02,2004, PN. 90, 98.
9) न.र.फाटक; मराठेशाही अखेरचा अद्वितीय स्वातंत्र्यवीर श्रीमन्मथमहाराज यशवंतराव होळकर वि.पु. भागवत, मौज प्रिंटींग ब्युरो खटाववाडी, मुंबई-4,1967, पृ-163.
10) कित्ता, पृ-142.
11) G.S. Sardesai; New Histary of the Marathas Vol-III (1782-1848), Phoenix publications Bombay-1968, Pn-363.
12) शिवराम महादेव परांजपे; मराठ्यांच्या लढायांचा इतिहास 1802 ते 1818, रा.रा.शंकर नरहर जोशी, चित्रशाळा प्रेस 1026, सदाशिव पेठ, पुणे -1934, पृ-239
13) कित्ता, पृ.249.
14) डॉ. गणेश मतकर; वीर श्रेष्ठ प्रथम यशवंतराव होळकर, अहिल्या प्रकाशन 3104, सुदामानगर, ई- सेक्टर इंदौर-1999 पृ-13.
15) शिवराम महादेव परांजपे; मराठ्यांच्या लढायांचा इतिहास 1802 ते 1818 रा.रा.शंकर नरहर जोशी, चित्रशाळा प्रेस 1026, सदाशिव पेठ, पुणे -1934, पृ-263.

16) घनश्याम होलकर; महाराजा यशवंतराव होलकर, नेशन प्रेस ओल्ड नं. 38, न्युनं-6 मॅकनिकोलस रोड, चेटपेट चेन्नई-31, 2018 पृ-37.

17) J.P. Guha; The Decisive Battles of India (1746 to 1849) Associated Publishing House New Delhi 5, PN-253.

18) घनश्याम होलकर; महाराजा यशवंतराव होलकर, नेशन प्रेस ओल्ड नं. 38, न्युनं-6 मॅकनिकोलस रोड, चेटपेट चेन्नई-31, 2018 पृ.-189.

19) रघुबीरसिंह (संपा); वाकई होल्कर, प्रकाशन स्कीन 57 मिश्रा- राजाजीका रास्ता जयपूर, 01, 1998. पृ.-131.

20) घनश्याम होलकर; महाराजा यशवंतराव होलकर, नेशन प्रेस ओल्ड नं. 38, न्युनं-6 मॅकनिकोलस रोड, चेटपेट चेन्नई-31, 2018 पृ-186.

21) कित्ता, पृ-187.

22) कित्ता, पृ-188.

23) यशवंत नरसिंह केळकर; होळकरांची कैफियत, हनुमान छापखाना सदाशिव पेठ, पुणे-2, 1954 पृ-227.

24) रघुबीरसिंह (संपा); वाकई होल्कर, प्रकाशन. स्कीन 57. मिश्रा- राजाजीका रास्ता जयपूर, 01, 1998. पृ-133,134.

25) कित्ता, पृ-134.

26) जोशी सु. ह व इतर; डायमंड इतिहास माहिती कोश पृ-173.

27) Dr. B.R.Andhare; Bundelkhand Under the Marathas, Shrikrishna Printing Press, Raut Chowk Lalganj Nagapur-2 1984, PN -133.

28) www.google.com.in- मराठ्यांचा इतिहास.

29) सौ. विजया कुलकर्णी (संपा); मराठ्यांची प्रशासन व्यवस्था, महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ मुंबई, 2003. पृ.-355.

30) शिवराम महादेव परांजपे; मराठ्यांच्या लढायांचा इतिहास 1802 ते 1818, चित्रशाळा प्रेस 1026, सदाशिव पेठ पुणे-1934, पृ.-234.

31) कित्ता, पृ-239.

32) कित्ता, पृ-233.

33) कित्ता, पृ-233.

34) W.H. Hutton; Rules of india the Murques welleslely, K.G. School and co. Lamingtion Road. Bombay 1961, पृ-76.

35) न.र. फाटक; मराठेशाही अखेरचा अद्वितीय स्वातंत्र्यवीर, श्रीमन्महाराज यशवंतराव होळकर, वि.पु. भागवत मौज प्रिंटींग ब्युरो खटाववाडी मुंबई-4, 1967, पृ.-115.

36) K.S. Gupta; Mewar and the Maratha Relations, (1735 to 1818 AD) S. Chand and Co PVT Ltd, Ram Nagar New Delhi-55, PN-158,168.

37) मधुसुदनराव होलकर; होलकरों का इतिहास प्रकाशन न्युज्ञान प्रेस 495, डी.डी.ए. कॉम्पलेक्स शहजादा बाग इंद्रलोक दिल्ली-35, 1992. पृ-388.

38) न.र. फाटक; मराठेशाही अखेरचा अद्वितीय स्वातंत्र्यवीर, श्रीमन्महाराज यशवंतराव होळकर, वि.पु. भागवत मौज प्रिंटींग ब्युरो खटाववाडी मुंबई-4, 1967, पृ-32.

39) दि.वी. गोखले; युध्दमीमांसा, मॅजेस्टीक प्रकाशन ८, फिनिक्स ३ रा मजला 457. एस. व्ही. पी. रोड मुंबई-4, 2000 पृ-242.

40) कित्ता, पृ-242.

41) कित्ता, पृ. 242.

42) कर्नल जेम्स टॉड; राजस्थान का इतिहास भाग-1 साहित्य सागर, धामाणी मार्केट की गली, चौडा रास्ता, जयपूर, 2008, पृ.-307.

43) घनश्याम होलकर; महाराजा यशवंतराव होळकर, नेशन प्रेस, ओल्डनं-38; न्युनं-6, मॅनिकोलस रोड चेटपेट चेन्नई,31,2018, पृ.-166.

44) कित्ता, पृ-79.

45) न. र. फाटक; मराठेशाही अखेरचा अद्वितीय स्वातंत्र्यवीर श्रीमन्महाराज यशवंतराव होळकर, वि.पु. भागवत मौजे प्रिंटींग ब्युरो खटाववाडी, मुंबई-4, 1967. पृ-119.

46) कित्ता, पृ-119.

47) कित्ता, पृ-120.

48) घनश्याम होलकर; महाराजा यशवंतराव होळकर, नेशन प्रेस, ओल्डनं-38; न्युनं-6, मॅनिकोलस रोड चेटपेट चेन्नई,31,2018, पृ.-149.

49) कित्ता, पृ-149.

50) बंडे शारदा गोविंदराव; मराठेकालीन होळकर संस्थान, कल्पना प्रकाशन ६, एच.आय.जी. आय.टी. आय जवळ नांदेड-02, 2009, पृ.-294.

51) गो.स. सरदेसाई; मराठों का नवीन इतिहास Vol-II, फोनिक्स प्रकाशन बेन हाम हॉल लेन, गिरगांव बॉम्बे, -4,1968, पृ-470.

52) डॉ. श्रीपाद दत्तात्र्य कुलकर्णी, हिंदु वर्चस्वासाठी लढा, साहित्य सागर प्रकाशन, धामाणी मार्केट की गली, चौडा रस्ता जगपूर 2008, पृ.-358.

53) गो.स. सरदेसाई; मराठों का नवीन इतिहास Vol-II, फोनिक्स प्रकाशन बेन हाम हॉल लेन, गिरगांव बॉम्बे, -4,1968, पृ-158.

54) अनिल मिसाळ; रणझुंजार महाराजा यशवंतराव होळकर, ज्ञानकुंज प्रकाशन मिलींद निवास, विद्यानगर, जत, जि. सांगली 2016, पृ-29.

55) कित्ता, पृ-29.

56) डॉ. गणेश मतकर; वीर श्रेष्ठ प्रथम यशवंतराव होलकर, अहिल्या प्रकाशन 3104, सुदामानगर ई-सेवहर इंदौर -09, 1999 पृ-55.

57) न. र. फाटक; मराठेशाही अखेरचा अद्वितीय स्वातंत्र्यवीर श्रीमन्महाराज यशवंतराव होळकर, वि.पु. भागवत मौजे प्रिंटींग ब्युरो खटाववाडी, मुंबई-4, 1967. पृ.-120.

58) अहिल्या स्मारिका; सन 1971, पृ-54.

59) घनश्याम होलकर; महाराजा यशवंतराव होलकर, नेशन प्रेस, ओल्डनं-38; न्युनं-6, मॅनिकोलस रोड चेटपेट चेन्नई,31,2018, पृ-163.

60) कित्ता, पृ-34.

61) कित्ता, पृ-166.

62) डॉ. गणेश मतकर; वीर श्रेष्ठ प्रथम यशवंतराव होळकर, अहिल्या प्रकाशन 3104, सुदामानगर ई-सेवहर इंदौर -09, 1999 पृ-55.

63) घनश्याम होलकर; महाराजा यशवंतराव होलकर, नेशन प्रेस, ओल्डनं-38; न्युनं-6, मॅनिकोलस रोड चेटपेट चेन्नई,31,2018, पृ-186.

64) कित्ता, पृ-184.

65) कित्ता, पृ-186.

66) कित्ता, पृ-186.

67) रघुबीरसिंह (संपा); वाकई होल्कर, प्रकाशन. स्कीन 57. मिश्रा- राजाजीका रास्ता जयपूर, 01, 1998. पृ-79.

68) कित्ता, पृ-79.

69) कित्ता, पृ-79.

70) दि.वी. गोखले; युध्दमीमांसा, मॅजेस्टीक प्रकाशन ८, फिनिक्स ३ रा मजला 457. एस. व्ही. पी. रोड मुंबई-4, 2000 पृ-241,242.

71) घनश्याम होलकर; महाराजा यशवंतराव होळकर, नेशन प्रेस, ओल्डनं-38; न्युनं-6, मॅनिकोलस रोडः चेटपेट चेन्नई,31,2018, पृ.186.

72) कित्ता, पृ. 149.

73) डॉ. गणेश मतकर; सांस्कृतिक इतिहास आणि होळकर राज्य, प्रकाशन नवीन फोटो कॉपी शिवविलास पॅलेस राजवाडा परिसर इंदौर 1999-68.

74) डॉ. गणेश मतकर; वीर श्रेष्ठ प्रथम यशवंतराव होळकर, अहिल्या प्रकाशन 3104, सुदामानगर ई-सेवहर इंदौर -09, 1999 पृ-47.

75) डॉ. गणेश मतकर; सांस्कृतीक इतिहास आणि होळकर राज्य, प्रकाशन नविन फोटो कॉपी शिव विलास पॅलेस राजवाडा परिसर इंदौर, 1999, पृ-68.

76) घनश्याम होलकर; महाराजा यशवंतराव होळकर, नेशन प्रेस, ओल्डनं-38; न्युनं-6, मॅनिकोलस रोडः चेटपेट चेन्नई,31,2018, पृ-189.

77) रघुबीरसिंह (संपा); वाकई होल्कर, प्रकाशन. स्कीन 57. मिश्रा- राजाजीका रास्ता जयपूर, 01, 1998.पृ-96.

78) अनिल मिसाळ; रणझुंजार महाराजा यशवंतराव होळकर, ज्ञानकुंज प्रकाशन विद्यानगर, जत जि. सांगील, 2016, पृ-29.

79) न.र. फाटक; मराठेशाही अखेरचा अद्वितीय स्वातंत्र्यवीर श्रीमन्महाराज यशवंतराव होळकर, वि.पु. भागवत मौजे प्रिंटींग ब्युरो खटाववाडी, मुंबई-4, 1967. पृ-169.

80) डॉ. गणेश मतकर; वीर श्रेष्ठ प्रथम यशवंतराव होळकर, अहिल्या प्रकाशन 3104, सुदामानगर ई-सेवहर इंदौर -09, 1999 पृ-168.

81) न.र. फाटक; मराठेशाही अखेरचा अद्वितीय स्वातंत्र्यवीर श्रीमन्महाराज यशवंतराव होळकर, वि.पु. भागवत मौजे प्रिंटींग ब्युरो खटाववाडी, मुंबई-4, 1967. पृ-164.

82) कित्ता, पृ.152.

83) कित्ता, पृ.-115.

84) गो.स. सरदेसाई; मराठे का नविन इतिहास, शिवकाल अग्रवाल ॲण्ड कंपनी प्रा.लि. दुर्गा प्रिंटींग वर्क्स आगरा 1964, पृ-401.

85) संजय सोनवणी; भारतीय स्वातंत्र्याचे प्रणेते महाराजा यशवंतराव होळकर, पुष्प प्रकाशन, भारत बुक हाऊस 1788, संदाशिव पेठ, देशमुखवाडी, पुणे-30,2011 पृ-39.

86) संजय सोनवणी; ब्लॉग स्पॉट इन 2011.

87) मधुसुदनराव होलकर; होलकरों का इतिहास प्रकाशन न्युज्ञान प्रेस 495. डी.डी.ए. कॉम्पलेक्स शहजादा बाग इंद्रलोक दिल्ली -35, 1992. पृ.-396.

88) Jadunath Sarkar; Fall of the Mughul Emprire vol-4, orient longman, Nicol road, Ballard Estate Bombay-1 1972, PN-194.

89) गो.स. सरदेसाई; मराठे का नवीन इतिहास Vol-II, फोनिक्स प्रकाशन बेन हाम हॉल लेन, गिरगांव बॉम्बे, -4,1968, पृ-401.

90) कित्ता, पृ-401.

91) कित्ता, पृ-401.

92) शिवराम महादेव परांजपे; मराठ्यांच्या लढायांचा इतिहास 1802 ते 1818, चित्रशाळा प्रेस 1026, सदाशिव पेठ पुणे-1934, पृ-232.

93) Grant Duff; History of the marath's part-II Asscoiated publishing house New Delhi's 1878, Page-586.

94) डॉ. गणेश मतकर; वीरश्रेष्ठ प्रथम यशवंतराव होळकर, अहिल्या प्रकाशन 3104, सुदामानगर ई-सेव्हर इंदौर, 1999 पृ-29.

95) John malcam; Empire central india, part-I Publication kingsubry, parbury and allen, leaden Hall-steet 1824, pol-192.

96) मधुसुदनराव होलकर; होलकरों का इतिहास प्रकाशन न्युज्ञान प्रेस 495. डी.डी.ए. कॉम्पलेक्स शहजादा बाग इंद्रलोक दिल्ली -35, 1992. पृ-416.

97) के.एस.गुप्ता; मेवाड आणि मराठा संबंध (1735-1818), एस.चाँद आणि को.प्रा.लि. रामनगर, नवी दिल्ली -55, पृ-169.

98) गो.स. सरदेसाई; मराठों का नवीन इतिहास Vol-II, फोनिक्स प्रकाशन बेन हाम हॉल लेन, गिरगांव बॉम्बे, -4,1968, पृ-401.
99) डॉ. सुमन वैद्य; अखेरचा पेशवा, प्रगती प्रकाशन 87 अ, धंतोली नागपूर-12, 1994 पृ-82.
100) घनश्याम होलकर; महाराजा यशवंतराव होळकर, नेशन प्रेस, ओल्डनं-38; न्युनं-6, मॅनिकोलस रोड चेटपेट चेन्नई,31,2018, पृ-173.
101) न.र. फाटक; मराठेशाही अखेरचा अद्वितीय स्वातंत्र्यवीर श्रीमन्महाराज यशवंतराव होळकर, वि.पु. भागवत मौजे प्रिंटींग ब्युरो खटाववाडी, मुंबई-4, 1967, पृ-92.
102) कित्ता, पृ-93.
103) कित्ता, पृ-102.
104) www.wikipedia.sanjay sonwani 6109 spot in 2011.
105) शिवराम महादेव परांजपे; मराठ्यांच्या लढायांचा इतिहास 1802 ते 1818, चित्रशाळा प्रेस 1026, सदाशिव पेठ पुणे-1934, पृ.249.
106) संजय सोनवणी; भारतीय स्वातंत्र्याचे प्रणेते महाराजा यशवंतराव होळकर, पुष्ठ प्रकाशन, भारत बुक हाऊस 1788, संदाशिव पेठ, देशमुखवाडी, पुणे-30, 2011 पृ-41.
107) न.र. फाटक; मराठेशाही अखेरचा अद्वितीय स्वातंत्र्यवीर श्रीमन्महाराज यशवंतराव होळकर, वि.पु. भागवत मौजे प्रिंटींग ब्युरो खटाववाडी, मुंबई-4, 1967, पृ-142.
108) अनिल मिसाळ; रणझुंजार महाराजा यशवंतराव होळकर, ज्ञानकुंज प्रकाशन मिलींद निवास, विद्यानगर, जत, जि. सांगली 2016, पृ-12.
109) न.र. फाटक; मराठेशाही अखेरचा अद्वितीय स्वातंत्र्यवीर श्रीमन्महाराज यशवंतराव होळकर, वि.पु. भागवत मौजे प्रिंटींग ब्युरो खटाववाडी, मुंबई-4, 1967, पृ-132.
110) रघुबीरसिंह (संपा); वाकई होल्कर, प्रकाशन. स्कीन 57. मिश्रा- राजाजीका रास्ता जयपूर, 01, 1998. पृ-103.
111) कर्नल जेम्स टॉड; राजस्थान का इतिहास भाग-1 साहित्य सागर, धामाणी मार्केट की गली, चौडा रास्ता, जयपूर, 2008, पृ-304.
112) मधुसुदनराव होलकर; होलकरों का इतिहास प्रकाशन न्युज्ञान प्रेस 495. डी.डी.ए. कॉम्पलेक्स शहजादा बाग इंद्रलोक दिल्ली -35, 1992. पृ-399.

113) न.र. फाटक; मराठेशाही अखेरचा अद्वितीय स्वातंत्र्यवीर श्रीमन्महाराज यशवंतराव होळकर, वि.पु. भागवत मौजे प्रिंटींग ब्युरो खटाववाडी, मुंबई-4, 1967, पृ-162.

114) घनश्याम होलकर; महाराजा यशवंतराव होळकर, नेशन प्रेस, ओल्डनं-38; न्युनं-6, मॅनिकोलस रोङ चेटपेट चेन्नई,31,2018, पृ-97.

115) न. र. फाटक; मराठेशाही अखेरचा अद्वितीय स्वातंत्र्यवीर श्रीमन्महाराज यशवंतराव होळकर, वि.पु. भागवत मौजे प्रिंटींग ब्युरो खटाववाडी, मुंबई-4, 1967, पृ-140.

116) कित्ता, पृ-142.

117) रघुबीरसिंह (संपा); वाकई होल्कर, प्रकाशन. स्कीन 57. मिश्रा- राजाजीका रास्ता जयपूर, 01, 1998. पृ-63.

118) कर्नल जेम्स टॉड; राजस्थान का इतिहास भाग-1 साहित्य सागर, धामाणी मार्केट की गली, चौडा रास्ता, जयपूर, 2008, पृ-304.

119) घनश्याम होलकर; महाराजा यशवंतराव होळकर, नेशन प्रेस, ओल्डनं-38; न्युनं-6, मॅनिकोलस रोङ चेटपेट चेन्नई,31,2018, पृ-25.

120) डॉ. गणेश मतकर; सांस्कृतीक इतिहास आणि होळकर राज्य, प्रकाशन नविन फोटो कॉपी शिव विलास पॅलेस राजवाडा परिसर इंदोर, 1999, पृ-68.

121) मधुसुदनराव होलकर; होलकरों का इतिहास प्रकाशन न्युज्ञान प्रेस 495. डी.डी.ए. कॉम्पलेक्स शहजादा बाग इंद्रलोक दिल्ली -35, 1992. पृ-365.

122) प्रा.डॉ. राम इंगळे; होळकर शाहीचा संस्थापक, विश्वभारती प्रकाशन, सीताबर्डी नागपूर-12,1992, पृ-87.

123) रघुबीरसिंह (संपा); वाकई होल्कर, प्रकाशन. स्कीन 57. मिश्रा- राजाजीका रास्ता जयपूर, 01, 1998. पृ-158.

124) घनश्याम होलकर; महाराजा यशवंतराव होळकर, नेशन प्रेस, ओल्डनं-38; न्युनं-6, मॅनिकोलस रोड, चेटपेट चेन्नई,31,2018,पृ-25.

125) कित्ता, पृ-25.

126) डॉ. गणेश मतकर; सांस्कृतीक इतिहास आणि होळकर राज्य, प्रकाशन नविन फोटो कॉपी शिव विलास पॅलेस राजवाडा परिसर इंदौर, 1999, पृ-68.

127) मधुसुदनराव होलकर; होलकरों का इतिहास प्रकाशन न्युज्ञान प्रेस 495. डी.डी.ए. कॉम्पलेक्स शहजादा बाग इंद्रलोक दिल्ली -35, 1992. पृ-365.

128) रघुबीरसिंह (संपा); वाकई होल्कर, प्रकाशन. स्कीन 57. मिश्रा- राजाजीका रास्ता जयपूर, 01, 1998. पृ-158.

129) घनश्याम होलकर; महाराजा यशवंतराव होळकर, नेशन प्रेस, ओल्डनं-38; न्युनं 6, मॅनिकोलस रोड, चेटपेट चेन्नई,31,2018, पृ-43.

130) अनिल मिसाळ; रणझुंजार महाराजा यशवंतराव होळकर, ज्ञानकुंज प्रकाशन मिलींद निवास, विद्यानगर, जत, जि. सांगली 2016, पृ-16.

131) बालाजी जनार्धन; नाना फडणवीस पृ-290.

132) न.र. फाटक; मराठेशाही अखेरचा अद्वितीय स्वातंत्र्यवीर श्रीमन्महाराज यशवंतराव होळकर, वि.पु. भागवत मौजे प्रिंटींग ब्युरो खटाववाडी, मुंबई-4, 1967,पृ-152.

133) घनश्याम होलकर; महाराजा यशवंतराव होळकर, नेशन प्रेस, ओल्डनं-38; न्युनं-6, मॅनिकोलस रोङ चेटपेट चेन्नई,31,2018, पृ-92.

134) कित्ता, पृ-65.

135) अजीज रशीद तडवी; आदीवासी भिल्ल समाज एवं संस्कृती पृ-37.

136) कित्ता, पृ-370.

137) घनश्याम होलकर; महाराजा यशवंतराव होळकर, नेशन प्रेस, ओल्ड नं-38 न्यु 6, मॅनिकोलस रोड. चेटपेट चेन्नई, 3, 2018, पृ-49.

138) कित्ता, पृ-49.

139) कित्ता, पृ-53.

140) गो.स. सरदेसाई; मराठों का नवीन इतिहास Vol-II, फोनिक्स प्रकाशन बेन हाम हॉल लेन, गिरगांव बॉम्बे, -4,1968, पृ-458.

141) कित्ता, पृ-458.

142) घनश्याम होलकर; महाराजा यशवंतराव होळकर, नेशन प्रेस, ओल्डनं-38; न्युनं 6, मॅनिकोलस रोङ चेटपेट चेन्नई,31,2018, पृ-182.

143) कित्ता, पृ-182.

144) बंडे शारदा गोविंदराव; मराठेकालीन होळकर संस्थान, कल्पना प्रकाशन 6, एच.आय जी. आय ही आय जवळ नांदेड, 02, पृ-244.

145) गो.स. सरदेसाई; मराठों का नवीन इतिहास, शिवकाल अग्रवाल ॲन्ड कंपनी प्रा.लि. दुर्गा प्रिंटीग वर्क्स आगरा, 1964, पृ-458.

146) घनश्याम होलकर; महाराजा यशवंतराव होळकर, नेशन प्रेस, ओल्डनं-38; न्युनं 6, मॅनिकोलस रोड चेटपेट चेन्नई,31,2018, पृ-185.

147) कित्ता, पृ-186.

148) न. र. फाटक; मराठेशाही अखेरचा अद्वितीय स्वातंत्र्यवीर श्रीमन्महाराज यशवंतराव होळकर, वि.पु. भागवत मौजे प्रिंटींग ब्युरो खटाववाडी, मुंबई-4, 1967,पृ-92.

149) बंडे शारदा गोविंदराव; मराठेकालीन होळकर संस्थान, कल्पना प्रकाशन ६, एच.आय.जी. आय.टी. आय जवळ नांदेड-02, 2009, पृ-244.

150) डॉ. सुमन वैद्य; आखेरचा पेशवा, प्रगती प्रकाशन, 87 अ धंतोली नागपूर-12, 1994 पृ-81.

151) डॉ. गणेश मतकर; वीरश्रेष्ठ प्रथम यशवंतराव होळकर, नवीन फोटोकॉपी शिव विलास पॅलेस राजवाडा परिसर इंदौर, 1999 पृ-47.

152) डॉ. गणेश मतकर; सांस्कृतीक इतिहास आणि होळकर राज्य, प्रकाशन नविन फोटो कॉपी शिव विलास पॅलेस राजवाडा परिसर इंदौर, 1999, पृ-68.

## प्रकरण चौथे

## यशवंतराव होळकर यांची रणनिती व लढाई विषयी धोरण

---

4.1 प्रस्तावना

4.2 युध्द म्हणजे काय

4.3 युध्दाची व्याख्या

4.4 युध्दाचे स्वरुप

4.5 युध्दाची व्याप्ती

4.6 युध्दजन्य परिस्थती

4.7 युध्दातील भूमिका

4.8 यशवंतराव होळकर यांची युध्दविषयक भूमिका

4.9 यशवंतराव होळकर यांची युध्दविषयक रणनिती

4.10 यशवंतरावांचे युध्दविषयक आक्रमक धोरण

4.11 यशवंतरावांची युध्दविषयक प्रत्यक्ष कारवाई

4.12 यशवंतरावांची लष्करी छावणी

4.13 यशवंतरावांचे गुप्तहेर खाते

4.14 यशवंतरावांची लष्करी साधन सामग्री व पुरवठा व्यवस्था

4.15 यशवंतरावांचा गनिमीकावा युध्दतंत्र

संदर्भ सूची

## प्रकरण चौथे

## यशवंतराव होळकर यांची रणनिती व लढाई विषयी धोरण

### 4.1 प्रस्तावना :-

यशवंतराव होळकर यांच्या युध्दविषयक धोरणाचा अभ्यास करताना असे लक्षात येते की, युध्दविषयक धोरणांमध्ये ईस्ट इंडिया कंपनीच्या नावाखाली इंग्रजांनी भारतात आपले अस्तित्व निर्माण करण्यासाठी ज्या काही धोरणांचा, नीतींचा उपयोग केला. भारतातील वेगवेगळ्या संस्थानिकांना आपल्या नियंत्रणाखाली आणत गेले. त्याला अनुसरुन एकंदरित परिस्थिती पाहुन यशवंतराव होळकरांनी त्या कालखंडात इंग्रजांच्या विरुध्द आपली युध्दविषयक धोरणे अवलंबविताना दिसुन येतात. यशवंतरावांची युध्दाविषयी भूमिका परिस्थिती, रणनिती, आक्रमण, प्रत्यक्षकारवाई, लष्करा बद्दलच्या छावण्या, त्यांचे गुप्तहेर खाते, लष्करी साधन सामग्री व वितरण व्यवस्था, युध्दविषयक युध्दतंत्र इत्यादी घटकांचा अभ्यास करावा लागणार आहे. युध्दविषयक धोरणांचा अभ्यास करताना प्रथम युध्द म्हणजे काय? त्याची व्याख्या, स्वरुप, व्याप्ती या घटकांच्या संकल्पना स्पष्ट कराव्या लागतात.

### 4.2 युध्द म्हणजे काय :-

ज्या ज्या वेळी मानवी संस्कृती आणि समाजाचे पतन होत गेले त्या त्या वेळी युध्दानेच विज्ञानाला जिवंत ठेवून तंत्रज्ञानाचा विकास घडवून आणलेला आहे.[1] जो पर्यंत संघर्षाची वृत्ती आणि युध्द प्रवृत्ती निसर्गत: जोपासली जाते. त्यामुळे प्रत्येकाने युध्दविद्या, युध्दविज्ञान जाणून घेणे किंवा आत्मसात करणे आवश्यक ठरते. युध्दविद्येला जाणून, समजून, व अनुभव घेतल्या शिवाय युध्दाच्या विज्ञानात प्रगती होऊ शकत नाही. युध्द हे मानवी संस्कृतीचा मुलाधार मानणे क्रम प्राप्त होते. जेंव्हा आदिमानव उदरनिर्वाहासाठी शिकारीवर अवलंबुन होता. त्यावेळी त्याची सर्व अस्त्र, शस्त्रे, ही फेकुन मारण्याची होती. ती सर्व हत्यारे वायुगणिताच्या शस्त्रांवर आधारीत होती. यामध्ये प्रामुख्याने शस्त्रे म्हणून दगड, बाण, भाला, टोकदार बांबु इत्यादींचा समावेश होता.

तुम्हास शांती पाहिजे असेल तर युध्दाला समजुन घेण आवश्यक आहे.[2] लष्करी विचारवंत लिडील हार्ट यांच्या मते त्यांनी केलेल्या या मानवी स्वभावाचा परिपाक आहे. जो पर्यंत मानव युध्दाला

समजुन घेत नाही तो पर्यंत त्यास शांततेची व्याख्या मांडता येणार नाही. युध्द हे मग आर्थिक, सामाजिक, राजकीय, सांस्कृतिक अशा कोणत्याही प्रकारचे असले तरी ते अगोदर समजुन घ्यावे लागते. यावरुनच मानवाला त्यावर उपाय योजना करता येतात. युध्दाला समजुन घेतल्यावरच पुढील ध्येय धोरणे जे शांततेच्या दृष्टीने अंमलात आणता येतील. त्याशिवाय शांतता प्रस्थापित करता येणार नाही. मानवी सभ्यता आणि संस्कृतीचा विकास युध्दाशी निगडीत आहे. समाजाचे अस्तित्व किंवा विकास युध्दामुळेच नियंत्रीत होत आहे.[3] कोणत्याही कालखंडाचा अभ्यास केला असता असे लक्षात येते की, मानवी सभ्यता आणि संस्कृतीचा एखाद्या कालखंडात विकास झाला असेल ती सभ्यता आणि संस्कृती दुसऱ्या मानवी समुहावर बळजबरीने लादण्याचा प्रयत्न केला तर त्याला युध्दाच्या माध्यमातूनच थोपविण्यात येते किंवा नियंत्रित केले जाते. कोणताही कालखंड असा नाही की ज्या कालखंडामध्ये मानवी इतिहासात युध्दे झालेली नाहीत.[4] युध्द हे त्या त्या कालखंडामध्ये पारंपारिक शस्त्रास्त्रानुसार युध्द झालेली दिसतील. युध्द हे मानवाच्या प्रगती मध्ये प्राचीन कालखंडा पासून होताना दिसतात. मग ते शस्त्रास्त्रे प्राचीन कालखंडातील असो की, मध्ययुगीन काळातील शस्त्रे असोत या शस्त्राद्वारे मानवी समुहा मध्ये युध्द होताना दिसतात. कालखंड कोणताही असो युध्दाची कारणे जरी वेगवेगळी असली तरी मानवामध्ये युध्द हे झालेली आपल्याला पहावयास मिळतात. युध्द म्हणजे झुंज आहे ते नैतिक आणि शारीरिक शक्तीच्या माध्यमातून कसोटी व नैतिक शक्तिला वगळून चालत नाही.[5] युध्द ही संकल्पना आपण पहात असताना युध्दाची दिशा, दृष्टी, ध्येय, प्राप्ती, स्वरुप, व्याप्ती इत्यादीचा अभ्यास करावा लागतो. युध्द हे दोन मानवी समुहामध्ये किंवा प्राण्यांमध्ये झालेली झुंज, ही युध्दाच्या संकल्पनेत मोडते. या झुंझीमध्ये हिंसे बरोबरच युध्दाच्या नैतिकतेचा विचार असतो. युध्द हे कशा प्रकारे कुठे, कधी, कशाने, नियम अशा प्रकारच्या नैतिकेतून लढले जाते. त्यात मर्यादा असतात. दोघांमध्ये चाललेल्या हिंसेमधुन संघर्षातून शक्तिशाली असणारा या युध्दात विजय संपादन करतो. संरक्षण व युध्दकरणे या कार्याचे अधिष्ठाण पुढील सिंध्दांतावर आहे.[6] "धर्म्यांदि युध्दाचे व्यत्क्षत्रियस्य विधाते" क्षत्रियाला धर्मयुध्दा शिवाय दुसरे कल्याण प्रद काही नाही. तसेच भारतीय राजकारणात साम, दाम, भेद व दंड हे चार उपाय सांगितले आहेत. त्यातील साम म्हणजे शत्रुशी शांततेचा तह हा पहिला उपाय, शत्रुला संपत्ती देऊन शांतठेवणे हा दुसरा उपाय, शत्रुच्या राज्यात भेद म्हणजे फाटाफुट करुन पहिल्या ऐवजी दुसरा, दुसरा ऐवजी तिसरा फसला तर अखेरीचा उपाय "दंड" म्हणजे युध्द होय. युध्द हे अशा रितीने कर्तव्य म्हणून प्राप्त झालेली ते श्रेयस्कर (पवित्र) कार्य ठरते.

### 4.3 युध्दाची व्याख्या :-

1) क्लाऊत्से विज याने युध्दाची व्याख्या स्पष्ट केली आहे.[7] प्रतिस्पर्ध्याला आपली इच्छा मान्य करण्यास भाग पाडण्यासाठी बळाचा वापर करुन केलेली कृती म्हणजे युध्द होय"
2) ब्रिटानिका विश्वकोश[8] :- परस्परविरोधी धोरण असलेल्या दोन मानवीय गटांमध्ये संघटीत शक्तीचा उपयोग करुन एका गटाने आपले धोरण दुसऱ्या गटावर लादण्याच्या प्रयत्नास युध्द संबोधले आहे.
3) कौटील्याच्या मते[9] :- राज्य विस्तारासाठी व राज्याचे संरक्षण करण्यासाठी आवश्यकता असेल तेव्हा पाहिजे त्या युध्द पध्दतीचा वापर केला पाहिजे.
4) मॅलिनोवस्कीच्या मते[10] :- आपापल्या धोरणांचे आचरण करताना उत्पन्न होणाऱ्या विवादास जे दोन स्वतंत्र राजकीय घटकांच्या संघटीत सैनिक शक्तीच्या माध्यमातून कार्यान्वित होतो. त्याला युध्द महणतात.
5) माओ-त्से-तुंग च्या मते[11] :- विरोधकांना संपविण्यासाठी सर्वोच्च संघर्ष केला जातो त्यास युध्द असे म्हणतात.

### 4.4 युध्दाचे स्वरुप :-

युध्दाचा विस्तार व्याप्ती व त्यामध्ये उपयोगात येणारी सैनिकी शक्ती व शस्त्रास्त्रे इत्यादी वरुन युध्दाचे स्वरुप निश्चित करता येते. युध्दाच्या विकासाचा इतिहास हा अतिशय प्राचीन असला तरी अति प्राचीन कालखंडात ही युध्द झाल्याचे संदर्भ आढळून येतात. परंतु त्या कालखंडातील युध्दाचे ऐतिहासिक क्षेत्रातील स्थान स्वरुपाविषयी अनेक मतभेद आहेत. ऐतिहासिक साधनांद्वारे अलीकडच्या काळामध्ये जहागिरदारीचा युध्दकाळ, राजवंशीय युध्दकाळ, लोकतंत्रीय युध्दकाळ, आणि संपूर्ण युध्दकाळातील युध्दाचे स्वरुप हे वेगवेगळया पध्दतीने दिसुन येतात. सावलीचे महत्व उन्हाशिवाय किंवा प्रकाशाची आवश्यकता अंधाराशिवाय स्पष्ट होत नाही तद्वच खरी शांतता म्हणजे काय? हे समजून घेतल्याशिवाय युध्दाचे स्वरुप लक्षात येत नाही.[12] युध्दाचे स्वरुप कोणत्या पध्दतीचे आहे ते कशा प्रकारे मानवी स्वभावावर व युध्दाच्या रणांगणावर सैनिकांच्या मनोर्धेर्यावर परिणाम करणारे आहे ते लढले गेलेल्या युध्दाच्या स्वरुपावरुन कळुन येते. त्यावेळीच युध्दाची दाहकता लक्षात येते. त्यामुळे युध्दाचे स्वरुप लक्षात आल्यास युध्दाची विध्वंसकता, गतिमानता, युध्द नेतृत्व इत्यादी समजुन घेतल्याशिवाय युध्द काय आहे, कसे आहे? त्याचे परिणाम युध्दात लढणाऱ्या सैनिकांसह

त्या भागातील विविध घटकांना याचा परिणाम भोगावा लागतो. त्यामुळे युध्दाचे महत्व हे त्याच्या स्वरुपावर अवलंबून असते. त्याचबरोबर इ.स. 1789 ते 1914 या कालखंडात मात्र युध्दाचे स्वरुप हे लोकतंत्रीय पध्दतीचे होते असे आपल्याला दिसुन येईल.

मानवी स्वभावाच्या अभ्यासासाठी युध्दाच्या स्वरुपाचे वातावरणाचे ज्ञान असणे आवश्यक समजले जाते.[13] ज्या मध्ये तो जन्म घेतो व त्या पासून प्रभावीत होतो. तेव्हा अशा प्रकारे युध्दाचे स्वरुप समजून घेण्यासाठी त्याच प्रकारच्या वातावरणाचा अभ्यास करणे आवश्यक असते. ज्या मध्ये युध्द लढले जातात. वेगवेगळया प्रकारच्या सिध्दांतांना एकत्रित केल्याने युध्दाचे वातावरण तयार होते या सिध्दांताचे महत्व अशा वेळी समजून येते, ज्या वेळी शत्रुचा विजय हा पराभवामध्ये बदलला जातो आणि पराभूत झालेले सैन्य विजयोत्सव साजरा करतो हे सर्व युध्दाच्या स्वरुपावर अवलंबून असते. त्यासाठी त्याचे ज्ञान असणे आवश्यक आहे.

### 4.5 युध्दाची व्याप्ती :-

युध्द हे संघटीतपणे करावयाचे कार्य असल्यामुळे युध्दामध्ये समाजातील सर्व विविध प्रकारचे घटक समाविष्ट असतात.[14] या कार्यवाहीत वेगवेगळ्या प्रकारच्या कलेचा, नीतीचा, कौशल्याचा व उच्च प्रतिच्या बुध्दीमत्तेचा संबंध येतो. त्यामुळे संस्कृतीच्या विकासाची वेगवेगळी लक्षणे दिसुन येतात. यामध्ये युध्दाच्या स्वरुपाचाही समावेश करण्यात आलेला आहे. ज्या ठिकाणी युध्द नाही त्या ठिकाणी संस्कृतीचे दर्शन होत नाही. युध्दामध्ये वेगवेगळया प्रकारच्या रणांगणात युध्दकौशल्यांची, शस्त्रांची, रणनीती, मनोर्धेर्य, गतिमानता, युध्द नेतृत्व, शक्ती, यंत्रांची आवश्यकता असते. युध्द आणि संरक्षणाचा घनिष्ठ संबंध पाहिल्यास संरक्षणाशी संबंधीत सर्व घटकांचा अभ्यास युध्दा मध्ये अपेक्षित आहे. पर्यायाने युध्दाच्या व्याप्ती मध्ये मोठ्या प्रमाणात वाढ होताना दिसून येते. विंस्टन चर्चिल यांनी या संदर्भात स्पष्ट केले की, मानवी सभ्यतेचा इतिहास हा युध्दांचा इतिहास आहे.

इतिहासपूर्व काळात सुध्दा हिंसात्मक संघर्षाचे अस्तित्व व्यापक आणि न संपणारे होते.[15] जो पर्यंत पृथ्वीतलावर मानवी सभ्यतेचा पगडा आहे तो पर्यंत युध्दाचे अस्तित्व नाहीसे होणे अशक्य आहे. विज्ञान व तंत्रज्ञानाच्या विकासामुळे जलद गतीची होणारी शस्त्रस्पर्धा, शांतता मोहीम, सत्तेचे संतुलन, राजकीय वर्चस्वाच्या कल्पना, आर्थिक विकास इत्यादी घटकांमुळे युध्दाची व्याप्ती वाढत्या स्वरुपाची आहे.

निसर्ग नियम जेवढे विस्तृत तेवढेच गहन शाश्वत आणि कठीण आहेत.[16] मानवी सभ्यतेच्या इतिहासाचा जर आपण पडताळा पाहिल्यानंतर युध्दाची व्याप्ती आणि या युध्दाच्या स्वरुपाची कल्पना आपल्याला दिसुन येते. पृथ्वीतलावर मानवाच्या जीवनाला प्रारंभ झाला त्यावेळी जन्मास आलेल्या प्राण्यांच्या मृत्यूची निश्‍चिती झालेली आपल्याला पहावयास मिळते. जन्म आणि मृत्यूच्या दरम्यान जी संघर्षमय आयुष्याची वाटचाल चालू झाली त्या वाटचालीचे पुढील रौद्ररुपाचे रुपांतर युध्दात झालेले दिसुन येते. जो पर्यंत पृथ्वीतलावर प्रकृती आणि मानवाचे आस्तित्व आहे. तोपर्यंत कोणत्याना कोणत्या स्वरुपात युध्दे हे चालु राहताना दिसुन येतील. त्यामुळे युध्द हे एक सामाजिक सत्य आहे असे पहावयास मिळते.

## 4.6 युध्दजन्य परिस्थिती :-

यूवा यशवंतराव होळकर यांची कल्पना शक्ती युध्दाच्या बाबतीतील डावपेच, सैनिकांना प्रोत्साहन, अचानकपणे प्रचंड हल्ला करुन शत्रुसैन्याला आश्चर्याचा धक्का देणाऱ्या वैशिष्टयांचे वर्णन इतिहासकार करतात.[17] यशवंतराव होळकर यांची युध्दा विषयी असणारे प्रेम युध्दात स्वत:ला झोकून देऊन शत्रु सैन्यात घुसून युध्द लढणे. त्यांच्याकडे असणारी युध्दातील डावपेचां विषयी अनुभव आपल्या सैनिकांचे मनोधैर्य वाढविण्यासाठी स्वत: रणांगणावर उपस्थित राहुन सैनिकांना मार्गदर्शन करणे मराठेशाहीच्या उत्तर कालखंडात उत्तरेकडील मैदानी प्रदेशात गनिमीकाव्याचा वापर हा घोडदळाच्या माध्यमातून करण्याचा यशवंतराव होळकर हे पहिले मराठा सरदार असतील ज्यांनी गनिमी काव्याची पध्दत ही मैदानी प्रदेशात स्वत: शत्रु सैन्याच्या विरुध्द वापरताना दिसतात.

पाऊस, वादळ, पाणी, चिखल, नद्या आणि नाले ही सगळी प्रक्षुब्ध झालेल्या सृष्टी देवतेची सैन्ये यावेळी होळकरांच्या बाजूने आणि इंग्रजांच्या विरुध्द लढण्या करिता उभी राहिलेली होती.[18] अशा प्रकारच्या युध्दजन्य परिस्थिती मध्ये यशवंतराव होळकर आणि त्यांचे सैनिकांना या परिस्थितीची जाणीव प्रत्येक वेळी युध्दात झालेली आहे. सृष्टी देवतेची पूजा करुनच यशवंतरावांचे सैन्य युध्दात समरस होवून शत्रुच्या सैन्यावर तुडून पडत. ध्येयाने प्रेरित झालेल्या यशवंतरावांना निसर्गाने सुध्दा सहकार्य केलेले दिसुन येते. यशवंतरावां सारखा युध्द नेतृत्व करणाऱ्या मराठा सरदाराला भौगोलिक नैसर्गीक घटकांचा अभ्यास त्यांच्या सततच्या घोडदौडीने त्यांना माहीत होत होता. त्यामुळे सैन्यावर नैसर्गीक संकटे येत असताना सुध्दा त्यांचा युध्दामध्ये विजय पदस्पर्श करीत

होता. संपूर्ण देशात इंग्रजां विरुध्द युध्द निरंतर शेकडो मैलांच्या यात्रेमुळे त्यांच्या घोड्यांच्या पायांचे खुर घासून गेले होते.[19] यशवंतराव होळकर इंग्रजांना या देशातून हाकलून लावण्यासाठी रात्रंदिवस शेकडो मैलांचा प्रदेश तुडवीत विना विश्राम करता घोड्याच्या पाठीवर बसुन घोडदौड करत करत त्यांचे सैनिकही थकले होते. घोड्याच्या पाठीवर असणारी खाल ही फाटत चालली होती. काही वेळा त्यांना जंगल प्रदेश, नदी, नाले या मार्गातून जावे लागत. ग्रीष्म काळ, वर्षाकाळ, शरदऋतु हे युध्दाच्या क्षेत्रामध्ये निघुन जायचे तरीही यशवंतराव होळकर सातत्याने इंग्रजांच्या विरुध्द संघर्ष करीत राहिलेले दिसुन येतात. संपूर्ण भारतात घोड्यावरची रपेट सातत्याने करत युध्दाची परिस्थिती असल्या कारणाने यशवंतरावांची ही मेहनत, जिद्द, चिकाटी सैनिकांना प्रोत्साहन देत अशा युध्दाजन्य परिस्थिती मध्ये त्यांचे कार्य चालत असे.

## 4.7 **युध्दातील भूमिका :-**

कोणत्याही राष्ट्राच्या इतिहासाचा अभ्यास करताना प्रथमत: त्या राष्ट्रातील लष्करी सामर्थ्याकडे व लष्करी पराक्रमाकडे लक्ष जावे हे साहजिकच आले.[20] कारण राज्ये मिळविण्याच्या किंवा राखण्याच्या कामी जी साधने उपयोगी पडतात त्यात लष्करी सामर्थ्याचा दर्जा हा नि:संशय पहाण्यात येतो. एखाद्या राष्ट्राच्या किंवा राज्याच्या संरक्षणाची सिध्दता काय आहे ही त्या राष्ट्राच्या लष्करी सामर्थ्यावर अवलंबुन असते. त्या राष्ट्राचा लष्करी विकास, वैभव, गौरवशाली इतिहासा मध्ये केलेले लष्करी कार्य, शत्रूराष्ट्रा विरुध्द केलेला पराक्रम त्याच्या आधारावरच त्या राष्ट्राच्या सामर्थ्याचा दर्जा, अस्तित्व, प्रभावा मधुनच त्या राष्ट्राची युध्दाविषयी असणारी भूमिका ही कशा प्रकारची आहे हे लक्षात येते. जेणेकरुन शत्रुच्या विरुध्द करण्यात येणाऱ्या कारवाईवर त्याची भूमिका अवलंबून असते. पेशव्यांच्या कालखंडा मध्ये अशाच प्रकारे मराठेशाहीसाठी अनेक सरदारांनी आपल्या बलिदान, त्यागावर मराठेशाहीचे अस्तित्व निर्माण केले व विस्तारीत स्वरुपामध्ये करण्यासाठी मराठा सरदारांचे योगदान त्या कालखंडात महत्वाचे मानले जाते. एखाद्या मोहिमेवर जाण्यासाठी करावी लागणारी तयारी त्यांचे मनोर्धेर्य मराठेशाहीसाठी देण्यात येणारे बलिदान, त्याग, साहस घरापासून दूर अंतरावर जाऊन त्या त्या परिस्थिती मध्ये स्वत:ला सामावून घेणे व शत्रु सैन्यावर चाल करुन जाणे यासाठी त्यांची असणारी युध्दाविषयी भूमिका ही महत्वाची मानली जाते. ग्रँट डफ लिहितो. मराठ्यांचे सामान म्हटले म्हणजे.[21] थोडीशी कांदा, भाकरी व एक घोंगडी एवढेच काय ते असे. रात्रीच्या वेळी कोठे उतरले तर घोड्याचे लगाम हातात धरुन घोंगडी पसरवून त्यावर काही वेळ अंगटाकून राहत

त्याच प्रमाणे दिवसा दोन प्रहरी काही खाण्याकरिता किंवा ऊन टाळण्या करिता उतरले म्हणजे पाच-पाच, सहा सहा जण एखादे झाड-झुडूप असेल तर त्याच्या खाली उतरत पण उघडे मैदान असेल तर जमिनीत भाला रोवून त्याला आपला घोडा बांधून भाल्याच्या टोका वरुन एखादी घोंगडी पसरवून देत व भर उन्हात डोके छोटयाशा छायेखाली ठेवून घोरत पडलेले असत. पण तलवारीस मात्र कधीच विसरत नसत ती कुशीशी ठेवीत त्यांच्या जवळ लहान, खुजी, चपळ काटक तट्टे असत. मिळालेली लुट त्यावर लादुन जलद गतीने लांबवीत फौज सुटसुटीत असल्यामुळे मिजासी व काही अशी बेकैद अशा बादशहाच्या फौजेस तिचा पाठलाग करणे कठीण पडे कधी गाठ पडून पराभव झाला तर नुकसान ते किती होणार.

सैनिकांचे युध्दावर जाण्यासाठी कूच करणे.[22] सरदारांना आदल्या दिवशी चिठ्ठ्या पाठवून युध्दावर जाण्यासाठी कुच करण्याचा आदेश कळविण्यात येत व रात्री सैन्यामध्ये दवंडी पिटून सर्वांना तो जाहीर करत. दुसऱ्यादिवशी पहाटे चार वाजता मोठी नौबत वाजते व सर्वांना सूचना मिळते. थोड्या वेळाने दुसऱ्याने नौबत झडताच बिनीवाला पेशव्याचे निशाण घेऊन पथकास दुसऱ्या पथकांचे सहकार्य मिळते बिनीच्या पथका बरोबर सरदारांच्या बिनीही बाहेर पडतात व त्यांच्या बरोबर लष्कराचा बाजार, बाजे लोक (वाद्य वाजविणारे) प्यादे, तोफखाना व बहिर बाजार बुणगे मुक्काम हालवितात. पेशव्यांचा बिनीवाला पुढे जाऊन पाण्याची सोय पाहून निशाण रोवून नवीन मुक्कामाची जागा कायम करतो. त्याच्या पाठोपाठ बाजारबुणगे येऊन पोहोचतात, पेशव्यांच्या ढालाच्या रोखाने प्रत्येक सरदार आपले डेरे, तंबु उभारतो प्रत्येक सरदाराने मुख्याच्या डाव्या किंवा उजव्या बाजूस आपल्या दर्जा प्रमाणे ठराविक अंतरावर डेरे द्यावे हे ठरलेले असते व प्रत्येक जण आपल्या माना प्रमाणे आपला मुक्काम जागा कुठे असावी हे ठरलेले असते, नदीकाठी उताराच्या ठिकाणावर मुक्काम झाल्यास दोन्ही तीरांवर फौजा उतरुन आघाडी व पिछाडीकडे पसरलेल्या असतात. उजवी किंवा डावी बाजू सांभाळली जात आहे किंवा नाही तिकडे सर्वांचे लक्ष असते.

जोन्स लिहितात मराठे ज्यावेळी कुच करतात त्यावेळी त्यांच्या फौजा या टोळया टोळयांनी निघतात.[23] सैन्य ज्यावेळी कुच करते तेव्हा वाटेमध्ये दोन्ही बाजूंनी शेतात पिके असतात त्यावेळी शेताच्या कुंपनामधील चिंचोळया रस्त्यातून जात असताना जणुकाही स्वार, पायदळ बुणगे, यांचा लोंढाच जमिनीवरुन कित्येक मैलपर्यंत वाहत आहे असा भास होतो. या घोळक्या मध्ये स्वार हे निशाणे, नौबत घेतलेले सैनिक ही दृष्टीस पडतात. पराभव किंवा शरणागतीने मोहिमेचा शेवट होत

असे.[24] मराठे हे सुसंस्कृत असल्याने त्यांचे सैन्य, सेनापती, हे जाळपोळ, लुटालुट, कत्तल ही नाराजीने किंवा अपरिहार्य म्हणून करत. शत्रुच्या सैन्याशी उदारपणाणे वागत असत. खंडणीची जमा केलेली राशी ही ज्यामध्ये जडजवाहीर, पैसा हा रोख घेत. परंतु एखादा प्रदेश असेल तर तो प्रदेश कराराने बांधुन घेत त्याच बरोबर युध्दात पराक्रम गाजवणाऱ्या सैनिकांचा गौरव, सन्मान करुन बक्षिस देण्याची प्रथा होती.

## 4.8 यशवंतराव होळकर यांची युध्दविषयक भूमिका :-

एखाद्या राज्या विरुध्द किंवा शत्रु सैन्या विरुध्द आपण कोणते युध्द क्षेत्र स्वीकारावे आणि शत्रुला कोणत्या ठिकाणी आणुन खड्डयात घालावे.[25] हे आगाऊ धोरण ठरवून यशवंतराव त्या प्रमाणे आपल्याला पाहिजे तशा प्रकारच्या हालचाली करण्यास शत्रुला भाग पाडणे यालाच युध्द शास्त्रातील फार नैपुण्य लागते. यशवंतराव होळकर यांच्यावर वेलस्लीने ज्यावेळी तीन्ही बाजूने हल्ला करण्याचे ठरविले त्यावेळी कॅप्टन मरे हा गुजरातहुन येत होता. तर कर्नल मॉन्सन जनरल लेकच्या नेतृत्वाखाली वेल्सलीने यशवंतराव होळकर यांना पराभूत करण्यासाठी पाठवले होते. परंतु यशवंतरावांच्या युध्द व्यूहरचनेत जनरल लेक व कॅप्टन मरे अडकले होते परंतु यशवंतरावांनी कर्नल मॉन्सन हा मुकूंदराखिंडी कडे येत आहे. ते पहाता त्याला या खिंडी मध्ये येऊ दिले. याला रोखण्यासाठी यशवंतरावांनी गणपतराव चिमनाभाऊ, कुशवाह बक्षी यांना चंबळनदी शेजारी २५००० घोडेस्वार आणि चाळीस जहाजांच्या बरोबर पाठवले होते. यशवंतरावांना त्यांच्या गुप्तहेरांकरवी मॉन्सनची इत्यंभूत माहिती मिळत होती. यशवंतरावांनी मुकूंदराखिंडी मधोमध मॉन्सन आल्यावर हल्ला केला. यशवंतरावांचे धोरण हे शत्रुला कोणत्या ठिकाणी आणून कोंडीत पकडावे, मॉन्सनच्या हालचालीवर लक्ष ठेवून आपली युध्दनीती कशा प्रकारची असेल याविषयी तयारी करणे इत्यादी विषयी यशवंतरावांची युध्दा विषयीची भूमिका स्पष्टपणे दिसुन येते.

यशवंतराव होळकर यांनी मार्किविस वेलेस्ली यास लिहीलेल्या पत्रात असे म्हणतात की.[26] इंग्रजांच्या तोफखान्याला समोरा समोरुन तोंड देण्याला जरी मी असमर्थ असलो तरी हजारो मैलांचा प्रदेश बेचिराख करीन आणि समुद्रात जशा एका मागुन एक लाटा येऊन आदळतात त्या प्रमाणे माझे सैन्य लक्षावधी लोकांवर जाऊन आदळेल आणि त्यामुळे होणाऱ्या हानीला मर्यादा रहाणार नाही इंग्रजांच्या विरुध्द यशवंतराव होळकरांना लढताना माहित होते की शस्त्रास्त्र व तोफखान्याच्या बाबतीत

जरी मी कमकुवत असलो तरी घोडदळाच्या बळावर इंग्रजांना पराभूत करण्याची माझ्या सैन्यामध्ये शक्ती आहे अशा प्रकारची मानसिकता, आत्मविश्वास, मनोर्धर्य हे उच्चप्रतीचे यशवंतरावांचे राहिलेले दिसुन येते. उत्तर भारतात इंग्रजांना सातत्याने पराभव स्वीकारावा लागला त्याचे कारण यशवंतरावांनी इंग्रजांचा पाठलाग करत त्यांना सळो की पळो करुन सोडले होते. इंग्रज या काळात एका मागुन एक पराभव स्वीकारत हताश झालेले दिसुन येतात. त्यामुळे इंग्रजांची युध्दनीती व यशवंतरावांच्या विरुध्द चालवलेल्या युध्द मोहीमेला प्रत्युत्तर म्हणून वेलस्लीला यशवंतरावांनी पत्राद्वारे आपले युध्दाविषयीची भूमिका स्पष्ट केलेली दिसते.

जेव्हा हिंग्लाजगडावर इंग्रज सैनिकांनी हल्ला केला. त्यावेळी यशवंतराव होळकर उपस्थित नव्हते.[27] त्यावेळी हिंग्लाजगडावर श्यामराव महाडिकांचा मुलगा अमृतराव हा हजर होता. परंतु इंग्रजांच्या हल्ल्यामुळे अमृतराव हिंग्लाजगड सोडून गेला होता आणि यशवंतरावांकडे बुंदीला जाऊन पोहोचला. त्यावेळी यशवंतरावांनी अमृतरावाला उद्देशून म्हटले की, शौर्य गाजविणाऱ्या वीरांचे कार्य पाठदाखवून पळुण जाणे हे शोभत नाही. यशवंतराव होळकरांच्या या वक्तव्या वरुन असे लक्षात येते की, योध्दयाने रणांगण सोडून पळून जाणे हे योध्दयाला शोभणारे नाही.[28] आलेल्या प्रसंगाला सामोरे जाणे हे खरे लक्षण त्या योध्दयाचे असते. शत्रुसैन्यावर तुटून पडणे, त्याचा पराभव करणे, युध्दजन्य परिस्थतीत युध्दाला सामोरे जाणे हे खऱ्या योध्दयाचे कार्य असते. अशा प्रकारचे सांगण्याचे काम यशवंतरावांच्या वरिल वाक्या वरुन समजते. यशवंतराव होळकर यांनी आपल्या वरिष्ठ अधिकाऱ्यांना व प्रत्येक सैनिकांना उद्देशून संबोधन केले की.[29] जीवनामध्ये प्रत्येकानी त्यागाची भावना ठेवली पाहिजे. त्याच बरोबर शत्रुच्या प्रत्येक हालचाली वर आपली नजर असने. आवयश्यक आहे. सैनिकांनी, अधिकाऱ्यांनी स्वत:चा आत्मविश्वास हा उच्चप्रतीचा ठेवावा परंतु अतिआत्मविश्वासी होणे ही काही वेळा हानिकारक ठरते. यशवंतरावांना त्या कालखंडात संपूर्ण भारतात घडणाऱ्या इंग्रजांच्या कारवाया तसेच शत्रु सैन्याबद्दल आपण किती जागरुक असायला पाहिजे. शत्रुच्या प्रत्येक कृत्यावर आपली नजर असणे महत्वाचे आहे. अशा प्रकारची दूरदृष्टी वर्तमान परिस्थितीतील अवलोकन करुन युध्दाच्या विषयी किती सजगता आहे हे आपल्याला दिसुन येते.

किल्ल्याचा आश्रय घेऊन लढणे आमचे ब्रीद नव्हे.[30] मराठ्यांची गादी घोड्याच्या पाठीवर यासाठी आम्ही किल्ल्याच्या बाहेर राहुन शत्रुस हैराण करु यशवंतरावाने जाटास बाणेदार उत्तर पाठविले. तळ पाडून, खंदक खंदून लढण्याची मराठ्यांची रीत नव्हती. संथगतीने युध्द लढणे हे त्यांच्या

गुरुने त्यांना कधी शिकवलेलेच नाही त्यांच्या युध्दात प्रचंड गतिमानता असे. शत्रु जर आपल्या माऱ्याच्या टप्प्यात आला की त्याच्यावर गतिमानतेने हल्ला चढवीत. एका हल्ल्यात जितके तुकडे शत्रुचे करता येतील तितके पाडावे. ज्यावेळी शत्रु आपल्या आटोक्यात येण्या सारखा नाही अशावेळी त्या शत्रुपासून फटकुन लांब राहावे. त्याच्या जवळपास घिरट्या घालून त्याची रसद पुरवठा लुटून शत्रुला जेरीस आणावे अशी त्याकाळी युध्दाच्या काळातील युध्दनिती होती. यशवंतराव होळकरांच्या या युध्द व्युहरचनेमुळे शत्रु सैन्य हतबल होत. समोरा समोरची युध्द करण्याची पध्दत त्याकाळी यशवंतरावांची नसली तरी गनिमी काव्याच्या युध्दतंत्राचा वापर करुन शत्रु सैन्याला जेरीस आणत. घोडदळाच्या माध्यमातून यशवंतरावांनी इंग्रजांना हतबल केले होते. किल्ल्याचा आश्रय घेवून लढणे म्हणजे स्वत:ला बंदीस्त करुन घेणे. घोड्याच्या रपेटावर शत्रुवर चाल करुन जाणे शत्रुला परेशान करणे या युध्दतंत्रा विषयी यशवंतराव होळकर यांच्या मध्ये नैपुण्य होते.

## 4.9 यशवंतराव होळकर यांची युध्दविषयक रणनिती :-

रणनिती म्हणजे रणभूमी वरिल डावपेच असे स्थुलमानाने म्हणता येईल.[31] सर्वसाधारणपणे अशा प्रकारचे डावपेच हे एका व्यापक सैनिकी रणनितीचा एकभाग आहे. युध्दमीमांसे मध्ये रणनिती, व्युहतंत्र ही संकल्पना व्यापक अर्थाने मांडलेली असून रणनिती ही त्या व्यापक संकल्पनेचा घटक आहे. रणनितीमध्ये विशिष्ट प्रकारच्या संभाव्य रणक्षेत्रा मध्ये सैन्यांचा, शस्त्रास्त्रांचा व इतर युध्द सामग्रीचा कौशल्यपूर्वक कार्यक्षम व परिणाम कारक उपयोग कशा पध्दतीने करावयाचा याचा विचार करण्यात येतो. संभाव्य युदध क्षेत्राच्या परिसराचा, हवामानाचा आणि आपल्या व शत्रुच्या युध्दसाधन सामग्रीचा व युध्दक्षमतेचा आपल्या हिताच्या दृष्टिकोनातून प्रभावीपणे नियोजन करणे म्हणजे रणनिती होय. रणांगणातील डावपेचांची उद्दिष्टये एका दृष्टीने सनातन आहे.[32] युध्दक्षेत्रातील रणनितीची उद्दिष्टये चढाई, प्रतिकार, युध्दसामग्री व सैनिकांचे एकत्रीकरण, वितरण, दळणवळणाची साधने, शस्त्रास्त्रे इत्यादींचा नेमका उपयोग व अनपेक्षीत हल्लाची किंवा त्याच्या प्रतिकाराची तयारी असते. युध्दाच्या रणभूमीतील रणनिती ही अनेक घटकांवर अवलंबून असते. सैन्याच्या सेनापतीला सोपविण्यात आलेली जबाबदारी, कार्य हे त्या सेनापतीकडे असणारी सैन्य संख्या, शस्त्रास्त्रे, युध्दाला लागणारी युध्द साधन सामग्री त्याच बरोबर संभाव्य युध्दभूमीचे स्वरुप, हवामान, शत्रु सैन्याची शक्ती त्यांची असणारी रचना इत्यादी घटकांची रणनिती आखताना विचारात घ्यावी लागतात. एखाद्या युध्दात ठरविलेल्या रणनिती मध्ये ऐनवेळी काही बदल करावे लागतात. त्यामुळे युध्दभूमी वरिल

रणनिती ही पूर्वनियोजीत असली तरी त्यांची प्रत्यक्ष कार्यवाही करणे ही गुंतागुंतीची ठरते आपल्या सैनिकांचे मनोर्धर्य हे सातत्याने टिकवून ठेवण्यासाठी आपल्या विजया बद्दल खात्री वाटावी याहृष्टीकोनातून रणनितीची ही संकल्पना दृढ करणे आवश्यक ठरते युध्दातील रणनितीच्या यशस्वीतेसाठी आवश्यक ठरतात.

यशवंतराव होळकर हे युध्दकलेतील एक कुशल सेनापती.[33] ज्यावेळी युध्दाला सामोरे जायचे त्यावेळी आपल्या सैन्यदलाचे सुरुवातीला चारपाच वेगवेगळे विभाग करुन वेगवेगळ्या बाजूंनी शत्रुच्या सैन्यावर चालुन जाणे आवश्यक आहे अशी त्यांची युध्दातील रणनिती दिसते. सगळ्यांनी एकाच ठिकाणी कोंढुन घेण्यात आणि एकत्रीत पराभव स्वीकारण्यात काही ही निष्पन्न होणार नाही. सैनिकांचे वेगवेगळे विभाग केल्याने सैनिकांना कुच करुन जाताना रस्त्यामध्ये घोड्यांना चारा, गवत, वैरण, पाणी इत्यादींचा पुरवठा होऊ शकतो. जर एखाद्या दलाचा पराभव युध्दात झाला तरी, दुसऱ्या सैन्यदलांना प्रयत्नांची पराकाष्टा करण्यासाठी अवकाश शिल्लक राहतो. ही युध्दातील आपल्या सैन्याला व घोडदला विषयी असणारी रणनिती मराठेशाहीमध्ये इतर कोणी मराठा सरदारांनी फारसे उपयोगा मध्ये आणलेली नव्हती तेंव्हा यशवंतराव होळकरां सारख्या कुशल सेनापतीने सरदाराने या रणनितीचा उपयोग करुन घेतलेला दिसेल.

यशवंतराव होळकर यांना वास्तविक उत्तरेकडे मथुरा, आग्रा, दिल्ली या शहरावरच चालकरुन जावयाचे होते.[34] यशवंतरावांनी अशी हुल उठविली की गुजरातेतून कॅप्टन मरे हा जो उज्जैनीवर चाल करुन येत आहे त्याच्यावर आपल्याला सगळ्यानिशी जाऊन हल्ला करावयाचा आहे. यशवंतराव होळकर यांनी युध्दकौशल्याचा वापर करुन कॅप्टन मरेला जागच्या जागी थोपवून युध्दनितीचा वापर केलेला दिसुन येतो. ज्या दिशेकडे खरोखरच आपल्याला जायचे असेल त्या दिशेकडची बातमी मुळीच बाहेर फुट न देता जिकडे जावयाचे नाही तिकडची खोटी बातमीची हुल उठवून शत्रुला फसवावयाचे आणि आपला उद्देश सहजासहजी साध्यकरुन घ्यावयाचा ही जी राजकारणातील गनिमी युध्दतंत्राची नेहमीची साधी युक्ती म्हणा किंवा युध्दातील रणनिती ही यशवंतराव होळकर यांनी यावेळी मोठ्या शिताफीने वापरात आणलेली दिसुन येते. इंग्रजांच्या तिन्ही बाजुने होणाऱ्या हल्ल्यापासून वाचण्यासाठी त्यांच्याच रणनितीद्वारे त्यांचेच गुजरातेतून येणाऱ्या कॅप्टन मरे आणि सैन्याला तेथेच थोपवून आपल्याला इंग्रजांच्या रणनिती मध्ये अडकुन ठेवण्याच्या

उद्देशाला रोखून, दुसऱ्या बाजूने येणाऱ्या इंग्रजांच्या सैन्यावर हल्ला करावयास यशवंतरावांना संधी मिळते हा युध्दातील रणनितीचा भाग समजला जातो.

लॉर्ड लेक यास यशवंतराव होळकर यांनी गोडपत्र लिहुन कळविले.[35] इंग्रजांशी वाकडे वर्तन करण्याची मला बिलकुल इच्छा नाही. उलट मी आपली मैत्री चाहतो. इकडे याचवेळी यशवंतराव होळकरांनी माचेडीकरराव राजाला पत्र लिहुन इंग्रजाविरुध्द उठण्याचा सल्ला दिला. यशवंतराव होळकरांच्या हा युध्दरणनितीचा एक भाग असल्याचा दिसुन येतो. स्वत:ची ताकत इंग्रजापेक्षा कमी असल्याने भारतातील राजेरजवाड्यांना इंग्रजांच्या विरुध्द उठाव करण्याचा त्यांचा मानस होता. जो पर्यंत इंग्रज भारतातून जाणार नाहीत तोपर्यंत मराठेशाहीचे अस्तित्व टिकुन रहाणार नाही. याची जाणीव त्यांना होती इथे यशवंतरावांची दुरदृष्टी दिसुन येते. शत्रुला आपल्या पत्र व्यवहारामध्ये गुंतवून ठेवणे आणि यांच्या विरुध्द एक फळी उभाकरणे ज्यामुळे इंग्रजांना जशासतसे उत्तर देण्यासाठी यशवंतरावांना देशी संस्थानिकांच्या सहकार्याची अपेक्षा होती.

८ आक्टोबर 1804 रोजी यशवंतराव होळकर यांनी दिल्लीवर भयंकर स्वरुपात हल्ला केला.[36] यशवंतरावांनी एक आठवडा पर्यंत दिल्लीवर भयंकर स्वरुपात तोफखान्याद्वारे तोफा गोळे टाकण्यात आले. दिल्ली ही इंग्रजांच्या ताब्यात अक्टर लोणी या इंग्रज अधिकाऱ्याच्या नियंत्रणाखाली कब्जात होती. यशवंतराव होळकर यांच्या घोडदळाने दिल्लीला चारही बाजूने वेढा एक आठवडा दिला होता. इंग्रजांना माहीत होते की जर दिल्ली यशवंतराव होळकराच्या ताब्यात गेली तर संपूर्ण भारतावर मराठ्यांचे वर्चस्व निर्माण होऊ शकते. यशवंतरावांच्या दिल्ली युध्दाचा हेतुच हा होता. परंतु यशवंतराव होळकरांना त्यांच्या गुप्तहेराद्वारे बातमी कळाली की इंग्रज अधिकारी लॉर्ड लेक हा अक्टर लोणी या इंग्रज अधिकाऱ्याच्या मदतीसाठी येत आहे. त्यावेळी यशवंतराव होळकर यांनी दिल्ली व दिल्लीकडे येणाऱ्या इंग्रजांच्या सैन्यात अडकुन रहाण्या अगोदर दिल्लीचा वेढा उठवून स्वत: यशवंतराव होळकर दुआबाच्या दिशेने सडी फौज घेऊन निघून गेले तर आपल्या घोडदळ आणि पायदळ दळाला भरतपूरच्या दिशेने जाण्याचे आदेश देण्यात आले. यशवंतराव होळकर यांच्या रणनितीचा हा भाग या ठिकाणी दिसून येतो. लॉर्ड लेक दिल्लीकडे येत आहे अशा वेळी यशवंतराव होळकर स्वत: दुसऱ्या ठिकाणी आपल्या सैन्याच्या विरुध्द दिशेने जातात. त्यावेळी दिल्लीकडे येणारा इंग्रज अधिकारी लॉर्ड लेकयास आपण नेमका कुणाचा पाठलाग करावा. यशवंतरावांचा की त्यांच्या सैन्याचा या मनस्थितीमध्ये यशवंतराव होळकर यांनी लॉर्ड लेक यास गोंधळाच्या परिस्थिती मध्ये

टाकलेले दिसुन येते. हा युध्दातील रणनितीचा भाग या ठिकाणी यशवंतराव होळकर यांनी खेळलेला दिसतो.

यशवंतराव होळकर यांना आपल्या राज्याच्या काही भागावर इंग्रजांनी अधिकार जमविला आहे याची बातमी समजताच त्यांनी इंग्रजांनी ताब्यात घेतलेल्या काही भागांना पुन्हा प्राप्त करण्यासाठी रणनिती आखली.[37] रणनितीच्या दृष्टिकोनातुन यशवंतराव होळकर यांनी दिल्लीवर आक्रमण केले होते. २६ आक्टोबर 1804 रोजी यशवंतराव होळकरांच्या घोडदळाने पाणिपतच्या खाली यमुनानदी ओलांडली आणि कर्नल बर्नवर हल्ला करण्याचा निश्चय केला कारण इंग्रजांनी त्यांच्या राज्यातील काही भाग आपल्या ताब्यात घेतला होता तो ताबा त्यांनी सोडावा. यासाठी यशवंतराव इंग्रजांच्या ताब्यात असणाऱ्या प्रदेशावर हल्ले करत होते. ज्यामुळे इंग्रज सैन्य व अधिकाऱ्यांचे लक्ष त्यांच्याकडे लक्षकेंद्रीत व्हावे यासाठी त्यांनी ही रणनिती आखलेली होती.

इंग्रजांचे सैन्य ज्या मुलखातून जावयाचे त्याच्या आसपासची गावे यशवंतराव होळकर यांनी आपल्या लुटफाटीने उजाड करुन टाकिलेली होती.[38] इंग्रजांना अन्नसामग्री मिळण्याची ही अतिशय पंचाईत पडू लागली आणि त्यामुळे पावसात भिजुन थंडीने कुडकुडावे व अन्नावाचुन भुकेने तडफडावे असा इंग्रज सैन्यातील शिपायांवर यशवंतरावांनी प्रसंग आणून सोडिला होता. यशवंतराव होळकर यांनी इंग्रजांच्या विरुध्द मोहीम उघडली. इंग्रजांना हतबल करुन सोडण्यासाठी रणनितीचा उपयोग केलेला होता, इंग्रज सैनिक ज्या प्रदेशातुन जातील त्याप्रदेशामध्ये इंग्रजांच्या सैन्याला अन्नधान्य, रसदपुरवठा उपलब्ध होऊ नये त्यांचे सैन्य अन्नावाचून कमकुवत व्हावे त्यांना पावसामध्ये आश्रय भेटू न देणे जेणेकरुन इंग्रजांकडे असणारे सैनिक इंग्रजांना सोडून जाण्यासाठी हतबल करण्याचा इंग्रजांची शक्ती कमी करण्याचा यशवंतरावांचा प्रयत्न होता. त्यामुळे इंग्रजांकडे असणारा तोफखाना व त्याला लागणारा दारुगोळा हा पावसामध्ये भिजत होता. तोफा चिखलात रुतुन बसल्याने त्यांनाबाहेर काढणे अवघड होऊन बसले. इंग्रजांना युध्दासाठी लागणारी साधनसामग्री नद्यांच्या पुरांमध्ये किती तरी ठिकाणी वाहून गेली. अशा परिस्थितीमध्ये यशवंतराव होळकर यांच्या सैन्यातील शिपाई इंग्रजांच्या सैन्यावर गतिमानतेने हल्ले करत यशवंतरावांच्या या युध्द रणनितीचा हा एक भाग होता. यशवंतराव होळकरा शिवाय आजुबाजुच्या डोंगराळ प्रदेशातील वास्तव्यास असणाऱ्या भिल्ल लोकही इंग्रजांच्या सैनिकांवर हल्ले चढवत होते. इंग्रज सैन्य हताश, मनोधैर्य कमकुवत झाल्याने अशा परिस्थितीचा

कधीही सामना करण्याची वेळ त्यांच्यावर कधी आली नाही. यशवंतराव होळकरांनी हवामानाचा अभ्यास करुन आखलेली युध्दापूर्वीची रणनिती या ठिकाणी यशस्वी होताना दिसते.

यशवंतराव होळकर यांचे गुप्तेहर खाते किती चांगल्या पध्दतीने कार्यरत होते हे कर्नल मॉन्सनच्या मुकूंदरा खिंडीतील हालचालीची इत्यंभूत माहिती मिळत असे.[39] यशवंतराव होळकर यांना तीन्ही बाजूने रोखण्यासाठी इंग्रजांची रणनिती होती त्याचाच भाग हा की यशवंतरावांना रोखण्यासाठी कर्नल मॉन्सन हा मुकूंदराखिंडीतून येत असता यशवंतराव होळकरांना मॉन्सनच्या प्रत्येक हालचालीची यशवंतरावांना गुप्तहेराकरवी माहिती मिळत होती. या माहितीच्या आधारे यशवंतरावांनी मौन्सनला मुकुंदराखिंडी मध्ये दूर पर्यंत आत येऊ दिले होते. पावसाळ्याचे दिवस असल्याने यशवंतराव मॉन्सनला मुकुंदराखिंडीत आतपर्यंत येवू देण्यासाठी वाट पहात होते. त्या अनुषंगाने यशवंतराव होळकर यांनी मॉन्सनला खिंडीत पकडण्यासाठी रणनिती आखुन आपले सरदार गणपतराव, चिमणाभाऊ, कुशवाह बक्षी इत्यादींना चंबळ नदीजवळ 2500 सैन्यासह व 40 होड्या घेऊन पाठविण्यात आले, मुकुंदरा खिंडीमध्ये यशवंतरावांनी त्याचा पाठलाग करुन त्यास जेरीस आणले होते. यशवंतराव होळकर यांनी मॉन्सनचा पाठलाग हा आग्ऱ्या पर्यंत तब्बल २०० मैल पाठलाग चालवला होता. इंग्रजांना या युध्दात पराभव स्वीकारावा लागल्याने यशवंतराव होळकरांचे नाव संपूर्ण भारतात नावाजले गेले. यशंतराव होळकर यांनी मुकूंदराखिंडीच्या युध्दात मॉन्सनला रणनितीच्या माध्यमातून दिल्लीकडे पळवून लावले. मॉन्सनच्या सैन्याची वाताहत या युध्दात झाली सैन्य तोफखाना सोडून पळाले इंग्रजांचा, रसद पुरवठा यशवंतरावांनी बंद पाडला इंग्रजांचे बरेच से सैन्य मृत्यूमुखी पडले. काही सैन्य मॉन्सनला सोडुन गेले हा यशवंतरावांच्या रणनितीचा या युध्दातील विजय म्हणावा लागेल.

लष्करी तज्ञ थॉमस मन्रो म्हणतो की, यशवंतराव होळकरांनी मॉन्सवर मिळविलेला विजय हा प्रत्यक्ष लढाई पेक्षा त्याआधीच्या लष्करी हालचाली व लष्करी डावपेच यांच्यामुळे मिळाला.[40] यशंतराव होळकरांनी ज्या प्रकारे गुजरातेतुन येणाऱ्या कॅप्टन मरेला थोपवून ठेवले व मॉन्सनवर हल्ला करण्यास यशवंतरावांना संधी मिळाली त्यावेळी त्यांनी जाणले होते की इंग्रजांच्या विरुध्द आपल्याला सजग रहावे लागणार आहे. मॉन्सन मुकूंदरा खिंडीतून आपल्यावर आक्रमण करण्यास येत आहे. त्याचवेळी यशवंतरावांनी आपल्या लष्करी हालचाली, मॉन्सनला मुकूंदरा खिंडीत केव्हा गाठायचे यासाठी सैन्याची जमवाजमव करण्यास सुरुवात केली आणि मॉन्सनवर हल्ला कशाप्रकारे कुठे,

केंव्हा करावयाचा यासाठीची युध्दापुर्वीची रणनिती आखुन ठेवली होती. या युध्दात रणनितीच्या दृष्टिकोनातून लष्करी हालचाली चालु केल्या होत्या. त्यामुळे मुकूंदराखिंडीच्या युध्दात यशवंतरावांना विजय मिळवता आला. त्या भागातील असणारा निसर्गाचा अभ्यास, हवामानाचा अंदाज, दऱ्या, खोऱ्या, नद्या, नाल्यांचा, जंगल, झाडे, झुडपे यांचा अभ्यास यशवंतरावांच्या घोडेस्वारांच्या पायाखाली कित्येक वेळा तुडविला असल्याने त्या भागाची इत्यंभूत माहिती यशवंतरावांना असल्याने यशवंतराव होळकर यांनी मॉन्सनच्या विरुध्द आपली युध्दाची रणनिती आखून मिळवलेला विजय दिसुन येईल.

भरतपुरास वेढा घालणाऱ्या शत्रुला चावे - चिमटे घेण्याचे काम यशवंतराव होळकर यांच्या किल्ल्याबाहेर असलेल्या सैन्य तुकड्या करीत होत्या.[41] इंग्रजांनी भरतपुरच्या किल्ल्याला वेढा दिल्याने यशवंतराव होळकर यांचे सैन्य किल्ल्यातून आणि किल्ल्याच्या बाहेरुन इंग्रज सैन्यावर हल्ला करत होते. यशवंतराव होळकर यांची एक पायदळ तुकडी किल्ल्या भौवतीच्या घनदाट झाडीमध्ये लपून इंग्रज सैन्यावर हल्ला करीत असे. सातत्याने दैनंदीन इंग्रजांचे थोडेफार नुकसान करावे आणि त्यांना स्वस्थता लाभू नये सतत त्यांच्या मध्ये गोंधळाची परिस्थिती राहावी त्यांचे मानसिक संतुलन कमकुवत व्हावे त्यांच्यात भयाचे वातावरण निर्माण व्हावे इत्यादी कार्य या पायदळाच्या तुकडीचे होते. तर दुसऱ्या सैन्याच्या तुकड्या दुर अंतरावर राहून इंग्रज सैन्याला येणारा रसदपुरवठा जो आग्रा मथुरा या ठिकाणाहून दारुगोळा, धान्य इत्यादीची साधनसामग्री रोखण्याची आणि लुटण्याची जबाबदारी यशवंतराव होळकर यांनी सेनापती मीरखान व बापु शिंदे यांच्या नेतृत्वाखाली कार्य करत होत्या. भरतपूरच्या किल्ल्याला इंग्रजांनी दिलेला वेढा कशा पध्दतीने त्यांनी काढुन घ्यावा. यासाठी भरतपूरच्या किल्ल्यातून आणि बाहेरुन यशंतराव होळकर यांचे सैन्य हल्ला करीत त्याचबरोबर यांना दारु गोळ्याचा, अन्नधान्याचा होणाऱ्या पुरवठा व्यवस्थेच्या मार्गामध्ये हा सर्व साठा रोखून ठेवणे त्यामुळे इंग्रज सैन्याची उपासमार व्हावी, त्यांना लागणारा दारुगोळा हा मर्यादीत स्वरुपात व्हावा. ते दारु गोळ्याविना आणि अन्न धान्यविना हतबल व्हावेत भरतपूरच्या किल्ल्याला दिलेला वेढा उठवावा ही यशवंतराव होळकर यांची युध्दा विषयीची रणनिती आपल्याला या ठिकाणी दिसुन येते. त्याच बरोबर यशवंतराव होळकर यांनी आपला सेनापती अमीरखान यास रोहीलाखंडावर आक्रमण करण्यास सांगितले त्यामुळे किल्ल्याला वेढा दिलेल्या इंग्रज अधिकारी आणि सैनिकांचे लक्ष विचलित होईल व अमिरखानाच्या विरुद्ध इंग्रजी सैन्य पाठविण्यात आल्यामुळे इंग्रजांचा भरतपूरास दिलेला वेढा कमकुवत होईल अशा प्रकारच्या रणनितीमध्ये यशवंतराव यशस्वी झालेले दिसुन येतात.

भरतपूरच्या किल्ल्याला वेढा देणाऱ्या लॉर्ड लेकचे लक्ष विचलित केल्याने लॉर्ड लेकने आपल्या नेतृत्वाखाली कार्य करणाऱ्या जनरल स्मिथ यास अमीरखानाचा बंदोबस्त करण्यासाठी रोहीलाखंडाकडे त्यास पाठवून देण्यात आले. त्यामुळे भरतपूरच्या किल्ल्याला वेढा देणाऱ्या इंग्रजी सैन्याच्या संख्येमध्ये कमकुवतपणा आलेला पहावयास मिळेल. यशवंतराव होळकर यांनी या युध्दात रणनिती वापरुन इंग्रजी सैन्याला हतबल केले. दुसरे लॉर्ड लेकचे लक्ष्य विचलीत केले. त्यांच्यात गोंधळाची स्थिती निर्माण केली. जनरल स्मिथ हा अमीरखानाचा बंदोस्त करण्यास रोहीला खंडाकडे कुच करतो. या युध्दातील डावपेचाचा (रणनिती) एक भाग यशवंतराव होळकर यांनी खेळलेला पहावयास मिळतो.

२३ डिसेंबर रोजी इंग्रजाच्या तोफगोळ्याने किल्ल्याच्या एका भागाचा हिस्सा ढासळल्याने या परिस्थितीचा फायदा घेण्यासाठी इंग्रज सैन्य किल्ल्यात घुसण्यासाठी पुढे सरसावली.[42] इंग्रजांचे सैन्य किल्ल्यात जाण्याअगोदरच किल्ल्यातून होळकरांचे सैन्य व जाटाचे सैन्य गतिमानतेने किल्ल्याच्या बाहेर पडले. किल्ल्यातून बाहेर पडताना या सैन्याची गतिएवढी तीव्र होती की इंग्रजी सैन्याला कापून पुढे होळकर आणि जाट यांचे सैन्य बाहेर पडले. इंग्रजांचे यामध्ये मोठ्या प्रमाणात सैन्य ठार झाले. होळकर व जाट सैन्याचा धावा एवढा तीव्र होता की, इंग्रजांच्या सैन्यदलाला कापून पुढे निघत होता. या युध्दात होळकर आणि जाट सैनिकांना यशवंतरावांनी ठरवून दिलेली युध्दतत्वे आणि रणनितीचा वापर करुन सकुशल सैन्य किल्ल्याबाहेर येताना दिसते.

पुष्कर तीर्थाच्या यात्रेला जात असल्याचे निमित्त करुन यशवंतराव होळकरांनी पुष्कर व नजीकचे आजमेरही दोन्ही ठाणी लुटली.[43] इंग्रजांच्या विरुध्द युध्द करण्यासाठी शिंद्याच्या अखत्यारीत असणारा हा प्रदेश यशवंतरावांनी पैशा करीता लुटला होता. इंग्रजांचे लक्ष विचलित करण्यासाठी पुष्करहुन धनसंपत्ती गोळा करण्याचा आणि इंग्रजांच्या विरुध्द लढण्यासाठी आपल्याकडे सक्षम तोफखाना असावा यासाठी ही रणनिती आखली होती. अनेक ऐतिहासिक दस्तऐवजाच्या अभ्यासातुन हे कळते की यशवंतराव होळकर यांची रणनिती ही युध्दापूर्वी ठरवलेली असे. यशवंतराव शत्रुसैन्या बरोबर मैदानी प्रदेशामध्ये तर युध्द करत होते त्यांचे सैन्यही गमिनीकावा युध्द पध्दतीमध्ये सर्वश्रेष्ठ होते. यांच्या मार्गामध्ये येणाऱ्या शत्रुसैन्याची रसदपुरवठा व्यवस्था आणि अन्य साधन सामग्रीची लुट करुन शत्रुसैन्याला परेशान करत आणि या सैन्याचे मनोधैर्य कमकुवत करणे हा हेतू असे.

यशवंतराव होळकर यांनी मथुराकडे जात असताना म्हटले होते.[44] माझ्यासोबत हरनाथसिंहाला घेऊन आगऱ्याच्या दिशेने कुच करणार सोबत घोडदळाचा एक खास ताफा सोबत असेल. जे भवानीशंकर बक्शी, मुर्तजाखान, बहादुरखान यांच्या सोबत देशी घोडदळ असेल, गोमाजी शिंदे आणि कुशवाह बक्शी या दोघांना कानपुरला पाठविण्यात आले ज्यामुळे लॉर्डलेक ला या दिशेने येण्यापासून रोखण्यासाठी पाठविण्यात आले होते. अन्य सरदारांना ही यशवंतराव होळकर यांनी आदेश दिला होता की गुल्मीखान आणि गोमाजी शिंदे यांनी नवीन सैन्याची भरती चालु करावी. यशवंतराव होळकर इंग्रजांच्या विरुध्द युध्द लढण्यासाठी वेगवेगळ्या ठिकाणी आपले सरदार पाठवत होते युध्दासाठी सैन्याची कमतरता भासु नये यासाठी नवीन भरती करण्याचे आदेश देण्यात आले. यशवंतराव होळकरांनी युध्दाचे डावपेच आखुन त्यावर अंमलबजावणी करण्यासाठी आदेश देण्यात आलेले होते.

यशवंतराव होळकर हे एक कुशल सेनापती होते. ते आलेल्या संधी पासून चुकणारे नव्हते.[45] यशवंतरावांनी युध्दात शत्रु सैन्य वेगवेगळ्या गटांमध्ये विभागले असेल तर त्यागटावर त्यांनी एकदाच आक्रमण केले नाही. शत्रु सैन्याला वेगवेगळ्या गटांमध्ये फोडून त्या एक-एक गटांवर प्रखरतेने, गतिमानतेने, आक्रमण करत व शत्रुसैन्याचे मनोर्धेर्य कमकुवत करत होते. यशवंतरावांच्या या युध्द डावपेचामुळे शत्रुचे सैन्य रणांगणातून सैरावैरा पळत असे कारण युध्द हे मैदानी प्रदेशात लढले जायचे त्यामुळे शत्रुचे सैन्य एकवटु नये यासाठी एक-एका दलावर आक्रमण करण्यात येत होते.

इ.स. 1804 साली इंग्रजांनी तिन्ही दिशेने यशवंतराव होळकर यांच्यावर आक्रमण केले.[46] यशवंतराव होळकर यांना तिन्ही बाजूने कोंडीत पकडण्यासाठी इंग्रजांनी रणनिती आखली होती. उत्तरे कडून लॉर्ड लेक, दक्षिणेकडून आर्थर वेलेस्ली आणि पश्चिमेकडून कर्नल मॉन्सन या इंग्रज अधिकाऱ्यांनी यशवंतराव होळकर यांच्यावर आक्रमण करण्यास सुरुवात केली. आर्थर वेलस्लीने आपला दबदबा मराठ्यांच्या प्रदेशात वाढविला होता. यशवंतरावांना आपल्या अंकीत केल्याशिवाय किंवा त्याचा पराभव केल्याशिवाय त्याला चैनपडत नव्हता. शेवटी तीन्ही बाजूने मोठ्या प्रमाणात यशवंतरावांवर आक्रमण करण्यात आले. परंतु यशवंतराव होळकर यांचे या तिन्ही इंग्रज सैन्य अधिकाऱ्यांच्या हालचालीवर लक्ष होते. कर्नल मॉन्सनवर आक्रमण केले. यशवंतराव होळकर यांनी कोटाच्या जवळ मॉन्सनच्या सैन्याचा पराभव केला. या युध्दा मध्ये मॉन्सनच्या ५ बटालियन आणि ६ सैन्यदलांचे नुकसान झाल्याने मॉन्सन आगऱ्याच्या दिशेने पळाला. इंग्रज पहिलेच यशवंतराव होळकर

यांच्या सैन्य शक्ती बद्दल भयभीत होते. ज्या मनोर्धेयाने यशवंतराव इंग्रजांच्या विरुध्द लढले व त्यांचा पराभव केल्याने इंग्रजांच्या वाढत्या प्रभुत्वाला भारतात धक्का पोहचल्याने इंग्रज भयभीत झाले होते.

यशवंतराव होळकर हे युध्दनीती व युध्दातील डावपेच हे शीघ्रगतीने अंमलात आणत होते.[47] कोणत्याही एका ठिकाणावर आक्रमण करुन यशवंतराव धनसंपत्ती वसुल करुन ते ठिकाण लगेचच सोडत आणि दुसऱ्या राज्यावर आक्रमण करण्याची योजना बनवीत. यशवंतराव होळकर यांनी एखाद्या राजेरजवाड्यांवर किंवा एखाद्या संस्थानिकावर आक्रमण केले असता धनसंपत्ती गोळा करावयाची त्या ठिकाणाला लगेचच सोडण्याला त्यांचे प्राधान्य असे कारण त्या ठिकाणावर जास्त वेळ राहिल्यास सैन्यामध्ये गोंधळाची स्थिती निर्माण होऊ शकते. तेथील नागरिकांमध्ये असंतोष आपल्या विरुध्द जास्त उफाळून येऊ शकतो. त्यामुळे तेथील धन संपत्ती गोळा केली असता. पुढील कोणत्या ठिकाणांवर आक्रमण करावयाचे त्यांची योजना बनवित. त्यानुसार दुसऱ्या ठिकाणावर डावपेचाचा उपयोग करुन शत्रुच्या प्रदेशावर हल्ला करत. अशा पध्दतीने यशवंतराव होळकर ज्या ठिकाणी हल्ला करावयाचे त्याठिकाणी जाण्या अगोदर डावपेच आखत असे आपल्याला दिसुन येते.

जर एखादी लढाई झेपत नाहीशी वाटल्यास तितकी आवश्यकता नसेल तर सैनिकांनी मैदान सोडावे व अगाऊ ठरलेल्या वेगवेगळ्या संकेत स्थळावर जाऊन नंतर यशवंतरावांकडे एकवटावे.[48] अशा प्रकारचा पूर्व संकेत असल्या प्रमाणे पळालेले शिपाई यशवंतरावांच्या भोवती गोळा होत. यशवंतराव होळकर यांचे डावपेच हे शत्रुला लवकर लक्षात येत नसे ज्यावेळी यशवंतरावांना वाटे शत्रु आपल्या पेक्षा संख्येने व शस्त्रास्त्रे, तोफखाना दलाने बलाढ्य आहे त्यावेळी शत्रुच्या समोर युध्दाला जाऊ नये. आपल्या सैनिकांनी मैदाने सोडावीत हा युध्दाचा अनुभव यशवंतरावांकडे होता. आपल्या सैन्याचे मनोधैर्य टिकवुन ठेवणे, आपल्या सैन्याची हानी जास्त होवू नये यासाठी युध्दातील डावपेचाचा वापर यशवंतरावांनी केला. ज्यावेळी आपले सैन्य मैदान सोडून जाईल त्यावेळी शत्रु सैन्याला असे वाटावे की आपल्याला भयभीत होवून यशवंतराव आणि त्याचे सैन्य पलायन करत आहे परंतु हा यशवंतरावांच्या डावपेचाचा तो एक भाग होता रणनिती नुसार सैन्य मैदान सोडुन जात. त्यावेळी हे ठरवून दिलेल्या संकेत स्थळावर यशवंतराव होळकर यांचे सैन्य परत येऊन एकत्रित होत. शत्रु सैन्य त्यावेळी वेगवेगळ्या दलामध्ये विभाजीत झाल्याने त्यांची एकवटलेली शक्ती कमी होतं. त्यावेळी यशवंतराव होळकर यांच्या नेतृत्वाखाली एकत्रित आलेले सैन्य पुन्हा शत्रु सैन्याच्या दलावर एक -

एक करुन त्यांच्या वर आक्रमण करत. हा यशवंतराव होळकर यांनी युध्दातील डावपेचाचा उपयोग या ठिकाणी केलेला आपल्याला पहावयास मिळतो.

इंग्रजाकडील घोड्या वरील तोफा व त्यांची युध्दतंत्रातील एकंदर श्रेष्ठता लक्षात घेऊन यशवंतराव होळकरांनी प्राप्त परिस्थितीत उत्कृष्ट गनिमीकावा चालविला.[49] यशवंतराव होळकर हे मैदानी प्रदेशात समोरा समोर न येता इंग्रजांच्या लष्करी छावण्यांवर हल्ले करुन निघून जाणे, इंग्रजांना होणाऱ्या पुरवठा व्यवस्थेची नाकाबंदी करणे, इंग्रज सैन्याचा सातत्याने पाठलाग स्वत:चा करायला लावणे. त्यामुळे इंग्रज सैन्य थकव्याने दमुन जात त्यामुळे त्यांच्यात पाठलाग करण्यास उत्साह राहत नसे. इंग्रज सैन्य यशवंतराव होळकरावर चिडुन जात. आम्ही त्याच्या जवळ जाई पर्यंत तो लांब कोसोदुर आमच्या पासून दूर अंतरावर घोड्याची रपेट करत जात असे. जसे शिवणा पाणीचा खेळ, यशवंतराव होळकर इंग्रजाबरोबर खेळत आहे. अशा प्रकारच्या डावपेचांबद्दल इंग्रज सैन्य अधिकारीही यशवंतराव होळकर यांची प्रशंसा करताना दिसतात.

## 4.10 यशवंतरावांचे युध्दविषयक आक्रमक धोरण :-

आक्रमण करण्याच्या लढाईचे प्रमुख अंग म्हणजे बचावाच्या बगलेवर जाणे किंवा त्याला टाळून जाणे.[50] याचाच अर्थ पुढाकार, उपक्रमशीलता हा आहे आक्रमण करण्याच्या लढाईमध्ये सेनापतीचा उद्देश हा निर्णयाची त्वरा करण्याचा असतो. अर्थात फाजीलघाई केली तर सैन्याची निष्कारण खराबी होण्याचा धोका असतो. बहुतेक आक्रमणे ही युध्दातील चमत्कारीक गोष्ट म्हणजे शत्रुच्या परिस्थिती विषयीची साशंकता आक्रमण करणारे सैन्य अंधारातच चाचपडत असते. साशंकता जास्त असेल तर सैन्य एकवटणे जास्त महत्वाचे ठरते व शत्रुच्या पाठीवर जाण्यापेक्षा बगलेवर जाणे अधिक श्रेयस्कर ठरते. मार्शल फौचच्या मते, ज्या प्रकारे पोपट पिंजऱ्यावर चोचीद्वारे आक्रमण करण्यासाठी पायाद्वारे एक पकड मजबुत करुन दुसऱ्या पायाद्वारे पकड मोकळी करतो. तशाच प्रकारे, शांततेचा वापर करुन योजनापूर्वक शत्रु सैन्यावर प्रहार करावा. आक्रमण करण्यासाठी प्रमुख अंग हे बचावाच्या बगलेवर जाणे किंवा त्याला टाळून जाणे याचा अर्थ हा पुढाकार, उपक्रमशीलता हा आहे.

युध्दामध्ये शत्रु सैन्यावर विजय मिळवायचा असेल तेव्हा आक्रमण करण्यासाठी आक्रमकता महत्वाची ठरते.[51] आक्रमक कारवाई अशा पध्दतीने करावी जेणेकरुन शत्रु सैन्याला बचाव करण्यासाठी वेळ मिळु नये. आक्रमक कारवाई ही त्यावेळी करता येते ज्यावेळी आपल्या सैन्या समोर ध्येय, उद्दिष्टांची निवड करण्यात आलेली असेल. ज्यावेळी आक्रमण करते वेळी आक्रमक कारवाई मुळे शत्रु सैन्याचे मनोधैर्य कमकुवत होते, तर आपल्या सैनिकांचे मनोधैर्य हे वाढते त्यामुळे शत्रुसैन्याला स्वक्षेत्रातून माघार घ्यावी लागते. यामुळे शत्रुच्या सैन्यामध्ये गोंधळाची स्थिती निर्माण होते शत्रु सैन्यावर विजय लवकर संपादन करावयाचा असेल, त्यावेळी शत्रुवर आक्रमण करताना आक्रमक कारवाई करणे आवश्यक ठरते.

यशवंतराव होळकर शत्रुसैन्यावर अशा प्रकारे हल्ला करायचे ज्याप्रमाणे हरणाची शिकार करण्यासाठी वाघ ज्या चपळतेने हल्ला करतो त्याप्रकारे हल्ला यशवंतराव होळकर करायचे.[52] यशवंतरावांच्या आक्रमणापुढे शत्रु सैन्य सैरावैरा पळत होते जसे हवे समोर भुसा उडायचा शत्रुच्याविरुध्द आक्रमण करण्याची आक्रमकता त्यांच्या कार्यात दिसते. यशवंतराव जर युध्दामध्ये स्वत: प्रत्यक्ष सहभागी झाले तर त्यांच्या सैनिकांमध्ये ही उत्साह वाढायचा त्यांचे मनोधैर्य उच्चप्रतीमध्ये होत असे यशवंतरावांचा युध्दाच्या बाबतीत शत्रुविरुध्द आक्रमकता, गतिमानता ही प्रचंड असे युध्दात युध्द नेतृत्व जर सक्षम असेल तर युध्दाला सुध्दा तलवारी सारखी धार येते. तुफान, प्रचंड, रणकंदन माजले जाते तेच यशवंतराव होळकर यांच्या बाबतीत दिसेल. शत्रुसैन्यावर अशा प्रकारे तुटून पडा की शत्रु रणांगण सोडून पळाला पाहिजे नाहीतर तो मृत्यूमुखी पडला पाहिजे. अशा पध्दतीचे आक्रमक धोरण यशवंतरावांचे होते.

यशवंतराव होळकर अशी व्यक्ती होती जे समोर दिसणाऱ्या पराभवाला सुध्दा विजयामध्ये रुपांतरीत करण्याची क्षमता ठेवत होते.[53] यशवंतरावांचे आक्रमणच असे होते की शत्रुच्या सैन्यावर रणांगणा मध्ये ज्या ठिकाणी मोठ्या प्रमाणात घमासान युध्द होत असे त्याठिकाणी स्वत: यशवंतराव व त्यांचे सरदार तीव्र गतीने शत्रुच्या सैन्यावर आक्रमण करत यशवंतराव होळकर यांनी स्वत: युध्दात शत्रुच्या तोफखाना दलावर आक्रमण करुन तोफा चालवणाऱ्यांचे तलवारीने डोकी उडवीत आणि शत्रुच्या तोफांच्या तोंड शत्रुच्या दिशेने फिरवीत व हल्ला करत एवढे धाडस, साहस शौर्य मराठे शाहीतील एखादाच कार्य तत्परतेने पहिल्यांदा करताना दिसला. स्वत: यशवंतराव शत्रुच्या सैन्यात घुसून शत्रुला तलवारीने कापत पुढे जाणाऱ्या यशवंतरावांमुळे त्यांच्या सैन्याला प्रोत्साहन मिळत असे.

३ आक्टोबर 1803 रोजीच्या युध्दामध्ये यशवंतराव होळकर यांच्या सैनिकांनी शिंदेच्या सैन्याला थांबवुन थांबवुन त्यांच्यावर आक्रमण केले.[54] युध्दाच्या वेळी यशवंतराव होळकर यांची गतिमानता प्रचंड प्रमाणात असायची शत्रुच्या सैन्यावर तीव्रतेने तुडून पडे व त्यांचे सैन्यदल कधी एकत्रित व्हायची तर कधी तीव्रतेने फुटून वेगवेगळ्या दिशांकडे दुरपर्यंत रणक्षेत्र तुडवत जायचे यशवंतराव होळकर युध्द नितीच्या आणि रणनितीच्या बाबतीत त्यांच्यात कौशल्य पूर्ण नैपुण्य होते.[55] यशवंतरावांना शत्रु सैन्यावर कधी कशा प्रकारे त्याच्यावर आक्रमण करावे हे त्यांना चांगले ठाऊक होते त्यामुळे यशंवतराव शत्रु सैनिकांना जागो जागी थांबवून शत्रुच्या सैन्यदलात, युध्द क्षेत्रातच फुट पाडुन त्यांच्यावर हल्ला करत, जर शत्रुसैन्याची संख्या जास्त वाटत असेल किंवा एखादे मोठे सैन्य दल जर अंगावर येत असेल त्यावेळी यशवंतरावांचे सैन्य शत्रुला आपला पाठलाग करावयास भाग पाडत रणक्षेत्रापासुन दुर अंतरा पर्यंत जर शत्रुने पाठलाग केला तर आपल्या सैनिकांना वेगवेगळ्या दिशेने जाण्यास सांगत त्यामुळे शत्रुचे सैन्य दल हे विखुरले जात त्यावेळी वेगवेगळ्या दिशेने गेलेल्या आपल्या सैन्याला एकत्रित करुन शत्रुच्या विखुरलेल्या दलावर आक्रमण करीत त्यावेळी शत्रुची शक्ती कमकुवत होत असे अशा पध्दतीने यशवंतराव होळकर यांचे युध्दात आक्रमक धोरण दिसते.

फेब्रुवारी 1804 मध्ये यशवंतरावांचे इंग्रजांना पत्र.[56] मी उघड्या मैदानात ब्रिटीश तोफांचा मुकाबला करण्यास असमर्थ असलो तरी लढाईचा प्रसंग आलाच तर शेकडो कोसांचा मुलुख घोड्याच्या टापाखली तुडवून लुटला जाईल, जाळला जाईल आणि अखंड चालणाऱ्या युध्दामध्ये समुद्राच्या लाटांप्रमाणे व्यापून टाकणाऱ्या माझ्या सैन्याकडून लक्षावधी मनुष्य प्राण्यांवर संकटाच्या राशी कोसळतील यशवंतराव होळकर यांना माहित होते की इंग्रजांच्या विरुध्द आपली लष्करी ताकद तोफखाना दलाच्या बाबतीत कमी आहे. याची जाणीव त्यांना होती तरी आपल्या घोडदळाच्या जोरावर त्यांनी इंग्रजांना नमविण्याचा प्रयत्न केलेला आहे. जर इंग्रजांनी माझ्या विरुध्द युध्द करण्याचा प्रसंग आणला तर मी ही काही कमी नाही शेकडो मैलांचा प्रदेश माझ्या घोडे स्वारांच्या नियंत्रणाखाली आणून तुमच्या आखत्यारीत असणारा प्रदेश हा उध्वसत करण्याची चेतावनी यशवंतराव इंग्रजांना देत होते. त्यामुळे माझ्या विरुध्द युध्द करण्यापूर्वी इंग्रजांनी दहावेळा विचार करावा ज्या प्रमाणे समुद्रामध्ये लाटा एका मागुन एक येतात त्याच पध्दतीने माझे सैन्य इंग्रजांवरती तुडून पडेल आणि या युध्दात माझ्या सैन्याद्वारे इंग्रजांचे सैन्य मारले जाईल अशा पध्दतीने हे माझे इंग्रजांच्या विरुध्द आक्रमण असेल.

कॅप्टन मॉन्सन पुढे आणि यशवंतराव होळकर त्यांच्या पाठीमागे अशी लांडगे तोड एक सारखी सुमारे 200 मैल पर्यंत पाठलाग चालविली होती.[57] यशवंतराव होळकर यांची युध्दनितीच अशा पध्दतीची होती की, त्या नितीमध्ये गतिमानता, प्रचंडता, सातत्य असायचे मराठेशाहीच्या इतिहासामध्ये पहिलेच व्यक्ती यशवंतराव होळकर असतील ज्यांनी एखाद्या इंग्रज अधिकाऱ्याच्या विरुध्द २०० मैला पर्यंत त्याचा पाठलाग केला. इंग्रज सुध्दा मुकूंदराखिंडीच्या युध्दातून प्रभावीत झाले होते, इंग्रजांचे सैन्य जर यशवंतरावांच्या पाठलागाने थकले असतील त्यावेळी त्यांना विश्रांतीसाठी एखाद्या ठिकाणी तळ द्यायला लागले की, इंग्रजांना हुसकावून लावण्यासाठी यशवंतराव होळकर यांचे घोडेस्वार त्यांच्यापुढे उभा राहिलेले आहेच. इंग्रजांचे सैन्य पाण्याने भरुन चाललेली नदी उतरुन जाण्याच्या प्रयत्नात असलेले या सैनिकांना यशवंतराव होळकर यांचे सैनिक त्यांना जलसमाधी देण्यासाठी त्या नदीच्या काठावर हजर असत. इंग्रजांना पळताना कोणत्याही ठिकाणाहून रसद पुरवठा मिळत नव्हता जर यदाकदाचित रसद पुरवठ्याची व्यवस्था झालीच तर ती त्यांच्या पासून लुटून घेण्यास यशवंतराव होळकर यांच्या घोडदळाने या इंग्रज सैन्याला घेराव घातलाच समजा अशा पध्दतीने यशवंतराव होळकर इंग्रजांच्या विरुध्द आक्रमण करत होते.

मराठेशाहीमध्ये मराठ्यांचा इंग्रंजा विरुध्दच्या युध्दात जरी पराजय झालेला असला तरी किमान यशवंतराव होळकर यांच्या मोहीमा यशस्वी होऊन कॅप्टन मॉन्सन या इंग्रज सैन्य अधिकाऱ्याला यशवंतराव होळकर यांच्या सैन्या समोर पराभव स्वीकारुन माघारी पळत जावे लागले.[58] एकंदरीत विचार करता मराठेशाहीच्या मध्ययुगीन कालखंडात इंग्रजांचा मोठ्या प्रमाणात प्रभाव भारतभर वाढत होता इंग्रज एकएक करुन भारतातील संस्थानिकांना आपल्या प्रभावाखाली आणत होते. त्यामुळे इंग्रजांना भारतात लवकरच आपणआपले शासन स्थापित करु असे वाटत असतानाच त्यांना यशवंतराव होळकरां सारखा मराठा सरदार आपल्या ध्येय धोरणांच्या आड येईल असे वाटले नव्हते. भारतातील महत्वाचे राजे राजवाडे इंग्रजांच्या आखत्यारीत आले. परंतु मराठ्यांचे राज्य आपल्या नियंत्रणाखाली जोपर्यंत येत नाही तोपर्यंत आपण संपूर्ण भारतावर आपले राज्य स्थापीत करु शकत नाही. मराठ्यांचा शेवटचा सरदार यशवंतराव होळकर आपल्या ध्येयधोरणाच्या मार्गात अडसर ठरत आहे. त्यावेळी इंग्रजांनी आपल्या युध्दनितीच्या माध्यमातून यशवंतरावांना पराभूत करण्याचा सातत्याने प्रयत्न करताना दिसतात. त्याचाच एक भाग हा कॅप्टन मॉन्सन आणि यशवंतराव होळकर यांच्यातील युध्द हे मुकूंदराखिंडीतील युध्द आणि या युध्दात कॅप्टन मॉन्सनची

झालेली नाचक्की यशवंतराव होळकराने मॉन्सनला आगऱ्या पर्यंत पळुवन लावले या दोघांमधील युध्द हे दोन महिने चालले, यात इंग्रज सैन्य अधिकारी कॅप्टन मॉन्सनचा पराभव यशवंतराव होळकर यांनी केलेला पहावयास मिळतो.

यशवंतराव होळकर हे असे मराठ्यांचे सरदार होते, त्यांना कधी पराभव माहित नव्हता.[59] जर यशवंतरावांचा एखाद्या युध्दात पराभव झाला तर लगेच पुन्हा सैन्याची जमवाजमव करुन पुन्हा आक्रमण करण्यास तयार आणि पुढील युध्दनिती, डावपेच, आखायच्या कार्यास लागे. यशवंतराव होळकर यांचा इंग्रजांच्या विरुदध सातत्याने विजय होत होता. त्यामुळे इंग्रज भयभीत झाले होते काहीही करुन यशवंतरावांना रोखा किंवा त्यांच्या सोबत मैत्रीपूर्ण संधी करा असे इंग्रजांची धारणा झाली होती. एकामागुन एक इंग्रजांच्या पराभवामुळे ईस्ट इंडिया कंपनीवर आर्थिक भार पडत होता. त्यामुळे इंग्रज गर्व्हनर कोणत्याही परिस्थितीमध्ये यशवंतरावांशी संधी करण्यास व युध्द न करण्यास विवष झालेले दिसतात. जर एखाद्या युध्दात यशवंतरावांचा पराभव झाला. यशवंतराव होळकर हे खचुन न जाता पुन्हा सैन्याची जमवा जमव करुन इंग्रजांच्या विरुध्द आक्रमण करण्यास तयार असे आणि इंग्रजांचा कोणत्या पध्दतीने युध्दात पराभव करावा याची पूर्व रणनिती आखत त्या रणनितीच्या माध्यमातून इंग्रजांवर आक्रमण करण्याची तयारी यशवंतराव करत असे.

भरतपूरकरांच्या दोस्तीचे कारस्थान पिकवुन ब्रिटीश फौजेच्या चढाईशी झुंजण्याची तयारी केली.[60] यशवंतराव होळकरं यांनी भरतपूरच्या जाटास आपले जुने मैत्रीपूर्ण संबंधाचे दाखले देऊन जाटाशी मैत्री स्थापित केली होती. इंग्रजांना भारतातुन हकलुन लावण्यासाठी यशवंतरांवानी सातत्याने इंग्रजांचा पराभव केला होता. भारतातील संस्थानिकांना यशवंतराव आवाहन करत होते की, इंग्रजांच्या विरुध्द सर्व संस्थानिकांनी एकत्र यावे मला सहकार्य करावे आपण सर्व जण मिळुन इंग्रजांना पराभुत करु त्या दृष्टिकोनातुन यशवंतरावांनी भरतपूरच्या रणजितसिंह जाटा सोबत मित्रत्वाचे संबंध स्थापित करुन इंग्रजांच्या विरुध्द आक्रमण करण्याची तयारी करीत होते. यशवंतराव होळकर यांचे आक्रमण करण्याचे धोरण हे एकट्याचे नसुन संपूर्ण भारतीय संस्थानिकाद्वारे इंग्रजाविरुध्द आक्रमण करण्याचे धोरण चालु होते.

यशवंतराव होळकरांचे सैन्य गनिमीकाव्या मध्ये तरबेज होते.[61] शत्रु सैन्याचे जेवढे नुकसान करता येईल तेवढे नुकसान करुन त्या ठिकाणाहुन निघूण जाणे शिवाजी महाराजांच्या गनिमीकाव्याची

ही पध्दत यशवंतराव होळकरांनी जेवढ्या प्रभावीपणे वापरात आणली तेवढी यशवंतरावांच्या अगोदर व नंतर ही कोणत्याही सरदाराला जमलेली नाही. छत्रपती शिवाजी महाराजांच्या काळातील गनिमीकावा पध्दतीच्या माध्यमातून शत्रुच्या सैन्यावर आक्रमण करण्याची पध्दती ही मैदानी प्रदेशात अवलंबविली ती यशवंतराव होळकरांनी मराठेशाहीच्या उत्तर कालखंडात मैदानी प्रदेशामध्ये गनिमीकावा पद्धतीने आक्रमण करणारा मराठा सरदार त्यांच्या नंतरही कुणी दृष्टीस पडत नाही. यशवंतराव होळकर मैदानी प्रदेशात गनिमी काव्याच्या माध्यमातून आक्रमण करत असे एकदा शत्रु सैन्यावर आक्रमण केले असता शत्रु सैन्याचे जेवढे नुकसान करता येईल, तेवढे करण्याचा प्रयत्न त्यांचा होता. पुन्हा शत्रुसैन्याने आपल्यावर आक्रमण करु नये एवढी दहशत यशवंतरावांच्या आक्रमणामध्ये असायची त्यामुळे शत्रु सैन्याला संधी मिळण्या अगोदर त्याच्यावर तीव्रतेने आक्रमण करावे आणि त्या ठिकाणाहून निघुन जाणे ही त्यांची आक्रमण करण्याची पध्दत होती.

जगदीशसिंह लिहीतात कॅप्टन मॉन्सन ने प्रथम यशवंतराव होळकर यांच्या राज्यात प्रवेश केला. [62] यशवंतराव होळकर आपल्या विशाल सैन्याच्या सहकार्याने इंग्रजांच्या सैन्याला घेरण्याचा त्यांचा प्रयत्न होता. यशवंतराव होळकर युध्द कौशल्यात पारंगत होते त्यांना त्या परिसरातील भौगोलिक घटकांचा आणि निसर्गाचा अभ्यास असल्याने त्यांनी इंग्रज सैन्याधिकारी मॉन्सनला मुकूंदराखिंडी मध्ये युध्दनितीच्या दृष्टीने दुरपर्यंत आत येवू दिले. आपल्या सैनिकांना सर्तक राहण्याचे कळवले. यशवंतरावांचे गुप्तहेर एवढे सक्षम होते की, त्यांना मॉन्सनची प्रत्येक हालचालीची माहिती मिळत. त्या दृष्टीने यशवंतरावांनी मॉन्सनवर आक्रमण करण्याचे डावपेच आखण्यास सुरुवात केली. इंग्रजांवर आक्रमण करण्यासाठी त्यांना चारही बाजूने घेरण्याचा त्यांचा मानस होता. त्या दृष्टीने मॉन्सनला मुकूंदरखिंडीत आत पर्यंत येवू दयावे आणि त्याच्यावर आक्रमण करावे ही युध्दनिती यशवंतरावांनी आखली होती.

यशवंतराव होळकर यांचे युध्द कौशल्य.[63] हे लहान लहान गटामध्ये सैन्याची विभागणी करून हे लहान गट दूर अंतरा पर्यंत दिसेनासे होत काही वेळाने हे लहान गट एकत्रित येवून गतिमानतेने हल्ला करीत असे. शत्रुच्या सैन्या विरुध्द यशवंतराव होळकर यांची युध्द करण्याची किंवा आक्रमण करण्याची पध्दत ही गनिमीकावा युध्दतंत्राद्वारे करण्याची दिसुन येते गनिमीकावा युध्दतंत्र यशवंतरावांनी मैदानी प्रदेशात वापरात आणला तो ही घोडदळाच्या माध्यमातून मराठ्यांचा एकमेव सरदार असेल ज्याने गनिमीकावा युध्दतंत्राला मैदानी प्रदेशातील रणांगणावर उपयोगात आणलेली

दिसेल. शत्रु सैन्याला ज्यावेळी त्यांचा सेनापती होळकरांच्या सैन्या विरुध्द हल्ला करण्याचा आदेश देत त्यावेळी यशवंतराव होळकर यांचे घोडदळ शत्रुच्या सैन्याला आपला पाठलाग करण्यास दूर दूर अंतरापर्यंत घेवून जात, शत्रु सैन्याला प्रत्यक्ष युध्दाची संधीच यशवंतराव होळकर देत नसे, ज्यावेळी शत्रुसैन्याचे घोडदळ पाठलाग करताना थकुन जात व परत माघारी जाण्यास निघाले असता. हेच यशवंतरावांचे घोडदळ या शत्रुसैन्याच्या घोडदळा वर आक्रमण करित व त्यांचा पाठलाग चालु ठेवत. यशवंतराव होळकरांच्या बंदुकधारी दलाच्या माध्यमातून शत्रु सैन्यावर फैरी झाडत असे. त्यांच्यावर भालाफेक करत, कधी त्यांना डिवचत, बहुसंख्य शत्रु सैनिकांवर अशा प्रकारचे आक्रमण करुन ठार केले जात. कधी कधी तर यशवंतरावांचे घोडदळ शत्रुसैन्या बरोबर लपंडाव ही खेळत. शत्रुच्या उजव्या किंवा डाव्या बगलेवर जाऊन किंवा पाठीमागे असणाऱ्या सैनिकां पर्यंत पोहचायचे व त्यांच्याकडे असणारा अन्नधान्य, इतर साधन सामग्री शस्त्रास्त्रे, दारुगोळा, लुटून घ्यावयाचा शत्रुच्या सैन्यामध्ये आपली दहशत निर्माण करावयाची त्यांचे सामान घेऊन निघुन जायचे अशा प्रकारे यशवंतराव होळकर शत्रुच्या विरुध्द आक्रमण करण्यात तरबेज होते. यशवंतराव होळकर यांची कल्पना शक्ती, युध्दातील डावपेच आपल्या सैनिकांना प्रोत्साहन आणि अचानकपणे तीव्रतेचे आक्रमण करुन शत्रुला आश्चर्याचा धक्का देणे हे युध्दातील कौशल्याचे वर्णन जगातील इतिहासकार ही यशवंतराव होळकर यांच्या बाबतीत करतात.

यशवंतराव होळकर यांचे युध्द कौशल्य आणि युध्दातील गतिमानतेद्वारे आपल्या सैनिकांना प्रोत्साहीत करण्याचा त्यांचा स्वभाव होता.[64] त्याला अनुसरुणच यशवंतरावांचे सैन्य युध्दात शत्रुच्या विरुध्द लढण्यासाठी कटीबध्द असायचे त्यांची युध्दातील डावपेच, आक्रमण हे गतिमानतेने शत्रुच्या सैन्यावर तुटून पडायचे ही त्यांची युध्दानिती असायची, त्यामुळे शत्रुसैन्याचे मोठ्या प्रमाणात नुकसान होत शत्रु मृत्यूमुखी पडत, शत्रुला भयभीत करत त्यामुळे तीव्रता ही त्यांच्या आक्रमणामध्ये सातत्याने दिसुन येते. जर एखाद वेळी शत्रुचे सैन्य आपल्या सैन्याला जास्त आहे असे वाटेल त्या युध्दात आपला पराजय होवू शकेल असे जर त्यांना वाटत असेल त्यावेळी यशवंतराव आपल्या सैनिकांना प्रोत्साहन देऊन त्यांचे मनोधैर्य वाढविताना दिसतात. उच्च प्रतीच्या मनोधैर्यावर आणि गतिमानतेवर यशवंतराव होळकर इंग्रजांवर विजय मिळवताना दिसतात.

## 4.11 यशवंतरावांची युध्दविषयक प्रत्यक्ष कारवाई :-

पेशव्यांच्या कालखंडा पासुन मराठा सरदारांच्या फौजेमध्ये पायदळा पेक्षा घोडदळाचा भरणा जास्त होता.[65] पहिल्या पासुन मराठ्यांनी एखाद्या शत्रुवर प्रत्यक्षकारवाई करण्यासाठी एक पध्दत अशी होती की मराठ्यांचा पायदळा पेक्षा घोडदळांवर जास्त कार्यचाले व त्यांचा मोठया प्रमाणात उपयोग होतो. तळ पाडुन, खंदक खणून लढण्याची त्यांची पध्दत नव्हती, धिमेपणाने लढत बसणे हे त्यांच्या गुरुने त्यांना कधी शिकवले नव्हते. शत्रु जर आपल्या आटोक्यामध्ये आला तर त्याच्यावर दौड मारुन प्रत्यक्षपणे हल्ला चढवावा किंवा घाला घालावा व एका हल्ल्याच्या धावामध्ये जितके जास्त तुकडे करता येतील तितके तुकडे करावे. परंतु शत्रुजर आपल्या आटोक्यात येण्यासारखा नसेल किंवा आपल्या पेक्षा वरचढ असेल तर त्या पासुन फटकुन दूर राहावे त्याच्या आवती भौवती घिरटया घालून त्याची रसद पुरवठा व्यवस्था लुटून शत्रुला जेरीस आणावे. अशा पध्दतीने यशवंतराव होळकर यांचे प्रत्यक्ष कारवाई संबंधी नियम होते.

जनरल लेकबरोबर यशवंतराव होळकर यांची लढाई चालु असता भरतपुरच्या जाटांनी यशवंतरावास किल्ल्यात येण्यास सांगितले.[66] त्यावेळी यशवंतराव होळकरांनी जाटास असे बाणेदार उत्तर पाठविले होते की, किल्ल्याचा आश्रय घेऊन लढणे आमचे ब्रीद नव्हे, मराठ्यांची गादी घोड्याच्या पाठीवर यासाठी आम्ही किल्ल्याच्या बाहेर राहुन शत्रुला हैराण करु. मराठ्यांच्या इतिहासाचा युध्दाविषयीचा अभ्यास केला असता असे लक्षात येईल की मराठ्यांनी कधी आश्रय घेऊन युध्द केलेले दिसत नाही.[67] त्यामुळे यशवंतराव होळकर यांनी प्रत्यक्ष कारवाईला प्राधान्य दिलेले आहे. किल्ल्याचा आश्रय घेऊन लढणे म्हणजे स्वत:ला बंदीस्त करुन घेणे होय. मर्यादीत काळासाठी स्वत:चे संरक्षण करणे हे होय. परंतु घोड्याच्या गादीवर विराजमान होऊन प्रत्यक्ष रणांगणावर प्रत्यक्ष कारवाई शत्रुच्या विरुध्द करणे याला प्राधान्य यशवंतराव होळकरांनी दिलेले दिसुन येईल. प्रत्यक्ष शत्रुला हैराणकरु, त्यांचा पराभव करु तोही प्रत्यक्ष कारवाईनेच.[68] गनिमी युध्दतंत्राचा वापर करुन सैन्याला हैराण करु परंतु कोणत्याही परिस्थिती मध्ये किल्ल्याचा आश्रय घेऊन युध्द करण्यात यशवंतराव होळकरांच्या युध्दनितीमध्ये बसत नव्हते त्यामुळे प्रत्यक्षपणे शत्रुच्या विरुध्द कारवाई करणे हे यशवंतराव होळकरांना सोयीचे वाटत होते. मराठ्यांना कधी स्वत:ला बांधुन घ्यायचे माहित नव्हते, स्वतंत्र व्यक्तिमत्वाच्या आधारावरच ते अटकेपार मराठेशाहीचा झेंडा फडकवताना दिसतात. त्यामुळे यशवंतरावांची स्वतंत्रवृत्ती देशाभिमान यामुळे यांना संपूर्ण भारतभर

घोडदळावर भ्रमंती ती ही इंग्रजांच्या विरुध्द करावी लागली. यामुळे रणजितसिंह जाटाला भरतपुरच्या किल्ल्यामध्ये न येण्याचे त्यांनी सांगितलेले दिसुन येते.

यशवंतराव होळकर युध्दाच्या वेळी निर्भयपणे रणांगणात प्रत्येक सैन्याच्या ठिकाणावर जात.[69] यशवंतराव हे संपूर्ण रणक्षेत्राचे निरीक्षण करुन आपल्या सैनिकांना मार्गदर्शन करत असे त्यांच्या दृष्टीने जर रणांगणातील सैनिकांत किंवा नियोजनात अस्थिरता आली तर त्या परिस्थितीला पूर्वपदावर आणत ही यशस्वीता यशवंतरावाच्या जीवनातील महत्वाची उपलब्धी समजावी. ज्यावेळी युध्दाला सुरुवात होत त्यावेळी यशवंतराव प्रत्यक्ष युध्दाच्या कारवाईत स्वत: सहभाग घेत युध्दाच्या रणक्षेत्रात शत्रुच्या विरुध्द आपल्या सैनिकांना प्रोत्साहन देत. मार्गदर्शन करीत प्रत्येक सैनिकाला कशाची आवश्यकता आहे. याची पाहणी स्वत: करत रणांगणामध्ये शत्रुच्या विरुध्द लढत असताना आपल्या सैन्याची काळजी करणारा या कालखंडातील एकमेव मराठा सरदार पहावयास मिळतो. प्रत्यक्ष युध्दाला सुरुवात होताच युध्दक्षेत्राचे स्वत: निरीक्षण करुन शत्रुची युध्दानिती डावपेच युध्दतत्वे काय आहेत यावर त्यांचे निरीक्षण असे त्याला अनुसरुन आपल्या सैनिकांना मार्गदर्शन करत जर युध्दात त्यांनी नियोजन पूर्वक केलेले डावपेच, युध्दनिती आणि सैनिकांमध्ये एकजिन्सी पणा जर दिसत नसेल शत्रुच्या विरुध्द अंमलात येत नसेल किंवा आपल्या सैनिकांवर शत्रुचा प्रहार वाढत असेल त्यावेळी स्वत: युध्द क्षेत्रात उतरुन आपल्या सैन्याची घडी व्यस्थीत बसवीत आणि संपूर्ण रणभूमीवर आपली नजर ठेवत यशवंतराव होळकर हे मराठेशाहीतील अशा प्रकारचे व्यक्तिमत्व होते. जे देशाच्या अखंड भारतासाठी त्यांनी इंग्रजांच्या विरुध्द एकटे स्वत: लढले. युध्द क्षेत्रात स्वत: प्राणाची बाजी लावून आणि आपल्या सैन्याला मार्गदर्शन व त्यांचा उत्साह वाढविण्यासाठी स्वत: युध्दात सहभाग घेत आणि शत्रुच्या सैनिकांना कापून काढत अशा परिस्थीतीत युध्दाचे डावपेच शत्रुविरुध्द खेळत या युध्द कौशल्याच्या यशस्वीतेवर यशवंतराव होळकर यांच्या जीवनातील महत्वाची उपलब्धी समजली जाते.

ज्या ठिकाणाहून तोफेतुन गोळे फेकले जात होते तेथे यशवंतराव हजर होते जेथे इंग्रजांच्या तोफांचे गोळे येऊन पडत होते तेथे ही यशवंतराव हजर होते.[70] यशवंतराव घोड्यावर बसुन आपल्या घोडे स्वारा बरोबर दौड करित. आणि आपल्या पायदळा बरोबर शत्रुच्या गोटात घुसून त्यांच्या पलटणी कापून काढीत. "तो पावसात भिजत होता, चिखलात रुतत होता आणि तो थंडीने कुडकुडत होता पण इतक्या ही संकटातून तो शत्रुला जेरीस आणीत होता." यशवंतराव होळकर प्रत्यक्ष युध्दाच्या कारवाई

मध्ये आपल्या ठरवलेल्या युध्द डावपेचाच्या माध्यमातून व युध्दनीतीच्या धोरणातून शत्रुच्या सैन्यावर प्रत्यक्षकारवाई करताना दिसतात. शत्रुकडे असणारी वेगवेगळी शस्त्रास्त्रे, तोफखाना त्यांची कधी भीती वाटली नाही. शत्रुसैन्यदलाचे तोफाद्वारे टाकण्यात येणाऱ्या तोफगोळया जवळ उभा असे हिंमत धाडस, शौर्य हे सर्व सततच्या युध्दातून अनुभवास आलेली प्रचिती असते. तोफेचा गोळा जवळ येऊन पडला तरी ते डगमगत नाही. युध्दावर आणि आपल्या प्रत्येक सैन्यदलावर प्रेम करणारे हे यशवंतराव होळकरां शिवाय मराठेशाहीच्या उत्तर कालखंडात दुसरा कोणी मराठा सरदार झालेला दिसत नाही. किती ही ध्येय वेडी माणसे आपल्या मातृभूमीच्या रक्षणासाठी कोणत्याही परिस्थितीत स्वत:ला ढाळुन घेत यशवंतरावांचा पिंडच हा युध्द नेतृत्वाचा होता. त्याला अनुसरुनच यशवंतरावांनी प्रत्येक युध्दात आपल्या प्रामाणिक प्रयत्नावर, ध्येयावर, रणांगणावर आणि आपल्या सैन्यावर अतुट पणे प्रेम केलेले दिसुन येते.

यशवंतराव होळकर आपल्या सैन्याचे प्रत्यक्ष युध्द चालु होण्या अगोदर तीन विभाग करुन शत्रुच्या सैन्यावर डावीकडून, उजवीकडून आणि समोरुन अशा तिन्ही बाजूंनी हल्ले करत.[71] यशवंतराव युध्दात प्रत्यक्ष कारवाई करत असताना त्या युध्दाचे रणक्षेत्र कोणत्या प्रकारचे आहे. म्हणजे भौगोलिक रचनेनुसार त्याला अनुसरुन युध्दाची रणनिती यशवंतराव आखत असे यशवंतरावांनी अशा प्रकारे कॅप्टन मॉन्सनला मुकूंदराखिंडीत गाठले व त्याच्या तीन्ही बाजूने त्याचावर हल्ला करण्यात आला. यशवंतराव होळकर हे भौगोलिक घटकांच्या आणि हवामानाच्या अंदाजावर आपले युध्द डावपेच आखत त्यावरच त्यांच्या युध्दातील यशस्वीता ही अवलंबून होती व प्रत्यक्ष कारवाई कशा पध्दतीने यशवंतराव करतील हे शत्रुला प्रत्यक्ष हल्ला केल्यावरच त्यांची युध्दनिती व युध्दातील डावपेच समजले जात.

यशवंतराव होळकरांच्या सैन्यातील बंदुकधारी घोडदळाच्या गोळया आणि पावसाच्या धारा या दोन्हीचा सारखाच मारा शत्रुच्या सैन्यावर करत.[72] पावसाळी हवेचा फायदा घेऊन यशवंतरावांनी इंग्रजांच्या फौजेला जेरीस आणिले होते. यशवंतराव होळकरांच्या सैन्यदलामध्ये धनुर्रधारी दळ, घोडदळ, पायदळ, तोफखानादळ, बंदुकधारी दळ इत्यादींचा समावेश होता. परंतु युध्दाची दाहकता पहाता आणि समोरच्या शत्रुची लष्करी ताकदीचा विचार करता यशवंतराव होळकर त्या त्या भौगोलिक रचनेनुसार सैन्यदलाचा उपयोग करुन घेत. तशाच पध्दतीने यशवंतराव होळकर यांनी मुकुंदरा खिंडीच्या युध्दात बंदुकधारी घोडदळाचा उपयोग कर्नल मॉन्सनच्या विरुध्द केलेला दिसुन

येईल. भर पावसाळ्यात मॉन्सनच्या विरुध्द यशवंतरावांनी युध्दमोहीम छेडली होती. त्या परिस्थितीचा फायदा घेऊन यशवंतरावांनी इंग्रजांच्या विरुध्द बंदुकधारी घोडदळाचा भर पावसाळ्यात उपयोग केला आहे. यशवंतराव होळकर यांचे 20,000 घोडदल लेफ्टनंट ल्युकनच्या तुकडीवर प्रत्यक्ष कारवाई करुन व या तुकडीतील सगळ्या घोडेस्वारांना यशवंतराव होळकर व त्यांच्या सैनिकांनी कापून काढले.[73] यशवंतराव होळकर यांची युध्दनिती, आक्रमक कारवाई ही घोडदळाच्या माध्यमातून वारंवार प्रत्येक युध्दात दिसून येते. त्यांची युध्दातील प्रत्यक्ष कारवाई दरम्यानची आक्रमकताही घोडदळाच्या माध्यमातून दिसुन येते. कर्नल मॉन्सनचा पाठलाग करता करता तो जरी पुढे निघुन गेला तरी यशवंतरावाच्या बहुसंख्य घोडदळाच्या माध्यमातून इंग्रज सैन्य अधिकारी लेफ्टनंट ल्युकनच्या फौजेवर आक्रमकपणे घोडदळाच्या माध्यमातून त्यांचे सैन्य कापुन काढलेले दिसते. ही यशवंतरावांची आक्रमकता आणि प्रत्यक्षकारवाई केलेली युध्दातील डावपेचाचा एक भाग दिसतो.

इंग्रजांशी मैदानात समोरा समोरची लढाई करावयाची नाही हे यशवंतराव होळकरांच्या युध्दनीतीचे तंत्र होते.[74] इंग्रजांची लष्करी शक्ति आपल्यापेक्षा जास्त आहे. याची जाणीव यशवंतरावांना होती. त्याला अनुसरुनच यशवंतरावांनी इंग्रजाचा युध्दात प्रत्यक्ष आक्रमण करण्याऐवजी गनिमी युध्दतंत्राचा वापर याठिकाणी केलेला दिसुन येईल. समोरा-समोरच्या युध्दात इंग्रजांचा तोफखाना हा शक्तिशाली होता. यशवंतरावांकडे इंग्रजां एवढा मोठ्या संख्येने तोफखाना नव्हता त्यामुळे आपल्या सैनिकांचे नुकसान जास्त होवू शकते यासाठी त्यांनी घोडदळाच्या माध्यमातून गनिमी तंत्राचा वापर इंग्रजांच्या विरुध्द सातत्याने केलेला आहे.

हडपसरच्या युध्दामध्ये यशवंतराव होळकर यांची शिपाईगिरीची व खंबीरतेची शर्थ झाली.[75] यशवंतराव होळकरांची हडपसरच्या युध्दामध्ये सर्व रणक्षेत्रावर त्यांची नजर सारखी फिरत असे आपल्या सैन्याच्या प्रत्येक हालचालीवर त्यांच्याच आदेशाने डावपेच आखले जात होते व त्याची अंमल बजावणी सैन्याला करावी लागत. प्रत्येक हल्ला यशवंतराव होळकर हे स्वत:पुढे होऊन करी कोणत्याही ठिकाणी रणक्षेत्रात आणीबाणीच्या प्रसंगी यशवंतराव हे सर्वांच्या पुढे आघाडीस जाऊन छातीठोक पणे उभे राहुन शत्रुसैन्यावर प्रत्यक्ष कारवाया करत. यशवंतराव होळकर यांची एक विशेषता होती की प्रत्येक युध्दात ते स्वत: सहभाग घेवून स्वत:चा जीव धोक्यात घालुन युध्दात शत्रु समोर उभा राहत.[76] यशवंतराव होळकर हे प्रत्येक युध्दात जातीने लक्षघालीत शत्रुच्या गोटामध्ये जाऊन शत्रुवर हल्ला करत स्वत:च्या जीवाची पर्वान करता जो युध्दात सहभाग घेतो त्याचा विजय

निश्चित असतो हे यशवंतरावांनी दाखवून दिलेले आहे. त्यामुळे यशवंतराव होळकर हे प्रत्येक युध्दात स्वत: प्रत्यक्षकारवाई करण्यासाठी स्वत: सैन्याच्या पुढे उभा असे.

## 4.12 **यशवंतरावांची लष्करी छावणी :-**

पेशवे कालखंडामध्ये पेशव्यांच्या किंवा मुख्याच्या ढाला नवीन मुक्कामावर दाखल झाल्या की, त्याच्या पाठोपाठ लहान मोठ्या सरदारांचे बिनिवाले आपापल्या मुख्याच्या ढाला घेऊन हजर होतात व आपली नवी जागा कायम करतात.[77] एकदा मोहीमेचे नेतृत्व करणाऱ्या व त्यांच्या सरदाराच्या जागा ठरवून झाल्याची गोटातील एका भागामध्ये मात्र व्यवस्थित पणा पहावयास मिळतो. तो व्यवस्थित पणा म्हणजे लष्कराचा बाजार, मुख्य सेनानी व सरदार यांच्या डेऱ्या समोर रुंदरस्ता आखुन त्याच्या दोन्ही बाजूस पाल उभारुन वाणी, उदमी, स्वत:ची दुकाने मांडतात या बाजारपेठेत प्रत्येक प्रकारची खरेदी करता येते, डेरे, तंबु उभारले गेले की भारदारीची तट्टे, उंट, घासदाणा, जमा करण्याकरिता बाहेर जातात. सरदाराची स्वारी मुक्कामावर दाखल होते तो घासदाणा सैन्यात येऊन पोहचतो, बहुतेक सैन्याचा कारभार हा राऊतांचा असे असंख्य राऊतांचा जमाव हा कित्येक कोसावर पसरलेला असल्याने मार्गाच्या सुरक्षेची काळजी राहात नाही. त्याच प्रमाणे लमाणांचे तांडेच्या तांडे हजारो बैल घेऊन सैन्याच्या बरोबर बाजारात, सर्व प्रकारचे व्यापार, उदीम, धंदे चालतात. शिपाईगिरी खडतर, कष्टाची वाटत नाही, वर्षेच्या वर्षे शिलेदार आपल्या गावी, घरी जितक्या सुखाने राहतो तितक्याच मजेत हा शिलेदार सैन्यामध्ये असतो. मराठ्यांची राहणी साधी यांच्या गरजा किती तरी थोड्या आणि सैन्या बरोबर मोठाले बाजार असल्यामुळे लष्करी पेशा स्वीकारणाऱ्या शिलेदाराच्या रोजच्या राहणीमानात विशेष काही फरक पडत नाही परप्रांतात सुध्दा तो देशावर असल्याप्रमाणे सुखी असतो याचा परिणाम म्हणजे इतर देशात दिसुन न येणारी अशी ही शिलेदारिची आवड मराठ्यात दिसुन येते.

मराठी लष्कर हे इंग्रजांच्या लष्करा पेक्षा वरचढच म्हटले पाहिजे.[78] राऊतांची ही अफाट फौज समुद्राप्रमाणे चोहीकडे पसरलेली असल्यामुळे आपल्या गोटाच्या संरक्षणा करिता इंग्रजांच्या सैन्या भोवती ज्या पध्दतीने खंदक, चौक्या, ठाणी या दृष्टीस पडतात. तशा मराठ्यांच्या छावणी भौवती दिसत नाहीत. नाही म्हणावयास रात्रीच्या वेळी छबीन्याच्या तुकड्या चारही बाजुला फिरुन गस्त घालतात. शिवाय सैन्यदलाचा गट दांडगा असल्यामुळे एक भाग नेहमीच हशील म्हणून आघाडीस कुच करतो.

जसजशी शत्रुशी संबंध जवळ येतो तसतशी या हशीलाची पुन: विभागणी करुन नुसत्या सड्या सैनिकांच्या तुकड्या आघाडीस रहातात. त्याशिवाय सर्व सामान सुमान काही अंतरावर पिछाडीस ठेवून ही सडीफौज नावा प्रमाणे सुटसुटीत रहाते. मराठी फौजेच्या प्रत्येक पथका बरोबर एक राहुटी, शामियाना याशिवाय डेरे, तंबु दिसावयाचे नाहीत.[79] राऊतांचे घोडे समोरा समोर बांधुन जो मार्ग तयार व्हावयाचा त्या मार्गाच्या टोकाला राहुटी उभी करावयाची आणि या राहुटीचा उपयोग राऊत फक्त पाऊस, वाऱ्याच्या वेळी करील इतर वेळेला सकाळ, संध्याकाळ ही राहुटी म्हणजे शिलेदारांची बसण्या उठण्याची जागा असे. राऊतांचा मुक्काम नेहमी आपल्या घोड्या जवळ असायचा त्याचठिकाणी तो रात्रीची विश्रांती घेई. पथकाबरोबर कणखर तट्टे असावयाचे कुच करुन दुसरा मुक्काम सैनिकांचे दस्ते ठिकाण गाठते तो मोतद्दार ही तट्टे आसपास फिरवून काही कबाड, घासदाणा, जमा करुन आणतात किंवा स्वारांचे सामान, सुमान मुक्कामाला पोंचते करुन घासदाण्याच्या शोधार्थ बाहेर पडतात. इतके करुन जनावरांच्या चारा, पाण्याची सोय झाली नाही तर स्वत: राऊत बाहेर पडुन आपल्या जनावरांची सोय लावी नंतर स्वत:च्या सोई पहात असे.

यशवंतराव होळकर यांच्या लष्करी छावण्या ह्या अत्यंत साध्या अवजड साहित्य नसलेले स्त्रिया, नोकर चाकर बिनलढाऊ सैन्य इत्यादींचा अभाव होता.[80] यशवंतरावांच्या या लष्करी छावण्यामध्ये बाजार बुणगे व अवजड साहित्य नसल्या कारणाने यांचे सैन्यदल हे युध्दाच्या रणक्षेत्रात विद्युत वेगाच्या हालचाली करत. त्याच बरोबर घोडदळाचा गनिमी युध्दतंत्राचा उपयोग करण्यात आलेला दिसुन येईल, यशवंतराव होळकर ज्यावेळी युध्दाच्या मोहीमेवर जात असताना हालआपेष्टांची त्यांना व त्यांच्या सैन्याला सवयच झाली होती. दुरवरच्या मोहिमा करत असताना यांचे सैन्य उपासमारीला ही सरसावलेले होते त्यामुळे यशवंतरावांचे सैन्यदले ही सुखासीन बनलेले नव्हते. त्यामुळे सैन्य कोणत्याही प्रकारच्या साहसी मोहिमा यशवंतरावांच्या सैन्यदलांच्या गरजा ह्या कमीत कमी असायच्या यांच्या सैन्यदलात नर्तकी, स्त्रियां, विलासी जीवनाला परवानगी नव्हती यांची यावरुन सैन्यदलाची शिस्त किती कडक असायची हे दिसुन येते. यशवंतराव होळकर जर एखाद्या मोहिमेवर असताना त्या युध्दात मिळणाऱ्या शत्रुची धनसंपत्ती काही ठराविक भाग सैन्यदलाच्या सरदारांना ठेवून घेण्यास परवानगी असायची प्रत्येक मोहिमे मध्ये यशवंतराव होळकरांच्या विजयास त्यांच्या प्रेरणा, सैन्यदलातील शिस्त, साधेपणा, खडतर प्रवास, नेतृत्वाची प्रेरणा इत्यादी घटक कारणीभूत ठरत. यशवंतरावांनी हिंग्लाजगडाची निर्मिती करुन आपल्या सैन्यदलाची लष्करी छावणी

हे प्रमुख केंद्राच्या स्वरुपात विकसित केली होती.[81] यशवंतराव होळकर आपल्या सैन्यदलासाठी व संचालनासाठी प्रमुख केंद्रे हे प्राकृतिक, धार्मिक आणि प्राचीन ठिकाणावर करत. यशवंतराव होळकर यांनी आपले गड, किल्ले यांना लष्कर छावणी व लष्करासाठी लागणारी शस्त्रास्त्रे, तोफखाना इत्यादी सामरिक दृष्टीने महत्वपूर्ण ठिकाणावर करण्यात आले होते. यशवंतराव होळकर हे एक विशाल सैन्याचे स्वामी होते.

## 4.13 **यशवंतरावांचे गुप्तहेर खाते :-**

आपल्या हालचालींच्या व लढाईच्या योजनांचा पाया असलेली शत्रु व त्याचा प्रदेश यांच्या बद्दलची सर्व प्रकारची माहिती म्हणजे इंटेलिजन्स होय.[82] युध्दावरील पाठ्यपुस्तके सांगातात की सेनापतीने नेहमी विश्वसनीय माहिती विचारात घ्यावी व नेहमी संशयी राहावे पण अशा दुर्बल म्हणीचा काय उपयोग? कल्पना संपली की अशा प्रकारच्या म्हणी सांगितल्या जातात. युध्दातील वेगवेगळ्या बातम्या परस्पर विरोधी असतात त्यापेक्षा जास्त प्रमाणात खोट्या अफवा पसरविणाऱ्या असतात व अनिश्चित स्वरुपाच्या ही असतात. म्हणून आपण सेनापतीकडून एवढीच अपेक्षा करु शकतो की त्याला विशिष्ट प्रमाणात निर्णयशक्ती हवी माणसे व त्यांचे व्यवहार यांचे ज्ञान व सामान्य व्यवहारज्ञान या योगेच ही निर्णयशक्ती प्राप्त होते. युध्द चालु असताना येणाऱ्या बहुतेक बातम्या ह्या खोट्या असतात आणि युध्दातील भीतीचा परिणाम खोटेपणा व चुकीच्या बातम्या वाढण्यात होतो.

हेरांच्या सामर्थ्याचे शुक्राचार्यांनी शतक्रोशभवा वार्ता हरेकीद नेन वै याचा अर्थ 100 कोसांवरुन माहिती हेराने एका दिवसात आणावी.[83] शुक्र, मनु, कौटिल्य या प्राचीन भारतातील राजनिती तज्ञांनी हेरांचे महत्व व त्या बाबतची माहिती आपल्या ग्रंथामध्ये लिहुन ठेवली आहे. कौशल्याने हेराला गूढ पुरुष नृपतीचे नयन म्हटले आहे. परकियांची संरक्षणनीती, संरक्षण दले, सैनिकी हालचाली संदेशंवहन पध्दती, गुप्तलेखन तंत्रे इत्यादींची माहिती साधारणपणे मध्यवर्ती गुप्तवार्ता संकलन संस्थेकडून गोळा केली जाते. सामान्यपणे लष्करी गुप्तवार्ता ही शत्रुसैन्याची माहिती गुप्तहेराद्वारे गोळा करण्याात येते.[84] शत्रुसैन्याचे संख्या बळ, शस्त्रास्त्रे, युध्दाची रचना इत्यादींच्या माहितीवरुन शत्रुवर हल्ला कशा पध्दतीने करणार की बचावात्मक पवित्रा घेणार याचा अंदाज घेता

येतो. त्याप्रमाणे शत्रुच्या विरुध्द डावपेच आखणे राखीव सैन्य दलास पाचारण करणे किंवा तोफखाना दलास विशिष्ट प्रकारची कामगिरी देणे हे ठरविता येते. शत्रुसैन्याची मर्मस्थाने, भेद्यस्थानामुळे शत्रुला हेरता येते. भौगोलिक घडणीप्रमाणे युध्दाची व्युहरचना, तोफखान्याचा वापर आपल्या हालचालीची सुरक्षितता इत्यादींची योजना आखता येते. दळणवळणाची, रस्ते, पायवाटा इत्यादींची माहिती गुप्तहेराद्वारे माहिती झाल्यास प्रत्यक्ष लष्करी हालचालीची माहिती मिळाल्याने शत्रुच्या युध्दहेतू विषयी अंदाज घेता येतो. नाहीतर आपण आखलेल्या डावपेचावर त्याचा परिणाम होऊ शकतो. हवामानाविषयी गुप्तहेराद्वारे माहिती मिळाल्यास युध्द ज्या ठिकाणी लढले जाणार आहे त्या भागातील सुर्योदय-सुर्यास्त कधी होणार धुके, पाऊस, वाऱ्याची दिशा, वादळे इत्यादी विषयीची माहिती गुप्तहेराद्वारे प्राप्त झाल्यास शत्रू सैन्याच्या विरुद्ध गोळामारी, रणांगणावरील आक्रमण कधी व केंव्हा करावयाचे, कोणत्या बाजुने व कधी हल्ला करावयाचा इत्यादी विषयी अंदाज घेता येतो. गुप्तहेर हा राज्याचा महत्वाचा घटक असतो. त्याच्या माहिती वरुनच एखादे राज्य शत्रुच्या विरुध्द आपली सुरक्षितता आणि आक्रमण करण्याची तयारी करतो. त्यामुळे गुप्तहेराची वार्ता व गुप्तहेर हा महत्वाचा घटक मानला जातो.

यशवंतराव होळकर यांनी आपल्या सैन्यदलास उत्तम प्रकारच्या गुप्तहेरांची जोड दिली.[85] शत्रु सैन्याच्या अंतर्गत कारभारात त्यांची सिध्दता बलाबल या विषयीची माहीती आपल्या गुप्तहेराद्वारे यशवंतराव होळकर मिळवित. यशवंतरावांनी अनेक प्रकारच्या मोहिमा आखल्या अनेक राजेरजवाडे, संस्थानिकांच्या शहरातून खंडणी गोळा केली. परंतु हे सर्व मोहिमा आखण्याच्या अगोदर यशवंतराव होळकर आवश्यक ती माहिती आपल्या गुप्तहेराद्वारे मिळवत असे. त्यामुळे यशवंतरावांना या मोहिमेमध्ये कधीही अपयश आले नाही किंवा त्यांना अपेक्षित खंडणी मिळाली नाही असे कधी झाले नाही यामुळे यशवंतरावांनी गुप्तहेर खात्याचे महत्व ओळखून आपल्या सैन्य दलास गुप्तहेरांचे जाळे या नवीन विभागाची जोड देण्यात आलेली होती. त्यामुळे शत्रुच्या विरुद्ध युध्दातील विजय मिळविण्यास जास्त सोयीचे झालेले दिसुन येते. हे सर्व यशवंतरावांच्या कार्यक्षम व प्रामाणिक गुप्तहेरांमुळे शक्य झाले.

भारमल दादा होळकरांसारखी माणसे यशवंतराव होळकरांना बातम्या पाठवीत असल्याचा (अप्रत्यक्ष) पुरावा आहे.[86] राज्यातील स्वकीय व परकीयांचे उपद्व्याप कुठे कसे चालले होते. याविषयी अज्ञानात राहाण्याची पाळी आली नाही. यशवंतराव होळकर यांच्या खास मर्जीतील आणि

होळकर घराण्याचे निष्ठावाण म्हणून भारमलदादा यांची ओळख होती. यशवंतराव होळकर जर राज्याच्या बाहेर मोहिमेवर असतील तर त्यांना गुप्त बातम्या या भारमलदादा होळकर यांच्याद्वारे मिळत यशवंतराव कोणत्या भागामध्ये मोहिमेवर आहेत शत्रु सैन्याच्या हालचाली काय आहेत. हे त्यांना त्यांच्या गुप्तहेराद्वारे बातम्या मिळत असे म्हणजे यशवंतरावांच्या आखत्यारीत असणारे गुप्त हेरांचे जाळे किती मजबुत होते या वरुन लक्षात येईल. गुप्तहेरांच्या माहितीवरच यशवंतरावांनी इंग्रजांचा सातत्याने पराभव केलेला दिसुन येतो. यशवंतराव होळकर यांच्याकडे इंग्रज वकिलाची सोय नव्हती.[87] यशवंतरावांना होळकर राज्यात इंग्रजी जाणणारी माणसे नाहीत म्हणून तसा कोणी लायक इसम नेमावा त्यातून इंग्रजच नेमलेला बरा अशी सुचना इंग्रजा कडून आली होती. परंतु आपल्या राज्यात इंग्रज फिरकायला नको ही यशवंतरावांची दृष्टी असल्याने ती सुचना अव्हेरली गेली. याठिकाणी यशवंतराव होळकरांची दुरदृष्टी दिसुन येते. आपल्या राज्यातील अंतर्गत माहिती दरबारामध्ये चालणाऱ्या चर्चा, हालचाली, आपल्या सैन्य दलाविषयी माहिती ही शत्रुपक्षा पर्यंत जायला नको यासाठी यशवंतरावांनी आपल्या होळकर राज्यात इंग्रजांना नको म्हणून वरिल सुचना फेटाळलेली दिसते. इंग्रजांच्या लष्करी हालचालींची माहिती यशवंतराव होळकरांना खडानखडा गुप्तहेराद्वारे विश्वसनियरित्या माहिती मिळत होती. त्या माहितीला अनुसरुन यशवंतराव लष्कराचे हल्ले चुकवीत असत. यशवंतराव होळकरांचे गुप्तहेर जाळे किती मोठ्या प्रमाणात कार्यक्षम होते हे वरील विधानावरुन लक्षात येईल. इंग्रजांच्या प्रत्येक हालचालीची माहिती यशवंतरावांना मिळत होती.[88] म्हणजे इंग्रजांच्या गोटामध्ये यशवंतरावांचे माणसे गुप्त बातम्या मिळविण्याचे कार्य करत होते हे दिसुन येईल. मिळणारी माहिती ही विश्वसनीय असे म्हणजे गुप्तहेर हा किती आपल्या कामाशी व आपल्या नेतृत्वाशी प्रामाणिक आहे हे स्पष्ट होते. इंग्रजांच्या यशवंतराव होळकरांच्या विरुध्द चालणाऱ्या लष्करी हालचाली व कधी आक्रमण करणार, कशा प्रकारे, कुठे करणार अशा वेळी यशवंतराव इंग्रजांचे आक्रमण हे चुकवत अयशस्वी करत होते. त्यामुळे इंग्रज हे यशवंतरावांबद्दल हतबल झालेले दिसुन येतात.

आम्ही आपल्याकडून आपल्या लष्कराची बातमी न फुटण्याची किती ही काळजी घेतली तरी होळकराला ती आगाऊ कशी समजते हे गुढ आहे.[89] आपल्या संबंधीची बातमी फुटली नाही अशा प्रकारच्या खात्रीने होळकराच्या तळावर छापा घालायला जावे तो होळकर तेथून केंव्हाच दहा वीस मैल दुसरीकडे निघुन गेलेला असा अनुभव नेहमी इंग्रजांना येतो. इंग्रजांच्या सैन्यदलामध्ये

यशवंतराव होळकरांचे सैन्य आहे की काय अशी शंका येते. इंग्रजांच्या प्रत्येक गुप्तकारवायांची माहिती यशवंतरावाला भेटते याबद्दल इंग्रज स्वत: संभ्रमीत झालेले दिसतात. यशवंतराव होळकरांवर हल्ला करण्यासाठी इंग्रजांनी आखलेल्या डावपेचाच्या माध्यमातून करण्यात येणाऱ्या हल्ल्या अगोदरच यशवंतराव आपली लष्करी छावणी सोडुन इंग्रजांपासुन कोसोदूर निघुन गेल्याची बातमी इंग्रजांना समजते. यामध्ये यशवंतराव आपल्या घोडदळाच्या माध्यमातून इंग्रजांना अचंबित करित. कार्यकुशल व प्रामाणिक गुप्तहेर हे यशवंतरावांच्या युध्दातील विजयाचे एक प्रमुख घटक मानला पाहिजे. यशवंतरावांना पुण्याकडे येत असताना गुप्तहेराद्वारे सुचना मिळाली की शिंदेची फौज येत आहे.[90] यशवंतरावांनी लगेचच आपल्या सरदार फतेहसिंहमाने व शहामतखान यांना सांडणी स्वाराद्वारे माहिती पाठविले की अहमदनगरकडे येणाऱ्या शिंदेच्या फौजावर हल्ला करण्यात यावा. यशवंतराव होळकर पुण्याकडे जात असताना 2 ऑगस्ट रोजी यशवंतराव संगमनेर याठिकाणी पोहोचले होते. त्यावेळी त्यांनी गाळणा-चांदवड किल्ल्यावर कब्जा केला होता. 11 सप्टेंबर 1802 रोजी यशवंतराव नाशिकच्या दक्षिण पश्चिम भागातून तीन लाख रुपये खंडणी गोळा करत होते. त्यावेळी त्यांना गुप्तहेराद्वारे माहिती प्राप्त झाली की, शिंदयाची फौज आपला पाठलाग करत आहे. सांगण्याचे तात्पर्य हे आहे की, शिंदयाची फौज तापी नदी उतरुन येत आहे. म्हणजे वाटेत यशवंतराव होळकरांचे गुप्तहेर आहेत. यशवंतराव संगमनेर नाशिक जवळ असताना त्या ठिकाणी त्यांना माहिती मिळते. म्हणजे यशवंतरावांचे गुप्तहेर जाळे किती सक्षम होते त्यांची दुरदृष्टी गुप्तहेराच्या माहितीवर लगेच पुढील डावपेच आखणे हे मराठेशाहीच्या सरदारामध्ये क्वचित आढळुन येईल. यशवंतराव होळकर चोहोकडील बातम्या गुप्तहेराच्या माध्यमातून मिळविण्याच्या कार्यात अतिशय जागरुक व कुशल असल्याने युध्दात त्यांना सातत्याने विजय मिळत गेलेले दिसतात.

यशवंतराव होळकर हे शत्रुची स्थिती शक्ती भौगोलिक परिस्थिती इत्यादी विषयी संपूर्ण माहिती इत्यंभूत ठेवत असे.[91] यशवंतराव होळकरांच्या जीवनातील जास्तीत जास्त वेळ हा घोड्याच्या पाठीवरच गेलेला आहे. त्यामुळे त्यांना युध्दातील कौशल्य, डावपेच इत्यादीमध्ये नैपुण्य प्राप्त झालेले होते. यशवंतराव होळकर ज्या ज्यावेळी एखाद्या मोहीमेवर असतील त्या त्या वेळी त्यांना त्यांच्या गुप्तहेराद्वारे शत्रुच्या ठिकाणाची माहिती प्राप्त होत असे. त्याच बरोबर शत्रुचे सैन्य, शस्त्रास्त्रे, तोफखाना, सैन्य संख्या इत्यादी बद्दलची माहिती विश्वसनीय प्राप्त होत असे या माहितीच्या आधारावरच शत्रुच्या विरुध्द यशवंतरावांची युध्दनिती, डावपेच अवलंबून असत त्याच बरोबर शत्रुच्या प्रदेशातील

भौगोलिक परिस्थितीचे ज्ञान माहिती इत्यादीचा अभ्यास करुनच शत्रुसैन्याच्या विरुध्द आक्रमण करत भौगोलिक रचनेचा अंदाज घेवून तेथील हवामान, जंगले, नद्या, नाले, दऱ्याखोऱ्या इत्यादी विषयीच्या गुप्तहेराद्वारे मिळालेल्या माहितीच्या आधारेच यशवंतराव होळकर पुढील नियोजन आखत एकंदरीत पहाता कोणत्याही राज्याची गुप्तहेर संघटना ही कार्यक्षम, प्रामाणिक असेल तरच त्या राज्याचा विजय सातत्याने होत असतो. याला अनुसरुनच यशवंतराव होळकरांची इंग्रजांच्या विरुध्दची घोडदौडही सातत्याने विजय प्राप्त करताना दिसते.

## 4.14 यशवंतरावांची लष्करी साधन सामग्री व पुरवठा व्यवस्था :-

यशवंतरावांच्या सैन्यदलांची लढाऊ क्षमता ही प्रामुख्याने पुरवठा व्यवस्थेवर किंवा वितरण व्यवस्थेवर अवलंबून असे.[92] सैनिक किंवा आवश्यक वस्तुंचा पुरवठा करण्याच्या कार्यामध्ये कच्चा मालाच्या पातळी पासुन पक्क्या मालाच्या सर्व वस्तु तसेच त्यांच्या भूमिकांचा वापर होणे आवश्यक असते. युध्दाच्या क्षेत्रावर जाणारा प्रत्येक सैनिक हा परिपूर्ण आहे किंवा नाही त्याची क्षमता योग्य आहे का नाही त्याच्याकडे पुरेशा प्रमाणात अन्न, वस्त्र, शस्त्रास्त्रे, दारुगोळा इत्यादी आहे का नाही याचा विचार हा पुरवठा व्यवस्थे मध्ये करणे महत्वाचे ठरते.

सैन्य जेव्हा आपल्या मोहिमेस व हालचालींना प्रारंभ करते तेंव्हा जीवनावश्यक वस्तुंचा पुरवठा आणि कुमक व निकामी सैनिक, निकृष्ट झालेली शस्त्रास्त्रे इत्यादींची भरपाईसाठी त्याला पुरवठा करणाऱ्या तळावर अवलंबून रहावे लागते.[93] सैनिकांना युद्धात पुरवठा करणाऱ्यांशी सातत्याने संपर्क ठेवावा लागतो. सैन्य आकाराने वाढत जाते तस तसे त्याला या तळावर जास्तीत जास्त अवलंबुन राहावे लागते. हे सैन्य शत्रुच्या सैन्यावर आक्रमण करणारे असो वा स्वत:च्या सीमेवर बचावाचा पवित्रा घेणारे असो दोघांनाही पुरवठा तळाची आवश्यकता सारखीच असते. या तळाचा मुख्य स्त्रोत संपूर्ण स्वदेशी असला तरी सैन्याच्या नजीकच्या पिछाडीचे क्षेत्र या दृष्टीने महत्वाचे असते. त्या ठिकाणी पुरवठा भांडारे उभारली जातात. त्याच बरोबर सैन्यही ठेवले जाते व तेथून नियमितपणे सैन्यदलांना लष्करी साधन सामग्री व पुरवठा व्यवस्था पाठवावी लागते. हे क्षेत्र त्यावेळी पुरवठा तळ बनते. सैन्याची मोहिम व हा तळ महत्वाचा मानला पाहिजे.

यशवंतराव होळकर यांच्या सैन्याला लागणारा अन्न, धान्य, रसद पुरवठा लष्करी साधन सामग्री ही युध्दभूमीतुनच उपलब्ध होते.[94] यशवंतराव होळकर हे एखाद्या मोहीमेवर जात असता

त्यांनी कधी आपल्या राज्यातुन रसदपुरवठा मागवलेला आहे किंवा घेऊन गेले आहेत. याचा संदर्भ आढळून येत नाही. यशवंतराव हे मोहिमेवर असता स्वत:च्या सैनिकांना लागणारी लष्करी साधन सामग्री ही त्यांनी शत्रुच्या विरुध्द मिळवलेल्या विजयातूनच त्यांना शत्रुसैन्याची लष्करी साधन सामग्री उपलब्ध होत होती. त्यामुळे त्यांच्याकडे असे विशिष्ट प्रकारची लष्करी साधन सामग्री त्यांनी निर्माण केली व आपल्याराज्यातुन मागवली आहे असल्याचा प्रत्यक्ष पुरावा सापडत नाही. त्याच बरोबर सैन्याला लागणारी रसद पुरवठा व्यवस्थाही त्यांनी शत्रुच्या गोटातूनच लुटून किंवा त्याचा पराभव करुन उपलब्ध केलेला आहे. बहुतांश वेळी यशवंतरावांचा युध्दात विजय होत असल्याने त्यांना शत्रुचा रसद पुरवठा हा आपोआप त्यांच्या सैन्याच्या आखत्यारित येत असे. उत्तर भारतात मल्हारराव होळकर यांच्या काळापासून होळकर राज्याच्या आखत्यारीत असणारी शहरे व त्यांच्या कडून यशवंतरावांच्या सैनिकांना रसद पुरवठा होत असे. यशवंतराव होळकरांच्या बहुतांशी मोहिमा ह्या राज्यापासुन दूर अंतरावर होत होत्या. त्यामुळे त्यांना आपल्या लष्करासाठी रसद पुरवठा व्यवस्थाही युध्दाच्या माध्यमातून होताना दिसुन येते. त्यामुळे त्यांना आपल्या सैनिकांसाठी रसद पुरवठेच्या बाबतीत कधीच कमतरता जाणवलेली दिसत नाही व रसद पुरवठ्याच्या कमतरतेमुळे यशवंतरावांचा पराभव झालेला कुठेही उल्लेख आढळत नाही. एकंदरीत यशवंतरावांना रसद पुरवठा हा युध्दातून उपलब्ध होत. त्याचबरोबर शत्रुचा रसद पुरवठा लुटत असे. किंवा त्यांच्या आखत्यारीत असणाऱ्या पारंपारिक पध्दतीने त्यांच्या नियंत्रणाखाली असणाऱ्या भागातून किंवा मित्र असणारे संस्थानिक राजे, रजवाडे यांच्याकडून उपलबध होत असे.

## 4.15 **यशवंतरावांचा गनिमीकावा युध्दतंत्र :-**

मराठीतील गनीम हा शब्द अरबी भाषेतील घनीम या शब्दावरुन आलेला असुन त्याचा अर्थ लुटारु असा होतो.[95] गनिमीकावा युध्दतंत्राने महाराष्ट्रामध्ये औरंगजेबाशी मराठ्यांनी जवळ जवळ सत्तावीस वर्ष लढून त्यास जेरीस आणले. गनिमीकावा युध्दतंत्राने लढणाऱ्या मराठयांना उद्देशुन मोगलांनी हा शब्दप्रयोग वापरला आणि तो अद्याप पर्यंत प्रचिलित आहे. गनिमीकावा युध्दतंत्र म्हणजे मराठ्यांचे युध्दतंत्र असे समीकरण संपूर्ण भारतामध्ये त्या कालखंडात रुढ झाले होते.

स्वराज्य स्थापने करिता शिवाजी महाराजांनी गनिमीकावा युध्दतंत्राचा केलेला अवलंब.[96] शिवछत्रपतींच्या गनिमीकावा युध्दतंत्राचे विश्वासू, सचेतन, सुसज्ज सेना हे मुख्यसुत्र होते. अपुरी

शस्त्रास्त्रे, घोडे, सैनिक व मर्यादीत साधन सामग्री यामुळे पारंपारिक पध्दतीने आमने-सामने युध्दतंत्र हे मोगलांसारख्या बलाढ्य शत्रुशी मुकाबला करण्यास निरुपयोगी ठरेल एवढेच नव्हे तर हानिकारक ठरेल हे लक्षात घेऊन छत्रपती शिवाजी महाराजांनी आपल्या युध्दनिती व युध्दपध्दतीला गनिमीकावा युध्दतंत्राची जोड दिली प्रसंगोचित सेनेची व्युहरचना अनुकुल रणांगणाची निवड, सैनिकांची शिस्तबध्द व अनपेक्षित आणि वेगवान हालचाली, प्रसंगावधान इत्यादी मुलभूत सिध्दांतावर छत्रपती शिवाजी महाराजांचे हे युध्दतंत्र आधारीत होते

छत्रपती शिवाजी महाराजांनी गनिमीकावा युध्दतंत्र पध्दतीचा अवलंब केला.[97] छत्रपती शिवाजी महाराजांनी स्वराज्याची स्थापना विस्तार, राज्याचे संरक्षण केले. औरंगजेबाच्या पाशवी आक्रमणापासून संताजी, धनाजीने महाराष्ट्राचा बचाव केला, थोरल्या बाजीरावाने मराठेशाहीचे साम्राज्यात रुपांतर केले. अल्प शस्त्र साहित्य असताना मोठेमोठे शत्रु गारद करुन पेशवे आणि होळकर यांनी अटकेपार गनिमीकावा युध्दतंत्राच्या साहाय्याने मराठेशाहीचा झेंडा लावला. विद्युत वेगाने हालचाली, अनपेक्षित हल्ला, सामर्थ्य कमी पडले तर माघार, असे तंत्र असल्याने यास धावपळीचे युध्दही म्हणत. पुढे चालुन कवायती कंपुचा काळ चालु झाला तरी सदाशिवराव भाऊ, तुकोजी होळकर, महादजी शिंदे इत्यादी मराठा सरदार वगळता इतरांनी गनिमीकावा युध्दतंत्राचे समर्थक होते. पुढे चालुन यशवंतराव होळकर यांनी त्यांच्या कालखंडात मैदानी प्रदेशातील गनिमीकावा युध्दतंत्र आत्मसात केलेले दिसुन येते. या तंत्रामध्ये यशवंतरावांनी घोडदळाचा उपयोग करुन इंग्रज आणि शत्रुच्या सैन्याविरुध्द सातत्याने युध्दक्षेत्रात विजय संपादन केलेले आपल्याला दिसुन येतात.

गनिमी काव्याच्या युध्दपध्दती वरुन मराठ्यांस गनीम म्हणण्याची सर्व हिंदुस्थानात चाल होती.[98] मराठेशाहीच्या कालखंडात मराठ्यांनी उत्तरेकडे जे आपले मराठेशाहीच्या साम्राज्याचा विस्तार केला होता तो याच गनिमीकावा युध्दतंत्राच्या साहाय्याने आपले नियंत्रण दुसऱ्या राज्यावर स्थापित केले होते. त्यात उत्तरेकडे थोरले बाजीराव पेशव्यांच्या नेतृत्वाखाली कार्य करणाऱ्या सुभेदार मल्हारराव होळकर असोत की महादजी शिंदे, धारचे पवार असो यांनी गनिमीकावा युध्दतंत्राच्या साहाय्याने मराठ्यांच्या राज्याचा विस्तार केला. गनिमीकावा युध्दतंत्र आणि मराठे हे समीकरण त्या कालखंडात जोडलेले दिसुन येते. त्यामुळे पानिपतच्या युध्दात मराठ्यांचा पराभव जो झाला तो गनिमीकावा युध्दतंत्राचा वापर न केल्याने झालेला दिसुन येतो. पानीपतचे युध्द सुरु होण्यापूर्वी त्यांनी आपल्या छावणी मध्ये उदगार काढले होते की, आम्ही गनीम आम्ही दुसऱ्याची रसद बंद करावयाची

ती उलट आमचीच रसद बंद होऊन आम्हास उपासमार काढावी लागत आहे. यावरुनच गनिमीकावा युध्दतंत्राच्या युध्दामध्ये बहुत वर्षाचा अनुभवी व वाकबगार मराठा सरदार सुभेदार मल्हारराव होळकर हे होते. त्यांच्या तोडीचा त्यावेळी मराठ्यांमध्ये कोणीही दुसरा सरदार नव्हता. गनिमीकावा युध्दतंत्राने अब्दालीला हैराण करण्याचा सल्ला सुभेदार मल्हारराव होळकर यांनी भाऊसाहेब पेशव्यांना दिला होता तो सल्ला भाऊसाहेबांनी धुडकावून लावला म्हणूनच पानिपत मध्ये मराठ्यांची तीनलाख बांगडी फुटली.

गनिमी काव्याची लढाई करण्यात मराठ्यांइतके पटाईत लोक हिंदुस्थानात कोणीही नव्हते.[99] मराठ्यांचे गनिमीकावा युध्दतंत्र हे शत्रुसोबत तोफा, पायदळ आणि पुष्कळसे बाजार बुणगे असले म्हणजे गनिमी कावा युध्दतंत्रामुळे जी त्रेधा उडून जाई ती विचारु नये ते लुटालुट व जाळपोळ करीत शत्रुच्या मुलखातुन फिरत, तेंव्हा त्यांचा पाठलाग ही करवत नसे कारण तो जर फक्त घोडेस्वारांची फौज घेऊन पाठीस लागला तर ते बेशक त्याजवर उलटून त्याचा चुराडा करीत. पायदळ व तोफखान्याचे लटांबर घेऊन तो पाटीस लागेल तो पर्यंत शेपन्नास कोसोदुर जात असत हा गनिमी काव्याचा एक प्रकार झाला. मराठयांची फौज शत्रु पेक्षा कमी असली म्हणजे दुश्मानास हेलपाटे घालावयास लावून बेजार करुन नंतर त्याच्याशी गाठ घालावयाचा त्यांचा विचार असला तर, ते या प्रमाणे करीत.[100] शत्रुपेक्षा दीडपटीने आपली फौज अधीक असली तर त्यांची गनिमी काव्याची निराळीच तऱ्हा होती जेथे शत्रु असेल तेथे जाऊन त्यास घेरीत त्यांच्या लहान लहान टोळ्यांवर झडप घालुन त्यास मारुन टाकीत. मोठी चांगली दहा पंधरा हजारांची टोळी आपली मुख्य फौज सोडून अंगावर चालुन आली म्हणजे आपण भिल्यासारखे दाखवून ते पळु लागत. आपला जय झाला असे समजुन शत्रु झपाट्याने पाठलाग करी या प्रमाणे त्यास पाठीवर घेऊन बऱ्याच अंतरावर गेल्यास त्याची युध्दकरण्याची व्यवस्था अगदी मोडली आहे व तो बे सावध झाला आहे. असे पाहुन एखादी अडचणीची जागा पाहुन हे एकदम माघारी उलटुन त्यावर पडत व शत्रुवर हल्ला करित ते शत्रुच्या लष्कराभोवती रात्रंदिवस घिरट्या घालीत त्याच्या चौक्या मारुन तुडवून टाकीत त्यास अन्न पाणी व वैरण मिळू नये यासाठी बंदोबस्त करून रात्री त्यांच्या लष्करात बाणांचा वर्षाव करीत अशा स्थितीमध्ये शत्रुचे सैन्य हैराण होऊन तळ हलवून कुच करु लागला म्हणजे हे नेहमी त्याच्या पिछाडीस बिलगत व त्यास पायबंद करीत अन्न पाणी बाहेरुन पोहचण्याचे बंद केल्यामुळे त्यांना उपाशी मरण्याची पाळी येऊन, शरण येऊन कशीतरी आपली सुटका करुन घेणे त्यास भाग पडत.

यशवंतराव होळकर यांच्या उत्तम लष्करी व्यवस्थेबरोबरच त्यांच्या मैदानी प्रदेशातील गनिमीकावा युध्दतंत्राचा उपयोग हा त्यांच्या यशास कारणीभूत ठरलेला आहे.[101] यशवंतराव होळकर यांनी उत्तरेकडील इंग्रजांच्या सत्तेशी लढून मराठेशाहीचे अस्तित्व अजुन जिवंत आहे हे दाखवून दिले. यशवंतराव होळकरांच्या तुलनेत इंग्रजांची लष्करी शक्ती ही वरचढ होती त्यामुळे एकाचवेळी इंग्रजांशी युध्द करणे शस्त्रास्त्रे व तोफखाना आणि द्रव्यबळाच्या दृष्टिकोनातुन यशवंतरावांना शक्य नव्हते. साहजिकच यशवंतरावांनी स्वकिय आणि इंग्रजांशी लढताना गनिमीकावा युध्द तंत्राचा वापर केलेला दिसतो. त्यासाठी जशी वेळ येईल त्याप्रमाणे शत्रु सैन्यावर अचानक तुटुन पडणे शत्रु जर वरचढ दिसताच माघार घेऊन अचानकपणे हल्ला करुन शत्रुच्या सैन्याचा पराभव करणे, इंग्रजांची सेना ही शिस्तबध्द कवायती करत होती. परंतु त्यांचे सैन्य पाठीमागून येणाऱ्या रसदपुरवठा व इतर लष्करी साधन सामग्रीवर अवलंबुन होते. इग्रजांकडे असणारे सैन्य हे पगारी, भाडोत्री असल्याने यशवंतराव होळकर यांच्या सारखा अनुभवी, युध्द कौशल्यात नैपुण्य असणाऱ्या शूर मराठ्यांशी इंग्रजांना सामना द्यावा लागल्याने ते अपयशी ठरलेले आपल्याला दिसुन येतील.

यशवंतराव होळकर हे ज्या दिशेने खरोखर जावयाचे असेल तिकडची बातमी मुळीच बाहेर फुटू न देता, जिकडे जावयाचे नाही तिकडची खोटीच हुल उठवून शत्रुला फसवावयाचे आणि आपला कार्यभाग सहजासहजी साधुन घ्यावयाचा.[102] यशवंतराव होळकर यांनी ही पद्धत यावेळी मोठ्या शिताफीने वापरात आणली. वास्तविकपणे उत्तरेकडे मथुरा, आग्रा, दिल्ली या शहरावरच यशवंतरावांना चाल करुन जावयाचे होते. तरी त्यांनी अशा प्रकारची खोटी बातमी बाहेर फुटू दिली की गुजरात मधुन कॅप्टन मरे जो उज्जैनवर चाल करुन येत आहे. त्याच्यावर आपल्या सगळ्या सैन्यानिशी जाऊन हल्ला करावयाचा आहे ही खोटी बातमी डावपेच आणि गनिमीकावा युध्दतंत्राचा भाग त्यांच्या कृतीमधून दिसुन येतो.

शत्रुला अचानक धक्का देणे चकित करुन सोडणे आणि शत्रु सावरायच्या आतच त्याच्यावर तुटून पडणे.[103] हे गनिमीकावा युध्दतंत्र यशस्वीपणे यशवंतराव होळकर उपयोगात आणत. यशवंतराव होळकर यांचे राज्यच "जीनघर जीन तख्त" या तत्वावर घोड्याच्या पाठीवर होते. यशवंतराव होळकर हे मैदानी प्रदेशातील गनिमीकावा युध्द तंत्राचे पुरस्कर्ते होते. घोडदळाच्या माध्यमातून त्यांनी स्वकीय राजे रजवाडे, इंग्रजांच्या विरुध्द या युध्दतंत्राचा उपयोग केलेला आहे. घोडदळाच्या माध्यमातून शत्रुच्या गोटावर अचानकपणे हल्ला करणे, त्यांचे सैन्य कापुन काढणे

पटकुन निघुन जाणे, शत्रुसैन्याला गोंधळातुन सावध होण्या अगोदरच त्याच्यावर अचानकपणे हल्ला करणे हा गनिमीकावा युध्दतंत्राचा उपयोग करताना दिसतात. उत्तर भारतात यशवंतरावांनी या युध्दतंत्राचा वापर हा इंग्रजांच्या विरुध्द मोठ्या प्रमाणात केलेला आढळुन येतो. अनपेक्षिततेचा धक्का हा भव्य प्रमाणात दिला पाहिजे त्यावेळी शत्रुसैन्य गोंधळून जाते. शत्रुचे मनोधैर्य त्यामुळे कमकुवत होते. शत्रुच्या सैन्याला चकित करण्यामागे गुप्तता, वेग हे दोन घटक महत्वाचे असतात त्यात यशवंतराव होळकर हे निष्णात होते.

यशवंतराव होळकरांचे सैन्य हे लहान लहान गटामध्ये विभागुन अदृश्य होत होते आणि नंतर लगेचच लवकरात लवकर एकत्रित होऊन यांची संख्या वाढत होती.[104] यशवंतराव होळकर युध्दाच्या रणक्षेत्रात शत्रुची सैन्य संख्या आपल्यापेक्षा संख्येने मोठी असेल त्यावेळी शत्रुच्या घोडदळास आपला पाठलाग करण्यास संधी देत. त्यावेळी यशवंतरावाचे घोडदळ पळुन जात आणि यांना प्रत्यक्ष युध्दकरण्यास संधी देत नसत. ज्यावेळी शत्रुचे घोडदळ यांचा पाठलाग करुन थकत व परत आपल्या तळाकडे माघारी फिरत त्यावेळी यशवंतराव होळकर यांचे घोडदळ त्यांचा पाठलाग करून आणि बंदुका चालवीत, भाला फेक करत अशा पध्दतीचे गनिमीकावा युध्दतंत्र हे मैदानी प्रदेशात शत्रु सैन्याला ठार करत. कधी कधी तर शत्रुच्या डाव्या, उजव्या, समोरुन व मागच्या ओळीमध्ये असणाऱ्या शत्रुच्या घोडदळात घुसून हल्ला करणे आणि शत्रुसैन्याला कापून काढीत त्यांची पुरवठा व्यवस्था, लष्करी साधन सामग्री लुटुन घेवून जात. युध्दाच्यावेळी यशवंतराव होळकर यांची गतिमानता ही प्रचंड प्रमाणात असायची.[105] गनिमीकावा युध्दतंत्राचे वैशिष्ट्ये हे असायचे की, शत्रुवर गतिमानतेने हल्ला करुन निघुन जायचे यशवंतराव होळकर यांनी प्रत्येक युध्दात रणांगणावर तीव्रतेने शत्रुवर हल्ला केल्याचे आढळुन येते. तीव्रतेने केलेल्या हल्ल्यामध्ये शत्रुची शक्ती ही फोडून टाकावयाची जेणे करुन शत्रुला एकत्रित येवू द्यावयाचे नाही, शत्रु सैन्य सैरावैरा पळत व त्यांचे मनोधैर्य खचले पाहिजे. यशवंतराव होळकर आणि त्यांचे सैन्य लवकरात लवकर एकत्रीत व्हावयाचे. तर कधी गतिमानतेने चारही बाजुला गटागटाने विखुरले जायचे आणि कित्येक मैलापर्यंत असणाऱ्या रणांगणाला आपल्या घोडदळाच्या टापाखाली तुडवायचे, जेणेकरुन शत्रुसैन्य आपला पाठलाग करणार नाही. केला तरी त्यांची सैन्य शक्ती विभागली जावी. जेणेकरुन विभागलेल्या शत्रुच्या सैन्यदलावर एक एक करुन हल्ले करावयाचे अशा प्रकारचा हा घोडदळातील गनिमीकावा युध्दतंत्राचा उपयोग यशवंतराव होळकरांनी इंग्रजांच्या प्रदेशात केलेला दिसुन येईल.

मराठ्यांचा गनिमीकाव्याने लढण्याचे युध्दतंत्र हे यशवंतराव होळकर यांनी अद्यापी सोडलेली नव्हते.[106] गनिमीकाव्याच्या युध्दतंत्राने लुटालुट करणारे सैन्य असले म्हणजे ते शत्रुसैन्याचे नुकसान केंव्हाही करु शकतात. या युध्दतंत्रात सडी फौज, दारुगोळा, पुरवठा व्यवस्था जास्त प्रमाणात घेऊन जाण्याची आवश्यकता नसते. त्यामुळे शत्रुच्या सैन्यावर आपल्याला वाटेल तेंव्हा ज्या पध्दतीने हल्ला करावयाचा आहे त्या पध्दतीने करण्यास सैन्याचे नेतृत्व करणाऱ्याला आणि सैनिकांना मोकळीक असे यशवंतराव होळकरांचा मैदानी प्रदेशातील गनिमीकावा युध्दतंत्र हे दुसरे युध्द तंत्र आपण लक्षात घेतले पाहिजे. रणांगणावरुन जर शत्रुचे सैन्य आपल्यावर हल्ला करण्यासाठी समोरुन येत असेल त्यावेळी यशवंतराव होळकरांचे घोडदळ सैन्यदल हे रणांगणावर चारही बाजूने विखरुन जात. त्यामुळे शत्रुचा होणारा तीव्रगतीने हल्ला हा निष्फळ व्हावयाचा शत्रुच्या सैन्यदलात गोंधळाची परिस्थिती निर्माण व्हावयाची त्यावेळी यशवंतरावांचे जे घोडदळ विखुरलेले होते. त्यावेळी हे सैन्यदल फिरुन शत्रुच्या सैन्यदलावर आक्रमण करण्यासाठी दुसऱ्या ठिकाणी एकत्रित होऊन तयारी करत आणि लगेचच शत्रुच्या सैन्यावर तुटुन पडायचे. घोडदळाच्या सुटसुटीत पणा पासुन व चपळते पासुन यशवंतराव होळकर यांच्या घोड दळांना जो फायदा व्हावयाचा तो त्यांच्या पायदळ, तोफखानादळ यांच्या पासून कधीही झालेला आढळुन येत नाही. यशवंतराव होळकर याची सारी भिस्त ही आपल्या गनिमीकाव्याच्या साह्याने लढणाऱ्या 1,50,000 (दीड लाख) घोडदळावरच होती. यशवंतरावांनी कवायती कंपु व तोफखाना दल यांच्यावर कधीच फारशी भिस्त ठेवलेली दिसत नाही.

आधी शत्रुला आपल्यामागे आणून मग त्याला उलटे पळायला लावून बदलत्या हवामानाचा अंदाज घेवून भर पावसाळ्यात गाळाच्या जमिनीत त्याची फजिती करुन तब्बल 200 मैल पाठलाग करत क्रमाने त्याची शक्ती कमी करत कसे संपवावे.[107] यशवंतराव होळकरांनी या गनिमीकावा युध्द तंत्राचा उपयोग हा कर्नल मॉन्सन यांच्यावर मुकूंदराखिंडीतून चालुन येत असताना केलेला दिसुन येतो. मॉन्सनला आपल्या पाठीमागे आणून त्यास परत माघारी पळायला यशवंतरावांनी भाग पाडले. गनिमीकावा युध्दतंत्राचा वापर करत असताना यशवंतरावांचे गुप्तहेर जाळे कुशल कार्यक्षम व प्रामाणिक आसल्याचे जाणवते ज्यावेळी शत्रुआपल्यावर चाल करुन येत आहे त्यावेळी त्याची इत्यंभूत माहिती यशवंतरावांना मिळत असे. त्यावेळी यशवंतराव युध्दतंत्राचा कधी वापर करावा हे त्यांना माहिती होते. त्यामुळे मुकूंदराखिंडीतील बदलत्या हवामानाचा अंदाज घेवून यशवंतराव गनिमीकावा युध्द तंत्राचा वापर करीत यशवंतरावांचा झंझावात असा असायचा की शत्रुला सैरावैरा

पळाल्याशिवाय गत्यंतर नसायचे तेंव्हा यशवंतरावांनी कर्नल मॉन्सनला मुकुंदराखिंडीच्या आत गाळाच्या जमिनीपर्यंत येवू दिले. तेथून त्यांच्यावर गनिमी कावा युध्दतंत्राने पाठलाग करत टप्या टप्याने इंग्रजांच्या सैन्यावर हल्ले करत त्यामुळे त्यांचे सैन्य ठार होत व त्यांची शक्ती कमी होत होती. शेवटी शत्रु सैन्याला संपवावे हा यशवंतरावांच्या गनिमीकावा युध्दतंत्राची युध्दनिती आपल्याला दिसुन येईल. जगातील एकमेव उदाहरण असेल जे की यशवंतराव होळकर यांनी तब्बल 200 मैल इंग्रजांचा सैन्याधिकारी कर्नल मॉन्सन याचा पाठलाग सातत्याने करुन त्याचा पराभव केला.

इंग्रजांशी मैदानात सामोरा समोरची लढाई करावयाची नाही हे यशवंतराव होळकरांच्या युध्दनितीचे तंत्र होते.[108] यशवंतरावांचे इंग्रजांच्या विरुध्द समोरा समोर युध्द करावयाचे नाही कारण इंग्रजांकडे असणारा तोफखाना, बंदुकधारी दल हा अत्याधुनिक स्वरुपाचा व मोठ्या प्रमाणात असावयाचा त्यामुळे यशवंतराव आपल्या सैन्याची हानी कमीत कमी व्हावी हा त्यांचा उद्देश होता इंग्रजांच्या विरुध्द लढण्यासाठी यशवंतराव होळकरांनी गनिमीकावा युध्दतंत्राचा वापर जास्तीत जास्त केलेला दिसुन येतो. घोडदळाच्या माध्यमातून इंग्रजांना युध्दात हतबल करत त्यांचे प्रचंड प्रमाणात नुकसान करीत गनिमीकावा युध्दतंत्राच्या पद्धतीने लढल्यामुळे इंग्रज यशवंतरावांच्या विरुध्द चिडत असे. इंग्रज ज्या ज्या वेळी यशवंतरावांचा पाठलाग करण्याचा प्रयत्न करीत, त्यावेळी यशवंतराव कोसो दुर इंग्रजापासुन गेलेले असायचे त्यामुळे यशवंतराव इंग्रजांसोबत समोरा समोरचे युध्द न करण्याची त्यांची युध्दनिती यशस्वी होताना दिसुन येईल.

इंग्रजांच्या विरुध्द यशवंतराव होळकर यांनी गनिमीकावा युध्द पध्दतीने युध्द केलेले दिसुन येते.[109] जनरल लॉर्ड लेक ज्यावेळी कानपुरहुन यशवंतराव होळकर यांच्या विरुध्द लढण्यासाठी निघाला त्यावेळी यशवंतरावांनी आपल्या गनिमीकावा युध्दतंत्राद्वारे युध्दाला सुरुवात केली आणि इंग्रजांच्या सैन्याला मोठ्या प्रमाणात थकवले या सैन्यावर यशवंतराव होळकरांचे सैन्य लहान लहान गटाद्वारे हल्ला करत आणि इंग्रजी सैन्याला मारुन त्यांची साधनसंपत्ती व रसद पुरवठा लुटून घेऊन जात. यशवंतराव होळकर यांच्या लष्करी व्यवस्थेसह त्यांचा गनिमीकावा युध्दतंत्राचा वापर त्यांच्याकडील मोहिमा व इंग्रजी सत्तांशी लढून स्वत:चे प्रभुत्व, अस्तित्व स्थापित केले होते. यशवंतराव होळकर यांनी भौगोलिक दृष्टिकोनातून आणि इंग्रजांची कमकुवत बाजु ओळखुन आपले सैन्य दल उभारले या सैन्याला उत्तम प्रशिक्षणाची, शस्त्रास्त्रांची जोड दिली सैन्याला वेतन, बढत्या, बक्षिसे देवून सैन्याला आपल्याकडे आकर्षित केले. सैन्यामध्ये स्नेहाचे संबंध स्थापित करुन स्वत:चे सैन्य प्रभावी बनवले इत्यादी मुळेच यशवंतराव होळकर हे इंग्रजांच्या सत्तेला नमवू शकले.

**संदर्भ सूची :-**

1) प्रा.ए.पी. चौधरी; युध्दविज्ञान संरक्षण व सामरिक शास्त्र, दत्तात्र्येग पाष्टे, डायमंड प्रकाशन 1691, सदाशिवपेठ, शंकर प्रसाद को. हौ.सो. तिसरा मजला टिळक रोड, पुणे-30 2008 पृ.01.

2) कित्ता, पृ.01.

3) कित्ता, पृ-07.

4) प्रा. महेश चौरे; युध्द आणि युध्द पध्दती, प्रकाशन अरुणा 103, ओमकार, कॉम्पलेक्स अ. खर्डेकर स्टॉप औसा रोड, लातुर, 2011 पृ-07.

5) कित्ता, पृ-07.

6) कित्ता, पृ-02.

7) प्रा. महेश चौरे; युध्द आणि युध्द पध्दती अरुणा प्रकाशन 103 ओमकार कॉम्पलेक्स अ. खर्डेकर स्टॉप औसारोड लातूर 2011 पृ-08.

8) प्रा. ए.पी. चौधरी; युध्दविज्ञान संरक्षण व सामारिक शास्त्र, दत्तात्र्येग पाष्टे, डायमंड प्रकाशन 1691 सदाशिव पेठ, शंकर प्रसाद को टौ.सो. तिसरा मजला टिळकरोड, पुणे-30 2008. पृ-03.

9) प्रा. महेश चौरे; युध्द आणि युध्द पध्दती अरुणा प्रकाशन 103 ओमकार कॉम्पलेक्स अ. खर्डेकर स्टॉप औसारोड लातूर 2011 पृ-08.

10) प्रा. ए.पी. चौधरी; युध्दविज्ञान संरक्षण व सामरिक शास्त्र, दत्तात्र्येग पाष्टे, डायमंड प्रकाशन 1691 सदाशिव पेठ, शंकर प्रसाद को टौ.सो. तिसरा मजला टिळकरोड, पुणे-30 2008. पृ-01.

11) प्रा. महेश चौरे; युध्द आणि युध्द पध्दती अरुणा प्रकाशन 103 ओमकार कॉम्पलेक्स अ. खर्डेकर स्टॉप औसारोड लातूर 2011 पृ-11,12.

12) प्रा. ए.पी. चौधरी; युध्दविज्ञान संरक्षण व सामरिक शास्त्र, दत्तात्र्येग पाष्टे, डायमंड प्रकाशन 1691 सदाशिव पेठ, शंकर प्रसाद को टौ.सो. तिसरा मजला टिळकरोड, पुणे-30 2008. पृ-05

13) कित्ता, पृ-05.

14) प्रा. महेश चौरे; युध्द आणि युध्द पध्दती अरुणा प्रकाशन 103 ओमकार कॉम्पलेक्स अ. खर्डेकर स्टॉप औसारोड लातूर 2011 पृ-08.

15) न.र. फाटक; मराठेशाही अखेरचा अद्वितीय स्वातंत्र्यवीर श्रीमन्महाराज यशवंतराव होळकर प्रकाशन, वि.पु. भागवत मौज प्रिंटींग ब्युरो खटाववाडी, मुंबई-1967 पृ-93.

16) शिवराम महादेव परांजपे; मराठ्यांच्या लढायांचा इतिहास 1802 ते 1818, चित्रशाळा प्रेस 1026, सदाशिव पेठ, पुणे-1934 पृ-256.

17) घनश्याम होलकर; महाराजा यशवंतराव होलकर, नेशन प्रेस, ओलडनं 38, न्युनं-6, मॅक निकोल्स रोड चेटपेट चेन्नई-31 2018, पृ-98.

18) श्रीपाद रामचंद्र टिकेकर (संपा); सरदेसाई स्मारक ग्रंथ, प्रकाशन बॉम्बे वैभव प्रेस, गिरगाव बॉम्बे, 1938, पृ-97.

19) प्रा.डॉ. राम इंगळे; होळकरशाहीचा संस्थापक, आर.बी. सिंह, विश्वभारती प्रकाशन सीताबर्डी नागपूर-12,1992, पृ-81,82.

20) तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी; मराठी विश्वकोष खंड-12, महाराष्ट्र राज्य विश्वकोश निर्मिती मंडळ, डी. ब्लॉक, एन्सा हटमेंट आझाद मैदान मुंबई-01 पृ-1184.

21) कित्ता, पृ-138.

22) प्रा.डॉ.राम इंगळे; होळकरशाहीचा संस्थापक, आर.बी.सिंह विश्वभारती प्रकाशन सीताबर्डी नागपुर-12,1992,पृ-90.

23) कित्ता, पृ.93.

24) शिवराम महादेव परांजपे; मराठ्यांच्या लढाचा इतिहास (1802 ते 1818) चित्रशाळा प्रेस 1026, सदाशिव पेठ. 1934- पृ-270.

25) शं.गा. कोलारकर; मराठ्यांचा इतिहास, श्री मंगेश प्रकाशन, श्री शांतादुर्गा निवास, 23 नवी रामदास पेठ-10, 1987 पृ-588.

26) घनश्याम होलकर; महाराजा यशवंतराव होलकर नेशन प्रेस ओलडनं-38, न्युनं-6 मॅकनिकोलस रोड, चेटपेट चेन्नई -31, 2018, पृ-96.

27) कित्ता, पृ-96.

28) कित्ता, पृ-89.

29) श्रीपाद रामचंद्र टिकेकर; सरदेसाई स्मारक ग्रंथ, श्रीसमर्थ सदन बेनहाम हॉल लेन, गिरगाव मुंबई-1938 पृ-105.

30) तर्कतीर्थ श्री. लक्ष्मणशास्त्री जोशी (संपा) ; मराठी विश्वकोष खंड-14 प्रकाशन महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोष निर्मिती मंडळ डी ब्लॉक, एन्सा हटमेंट, आझाद मैदान मुंबई-01 1989 पृ-419.

31) कित्ता, पृ-419.

32) डॉ. प्रा. ए.पी. चौधरी; युध्दविज्ञान, संरक्षण व सामरिक शास्त्र, दत्तात्र्ये गं.पाष्टे डायमंड प्रकाशन 1691, सदाशिव पेठ, शंकर प्रसाद को. हौ.सो. तिसरा मजला, टिळक रोड पुणे-30, 2008 पृ-38.

33) शिवराम महादेव परांजपे; मराठ्यांच्या लढ्यांचा इतिहास (1802 ते 18180) रा.रा. शंकर नरहर जोशी, चित्रशाळा प्रेस 1026, सदाशिव पेठ, पुणे-1934, पृ-239.

34) कित्ता, पृ-242.

35) गो.स. सरदेसाई; मराठी रियासत खंड-8 पॉप्युलर प्रकाशन, प्रा. लि. 301, महालक्ष्मी चेंबर्स 22, भुला भाई देसाई रोड मुंबई-26 पृ-438.

36) मधुसुदनराव होलकर; होलकरोंका इतिहास, प्रकाशन न्यु ज्ञान प्रेस 495, डी.डी.ए. कॉम्पलेक्स शहजादा बाग इंद्रलोक दिल्ली -35, 1998, पृ-433.

37) कित्ता, पृ-435.

38) शिवराम महादेव परांजपे; मराठ्यांच्या लढायांचा इतिहास (1802 ते 1818) चित्रशाळा प्रेस 1026, सदाशिव पेठ पुणे 1934 पृ-247.

39) घनश्याम होलकर; महाराजा यशवंतराव होळकर, प्रकाशन नेशन प्रेस ओल्डनं-38, नवीन नं.-6 मॅकनिकोल्स रोड, चेटपेट चेनई-2018, पृ-88.

40) डॉ.बी.एल. गोवर; आधुनिक भारताचा इतिहास, प्रकाशन एस चाँद अॅन्ड कंपनी लि. 7361 रामनगर नई दिल्ली 190055, पृ-144.

41) न.र.फाटक; श्रीमन्महाराज यशवंतराव होळकर, प्रकाश्न वि.पु. भागवत मौज प्रिंटींग ब्युरो, खटाववाडी मुंबई-4, 1967 पृ-95.

42) मधुसुदनराव होलकर; होलकरोंका इतिहास, प्रकाशन न्यु ज्ञान प्रेस 495, डी.डी.ए. कॉम्पलेक्स शहजादा बाग इंद्रलोक दिल्ली -35, 1998, पृ-436.

43) डॉ. श्रीपाद दत्तात्र्य कुलकर्णी(संपा) ; हिंदु वर्चस्वासाठी लढा, प्रकाशन श्री भगवान वेदव्यास इतिहास संशोधन मंदीर, बी-7-8 श्रीपाल अपार्टमेंटस आराधना चित्रपटगृहा जवळ पाच पाखाडी ठाणे-02, 1993, पृ-351.

44) घनश्याम होलकर; महाराजा यशवंतराव होळकर, प्रकाशन नेशन प्रेस ओल्डनं-38, नवीन नं.-6 मॅकनिकोल्स रोड, चेटपेट चेनई-2018, पृ-102.

45) Jadunath sarkar; Fall of Mughul Empire vol-4 publication orient longman limited, 50 sunder nagar, new delhi-3 1966 PN-165.

46) घनश्याम होलकर; महाराजा यशवंतराव होळकर, प्रकाशन नेशन प्रेस ओल्डनं-38, नवीन नं.-6 मॅकनिकोल्स रोड, चेटपेट चेनई-2018, पृ-94.

47) कर्नल जेम्स टॉड; राजस्थान का इतिहास भाग-1, प्रकाशन साहित्यगार, धामाणी मार्केट की गली, चौडा रास्ता जयपूर-2008, पृ-304.

48) न.र.फाटक; श्रीमन्महाराज यशवंतराव होळकर, प्रकाश्न वि.पु. भागवत मौज प्रिंटींग ब्युरो, खटाववाडी मुंबई-4, 1967, पृ-40.

49) गो.स. सरदेसाई; मराठी रियासत खंड-8, पॉप्युलर प्रकाशन, प्रा. लि. 301, महालक्ष्मी चेंबर्स 22, भुला भाई देसाई रोड मुंबई-26, पृ-345.

50) दि.वी. गोखले; युध्दमीमांसा, प्रकाशन मैजेस्टिक 8, फिनिक्स ३ रा मजला, 457 एस.व्ही. पी.रोड मुंबई-04, 2000 पृ-378.

51) प्रा. महेश चौरे; युध्द आणि युध्द पध्दती, अरुणा प्रकाशन 103, ओमकार कॉम्पलेक्स अ. खर्डेकर स्टॉप, औसा रोड, लातूर 2011. पृ-17.

52) तर्कतीर्थ श्री लक्ष्मणशास्त्री जोशी (संपा); मराठी विश्वकोष खंड-1, प्रकाशन महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ, मुंबई, 1976, पृ.898.

53) घनश्याम होलकर; महाराजा यशवंतराव होळकर, प्रकाशन नेशन प्रेस ओल्डनं-38, नवीन नं.-6 मॅकनिकोल्स रोड, चेटपेट चेनई-2018, पृ-58.

54) कित्ता, पृ-57.

55) कित्ता, पृ-51.

56) श्रीपाद दत्तात्र्य कुलकर्णी (संपा); हिंदु वर्चस्वासाठी लढा, प्रकाशन श्री भगवान वेदण्यास इतिहास संशोधन मंदीर बी. 7-8, श्रीपाल आपार्टमेंटस आराधना चित्रपट गृहा जवळ, पाच पाखाडी ठाणे -02 1993 पृ-351.

57) शिवराम महादेव परांजपे; मराठ्यांच्या लढायांचा इतिहास (1802 ते 1818) चित्रशाळा प्रेस 1026, सदाशिव पेठ, पुणे 1934- पृ-250.

58) कित्ता, पृ-05.

59) Jadunath sarkar; Fall of Mughal Empire vol-4, publication orient Longman limited, 50 sunder Nagar, New Delhi-3, 1966, pal-46.

60) कर्नल जेम्स टॉड; राजस्थानका इतिहास भाग-1, साहित्यगार प्रकाशन, धामाणी मार्केटकी गल्ली, चौडा रास्ता जयपूर-2008 पृ-304.

61) संयज सोनवणी; भारतीय स्वातंत्र्याचे प्रणेते महाराज यशवंतराव होळकर, पुष्प प्रकाशन भारतबुक हाऊस, 1988 सदाशिव पेठ देशमुख वाडी पुणे-31 2011, पृ-92.

62) मधुसुदनराव होलकर; होलकरोका इतिहास, प्रकाशन न्यु ज्ञान प्रेस 495, डी डी ए कॉम्पलेक्स शहजादा बाग इंद्रलोक दिल्ली-35. 1998, पृ-423.

63) कित्ता, —पृ-430.

64) डॉ. गणेश मतकर; वीरश्रेष्ठ प्रथम यशवंतराव होळकर, प्रकाशन नवीन फोटो कॉपी शिव विलास पॅलेस राजवाडा परिसर इंन्दौर, 1999, पृ-42.

65) श्रीपाद रामचंद्र टिकेकर (संपा) ; सरदेसाई स्मारक ग्रंथ, प्रकाशन केशव भिकाजी ढवळे, श्रीसमर्थ सदन, बनाम हॉल लेन, गिरगांव मुंबई- 1938, पृ-105.

66) कित्ता, पृ.105.

67) दि.वी. गोखले; युध्दमीमांसा, प्रकाशन मैजेस्टिक 8, फिनिक्स ३ रा मजला, 457 एस.व्ही. पी.रोड मुंबई-04, 2000 पृ-101.

68) गो.स. सरदेसाई; मराठोंका नवीन इतिहास भाग-3 शिवलाल अग्रवाल अॅन्ड कंपनी, दुर्गा प्रिंटींग वर्क्स आगरा 1964 पृ-398.

69) शिवराम महादेव परांजपे; मराठ्यांच्या लढा्यांचा इतिहास (1802 ते 1818) चित्रशाळा प्रेस 1026, सदाशिव पेठ, पुणे.-1934,पृ-249, 250.

70) कित्ता, पृ.255.

71) कित्ता, पृ.247.

72) कित्ता, पृ.254.

73) न.र.फाटक; मराठेशाही अखेरचा अद्वितीय स्वातंत्र्यवीर श्रीमन्ममहाराज यशवंतराव होळकर, वि.पु. भागवत मौज प्रिंटीग ब्युरो खटाववाडी, मुंबई 1967, पृ-84.

74) गो.स. सरदेसाई; मराठी रियासत खंड-8 पॉप्युलर प्रकाशन, प्रा. लि. 301, महालक्ष्मी चेंबर्स 22, भुला भाई देसाई रोड मुंबई-26, पृ-222,223.

75) Rajaram Vyankatesh Nadkarni; The rise and fall of the Maratha Empire, Popular Prakashan Bombay 1888,PN-322.

76) श्रीपाद रामचंद्र टिकेकर(संपा); सरदेसाई स्मारक ग्रंथ, प्रकाशन केशव भिकाजी ढवळे, श्रीसमर्थ सदन, बनाम हॉल लेन, गिरगाव, मुंबई-1938, पृ-139.

77) कित्ता, पृ.140.

78) कित्ता, पृ.137.

79) कित्ता, पृ.138.

80) घनश्याम होलकर; महाराजा यशवंतराव होलकर, नेशन प्रेस, ओल्डनं-38 न्युनं-6 मॅकनिकोलस रोड, चेटपेट चेन्नई, 31-2018, पृ-125.

81) दी.वी. गोखले; युध्दमीमांसा, मजेस्टीक प्रकाशन 8, फिक्स तिसरा उरा मजला, 457 एस. व्ही. पी रोड, मुंबई-04 2000 पृ-97.

82) कित्ता, पृ. 97.

83) कित्ता, पृ. 97.

84) तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी (संपा); मराठी विश्वकोष खंड-5, प्रकाशन महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ, मुंबई, 1976 पृ.131.

85) गायकवाड, सरदेसाई, थोरात, हनमाने; मराठेकालीन संस्था व विचार, प्रकाशन, एम.व्ही. फडके आणि कंपनी, महाद्वार रोड, कोल्हापुर -12-1982, पृ-333.

86) न.र.फाटक; यशवंतराव होळकर, मौज प्रिंटींग ब्युरो खटाववाडी मुंबई-4 पृ-117.

87) कित्ता, पृ 178.

88) कित्ता, पृ-164.

89) कित्ता, पृ-164.

90) घनश्याम होलकर; महाराजा यशवंतराव होल्कर नेशन प्रेस ओलडनं 38, न्युनं-6 मॅकनिकोक्लस रोड चेटपेट चेन्नई, 31-2018,पृ-50.

91) कित्ता, पृ.187.

92) चौधरी, पाटील, सैदाणे, ढाके, चौधरी; संरणशास्त्र, प्रकाशन निराली 119, बुधवार पेठ, जोगेश्वरी मार्ग पुणे 02,2002, पृ-82.

93) दी.वी. गोखले; युध्दमीमांसा, मैजेस्टीक प्रकाशन-8 फिनिक्स 3 रा मजला, 457, एस.व्ही पी रोड, मुंबई 04, 2000 पृ-273.

94) मधुसुदनराव होलकर; होलकरोका इतिहास, प्रकाशन न्यु ज्ञान प्रेस 495, डी डी ए कॉम्पलेक्स शहजादा बाग इंद्रलोक दिल्ली-35. 1998, पृ-388.

95) तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी (संपा); मराठी विश्वकोष खंड-4, प्रकाशन महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती, मुंबई -1976 पृ-852.

96) परशुराम गुप्त; गुरिल्ला युध्द कर्म, प्रकाशन प्रकाश बुक डिपो, बडा बाजार बरेली 1983,पृ-01.

97) कित्ता, पृ-87.

98) तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी संपा; मराठी विश्वकोष खंड-4, प्रकाशन महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मुंबई 1976, पृ-853.

99) श्रीपाद रामचंद्र टिकेकर (संपा); सरदेसाई स्मारक ग्रंथ, प्रकाशन केशव भिकाजी ढवले, श्रीसमर्थ सदन बनाम हॉल लेन गिरगावं मुंबई-1938, पृ-102.

100) कित्ता, पृ-103,105.

101) न.र.फाटक; मराठेशाही अखेरचा अव्दितीय स्वातंत्र्यवीर श्रीमन्ममहाराज यशवंतराव होळकर, वि.पु. भागवत मौज प्रिंटीग ब्युरो खटाववाडी, मुंबई 1967, पृ-89.

102) शिवराम महादेव परांजपे; मराठ्यांच्या लढायांचा इतिहास (1802 ते 1818) चित्रशाळा

103) प्रेस 1026, सदाशिव पेठ, 1934 पृ-243.

104) संजय सोनवणी; भारतीय स्वातंत्र्याचे प्रणेते महाराजा यशवंतराव होळकर, पुष्पा प्रकाशन भारतबुक हाऊस 1788, सदाशिवपेठ, देशमुखवाडी पुणे-30, 2011, पृ-38.

105) मधुसुदनराव होलकर; होलकरींका इतिहास, प्रकाशन न्यु ज्ञान प्रेस 495, डी डी ए कॉम्पलेक्स शहजादा बाग इंद्रलोक दिल्ली-35. 1998, पृ-432,433.

106) कित्ता, पृ.388.

107) शिवराम महादेव परांजपे; मराठ्यांच्या लढा्यांचा इतिहास 1802 ते 1818, चित्रशाळा प्रेस 1026, सदाशिव पेठ पुणे.-1934,पृ-249, पृ-233.

108) संयज सोनवणी; भारतीय स्वातंत्र्याचे प्रणेते महाराज यशवंतराव होळकर, पुष्पा प्रकाशन भारतबुक हाऊस, 1988 सदाशिव पेठ देशमुख वाडी पुणे-31 2011, पृ-120.

109) मधुसुदनराव होलकर; होलकरेका इतिहास, प्रकाशन न्यु ज्ञान प्रेस 495, डी डी ए कॉम्पलेक्स शहजादा बाग इंद्रलोक दिल्ली-35. 1998, पृ-381.

110) मधुसुदनराव होलकर; होलकरोंका इतिहास, प्रकाशन न्यु ज्ञान प्रेस 495, डी डी ए कॉम्पलेक्स शहजादा बाग इंद्रलोक दिल्ली-35. 1998, पृ-432.

# प्रकरण पाचवे

## यशवंतराव होळकर यांचे तत्कालीन राष्ट्रीय राजकारणातील सत्ता संघर्ष

---

5.1 प्रस्तावना

5.2 इंग्रजांचा भारतातील वाढता प्रभाव

5.3 यशवंतराव होळकर यांची राजकीय भूमिका

5.4 यशवंतराव होळकर यांचा वाढता प्रभाव

संदर्भ सूची

## प्रकरण पाचवे

## यशवंतराव होळकर यांचे तत्कालीन राष्ट्रीय राजकारणातील सत्ता संघर्ष

### 5.1 प्रस्तावना :-

यशवंतराव होळकर यांचे ज्या कालखंडामध्ये नेतृत्व उदयास आले त्या नेतृत्वाला तेजोमय दिवस आलेले दिसुन येते. यशवंतरावांचा कालखंड हा अशा परिस्थिती मध्ये उदयास आलेला पहावयास मिळतो की, मराठेशाहीच्या राज्यात पेशवे कालखंडाचा हा प्रदोष काळ होता. पेशव्यांच्या या काळात उत्तरोत्तर अंधार वाढतच गेला. मराठेशाहीच्या काळात पेशव्यांची मोडकळीस आलेली सत्ता ही पेशव्यांच्या आगोदर मराठेशाहीचे नेतृत्व करणाऱ्या कर्त्या पुरुषाच्या एका मागून एक झालेल्या निधनामुळे दृष्टीला पडु लागली. ज्यांनी उत्तर भारतात मराठेशाहीच्या पराक्रमाचा दबदबा, जरब, प्रभाव दरारा निर्माण केला ते मल्हारराव होळकर आणि महादजी शिंदे, अहिल्याबाई होळकर, तुकोजी होळकर, सवाई माधवराव यांच्या मृत्यू नंतर, होळकरांची माळव्यातील सत्ता ही कमकुवत होऊ लागली होती. त्याच धुमाकुळीमध्ये यशवंतराव होळकर यांच्या कार्य कर्तृत्वाला वाट मोकळी करुन दिली ती मल्हारगर्दी या घटनेने यशवंतरावांच्या अंगी असलेल्या साहस, शौर्य, उत्साह, धैर्य, उपजत गुणांची परीक्षा मल्हार गर्दीच्या माध्यमातून पुढे आली. त्यामुळे त्यांना स्वयंकर्तृत्वाचा ठसा उमटाविण्यास संधी उपलब्ध झाली.

यशवंतराव होळकर यांच्या कालखंडात भारतात मोठ्या प्रमाणामध्ये इंग्रजांनी आपले प्रभुत्व वेगवेगळ्या संस्थानिकांवर लादण्यास सुरुवात केलेले होते. भारतात ‘‘शत्रु पक्षाचा भेद हे युध्दनीतीचे एक महत्वाचे अंग असल्याचे न विसरणे उत्तम भेदनिती भारतातील कोणतेही संस्थानिक करताना दिसत नाहीत. भेदनीतीचा प्रयोग हा पहिल्यांदा इंग्रजांनी भारतातील संस्थानिकांमध्ये उपयोगात आणलेला दिसुन येतो. पेशव्याने मराठेशाहीचे सर्व सार्वभौमत्व इंग्रजांकडे गहान टाकले होते. या घटनेचा सर्वाधिक संताप कोणा मराठा सरदाराला आला असेल तर ते यशवंतराव होळकर होते. मराठेशाही इंग्रजांच्या घशात गेल्याने यशवंतराव होळकर यांनी इंग्रजा बरोबर युध्द करण्याचा निर्णय घेतलेला दिसतो. शिंदे, भोसले, पेशवे यांनी इंग्रजांचे मांडलिकत्व मान्य केले होते. त्यामुळे यशवंतरावांनी यांच्या बरोबर जुने विवाद विसरुन इंग्रजांच्या विरुध्द लढण्यासाठी पत्र व्यवहार चालु

केला होता. इंग्रज या देशातील परकीय माणसे आहेत. त्यांना आपल्या राज्याच्या अंतर्गत कारभारामध्ये हस्तक्षेप करण्याचा अधिकार नाही असे यशवंतरावांना वाटत होते.

यशवंतराव होळकर यांना इंग्रजांच्या विरुध्द युध्द करायचे तर आपले लष्कर हे वाढविले पाहिजे हे त्यांना माहित होते. यशवंतरावांनी इंग्रजांच्या आखत्यारित असणाऱ्या औरंगाबाद मधुन वसुली करुन इंग्रजांना इशारा देऊनच त्यांनी इंदौरकडे प्रयाण केले. यशवंतरावांनी भोसले आणि शिंदे यांच्याशी पत्रव्यवहार करुन कळवले की "आपण तिघे एकत्र येऊन जलचरांना नेस्तनाबुत करु आपापसातील सारे वाद नंतर सोडवू", अशा प्रकारे पत्रांमध्ये भोसले यांना कळवले होते. परकीय शक्तीला आपल्या राज्यात स्थिरस्थावर होवून देण्यासाठी आपसातील विवाद हे आपण नंतर सोडवू. अगोदर ह्या परकिय शक्तीला बाहेर घालवू अशी त्यांची मनोमन इच्छा दिसुन येते. त्याकाळी संस्थानिकांच्या अंतर्गत कारभारामध्ये इंग्रजांच्या हस्तक्षेपाचे भविष्यकाळामध्ये काय परिणाम होतील याची जाणिव यशवंतरावांना होती, कोणत्याही परिस्थिती मध्ये इंग्रजांना या भूमीवरुन हाकलून द्यावयाचे हे त्यांनी ठरवलेले दिसते. इंग्रजांचा खराधोका काय आहे हे यशवंतराव ओळखून होते. त्यांनी भारतातील संस्थानिकांना एकत्र येण्याचे आव्हान करत. परंतु यशवंतरावांना संस्थानिकांनी दाद दिली नाही.

मराठेशाहीतील सरदारांच्या आखत्यारीत असणारे प्रांत ओरिसा, बंगाल, गुजरात हे एक एक करुन इंग्रजांनी हस्तगत केले होते. यशवंतराव होळकर इंग्रजांच्या प्रत्येक हालचालीवर लक्ष ठेवून होते. पंजाब, ओरिसा, राजपुताना, बुंदेलखंड इत्यादी प्रांतातील राजे, राजवाडे यांच्यावर इंग्रज नियंत्रण स्थापित करत होते, इंग्रजांची ध्येय धोरणे काय आहेत? हे यशवंतराव होळकर यांच्या लक्षात यायला वेळ लागला नाही. यशवंतराव होळकर हे आपल्या सैन्यदलास सक्षम करण्याच्या प्रयत्ना मध्ये होते. त्यांना माहित होते की, इंग्रज देशी संस्थानिकांना एकएक करुन स्वत:च्या नियंत्रणाखाली आणतील. आणि शेवटी आपल्यावर पूर्णपणे एकत्रित आक्रमण करणार त्यासाठी यशवंतरावांनी इंग्रजांच्या विरुध्द युध्द लढण्यासाठी शिखां पासून, मोगल, राजपुत, नवाब इत्यादींना एकत्र येण्यासाठी यशवंतराव आव्हान करित होते. इंग्रजांची संपूर्ण भारतावर सत्ता नियंत्रणात येत असताना मराठेशाहीतील मराठा सरदार यशवंतराव होळकर हे आपली लष्करी ताकद वाढवत होते, हे इंग्रजांना माहित असल्याने यशवंतरावाकडे मैत्रीचा प्रस्ताव इंग्रज ठेवत. परंतु यशवंतरावांनी आपल्या काही अटी इंग्रजांपुढे ठेवल्या हे इंग्रजांना मान्य न होण्या सारख्या होत्या हे यशवंतरावांना माहित होते.

त्यावेळी 4 मार्च 1804 रोजी यशवंतराव होळकर यांनी जनरल लेकला पत्र लिहीले की, “माझा देश आणि माझी संपत्ती ही माझ्या घोड्याच्या खोगिरावर आहे. ज्याही दिशेला माझ्या पराक्रमी सैनिकांचे घोडे वळतील त्या दिशेचा सर्व प्रदेश आम्ही जिंकुन घेऊ, जर तुम्ही शहाणे आणि विचारी असाल तर माझे प्रतिनिधी सांगतील त्या महत्वाच्या विषयाचा आधी फडशा पाडाल” इंग्रजांना अशा प्रकारे सांगणारा भारतातील कोणत्याही संस्थानिकाची हिंमत तर झाली नाहीच पण मराठेशाही मध्ये सुध्दा असा मराठा सरदार होणे नाही. इंग्रजांच्या विस्तारवादी साम्राज्य धोरणामुळे भारतातील संस्थाने कशा पध्दतीने इंग्रजांच्या नियंत्रणाखाली येत आहेत? त्यामुळे यांना वेळीच रोखले नाहीतर या देशातील कोणत्याही संस्थानिकाचे अस्तित्व रहाणार नाही. त्यामुळे भारतातील संस्थानिकांनी एकत्र येवून इंग्रजांना भारताच्या बाहेर हाकलून लावण्यास सहकार्य करा, माझा घोडा आघाडीला आहे, आपण सर्वजन मिळून इंग्रजांना पराभूत करण्यासाठी सक्षम आहोत.

## 5.2 **इंग्रजांचा भारतातील वाढता प्रभाव :-**

इंग्रजांनी व्यापारी पेशाने भारतात प्रवेश केल्यानंतर त्यांना साम्राज्य स्थापन करण्याला हिंदुस्थानची भूमी फार मऊ वाटली.[१] त्या उद्देशानेच इंग्रजांनी भारतात आपले पाय रोवण्यास सुरुवात केलेली दिसते. मराठ्यांच्या राज्याला संपुष्टात आणुन त्यांच्या जागेवर बसण्यासाठी इंग्रजांनी बराच खटाटोप करण्यास सुरुवात केली. या प्रयत्नाचे फळ त्यांना मिळाले. मराठेशाहीची केंद्रीय सत्ताही या कालखंडात कोसळल्या नंतर मराठेशाहीच्या आधार स्तंभांना आपल्या नियंत्रणाखाली आणण्याचे कार्य इंग्रजांना सोपे होते. त्यासाठी इंग्रजांनी कधी नरमाईचे धोरण स्वीकारुन तर कधी आपल्या शक्तीचे भय दाखवून, कधी आमिषे दाखवून तर कधी जबरदस्तीने चारही बाजूने मराठेशाही वर आक्रमण करण्यास इंग्रजांनी सुरुवात केली. इंग्रजांच्या या कुटनितीला अयशस्वी करणारा मराठेशाही मध्ये एकही धुर्त मुत्सद्दी या कालखंडात दिसत नाही. प्रत्येकजण आपआपले अस्तित्व जपण्याच्या, संरक्षणाच्या दृष्टीने सातत्याने प्रयत्न करताना दिसतात त्यामुळे इंग्रजांची कुटनिती ही भारतातील संस्थानिक आणि मराठेशाहीमध्ये यशस्वी झालेली दिसते.

इंग्रजांनी मराठ्यांचे साम्राज्य गिळंकृत करताना शौर्या पेक्षा मुत्सद्देगिरीचा कुटिल नीतीचाच विशेष अवलंब केला.[2] मराठेशाहीच्या इतिहासाकडे वळुन पाहिले असता हे लक्षात येईल की मराठेशाही इंग्रजांच्या अधिपत्याखाली कुटनितीच्या माध्यमातून नियंत्रणात आलेली पहावयास

मिळते. मराठेशाही मध्ये असणाऱ्या एकमेकाविषयी संशय, द्वेष, मत्सर इत्यादीमुळे इंग्रजांची कुटनिती यशस्वी झालेली दिसुन येते. मराठेशाही मध्ये एकमेकांच्या मनामध्ये वैमनस्य नव्हते तरी त्यांच्यात इंग्रजांनी निर्माण करुन मराठ्यांमध्ये कल्ह उत्पन्न करावयाचा, मध्यस्थाची भूमिका बजावून स्वत:चे नियंत्रण स्थापीत करावयाचे ही इंग्रजांची कुटनीती त्यावेळी भारतभर प्रत्येक संस्थानिकां मध्ये निर्माण करुन आपली किंमत वाढवायची हे इंग्रजांचे धोरण होते. बंगाल आत्मसात करुन इंग्रजांनी मुसलमानांच्या दिल्लीच्या राज्याचे पाणी जोखले.[3] वास्तविक दिल्लीच्या शाहीचा दरारा हा पूर्वी सारखा राहिलेला दिसत नाही. त्यामुळे याचा फायदा इंग्रजांनी आपले साम्राज्य वाढविण्यासाठी करुन घेतलेला दिसतो. पुढे चालुन इंग्रजांनी राज्याचे रुपांतर भारतभर साम्राज्य वाढविण्यात केले होते. परंतु कालांतराने मराठेशाहीची इंग्रजांचा जो प्रसंग आला त्यावेळी मराठेशाही आपले प्रभुत्व, दरारा, हा सद्यस्थितीत जोरात असल्याने त्यावेळी इंग्रज मराठेशाहीच्या वाटेस गेलेले दिसत नाही. इंग्रजांनी मराठेशाहीच्या विरुध्द जाण्यासाठी योग्य वेळेची वाटपाहिली ज्यावेळी ही संधी त्यांना प्राप्त झाली त्यावेळी त्यांनी मराठेशाहीशी कुटनीती च्या माध्यमातून आपले प्रभुत्व स्थापन करण्यास हळुहळु सुरुवात केली. इंग्रजांनी त्यावेळी ओरिसाचे राजकारण करुन हा प्रांत आपल्या नियंत्रणाखाली आणलेला दिसतो. त्यावेळी मराठेशाही कमकुवत होत चालली होती. त्यामुळे या अगळिकेचा प्रतिकार यांच्याने झालेला दिसत नाही. याचा फायदा घेऊन मराठेशाहीतील प्रमुख सरदारांना फोडून शेवटी केंद्रीय सत्तेला इंग्रजांनी आपल्या कुटूनीतीच्या माध्यमातून नियंत्रण स्थापीत केलेले दिसुन येईल.

क्लाईव्ह म्हणतो ज्या देशातील लोक स्वदेश बांधवांवर निर्विकार पणे हत्यारे चालवितात. ते लोक कधी स्वतंत्र रहाणेच शक्य नाहीत.[४] त्यामुळेच भारतात इंस्ट इंडिया कंपनीच्या माध्यमातून इंग्रजांनी व्यापारी धोरणपुढे करुन इंग्रजांचा साम्राज्य विस्तार धोरणाची दिशा वाढत गेलेली आहे. ज्यावेळी देशाच्या अंतर्गत भागामध्ये गोंधळाची बंडाची भाषा बोलली जाते. त्याला अनुसरुन कृत्य केली जातात. त्या कृत्याचा परिणाम हा त्या देशातील नागरिकांना भोगावे लागते त्यावेळी परकीय शक्तिना आपले अस्तित्व निर्माण करण्यासाठी संधी ही देशांतर्गत नागरकि आपले स्वातंत्रय न पहाता परकिय सत्तांच्या हस्तक्षेपाच्या माध्यमातयून आपल्या देशबांधवावर हल्ले करुन परकियांना आपल्या स्वातंत्र्या मध्ये हस्तक्षेप करण्यास संधी प्राप्त करुन देतात. तेव्हा देशांतर्गत नागरिकां मध्ये स्वातंत्र्य रहाणे कदापि शक्य नाही.

पोर्तुगाल, डच, फ्रांसिसो कंपनी आणि इंग्लंडची ब्रिटीश ईस्ट इंडिया कंपनी अशा युरोपियन राष्ट्रांनी व्यापारासाठी भारतात प्रवेश केला होता.[5] भारतात ब्रिटिश ईस्ट इंडिया या इंग्लंडच्या व्यापारी कंपनीने इ.स. 1757 साली प्लासीच्या युध्दा द्वारे बंगालमध्ये इंग्रजांनी सत्ता स्थापन केली. त्यावेळी इंग्रजी सत्तेचा पहिला राज्यपाल हा रॉबर्ट कलाईव्ह हा होता. त्यामुळे त्यास भारतातील इंग्रजी सत्तेचा संस्थापक संबोधण्यास येते. प्लासीच्या युध्दाने भारतात इंग्रजी सत्तेचा पाया घातला तर, इ.स. 1764 च्या बक्सार युध्दामुळे भारतात या सत्तेचा पाया हा अधिक मजबुत झालेला पहावयास मिळतो. प्लासीच्या युध्दाने कालचे व्यापारी बंगाल प्रांताचे मालक झाले.[6] बंगाल मध्ये इंग्रजांचे प्रभुत्व, शक्ती वाढल्याने ईस्टइंडिया कंपनीच्या अंतर्गत, काम करणाऱ्या कर्मचारी वर्ग आणि बंगाल प्रांताचा नवाब याने तेथील नागरिकांचे आर्थिक शोषण करण्यास सुरुवात केली. या घटने बाबतीत रॉबर्ट क्लाईव्ह म्हणतो ईस्टइंडिया कंपनी आणि त्या कंपनीचे पदाधिकारी यांनी बंगाल प्रांताच्या नवाबाकडून मोठ्या प्रमाणामध्ये धनसंपत्ती गोळा केलेली पहावयास मिळते. डॉ. ईश्वरी प्रसाद यांच्या मते, प्लासीच्या युध्दाने ब्रिटिश बंगाल या प्रांताचे मालक झाले आणि पुढील शंभर वर्षात त्यांनी भारत हस्तगत केला. सर जदुनाथ सरकार म्हणतात 23 जुन 1757 रोजी भारतीय इतिहासाचा मध्यकाळ समाप्त होवून भारताच्या आधुनिक इतिहासाला प्रारंभ झाला, प्लासी युध्दाचे सर्वश्रेय हे रॉबर्ट क्लाईव्ह यांना जाते.

22 आक्टोबर1764 रोजी बक्सार चे युध्द इंग्रज आणि संयुक्त सैन्य यांच्यात युध्दाला सुरुवात.[7] या युध्दामध्ये इंग्रजांचा विजय झाला आणि भारतातील इंग्रजी सत्तेचा पाया आणि साम्राज्य विस्तारवादी धोरणाचा मार्ग मोकळा झालेला दिसतो. इंग्रजांनी भारतातील आपले साम्राज्य विस्ताराचे धोरण हे पुढील 100 वर्षात ईस्टइंडिया कंपनीला आपली सार्व भौम सत्ता भारतात निर्माण करता आलेली आहे.17 व्या शतकात भारतीय इतिहासामध्ये मराठा शक्तीचा उदय आणि विकास ही अनन्यसाधारण घटना होती.[8] छत्रपती शिवाजी महाराजांनी उत्तरेतील मोगल संस्कृतीच्या आक्रमणा पासून दक्षिणेकडील संस्कृतीचे संरक्षण करण्या करिता स्वराज्याची स्थापना केलेली पहावयास मिळते तेव्हा पासून ते इ.स. 1757 च्या प्लासी युध्दापर्यंत इंग्रज आणि मराठा हा संघर्ष पहावयास मिळत नाही. ब्रिटीश ईस्टइंडिया कंपनीच्या माध्यमातून इंग्रजांनी देशातील व्यापाऱ्यांना व मराठ्यांना ईस्टइंडिया कंपनीद्वारे त्रास देण्याचे एकही उदाहरण त्या कालखंडात सापडत नाही. इंग्रजांनी ईस्टइंडिया कंपनीच्या माध्यमातून भारतात स्वत:ची सत्ता स्थापन ही 23 जुन 1757 साली झालेल्या

प्लासी च्या युध्दातील विजयाने केली आणि इंग्रज आणि मराठा संबंधाना सुरुवात झालेली पहावयास मिळते.

इंग्रज मराठा पहिल्या युध्दात इंग्रजांना विशेष असा प्रादेशिक लाभ झालेला दिसुन येत नाही.[9] परंतु या युध्दाने ईस्ट इंडिया कंपनीचे भारतातील सार्वभौमत्व यशस्वी झाले आहे. असे कीन इतिहासकाराने संबोधले आहे. इंग्रज गव्हर्नर जनरल वेलस्ली भारतातील एकेक राज्य आक्रमण व तैनाती फौजेचा वापर करुन ब्रिटीश सत्तेखाली आणत होता.[10] गर्व्हनर जनरल वेलस्लीचे धोरणच हे आक्रमक पध्दतीचे होते. संपूर्ण भारतातील संस्थानिकांमध्ये आपले वर्चस्व, नियंत्रण स्थापीत करण्यास सुरुवात केलेली दिसते. वेगवेगळया संस्थानिकांना इंग्रजांच्या नियंत्रणाखाली आणत असताना मराठा राज्याच्या अंतर्गत शिरकाव करण्याचा त्यांचा मानस होता. मराठा राज्य जर आपण जिंकले तर भारतातील सत्ताही अबाधित राहील आपल्याला विरोध करणारी सत्ता दुसरी कोणी नाही याचा इंग्रजांना अभ्यास होता. त्यामुळे वेलस्लीने मराठ्यांच्या आजुबाजुला असणाऱ्या लहानमोठ्या राज्यावर इंग्रजांचे वर्चस्व स्थापन करत असताना, दुसरीकडे पेशवा बाजीराव दुसरा हा मराठा सरदाराशी युध्द लढत होता. त्यामुळेच पराभूत झालेल्या दुसऱ्या बाजीराव पेशव्याला स्वराज्या मध्ये कोणत्याही मराठा सरदारांनी सहकार्य केले नाही की त्यास सहानुभूती मिळाली नाही.

शिंदे व भोसले या युतीचा पराभव करण्यासाठी गर्व्हनर जनरल वेलस्लीने उत्तर भारतात इंग्रजी सैन्याचे नेतृत्व जनरल लेक कडे देण्यात आले तर दक्षिणेकडील नेतृत्व हे गर्व्हनर वेलस्लीचा भाऊ आर्थर वेलस्ली याच्याकडे देण्यात आले.[11] आर्थर याने संयुक्त सैनिकांचा पराभव हा वसई या ठिकाणी केला व बऱ्हाणपूर व आशिरगडातील शिंद्याची लष्करी ठाणी इंग्रजांनी जिंकुन घेतली त्यानंतर दौलतराव शिंद्या सोबत वाटाघाटी करण्यासाठी इंग्रजांनी कर्नल कॉलिन्स यास पाठवले असता या दोघांमध्ये वाटाघाटी होऊ शकल्या नाहीत. अशा पध्दतीने इंग्रजांच्या युध्दनीतीद्वारे दोन्ही सैन्यदलांनी वेगवेगळ्या ठिकाणी हल्ला करुन गाठण्याचा निर्णय इंग्रजांनी घेतला होता. उत्तरेकडे असणारा जनरल लेक याने दिल्ली जिंकुन सम्राट शहाआलम यास ताब्यात घेऊन आग्रा आणि मथुरे वर आपले नियंत्रण मिळविल्या नंतर लासवरी या ठिकाणी इंग्रजांनी १ नोव्हेंबर 1803 रोजी पराभव केला होता. त्या वेळी गाविलगडचा किल्ला इंग्रजांनी जिंकल्यामुळे भोसले हे इंग्रजांना शरण येताना दिसतात.

ज्यावेळी मार्क्विस वेलस्ली इंग्लंडहुन भारतात आला त्यावेळी नेपोलियन बोनापार्ट भारत विजयाच्या योजना बनवीत होता.[12] त्यावेळी इंग्लंड आणि फ्रांस हे दोन देश सत्ता संघर्षात गुंतलेले होते. त्यामुळे भारतातील अधिकतर संस्थानिक अप्रत्यक्षपणे फ्रांसच्या प्रभावाखाली असलेले दिसतात. त्यावेळच्या तत्कालीन परिस्थितीचा विचार करता फ्रांसच्या प्रभावाखाली असणाऱ्या संस्थानिकांना कशा पध्दतीने प्रभावा पासून दुर करता येईल. परंतु भारतामध्ये ब्रिटीश ईस्ट इंडिया कंपनीच्या माध्यमातून आपल्या साम्राज्याचा विस्तारवादी धोरणासाठी जर प्रत्यक्ष अप्रत्यक्ष धोका कुणाचा असेल तर तो फ्रांसचा होता. फ्रांस हा येथील संस्थानिकांवर आपला प्रभाव पाडण्यात यशस्वी झालेला दिसतो. कारण भारतातील काही संस्थानिकामध्ये फ्रांस त्यांच्या सैनिकांना प्रशिक्षीत करण्यासाठी सदैव तयार असे. जसे टीपु सुलतानच्या सैन्याला फ्रांसने प्रशिक्षीत केले होते. वेलस्लीने भारतातील फ्रांसच्या प्रभावाला टप्याटप्याने कमी करण्याचे धोरण आखले होते.[13] त्याच दृष्टिकोनातून वेलस्लीने प्रथम मॉरीशसवर हल्ला करण्याची योजना बनवली जेणेकरुन हिंदी महासागरातील फ्रांसच्या आखत्यारीत असणाऱ्या लष्करी तळांना उध्वस्त करण्यात येईल. ॲडमिरल रेनर हा त्या वेळापर्यंत वेलस्लीला सहकार्य करण्यासाठी तयार नव्हता जोपर्यंत ग्रह मंत्रालयाकडून आदेश उपलब्ध होत नाहीत त्यावेळी डच, हे फ्रांसीसी चे मित्र होते. शेवटी वेलस्लीने गृहसरकारशी बोलणीकरुन विनंती करण्यात आले की, केप कॉलनी ही डचां पासून हस्तगत करण्यात यावी. त्याच वेळेला गृह शासनाद्वारे वेलस्लीला आदेश आला की एका भारतीय सैन्य दलाची तुकडी इजिप्तला पाठविण्यात यावी या आदेशान्वये वेलस्लीने इ.स. 1802 साली आमीनशी संधी करण्यात आली परंतु वेलस्लीने फ्रांसीसीच्या प्रभावाला भारतामध्ये रुजु दिले नाही. वेलस्लीला फ्रांसचा प्रभाव कमी करुन इंग्रजांचा प्रभाव ईस्ट इंडिया कंपनीच्या माध्यमातून निर्माण करावयाचा होता. त्यासाठी वेलस्लीची धडपड होती. वेलस्लीला ब्रिटनच्या पंतप्रधानाचा पाठिंबा होता. या पाठिंब्याच्या आधारावरच वेलस्लीने इंग्रजांच्या विस्तारवादी धोरणाला यशस्वी केले.[14] इ.स.1799 साली वेलस्लीने माल्कमला फारस ला पाठविण्यात आले. त्या ठिकाणी असणाऱ्या फ्रांसीसी प्रभुत्वाला संपवायचे त्यासाठी माल्कम याने फारसच्या शहा बरोबर करार करण्यात यशस्वी झाला या कराराच्या अटीमध्ये एकअट अशी होती की फारसच्या शाहाने फ्रांसिसी नागरिकांना आपल्या राज्याच्या सीमेमधुन हाकलुन लावण्यात यावे अशा प्रकारची अट या करारामध्ये टाकण्यात आलेली होती. जेणेकरुन पुन्हा त्या ठिकाणी फ्रांसीसीचा प्रभाव निर्माण होवू नये. अशा प्रकारचे धोरण वेलस्लीने आखले होते. इ.स. 1803 साली जनरल लेक याने आग्रा व दिल्ली या दोन शहरावर आपले

नियंत्रण स्थापन केले. मोगल शाहआलम इंग्रजांच्या प्रभावाखाली आला अशा पध्दतीने वेलस्लीने भारतातून फ्रांसीसी प्रभावाला टप्या टप्याने कमी करुन पूर्णपणे इंग्रजी प्रभावाखाली आणण्यात यशस्वी झालेला पहावयास मिळतो.

इ.स.1798 साली वेलस्ली भारतात दाखल होताच इंग्रजांच्या धोरणामध्ये बदल झाला.[15] वेलस्लीने स्वत: पुढाकार घेऊन निजाम, टिपु, आणि मराठे या भारतीय संस्थानिकांना फ्रेंचाच्या प्रभावाखाली येऊ द्यायचे नाही. अशा प्रकारचे धोरण ठरवले होते निजाम हा मराठ्यांच्या नियंत्रणा पासून मुक्त होण्यासाठी इंग्रजांचे सहकार्य घेण्यासाठी उत्सुक होता. तेव्हा निजामाने इंग्रजांच्या प्रभावाखाली रहाण्याचे मान्य केले होते. इ.स. 1798 साली अशा प्रकारचा करार निजामाने इंग्रजाबरोबर केल्याने त्यावेळी मराठे हे सजग झाले होते. नाना फडणवीसांनी इंग्रजाबरोबर कोणत्याही प्रकारचा तह किंवा करार व औपचारिक संबंध ठेवण्यासाठी विरोध केला होता. त्यांना इंग्रजांची ध्येय धोरणे कशा प्रकारची आहेत. आणि आपल्या मराठा राज्याला याचे परिणाम काय भोगावे लागतील याची त्यांना जाण होती. त्यामुळे त्यांनी इंग्रजाबरोबर कोणत्याही प्रकारचे संबंध स्थापीत करण्यास असमर्थता दाखवली होती.

इ.स.1798 च्या निजामा बरोबर केलेला करार तसेच दुसऱ्या इंग्रज मराठा युध्दाने भारतातील फ्रेंचांच्या या अखेरच्या प्रयत्नासाही खीळ बसवली.[16] इंग्रजांचे वाढते प्राबल्य निजामा बरोबर इंग्रजांनी केलेला करार. यामुळे फ्रेंचांना निजामाच्या आखत्यारीत असणाऱ्या फ्रेंच सैन्य दलाच्या तुकड्या या निजामाने काढून टाकल्या होत्या. त्यामुळे फ्रेंचाना आपल्या प्रभावाखाली असणाऱ्या संस्थानिकांना सोडावे लागले त्यांची जागा इंग्रजांनी बळकावली होती. परंतु दुसऱ्या इंग्रज मराठा युध्दामध्ये फ्रेंचांनी इंग्रजांचा पराभव होण्यासाठी सातत्याने प्रयत्न केले परंतु या युध्दात मराठ्यांचा पराभव झाल्याने फ्रेंचाचे मनसुबे अयशस्वी झालेले दिसतात. त्यामुळे भारतातील आपल्या प्रभावास अयशस्वीता आली असे फ्रेंचाना वाटल्याने त्यांचे सर्व प्रयत्न अयशस्वी ठरलेले दिसतात.

टिपु सुलतान बरोबर इंग्रजांनी वेगळे धोरण अवलंबविले इ.स.1799 साली आवश्यक फौजेची आणि खजिन्याची तजवीज होताच त्यांनी टिपुवर हल्ला केला.[17] टिपु सुलतानवर हल्ला करावयाचा तर आपल्याकडे त्याच्या तोडीचे सक्षम असे लष्करी बळ असायला हवे. या लष्करी बळाला गतिमानतेने हल्ला करण्यासाठी शस्त्रास्त्रे व रसद पुरवठ्यासाठी धनसंपत्तीची आवश्यकता

आहे त्याची तजवीज होई पर्यंत इंग्रज टिपुवर हल्ला करु शकत नव्हते टिंपुकडे असणारे लष्करी बळ हे फ्रेंचांनी प्रशिक्षीत केलेल्या सैन्य तुकड्या होत्या. त्यासाठी इंग्रजांना सैन्यदलाची आणि धनसंपत्तीची तजवीज केल्या खेरीज टिंपु सुलतानवर हल्ला करु शकत नव्हते. ज्यावेळी इंग्रजांकडे या दोन्ही घटकांची जमवाजमव झाली त्यावेळी इंग्रजांनी टिपु सुलतानवर हल्ला करण्याचे ठरवले. त्या हल्ल्यात टिपु सुलतानचा पराभव झाला. इंग्रजांनी श्रीरंग पट्टणवर आपले नियंत्रण मिळवले टिपसुलतानचा सर्व प्रदेश आपल्या नियंत्रणाखाली घेतला यातील काही भाग हा निजाम आणि पेशव्याला देण्यात आला टिपुसुलतान वर आक्रमण करण्याच्या कार्यात पेशव्याने मराठ्यांची एक तुकडी इंग्रजांच्या बाजूने लढण्यासाठी पाठवली होती. त्यामुळे इंग्रजांनी काही भाग पेशव्यांना पण दिलेला दिसतो. यासर्व हालचाली नंतर इ.स. 1800 साली फक्त भारतातील दोनच सत्ता ह्या उरलेल्या दिसतात ते म्हणजे मराठे आणि इंग्रज इतर सर्व सत्ता या दोन्ही पैकी कोणाच्या तरी मांडलिक बनलेल्या होत्या. त्यामुळे पुढील काळात इंग्रज आणि मराठे या दोघांमध्ये संघर्ष होणे अपरिहार्य होते हे इंग्रज आणि मराठे दोघे ही समजुन होते.

18 व्या शतकात भारतातील तीन महत्वाच्या सत्ता पैकी मराठ्यांची सत्ता ही एक होती दुसऱ्या दोन सत्ता म्हणजे हैद्राबादचा निजाम आणि म्हैसुरचा हैदरअली होत.[18] या तिन्ही सत्ताधीशां मध्ये प्रामुख्याने मराठामंडळ हे महत्वपूर्ण होते. भारतातील इतर सत्ताधीशापैकी मराठा सत्ता ही लष्कराच्या दृष्टिकोनातून शक्तिशाली दिसुन येते. मोगलांच्या सत्तेवर मराठा सत्तेने आपले प्रभुत्व स्थापीत केले होते. एकंदरीत त्या कालखंडाचा विचार करता मोगलांच्या सत्तेचा वारसा सांभाळण्याची जबाबदारी क्षमता ही मराठा सत्तेमध्ये होती त्यामुळे मराठा साम्राज्य अंतर्गत केंद्रीय नेतृत्व करण्यासाठी सक्षम असा नेता नव्हता. त्यामुळे मराठा राज्यातील सर्व मराठा सरदारांना एकत्रित करेल असे नेतृत्व त्याकाळी नव्हते. तेंव्हा त्याचे रुपांतर हे मराठामंडळा मध्ये झालेले पहावयास मिळते छत्रपती शिवाजी महाराजांनी निर्माण केलेले स्वराज्य हे लष्कराच्या दृष्टिकोनातून विकेंद्रीत झालेले होते. परंतु तिसऱ्या पानिपतच्या युध्दातील पराभवाने मराठ्यांच्या केंद्रीय सत्तेला मोडकळीस पणा आलेला दिसुन येतो. मराठा सत्ता ही अखंड भारतात आपले वर्चस्व निर्माण करुन होती. परंतु बदलत्या राजकारणामुळे आणि नवसरदारांची निर्मिती झाल्याने पुन्हा मराठा सत्ता भारतात आपले अस्तित्व निर्माण करण्यासाठी इंग्रजांशी झुंज देताना दिसतात. सत्तेच्या विकेंद्रीकरणाचे परिणाम मराठी सत्तेवर मोठ्या प्रमाणात झाले व त्यातुन नवसरदार वर्गाची निर्मिती झाली.[19] पहिल्या बाजीराव पेशवे यांच्या

कालखंडामध्ये मराठेशाहीचा विस्तार उत्तरेकडील प्रांतामध्ये व्हावा या दृष्टीने बाजीराव पेशवे यांनी नवसरदारांच्या खांद्यावर मराठेशाहीचा विस्तार वाढविण्याची जबाबदारी सोपवलेली दिसते. नागपुरचे भोसले, गुजरात चे गायकवाड, इंदौरचे होळकर, ग्वाल्हेरेचे शिंदे, धारचे पवार या नवसरदारांनी मराठेशाहीच्या नेतृत्वाखाली आपले सार्वभौमत्व उत्तरेकडील प्रांतामध्ये प्रस्थापीत केले होते. त्यामुळे मराठा मंडळ हे भारतातील इतर संस्थानिकांमध्ये शक्तीशाली समजले जात. फ्रेंचांचे व मराठ्यांचे बरेच करार या कालखंडात झालेले आढळुन येतात. पानिपतच्या युध्दानंतर मराठासत्तेमध्ये अंतर्गत मतभेद निर्माण झाल्याने पुढील काळामध्ये मराठासत्तांचा ऱ्हास झाल्याचा पहावयास मिळेल. पेशव्यांच्या घराण्यातील अंतर्गत मतभेद, हैदरअली, निजाम यांचा पराभव केल्याने इंग्रजास फायदा झाला.

इ.स. 1800 सालातील महत्वपूर्ण घटना म्हणजे नाना फडणवीस यांचा मृत्यू.[20] नाना फडणवीस यांनी मराठेशाहीची सत्ता स्वत:च्या नियंत्रणाखाली 25 वर्ष ठेवलेली दिसते आपल्या कौशल्यपूर्ण मुत्सद्देगीरीचे दर्शन त्यांनी दाखवून दिले, पानिपतच्या युध्दानंतर उदयास आलेल्या तुकोजी होळकर, महादजी शिंदे, सर्वोत्कृष्ट मराठा प्रशासक असलेल्या अहिल्याबाई होळकर यांच्या सारख्या नेतृत्वाच्या कार्यकाळात नाना फडणवीस हा शेवटचा नेता होता या सगळयांचा मृत्यू इ.स. 1795 ते 1800 या पाच वर्षात झाला.

इंग्रजांनी रघुनाथरावाला आपल्या हाताशी ठेवून मराठ्यांच्या कारभारावर आपली पकड मिळविण्याचा केलेला प्रयत्न.[21] भारतात आपल्या साम्राज्यविस्तारासाठी एका दशका पूर्वी बंगाल आणि अवधची सत्ता आपल्या नियंत्रणाखाली आणली होती. तब्बल 25 वर्षानंतर इ.स.1803 साली एक रक्षण कर्ता या नावाखाली इंग्रजांनी मराठेशाहीची सत्ता आपल्या नियत्रंणाखाली आणण्यासाठी केलेल्या नीतीचाच हा भाग होता.

इ.स.1803 मधील महत्वाचे वैशिष्टये हे उत्तर आणि दक्षिणेच्या कारभारातील वाढते अंतर आणि प्रमुख राजकीय सत्तांचा अस्त.[22] भारतातील संस्थानिकांमध्ये प्रमुख सत्ता ह्या. म्हैसुरचा टिपु सुलतान, हैद्राबादचा निजाम आणि मराठेशाहीचे नाना फडणवीस व इंग्रज यांच्यामध्ये सातत्याने वेगवेगळे तह करण्यात आलेले होते. त्यामुळे प्रत्येक संस्थानिक हा आपले स्थान उंचावण्यासाठी प्रयत्न करताना दिसतात. इंग्रजांनी मराठ्यांच्या विरोधात इ.स. 1803 मध्ये गुजरात, बुंदेलखंड व

ओरिसा मध्ये युध्दात यश संपादन केले.[23] 29 ऑगस्ट 1803 रोजी कर्नल मुरने भडोच काबीज केले, 17 सप्टेंबर 1803 रोजी चंपानेर आणि पावागडावर आपले नियंत्रण स्थापीत करुन आक्टोबर 1803 मध्ये कटक व बालासोर आखत्यारीत केलेले पहावयास मिळेल मराठ्यांच्या नियंत्रणाखाली असलेल्या लहान, लहान प्रांताना बाजूला करण्यात इंग्रजांना यश मिळाले इंग्रजांनी राजपुत, जाट, दोआबचा नवाब, बुंदेल हिंमत बहादूर, समशेर बहादूर, व अंबाजी इंगळे यास मराठ्यांपासून फोडण्यात इंग्रजांना यश मिळाले इंग्रजांनी भारतातील संस्थानिकांना आपल्या अंकीत करुन मराठा राज्याच्या कारभारामध्ये हस्तक्षेप, नियंत्रण स्थापीत करण्यासाठी इंग्रजांची कुटनिती ही यशस्वी ठरलेली दिसते.

डिसेंबर 1803 पर्यंत इंग्रजांनी पराभूत सत्तांना कमकुवत करुन सोडणारे तह करायला भाग पाडले.[24] इंग्रजांनी आपले विस्तारवादी धोरण अवलंबून पेशव्यांची पुण्यातील सत्ता ही निवासी इंग्रज अधिकाऱ्यांच्या हातात गेल्याने इंग्रज अधिकारी सर्व कारभार आणि सरकारी कामे इंग्रज अधिकाऱ्याच्या नेतृत्वाखाली पार पाडण्यात येवू लागले, इंग्रजांनी सर्व राजपुत संस्थानिकांना मांडलिकत्वाचे तह स्वीकारण्यास लावले तसेच माळव्याच्या उत्तरेकडील जाट, रोहीले आणि बुंदेल्यांच्या राज्याचीही हीच अवस्था इंग्रजांनी करुन ठेवली होती. नाना फडणवीस यांनी म्हटले होते की, अनिष्ट गोष्टी घडण्याची संभावना पुढील काळात दिसते, नियतीने तसे ठरविल्यामुळे त्यातुन आपली सुटका नाही.[25] मराठा मंडळाचा पाडाव होणे आता निश्चित आहे. इंग्रजांनी टिपु सुलतानला पराभूत केलेले आहे. इंग्रजांची नजर ही आता मराठा राज्याकडे आहे अशी शक्यता नाना फडणवीस यांनी बोलुन दाखवली होती, परंतु दुसऱ्या बाजीरावाला नाना फडणवीस यांनी आपल्या दरबारामधून टीपु सुलतानच्या वकिलास काढण्या करीता सांगितले होते. नाना फडणवीस यांची त्या कालखंडात भविष्यवाणी खरी ठरत होती. त्यांना इंग्रजांच्या ध्येय धोरणांचा अंदाज आल्याने त्यांनी शक्यता वर्तवली होती. पुढे ते म्हणतात की टिपु सुलतान संपला आहे, इंग्रजांच्या साम्राज्यावादी व विस्तारवादी धोरणाचा प्रभाव वाढताना दिसत आहे भारतातील असंख्य लहान मोठे राजे राजवाडे यांनी इंग्रजांचे मांडलिकत्व पत्कारले आहे. आता ते मराठा राज्याच्या दिशेने पुण्यावर आपले नियंत्रण मिळविण्यासाठी आक्रमण करण्यासाठी तयारी करतील.

पेशव्यांच्या गादीसाठी चाललेल्या संघर्षाचे बरेच दुरगामी परिणाम झाले.[26] मराठा राज्याच्या छत्रछायेखाली असणारी लहान लहान प्रांत हे पेशव्यांच्या अंतर्गत संघर्षामुळे त्यांच्यावर नियंत्रण

राहिले नाही, इंग्रजांना ही संधी चालुन आली इंग्रजांना माहित होते की मराठा राज्याला कमकुवत करण्यासाठी अंतर्गत संघर्षहाच कारणीभूत ठरेल, परंतु यांच्या नियंत्रणात असणाऱ्या प्रांतांना प्रथम बाजुला करुन आपले नियंत्रण या प्रांतावर मिळवावे लागेल. त्यावेळी मराठा राज्यावर आपल्याला नियंत्रण स्थापीत करण्यात येईल परंतु पेशव्यांच्या अंतर्गत संघर्षाचा परिणाम हा मराठा राज्याचा अंतर्गत भाग असलेले प्रांत होते. त्यांच्याकडे असणारे केंद्रीयसत्तेचे विकेंद्रीकरण झाल्याने मराठाराज्य कमकुवत झालेले पहावयास मिळते. इंग्रजांची तयारी आणि संघटन अधिकमजबुत होते. लॉर्डवेलस्ली व लॉर्डलेक यांनी मिळून सुत्रबध्दपणे मोहिमा योजिल्या.[27] वेल्सली आणि लेक यांनी मराठेशाहीच्या राज्यावर कुटनितीच्या माध्यमातून हल्ले करण्याची योजना आखण्यास सुरुवात केली. इंग्रजांचे सैन्य संघटन मोठ्या प्रमाणात सज्ज करण्यात आले. इंग्रजांनी आपली मानसिकता मराठेशाहीच्या विरुध्द आक्रमण करावयाचे आहे अशी बनवली. वेलस्ली आणि लेकने आपल्या वेगवेगळ्या आघाड्यावर असणाऱ्या प्रशिक्षीत सैन्यदलांना तैनात करण्यात आले, इंग्रजांचा प्रमुख उद्देश हा होता की कुटनितीच्या माध्यमातून मराठा राज्याच्या अंतर्गत असणारी बलाढ्य सरदार घराणी यांना एकमेकांपासून वेगळे करणे यांच्यात वैमनस्य निर्माण करणे दौलतराव शिंदे याने उभारलेल्या नव्या सैन्यदलास फोडणे, जेणेकरुन त्यांची शक्ती कमी होवू शकेल.त्याचबरोबर होळकरांचे नियमित उत्पन्न देणाऱ्या प्रांतामध्ये यांचे उत्पन्न खंडीत करणे तो प्रदेश आपल्या कब्जात घेणे इत्यादी योजना वेलस्ली आणि लेकयाने आखलेल्या होत्या.

द्वितीय इंग्रज-मराठा युध्दात मराठा सरदार मंडळाच्या होळकर, शिंदे, भोसले यातीन प्रमुख आधारस्तंभाची इंग्रजांनी वासलात लावली.[28] इंग्रजांच्या सुत्रबध्दपणे मोहीमा ह्या मराठेशाहीच्या विरुध्द आखण्यात वेलस्ली आणि लेक यांनी परिश्रम व तयारी केलेली होती. मराठेशाहीचा अंत जवळ आलेला आहे. हे द्वितीय इंग्रजमराठा युध्दाने स्पष्ट केलेले आहे. कारण मराठेशाहीच्या दरबारा मधून फ्रेंच वकिलांची हकालपट्टी करण्याचे स्वप्न हे इंग्रजांचे पूर्ण झालेले होते. त्याच बरोबर दिल्लीच्या मोगलबादशाही वरील मराठेशाहीचे नियंत्रण कायमचे संपुष्टात येऊन आता मोगलबादशाही इंग्रजांच्या नियंत्रणाखाली आल्याने भारतातील इंग्रजांची सत्ता ही सर्वाभौम होण्यास हरकत नसावी, पुढे चालुन लॉर्ड हेस्टींगने वेलस्लीचे अपूर्ण राहिलेले कार्य पूर्ण करुन शेवटचा श्वास घेणाऱ्या मराठेशाहीचा कायमचा सोक्षमोक्ष लावलेला दिसतो.

दुसऱ्या इंग्रज-मराठा युध्दामुळे मराठ्यांचा सर्व प्रदेश प्रत्यक्षपणे इंग्रजांच्या अंमलाखाली आला.[29] इंग्रजांनी ठरवलेल्या युध्द योजना, मोहिमेच्या माध्यामतून मराठ्यांचा पराभव केलेला पहावयास मिळतो. इंग्रजांना सातत्याने वाटत असे की मराठेशाहीचा हा प्रदेश आपल्या नियंत्रणाखाली कधी येईल याकडे इंग्रजी राज्यकर्त्याचे लक्ष लागुन राहिले होते. थोडयाच कालावधीत इंग्रजांनी सर्वच प्रदेश आपल्या नियंत्रणाखाली आणला व आपल्या मालकीचा बनवला. दुसऱ्या इंग्रज मराठा युध्दाचे महत्व कळुन येईल विजयाची वार्ता येताच जनरल मन्रो याने जे उदगार काढले ते महत्वाचे समजले पाहिजेत.[30] आता आम्ही संपूर्ण हिंदुस्थानचे मालक बनलेले आहोत आम्हाला येथून हाकलून लावणे आता शक्य नाही याचे सर्वश्रेय हे आपल्याला वेलस्लीला द्यावे लागते वेलस्लीने योजनाबध्द पध्दतीने पाऊले उचलली आणि मराठी सत्ता खिळखिळी करुन टाकली. वेलस्लीने ज्या वेळी भारतात 26 एप्रिल 1798 रोजी इंग्रज अधिकारी म्हणून पदभार स्वीकारला त्यावेळी त्याने इंगजांच्या विस्तारवादी धोरणाला प्रारंभ केला होता. भारतातील प्रत्येक लहान मोठी शक्तिशाली, कमकुवत संस्थानिकांना आपल्या नियंत्रणाखाली घेण्याचे धोरण आखले होते. भारतातील बलाढ्य मराठेशाहीची सत्ता ही टप्या टप्याने कमकुवत करुन मराठेशाहीच्या राज्यावर आपले नियंत्रण मिळविण्यात तो यशस्वी झालेला पहावयास मिळेल.

आमच्या बापदादांनी राज्यमिळविले त्यांचे घर घोड्याच्या खोगिरावर होते, तेथुन उठून ते तंबुत जाऊन बसले? आता तुम्ही शिपायांना मातीच्या बराकी बांधून देऊ लागला पण सांभाळा, पुढे सर्वांचीच माती होईल.[31] हे वाक्य दौलतराव शिंदे यांच्या दरबारामध्ये महादजी शिंदे यांच्या कालखंडातील सैनिकाचे दौलतरावांना उद्देशुन होते. मराठ्यांची सत्ता ही उत्तरेकडे विस्तारण्यात घोडदळाचा फार मोठा वाटा आहे. घोडयाच्या खोगीरावरच राहून त्यांनी मराठेशाहीचा विस्तार हा अटकेपार केलेला पहावयास मिळतो. कालांतराने महादजी व तुकोजी होळकर यांच्या कार्यकाळा नंतर सैन्य व्यवस्थेमध्ये फार मोठे बदल झाले. पायदळाला महत्व देण्यात आले, कवायतीकंपू बनविण्यात आल्यामुळे युध्दातील आक्रमक हालचाली आणि शत्रुच्या सैन्यावर गतिमानतेने हल्ला करणे हे कार्य नवीन सैन्य व्यवस्थेमध्ये मंदावले, सैनिकांना रहाण्यासाठी त्याकाळी उघड्या रानावर आराम करावा लागे. परंतु आता सैनिकांना रहाण्यासाठी घरे बांधून देण्यात येवू लागली. त्यामुळे त्यांच्यातील चपळता कमी होऊन आरामदायी सोयी सुविधांमुळे सैन्यात आळशी वृत्ती निर्माण होऊ

लागल्या मुळे युध्दात हालचाली हया चपळतेने होत नव्हत्या यामुळे भविष्यकाळातील मराठेशाहीची सत्ताही इंग्रजांनी मातीमोल केलेली पहावयास मिळते.

सर फिलिप फ्रॅन्सिसच्या मते, मराठे कवायती शिकु लागले. तोफा ओतु लागले पण यातच त्यांचा नाश आहे.[32] मराठ्यांनी आपली लढण्याची जुनी स्वदेशी गनिमी कावा युध्दतंत्र पध्दतीचा स्वीकार केला नाही. त्यांनी परकीयांच्या युध्द लढण्याच्या पध्दतीनुसार लष्कराची उभारणी करण्यास सुरुवात केली परंतु ही पध्दत कोणालाही मानवत नाही आम्ही मराठ्यांना यापुढे भिण्याचे काही कारण नाही अशा पध्दतीचे मत मांडले होते तेही खरेच मराठ्यांनी आपल्या गनिमी कावा युध्दतंत्राचा त्याग करुन इंग्रजांच्या सैन्य पध्दतीचा स्वीकार केला त्यातच इंग्रजांचा विजय काही अशी झालेला दिसतो. मराठे घोडदळाद्वारेच युध्द हे प्रामुख्याने लडली जायची परंतु कवायती सैन्य, तैनाती फौजेचा स्वीकार केल्याने इंग्रजांना मराठ्यांच्या विरुध्द लढण्यासाठी यांना आपल्या डावपेचानुसार कार्य करण्यास फायदाच झाला इंग्रजांनी मराठ्यांना युध्दात पराभूत करण्यासाठी त्यांच्या जुन्या पध्दती पासुन मराठ्यांना दुर ठेवले त्यामुळे इंग्रजांना युध्दात सहज विजय मिळविण्यासाठी एक प्रकारे फायद्याची युध्दनिती व लष्करी व्यवस्था ही कारणीभूत ठरली.

वेलेस्लीचे चढाऊ धोरण टिपुने व मराठ्यांनी वेळेवर ओळखले नाही.[33] प्रत्येक संस्थानिक आपआपल्या सत्तेला सांभाळण्यासाठी प्रयत्न करताना दिसतील भारतातील इंग्रजांच्या विस्तारवादी धोरणांकडे प्रत्येक सत्तेने दुर्लक्ष केले. एकमेकांमध्ये संघर्ष करत बसले याचा फायदा इंग्रजांनी आपली सत्ता भारतात स्थिर करण्यासाठी करुन घेतलेला दिसुन येईल. प्रत्येक भारतीय संस्थानिकांनी इंग्रजांच्या विरुध्द एकत्र आले आसते तर किमान भारतामध्ये एवढ्या लवकर इंग्रजांची सत्ता सार्वभौमत्वाकडे पोहोचली नसती. परंतु एकमेकांच्या संघर्षामध्ये या संस्थानिकांनी इंग्रजाकडे दुर्लक्ष केले. त्याचा परिणाम भारतीय संस्थानिकांना इंग्रजांच्या नियंत्रणाखाली जाण्यात झाला. प्लासीच्या युध्दा पासून इंग्रजीसत्ताही त्यावेळच्या अस्तित्वात असणाऱ्या सत्तेच्या बरोबरीची झालेली पहावयास मिळेल. कालांतराने इंग्रजांनी लहानमोठ्या संस्थानिकांना आपल्या अंकित बनवले. त्यातच टिपु सुलतानच्या विरुध्द इंग्रजांनी श्रीरंग पट्टणच्या लढाईने इंग्रजांची सत्ता भारतात सार्वभौम होताना दिसेल. मराठ्यांच्या सत्तेकडे इंग्रजांनी टप्याटप्याने हस्तक्षेप करण्यास सुरुवात केलेली पहावयास मिळेल. भारतीय संस्थानिकांनी जर एकत्रीतपणे इंग्रजांच्या विरुध्द आक्रमण केले असते तर भारतामध्ये इंग्रजांना आपली सार्वभौम सत्ता स्थापन करण्यास अडचणी निर्माण झाल्या असल्या.

इंग्रज रेसिडेंट हे सर्व एकापेक्षा एक इंग्रज अंमलदार मराठ्यांचा पाडाव करण्यास चंगबांधून उभे राहिले.[34] इंग्रजांनी मराठ्यांच्या राज्यात कुटनिती आर्थिक अमिषे दाखवून, मराठ्यांमध्ये फुट पाडलेली दिसते. मराठ्यांच्या हालचाली, शस्त्रास्त्रे, लष्करी व्यवस्था, इत्यादी विषयी गुप्त बातम्या इंग्रजांनी मिळविल्या त्याला अनुसरुन इंग्रज मराठ्यांच्या विरुध्द धोरण ठरवु लागले. मराठा सत्तेतील लोकांना आमिषे दाखवून फितुर केले त्याच बरोबर मराठ्यांच्या राज्यातील नागरिकांना आपल्या बाजुने वळविण्यासाठी जाहिरनामे, वेगवेगळया प्रकारची आमिषे दाखवून इंग्रजांच्या बाजुने नागरिकांचे मत वळविण्याचे प्रयत्न केले. मराठेशाहीच्या सरदारांमध्ये व सावकारामध्ये आपली प्रतिमा ही सत्यवचनाची, आणि व्यापाराच्या दृष्टीने देवाण घेवाण विषयी इंग्रजांनी आपली पत वाढविली आणि दुसरीकडे तितक्याच गतीने मराठ्यांची पत कमी करण्याचा सातत्याने प्रयत्न इंग्रजांनी केलेला दिसुन येतो. मराठेशाहीतील सरदारांना एक एक करुन आपल्या बाजूने किंवा एकमेकांमध्ये संशयाचे वातावरण निर्माण करुन मराठेशाहीतील सरदारांमध्ये एकजुट होऊ दिली नाही. इंग्रजांनी आपल्या कुटनितीच्या माध्यमातून या मराठा सरदारांनी सदैव अखंडीत राहावे अशी नीती वापरलेली दिसते.

इंग्रजांच्या कारभारात एक हाती हुकुमत व एकसुत्री पणा होता.[35] भारतातील इंग्रजांचे प्रमुख ध्येय धोरण ठरविण्याचा अधिकार हा गर्व्हनर जनरल यास होता. देशांतर्गत इंग्रजांचे धोरण कशा प्रकारे असेल हे गर्व्हनर जनरल ठरवून देत. प्रत्येक ठिकाणी नेमलेला इंग्रजी रेसीडेंट हा त्याला त्याच्या आजुबाजुच्या संस्थानिकांच्या हालचालीची माहिती ही लवकरात लवकर सर्वांना समजावी या हेतूने माहिती पोहचवत परिस्थिती प्रमाणे प्रत्येक रेसिडेंटास स्वत:च्या अधिकार क्षेत्रात एखादे कृत्य करण्याचे संपूर्ण अधिकार प्रत्येक रेसीडेंटला देण्यात आलेले होते. भारतातील मोक्याच्या ठिकाणी कोणत्याना कोणत्या सबबीवर इंग्रजांनी आपली सैन्य दले वेगवेगळ्या विभागामध्ये विभागून दिलेली होती.

इंग्रजांनी प्रत्येक उद्योगाची रुपरेषा ठरवून दिल्यावर त्यास पोषक असे धोरण प्रत्येक ठिकाणच्या रेसिडेंटास आपल्या आकलन क्षमतेनुसार व सोयी प्रमाणे ठरविता येईल.[36] जर एखादवेळी समोरील बाजु अंगावर येत असेल त्यावेळी आपले चढाऊ धोरण सोडून स्वस्थ बसणे. वेगवेगळ्या ठिकाणाच्या इंग्रजी रेसिडेंटास गर्व्हनर जनरल द्वारे पैशाचा पुरवठा ही मोठ्या प्रमाणात होत होता. म्हैसुर, मद्रास, बंगाल या प्रदेशातील उत्पन्न हे मराठेशाहीला जिंकण्यासाठी इंग्रजांना कामी

आले. इंग्रजांच्या प्रत्येक बाबतीत मराठेशाहीतील पध्दत ही इंग्रजांच्या मानाने दुय्यम दर्जाची होती इंग्रजांकडे मोठ्या प्रमाणात पैशांचा मुबलक पुरवठा, दक्षतेचे जागरुक धोरण, एकतंत्री कारभार, न्यायान्याय सर्व बाजूस ठेवून प्रसंगी वाटेल तसे वर्तन करण्याची तयारी आणि पराभव झाला तरी ठासून पुन्हा प्रयत्न करण्याची चिकाटी इंग्रजांच्या अंगीगुण असल्याने मराठेशाहीवर आपले नियंत्रण प्रस्थापीत करण्यासाठी मराठेशाहीला कमकुवत करत गेले. मोठमोठे खडक बारीक भेगामधून पाणी झिरपुन शेवटी खिळखिळे होतात. तशा प्रकारची परिस्थिती त्या कालखंडामध्ये इंग्रजांनी मराठेशाहीची प्रामुख्याने पुण्यातील पेशवे दरबार व मराठेशाहीच्या उत्तरेकडील सरदार, होळकर, शिंदे, भोसले, गायकवाड, या प्रमुख सरदारांची केलेली पहायला मिळते.

कुटनीतीच्या क्षेत्रात इंग्रजांनी मराठ्यांवर मात केली.[37] इंग्रजांनी भारतातील वेगवेगळी संस्थाने आपल्या ताब्यात घेवून मराठेशाहीवर मात करण्यासाठी इंग्रजांनी लढाईपूर्वी मराठेशाहीच्या आजुबाजुला असणाऱ्या संस्थानिकांना एकतर आपल्या नियंत्रणाखाली आणले तर काहीना आपल्या मित्रत्वाच्या बंधनामध्ये अडकवुन शत्रुला एकटे पाडणे हे इंग्रजांच्या कुटनीतीचे धोरण दिसुन येते. इंग्रजांनी मराठेशाहीतील असणाऱ्या मराठा सरदाराचा अभ्यास केला असता त्यांच्या असे लक्षात आले की मराठा सरदारामध्ये ऐक्य नसल्याने इंग्रजांना मराठेशाहीवर आपले नियंत्रण स्थापन करण्यासाठी संधी उपलब्ध झालेली पहावयास मिळते. ब्रिटिश संरक्षणाशिवाय स्वतंत्र राहणारी एकमेव मुलभूत शक्ती ही संघीय मराठा राज्ये आहेत.[38] इंग्रजांच्या साम्राज्यवादी, आणि विस्तारवादी धोरणामुळे भारतातील वेगवेगळ्या संस्थानिकांनी वेलस्लीच्या माध्यमातून इंग्रजांच्या आश्रयाला काही संस्थानिक गेले तर काहींनी इंग्रजांच्या तैनाती फौज ह्या आपल्या संस्थानिकांमध्ये समाविष्ट करुन घेतल्या जे इंग्रजांच्या नेतृत्वाखाली आले नाहीत त्यांना वेगवेगळ्या स्वरुपाची अमिषे दाखवून आपल्या नियंत्रणाखाली आणले, एवढे सगळे इंग्रज करत असताना मराठेशाही त्या कालखंडात इंग्रजांच्या पुढे नतमस्तक झाली नाही. बऱ्याच वेळा इंग्रजांनी मराठेशाहीवर अप्रत्यक्ष स्वरुपात अघात केले, परंतु त्याचा काही एक परिणाम मराठेशाहीवर झाला नाही. त्यामुळे वेलस्ली मराठेशाही बद्दल आपले वैयक्तीक मत नोंदवलेले दिसुन येते. इंग्रजांनी मराठा सत्ताधीशांकडे सलग प्रदेश कोठेही कायम ठेविले नाहीत.[39] इंग्रजांनी आपल्या ध्येय धोरणानुसार दोन मराठी संस्थानाच्या दरम्यान, एकसंघता ठेवलेली दिसत नाही. या दोन राज्याच्या दरम्यान राजपुत, जाठ, मुसलमान इत्यादी पैकी परकीय सत्ता या दोघांमध्ये ठेवण्यात आली जेणेकरुन मराठेशाहीतील या दोन सत्ता एकत्रित होऊन

इंग्रजांना आव्हान निर्माण करतील त्यामुळे इंग्रजांनी मराठ्यांची सत्ता ही विभागण्यात आलेली पहावयास मिळते. त्याच बरोबर इंग्रजांनी आपल्या नियंत्रणाखाली असणाऱ्या प्रदेशांना जे विभागुन होते त्यांना एकत्रित करण्याचा त्यांचा प्रयत्न दिसतो. जसे बंगाल, मद्रास, मुंबई हे लांबचे प्रदेश यांच्या नियंत्रणाखाली होते. दुरच्या प्रांतामध्ये असणारे लहान मोठे संस्थानिक इंग्रजांनी त्यास जोडल्याने यांच्या नियंत्रणा खालील प्रदेश हे एकत्रीत करुन आपली सत्ता स्थापीत केलेली दिसते. दिल्ली, आग्रा, अलीगड, इत्यादी महत्वाच्या नाक्यांची ठिकाणे ही हस्तगत करुन गंगा, यमुना, दुआब नद्याकाठचे समृध्द प्रदेश ताब्यात घेतली.[40] इंग्रजांनी भारतातील आपल्या साम्राज्याच्या सीमा ह्या उत्तरेला हिमालया पासुन ते पंजाब पर्यंत वाढवलेल्या दिसतात. इंग्रजांनी आपल्या नियंत्रणाखाली भारतातील मोठा भूप्रेदश आणला. त्यांनी यासाठी आपल्या सोयीनुसार रस्ते तयार करुन एकमेकांशी संपर्क रहावा यासाठी प्रयत्न केलेले दिसतात. इंग्रजांनी स्वत: याबाबतीत आपले मत मांडलेले आहे. हिंदुस्थानातील प्रमुख संस्थाने हे इंग्रजांशी सामान्यपणे नियंत्रणात आलेले असुन या संस्थाना बरोबर संबंध प्रस्थापीत करुन यांच्याशी आपले संबंध चांगले ठेवत जाणे त्याच बरोबर या संस्थानिकांशी इंग्रजांशी आपले संबंध दृढ करणे हे त्यांच्या हिताच्या दृष्टीने महत्वाचे आहे असे इंग्रजांना वाटे, इंग्रजांनी या संस्थानिकांशी संबंध ठेवल्यामुळे कोणत्याही संस्थानिकांना दुसऱ्या संस्थानिकांवर आक्रमण करण्याची शक्ती राहिलेली दिसत नाही त्यामुळे प्रत्येक संस्थानिकाची जी सीमा आखुन देण्यात आलेली आहे त्या सीमेमध्येच त्या संस्थानिकाने समाधानी राहिले पाहिजे. ही परिस्थिती कायम संस्थानिकांमध्ये राखण्या बद्दल इंग्रज सरकार सदैव बांधले गेलेले दिसुन येतात.

18 व्या शतकाच्या मध्यकाळात युरोपमधील युध्दात विकसित झालेली भाडोत्री प्रशिक्षीत सैन्यदलाच्या जोरावर इंग्रज हे जगातील एक लष्करी महासत्ता म्हणून उदयास आलेली होती.[41] तेंव्हा भारताच्या संदर्भात बोलायचे झाल्यास इंग्रजांनी बंगाल आणि तामिळनाडू हे सर्वात प्रचंड प्रदेश त्या काळातले इंग्रजांनी आपल्या ताब्यामध्ये घेतले होते. या प्रदेशाच्या माध्यामातून मिळणाऱ्या उत्पन्नातून इंग्रज हे आपली लष्करी दलास प्रशिक्षण व यांना शस्त्र सज्ज करुन लाखाचे सैन्य दल तेही गणवेशधारी उभी करु शकले. इंग्रजांनी याच राज्याच्या उत्पन्नातून मिळणाऱ्या रोख रक्कमेवर दोन मोठ्या मोहिमा इंग्रजांनी जिंकलेल्या आहेत. इंग्रजांनी त्यांना मिळणाऱ्या पैशाच्या मुबलकतेवर त्यांनी आपल्या सैन्यदलास शत्रुच्या विरुध्द आधुनिक पध्दतीचे शस्त्रास्त्रे, तोफखाना, प्रशिक्षीत सैन्य व नेपोलिअन बोनापार्टच्या विरुध्द लढलेल्या युध्दातील विजयामुळे इंग्रजांचा आत्मविश्वास हा

वाढलेला होता. या आत्मविश्वासाच्या जोरावर इंग्रजांनी मराठेशाहीचा पराभव करु शकले. विशेष म्हणजे जगातील कोणतीही सत्ता त्यावेळी इंग्रजांचा पराभव करु शकली नाही. त्यामुळे मराठेशाही चा विजय त्यावेळी इंग्रजांच्या विरुध्द दुरापास्त होते हे यावरुन लक्षात येते.

क्लाईव्ह याने भारतात इंग्रजांचा राज्यकर्ता म्हणून पाय रोवले.[42] वॉरेन हेस्टिंग्ज याने इंग्रजांचे पाय भारतात रोवण्यास मजबुती प्रदान केलेली पहावयास मिळते, कॉर्नवॉलिस याने तर त्यावर घर बांधण्यास सुरुवात केली आणि लॉर्ड वेलस्लीने इंग्रजांच्या भारतातील घराला पूर्णपणे बांधून तयार केलेले दिसेल, यानंतर भारताचा गर्व्हनर जनरल याने इंग्रजांच्या भारतातील साम्राज्याला अंतिम स्वरुप देण्याचे कार्य केलेले आढळून येईल. "सर फिलीप्स याने वेलेस्ली आणि त्याच्या सहकाऱ्यांची अन्याय, अत्याचार, वसईच्या संधीचा अन्याय तथा मराठा सरदारांच्या निर्दोषतेला ब्रिटीश संसदे समोर मोठ्या विस्ताराने प्रस्तुत केले.[43] सर फिलीप्स याने ब्रिटीश संसदे समोर मत मांडताना असे म्हणतात की, इंग्रज राज्यकर्ते आणि भारतीय राजे, सरदार यांच्या चारित्र्यावर खोटे आरोप लावून त्यांना बदनाम करत होते. त्यानंतर भारतातील राजे, राजवाडे यांच्या स्वातंत्र्यावर स्वत:चे नियंत्रण स्थापित करत, गर्व्हनर जनरल मराठ्यांच्या विरुध्द धोरणाचे ते समर्थन करीत, युध्दाला इंग्रजांनी अनिवार्य संबोधले होते. इंग्रजांचे म्हणणे असे होते की, जर मराठ्यांवर आक्रमण करुन त्यांच्यावर नियंत्रण स्थापीत केले नसते, तर मराठे हे कंपनी शासनाला भारतातील इतर संस्थानिकांपेक्षा सर्वाधिक धोकादायक ठरु शकले असते. असे ईस्ट इंडिया कंपनीच्या पदाधिकाऱ्याद्वारे सांगण्यात आले. एकंदरीत पहाता इंग्रजांना मराठेशाही विषयी त्यांच्यावर प्रभाव जाणवत होता. इंग्रजांना मराठ्यांची धास्ती होती शेवटी मराठयांचे राज्य हे इंग्रजांनी आपल्या नियंत्रणात घेतले त्यावेळी इंग्रजांची भारतातील सत्ता ही पुढील 100 वर्षासाठी सार्वभौम झालेली पहावयास मिळते.

सर फ्रेडरिक लेली यांच्या मते, मराठ्यां सोबत इंग्रजांचे घनिष्ठ सबंध होते. परंतु त्या कालखंडातील काही घटनांबद्दल आम्ही कितीही सफाईदारपणे बोललो तरी परंतु त्यामध्ये असे अनेक गोष्टी आहेत ज्यामुळे इंग्रजांना लाजवाटावी.[44] इंग्रजांनी मुळात भारतात आपले साम्राज्य वादी, विस्तारवादी धोरण ईस्टइंडिया कंपनीच्या माध्यमातून अवलंबलेले दिसेल. ज्या ज्या लहान मोठ्या संस्थानिकांना आपल्या आखत्यारीत आणता येईल. त्यासाठी इंग्रजांनी, कुटनीती, डावपेच, आखुन त्यांवर नियंत्रण मिळवले. तसेच मराठेशाहीला आपल्या अंकीत करण्यासाठी इंग्रजांनी वरील धोरणांचा अवलंब केला. मराठा सरदारांत फुटपाडणे, एकमेकांमध्ये संशयाचे वातावरण निर्माण

करणे, आमिषे दाखवणे, अशा अनेक प्रकारचे हातखंडे त्यावेळी इंग्रजांनी कुटनीतीच्या माध्यमातून वापरली ज्यामुळे मराठेशाही पुढील काळात कमकुवत झालेली पहावयास मिळेल. आणि इंग्रजांना हेच पाहिजे होते. त्यांना माहित होते की, मराठ्यांचा आपण समोरा समोरच्या युध्दात पराभव करु शकत नाहीत. त्यावेळी त्यांनी वरील कुटनितीचा वापर करुन मराठेशाहीवर आपले नियंत्रण स्थापीत करताना दिसतात.

मराठेशाहीचे केंद्र असलेले पेशवा आणि होळकर, शिंदे, गायकवाड, भोसले या प्रादेशिक राजवटी मध्ये सत्ता समीकरणे बदलली.[45] माधवराव पेशवा, दौलतराव शिंदे, यशवंतराव होळकर हे वेगवेगळ्या पारंपारिक पध्दतीने मराठेशाहीच्या नेतृत्वाखाली असणाऱ्या प्रादेशिक राजवटीमध्ये नवीन मराठा सरदार उदयास आले परंतु शिंदे आणि पेशवे यांची उदासीनता दिसत होती. मराठा राज्याच्या सीमांचे संरक्षण करण्यासाठी यशवंतराव होळकर हे एकाकी झुंज देत होते. परंतु मराठेशाहीतील इतर जबाबदार लोकांचे सहकार्य यशवंतरावांना मिळाले नाही मराठेशाहीत एकमेकांच्या सत्तामध्ये हस्तक्षेप करण्यास दौलतराव शिंदे आणि पेशव्यांनी सुरुवात केल्याने मराठ्यांच्या राज्य अंतर्गत संघर्षामध्ये गुरफटून गेले होते. त्यामुळे मराठेशाही सुध्दा इंग्रजांनी आपल्या आखत्यारीत आणुन इंग्रजांना भारतीय उपखंडात प्रतिस्पर्धी राहिला नाही त्यामुळे भारताच्या सार्वभौम सत्तेसाठी एकमेव इंग्रज पुढे आलेले दिसतात.

इंग्रजांनी मराठ्यांच्या विरुध्द युध्द का केले.[46] इंग्रजाना भारतात आपली सत्ता स्थापन करावयाची होती त्यासाठी भारतावर फ्रेंचाचा प्रभाव कमी करुन इंग्रजांचा प्रभाव वाढवयाचा होता. त्याच बरोबर भारतातून फ्रेंचांची हकालपट्टी करावयाची होती. ईस्ट इंडीया कंपनीच्या माध्यमातून इंग्रजांना भारतात साम्राज्यवाद, विस्तावादी धोरण अनुसरुन आग्रा आणि दिल्ली या ठिकाणी आपली शक्तिशाली लष्करी छावणी निर्माण करणे जेणेकरुन लहान, लहान संस्थानिकांनवर हल्लेकरुन आपल्या नियंत्रणाखाली आणावे त्याचबरोबर दिल्लीचा मोगलसम्राट हा नामधारी असल्याने दिल्लीवर आपले अधिकार करुन हिंदुस्तानचे शासनकर्ते होण्यासाठी इंग्रज इच्छुक होते हे पहावयास मिळेल.

## 5.3 यशवंतराव होळकर यांची राजकीय भूमिका :-

यशवंतराव होळकर पुण्याच्या रोखाने येऊ लागले होते यशवंतरावांचा उद्देश काय होता तो त्यांच्याच शब्दात पाहु ते पेशवा दुसऱ्या बाजीरावाला लिहितात, आपन धनी आपणाशी विरोध करण्याची माझी ईच्छा नाही शिंद्याचा व माझा समेट करुन द्या, असा समेट झाला तरच इंग्रजावर दाब बसुन राज्याचा बचाव होईल.[47] यशवंतराव होळकर यांना भारतातील सद्य परिस्थितीत इंग्रजांची ध्येय धोरणे कशा पध्दतीने चालली आहेत. याची कल्पना त्यांना होती मराठेशाहीच्या विरोधामध्ये कृत्यकरण्याचे माझे कोणतेही धोरण नाही परंतु मराठेशाहीतील मराठा सरदारामध्ये एकजुटपणा असावा एकमेकी संशयाचे वातावरण नसावे त्यासाठी पेशव्यांनी दोन मराठा सरदारां मध्ये समेट घडवुन आणला तर इंग्रजावर आपल्या मराठेशाहीचा दबाव राहील. इंग्रज मराठेशाहीच्या दरवाजापर्यंत येवून पोहोचलेले आहेत. त्यासाठी दोन मराठा सरदारांमध्ये एकमत झाले तर इंग्रजांवर दबाव वाढेल. मराठेशाहीच्या विरुध्द कुटनीतीच्या माध्यमातुन इंग्रज नियंत्रण स्थापन करणार नाहीत. त्यासाठी पेशव्यांनी पुढाकार घेवून मराठा सरदारांमध्ये समेट घडवून आणावा तेंव्हा मराठेशाहीचे राज्य वाचु शकेल. अशी आशा यशवंतराव होळकर यांना होती परंतु नियतीला आणखी काही दुसरेच मान्य होते असे दिसुन येते.

हिंदुभूमी वरिल मराठ्यांचे साम्राज्य नष्ट झाल्या बद्दल अत्यंत चीड जर कोणास विशेष आली असेल तर ती मराठेशाहीचे मराठा सरदार यशवंतराव होळकर होय.[48] इंग्रजांना त्यांच्या साम्राज्यवादी, विस्तारवादी धोरणाला विरोधकरणे, त्यांना देशाबाहेर हाकलुन लावणे हा एकच ध्यास त्या कालखंडात कोणाचा असेल तर तो यशवंतराव होळकर यांचा होता. अमृतराव पेशवा दौलतराव शिंदे, भरतपुरचा जाट राजा रणजित सिंह असे अनेक संस्थानिक त्यावेळी इंग्रजांच्या विषयी अंत: करणातुन जळत होते. परंतु प्रत्यक्ष इंग्रजांच्या विरुध्द त्यांना या देशातुन हाकलुन लावण्यासाठी कुणाचीही हिम्मत होत नव्हती. इंग्रजांच्या विरूद्ध विविध गुप्त योजना शस्त्रास्त्र साठा, सैन्याची जमवा जमव, भारतातील संस्थानिकांनी एकत्रीत यावे यासाठी आव्हान करणारा फक्त यशवंतराव होळकर हा मराठेशाहीतील मराठा सरदार एकमेव होता. यशवंतराव होळकर यांनी यावेळी असा पुकारा केला की.[49] इंग्रजांच्या विरुध्द सर्व भारतातील हिंदु दौलतदार उठले असून सर्व संस्थानिकांनी मिळून त्यांच्यावर हल्ला केला तरच ते भारतातुन निघुन जातील आणि आपला निभाव लागेल. यशवंतराव होळकर यांच्या आव्हानाला प्रतिसाद हा नागपुरच्या भोसल्याकडून जोराचा पाठिंबा मिळाला परंतु

प्रत्यक्षात सहकार्य काहीच भेटले नाही. भारतातील लहान मोठे संस्थानिकांचे इंग्रजांच्या ताब्यात गेलेले प्रदेश मिळावे या करिता संस्थानिकांच्या एकत्रीत येण्याच्या हालचालीना वेग आलेला दिसुन येतो.

दिनांक 21-02-1804 रोजी यशवंतराव होळकर यांनी समशेर बहाद्दरास लिहिलेले पत्र जलचरांचा प्रसार बहुत झाला श्रीमंत व उभयंता सरदार फितले अलग आहेत. त्यांनी एकत्र आले पाहिजे.[50] यशवंतराव होळकर यांनी आपल्या मराठेशाहीचा प्रमुख पेशवा आणि मराठा सरदारांमध्ये सुसंवाद नाही वेगवेगळ्या ठिकाणी विखुरलेले आहेत. त्यांनी एकत्रीत आले पाहिजे त्यावेळी मोठ्या प्रमाणात इंग्रजांचे प्रभुत्व वाढत आहे त्यांच्या नेतृत्वाखाली एकएक संस्थानिक येत आहे यांना वेळीच रोखले नाही तर ते मराठेशाही राज्याच्या सीमांवर येवून धडकतील आपले राज्य त्यांच्या नेतृत्वाखाली जाईल त्यासाठी मराठेशाहीतील प्रमुखांनी व मराठा सरदारांनी एकत्र आले तरच आपण इंग्रजांचा पाडाव करु शकतो असे यशवंतराव होळकर सातत्याने आव्हान करत होते. आपलेच देश बांधव किंवा धर्म बांधव इंग्रजास मिळतात आणि आपल्या विरुध्द लढतात ह्याचा यशवंतराव होळकरास अतिशय संताप येई.[51] यशवंतराव होळकर यांना अशा देश बांधवांच्या कृत्याबद्दल राग येई त्याच बरोबर त्यांच्या सैन्यदलात ही संताप व्यक्त होत. तेंव्हा यशवंतरावांनी इंग्रजांना जाऊन मिळणाऱ्या आपल्या देशातील नागरिक, सैनिक यांना रोखण्यासाठी त्यांनी इंग्रजाच्या सैन्यातील कार्य करणाऱ्या मराठी व अमराठी, हिंदी सैनिकांना आपल्या लष्करामध्ये सामील होण्यासाठी यशवंतरावांनी विविध प्रकारचे आमिषे दाखवले, जे अशा पध्दतीने सामील होत नाहीत अशा सैन्याला धाक दाखवून फितविणे, इंग्रज सैन्य अधिकाऱ्याचे शिरच्छेद करावयास आपल्या सैन्याला लावणे व देशातील सर्वसामान्य नागरिकांना प्रोत्साहन देणे व त्या बद्दल त्यांना बक्षिस देणे ज्यावेळी अशा प्रसंगात न ऐकणाऱ्या सैनिकांना हालहाल करुन ठार करणे, ज्यामुळे इंग्रजांच्या सैन्यदलात भरती होण्यापासुन परावृत्त होईल अशा प्रकारची दहशत इंग्रजी सैन्यात असणाऱ्या भारतीय सैन्याची व भरती होणाऱ्यामध्ये निर्माण केलेली पहावयास मिळते.

यशवंतराव होळकराच्या उद्योगास जसजसे यश येत चालले तशा पध्दतीने संस्थानिकांमध्ये यशवंतरावांच्या कार्य कर्तृत्वाबद्दल आशा पल्लवीत झालेल्या दिसतात.[52] संस्थानिकांमध्ये इंग्रजांच्या विरुध्द उठाव करण्यासाठी यशवंतराव होळकर यांना सहकार्य करण्यास संस्थानिकांनी मनाची तयारी चालवलेली दिसते. तशाच पध्दतीने भोसल्यांचे विचार इंग्रजांच्या विरुध्द उठण्याचे चालु होऊन त्यांनी हुशंगाबादवर कब्जा करण्या करिता आपली काही सैन्यदले नर्मदेच्या किनाऱ्यावर आणलेले

पाहवयास मिळतात. इ.स. 1804 मध्ये यशवंतराव होळकर आणि दौलतराव शिंदे यांच्या मध्ये मोठा संघर्ष निर्माण झाला होता. परंतु महादजी आणि रघुजी भोसले यांच्या निधनानंतर यशवंतराव होळकर यांनी गुप्तपणे जयपूरचा राजा, जोधपूर, उदयपूर चे राजे, बेगम समरु, मच्छेडीचा राजा, रोहिल्यांचा प्रमुख गुलम मोहमंद आणि काही शीख समुदायाचे प्रमुख रावसिंग, मीरसिंग, गुरुपालसिंग, जादुसिंग इत्यादी बरोबर इंग्रजांच्या विरुध्द लढा उभा करण्यासाठी यशवंतरावांनी संस्थानिकां बरोबर पत्रव्यवहार केलेला होता.

शिंदे व भोसले यांच्या पराभवामुळे यशवंतराव होळकर यास जबदरस्त धक्का बसला.[53] इंग्रजांनी अपेक्षितपणे शिंदे आणि भोसले यांचा पराभव केला आहे. आता इंग्रज आपल्याकडे वळतील हे यशवंतराव होळकर यांना माहित होते. त्यामुळे त्यांनी इंग्रजांच्या विरुध्द लढण्यासाठी आपल्या सैन्यदलास शस्त्रसज्ज करावयास तयारी चालवली होती. यशवंतरावांनी इंग्रजांच्या विरुध्द लढण्यासाठी भारतातील छोट्या मोठ्या संस्थानिकांना आव्हान करुन इंग्रजांच्या विरुध्द एकत्रीत लढा उभारण्यासाठी आघाडी करण्याचे प्रयत्न चालवले होते. यशवंतराव होळकर यांनी इंग्रजविरोधी आघाडी उभारण्याची तयारी सुरु केली. तेंव्हा वेलस्लीने एप्रिल 1804 मध्ये त्यांच्या विरुध्द युध्द पुकारले.

यशंतराव होळकर यांचा दौलतराव शिंद्या कडे एक सारखा लकडा चालु होता की झाले ते सर्व विसरुन तुम्ही एकदम कंबर बांधुन मला सामील व्हा.[54] यशवंतराव होळकर यांनी इंग्रजांच्या विरुध्द लढण्यासाठी मराठेशाहीतील मराठा सरदारांनी मला साथ द्यावी आपआपसातील जुनेवाद विसरुन आपण मला इंग्रजांच्या विरुध्द लढण्यासाठी सहकार्य करावे. शिंदे आणि भोसले जर एकत्र आले तर इंग्रजांची मजाल कायती मराठेशाहीच्या विरुध्द प्रत्यक्ष - अप्रत्यक्ष कारवाया करण्याची, इंग्रजांना आपण तिघे एकत्रीत येवून आपल्या राज्यातून आणि या देशातुन बाहेर हाकलुन मराठेशाहीचा पुन्हा उत्तरेकडे दबदबा निर्माण करू शकतोत. त्यासाठी शिंदे व भोसले यांनी मला सहकार्य करावे असे यशवंतराव होळकर यांना वाटत होते.

यशवंतराव होळकर यांनी एक शेवटचा प्रयत्न म्हणून ब्रिटिशांच्या विरुध्द सर्व मुत्सद्दी सेनापती यांना एकत्र येण्याचे आव्हान केले.[55] त्याला अनुसरुन 17 एप्रिल 1805 रोजी संबळगड याठिकाणी मराठ्यांच्या इतिहासामध्ये या मेळाव्याचे मोठे महत्वाचे स्थान आहे. इंग्रजांच्या विरुध्द

एकत्र लढा देण्यासाठी ही बैठक आयोजीत करण्यात आलेली होती. या बैठकीला मराठेशाहीतील मराठा सरदारांनी एक दिलाने एकत्र येवून लढावे असा यशवंतरावांचा प्रयत्न होता. यशवंतराव होळकर चर्मण्वती नदी उतरुन चैत्र व्हा पक्षी सन 1214 चे साली भेटीचा बेत ठरला.[56] संबळगड या ठिकाणी दौलतराव शिंदे यांनी जागा पाहून बिछायत करुन 5000 हजार खांसा बदिमाख पोषाख येऊन बसले. त्यानंतर यशवंतराव होळकर यांची स्वारी आली. 60000 घोडे स्वार त्यांत यशवंतरावांच्या अंगामध्ये दहाशेर रुईचा डगला पांढऱ्या शेल्याचा धाटा, ढाल, तलवार बासडा, खांद्यावर गांठची गांठच आले यामध्ये यशवंतराव होळकर कोणते हे ओळखण्यास येत नव्हते. ते येथे येताच गराडा फिरवून देऊन, २ हजार खांसा उतरला या बैठकीला अजुन सातारच्या गदीचे छत्रपतीचे बंधु चतुरसिंह हे पण उपस्थित होते. तिकडल्या हिकडल्या दोन्ही बाजुच्या तोफा चालल्या चार घटिका पर्यंत कोणाचा शब्द कोणाच्या कानी पडत नव्हता. इत्यादी व्यवस्था झाल्या नंतर दौलतराव शिंद्याचे तोंड सुकुन गेलेले होते. एक दोन दिवसामध्ये बैठका होऊन सफाईची बोलणी झाली आणि उभयतांचा एक विचार झाला.

संबळगड याठिकाणी दौलतराव शिंदे व यशवंतराव होळकर हे दोघे भेटुन गुप्तचर्चा झाली पहिल्यांदा या बैठकीद्वारे इंग्रजांच्या विरुध्द लढण्यासाठी दोघांनी प्रतिज्ञा केली.[57] यशवंतराव होळकर यांचा पाठलाग करण्याचा इंग्रज सोडत नव्हते. यशवंतराव होळकर आणि दौलतराव शिंदे आपआपल्या दिशेने यशवंतराव कोट्याकडे व दौलतराव शिंदे अजमेरकडे रवाना झाले, बाजीराव पेशवा, शीख राजा रणजितसिंह, भोसले, माचेडीचा राजा, जयपुरचे महाराज, मेवाडचे ठाकुर इत्यादींना यशवंतरावांनी पत्र व्यवहार केला. त्याचबरोबर इंग्रजांच्या अधिपत्याखाली राजे आणि महाराजा रणजितसिंह यांनी यशवंतरावांना इंग्रजांच्या विरुध्द लढण्यासाठी संमती दर्शविली होती.

सर्वांचा विचार एकच की मराठी राज्य बुडत चालले आहे त्यांची निभावणी सर्वांनी एकविचारे करावी.[58] यशवंतराव होळकर आणि अमीरखान यांच्या सारखे युध्द कौशल्यात निष्णात असलेल्यांना पैशाचा व सैन्यदलांचा पुरवठा करुन इंग्रजांचा पाय मराठेशाहीच्या राज्यातुन काढुन टाकावा यासाठी सर्वांनी आपसातील भेद विसरुन एक दिलाने इंग्रजांच्या संकटास तोंड द्यावे आणि मराठ्यांची एकजुट करावी हा यशवंतराव होळकर यांचा उद्देश होता तर मराठयांची एकजुट ही इंग्रजांच्या विरुध्दची फोडावी हा इंग्रज अधिकारी माल्कमचा डाव होता. आपण एकत्र येऊन जल चरांना नेस्तनाबुद करु आपण आपसातील सारे वाद नंतर सोडवू.[59] इंग्रजांचे भारतातील वाढते प्रभुत्व, कोणत्या ना कोणत्या

संस्थानिकांना आपल्या नियंत्रणाखाली घेण्याचे धोरण इंग्रजांचे चालु होते. हे सर्व यशवंतराव होळकर यांच्या लक्षात आल्याने मराठेशाहीचे राज्य इंग्रजांच्या घशात जावू नये यासाठी यशवंतरावांनी मराठेशाहीतील मराठा सरदारांना एकत्रित येण्यासाठी आव्हान करत होते जेणेकरुन यशवंतराव होळकर आणि दौलतराव शिंदे यांचे या कालखंडात अंतर्गत संघर्ष असताना सुध्दा यशवंतराव होळकरांनी आपले अंतर्गत वाद सोडून संस्थानिकांतील इंग्रजांचा वाढता प्रभाव रोखण्यासाठी एकत्रीत यावे असे आव्हान करणारा मराठेशाहीतील एकमेव सरदार दिसुन येईल.

पूर्वी राज्यात ऐक्यता बहुत येणे करोन आज पावेतो व्यंगन पडता एक छत्री अंमल फैलावला होता.[60] यशवंतराव होळकर यांनी मराठेशाहीच्या प्रमुखांना व मराठा सरदारांना उद्देशुन आपले मत मांडले होते. राज्याचा प्रमुख हा खंबीर, दुरदर्शी असणारे नेतृत्व होते त्यामुळे मराठा सरदारांमध्ये एक वाक्यता, असल्याने मराठेशाहीचा विस्तार, विकास मोठ्या प्रमाणात थोरले बाजीरावांच्या कार्यकाळात झालेला दिसतो. सर्वांना एकजुटपणे कार्य करवुन घेणे हे त्यांना जमले होते. त्यामुळे यांच्या नेतृत्वाखाली एकछत्री अंमल पसरताना दिसतो तशाच प्रकारे इंग्रजांच्या विरुध्द यशवंतराव होळकर यांनी मराठेशाहीतील सर्व प्रमुखांना एकत्रीत करण्याचा प्रयत्न केलेला पहावयास मिळतो. मराठेशाहीच्या सरदारांची आपसातील फाटाफुट इंग्रजांच्या चढाईखोर धोरणाला पोशीत होती.[61] हे जर धोरण यशस्वी होऊ द्यावयाचे नसेल तर भारतातील सर्व संस्थानिकांनी इंग्रजांच्या विरुध्द एकत्र आले पाहिजे. आपल्या स्वत:चे हीत पहाण्यापेक्षा सर्वांनी एकत्रीत आले तरच इंग्रजांच्या वर्चस्वाला झुगारुन देऊ. अशा प्रकारे यशवंतराव होळकरांनी विविध संस्थानिकांना केलेल्या पत्रव्यवहारावरुन समोर येते. यशवंतराव होळकरांनी प्रथम आत्माराम शिवराम व बाळाजी यशवंत यास रघुजीचे मन वळविण्यास पाठविले. ता. 19 जुन 1804 रोजी यशवंतराव होळकर आपल्या वकिलास लिहीतात.[62] सेना साहेब सुभा यांचे लक्ष स्वधर्म संरक्षणाकडे पूर्ण आहे. प्रसंग पाहुन जलचरांशी तुर्त समेट घातला परंतु त्याजवर कायम नाहीत प्रस्तुत कटक, बंगाल्याकडे फौजा पाठविण्याची तयारी होत आहे. म्हणून लिहिले ते विदित जाले, सेना साहेबांकडील फौज जाणार ही गोष्ट फार चांगली असे चहुकडून पायबंद असल्यावर जलचर कोठपावेतो पुरे पडतील? याज करता फौज सत्वर बिदा करावी, धर्म संरक्षणाची ही हाकाटी यशवंतराव होळकर आपल्या द्वारे शक्य तितकी उठवीताना दिसतात परंतु छत्रपती शिवाजी महाराजांच्या त्यावेळीची ती ह्दयभेदी आरोळी आता दीडशे वर्षांनी कोणाच्याच कानामध्ये जात

नव्हती आता भारतातील संस्थानिक व मराठेशाही असो. स्वत:च्या स्वार्थापलिकडे दुसरा धर्म कुणालाही सुचत नव्हता.

यशवंतराव होळकर यांनी 21 जाने 1804 रोजी आपला नागपुरचा वकील खंडो महादेव यास पत्रादवारे कळविले की.[63] तुमची रवानगी रघुजी भोसले व दौलतराव शिंदे यांजकडे केली त्यावर तुमची पत्रे आली, त्यांची उत्तरे इंदुर येथून पाठविली ती पोचलीच असतील. अलीकडे विश्वनाथ उमाजी शहापुऱ्याचे मुक्कामी येऊन दाखल झाले भेटी होऊन बोलण्याचे भाव सांगितले त्यावरुन संतोष झाला येथे मसलतीचां प्रसंग येथील एकसंधान राहुन शत्रुचे पारिपत्य होऊन बंदोबस्त झाला पाहिजे. या अन्वये तुम्ही बोलुन ज्यांत त्यांची कायमी पूर्वी प्रमाणे राहुन मसलत शेवटास जाऊन स्वराज्याचा बंदोस्त घडून हिंदुधर्म राहील ते करणे, अंबुजी इंगळ्याचे कुमकेस मीरखान यास जाण्याविषयी लिहीले आहे, आम्ही अजमेरचे सुमारास जाऊन जोधपुरकरांचे संधान पक्के केले आहे. त्यांची फौज सामील करुन घेऊन सडे होऊन करोलीचे सुमारे जातो. तेथे अंबुजी इंगळ्यांना बोलावुन घेऊन पुढील मसलतीचा नक्षा ठरवून त्या प्रमाणे गांठघालुन शत्रूचा मुकाबला घेतो कोणी काही लिहीतील व बोलतील त्याचे संशयमनात येऊ न देता कायमी राहुन ज्यांत एकदिलाने मसलत शेवटास जाऊन बंदोबस्त घडे ते करणे" एकदरीत यशवंतराव होळकर यांच्या पत्राचा विचार करता असे लक्षात येते की इंग्रजांच्या विरुध्द अखंड भारतातील संस्थानिक आणि मराठेशाहीतील मराठा सरदारांना यशवंतरावांनी ठरवलेल्या मोहिमेचे नियोजन केलेले दिसते. या पत्रात अजुन यशवंतराव म्हणतात की, कोणी काही लिहील मनात शंका येवू देवू नये जेणे करुन यशवंतरावांनी ठरवलेल्या आपल्या ध्येयाप्रती देशाभिमान आणि अखंड भारताची संकल्पना या ठिकाणी रुझवताना आपल्याला पहावयास मिळते.

10 फेब्रुवारी 1804 रोजी इंग्रजांचे यशवंतरावांना पत्र.[64] आमच्या वाटेस जोवर तुम्ही जात नाहीत तोवर आमच्या कडून तुमच्या बाबतीत आगळीक होणार नाही असे आश्वासन इंग्रजाकडून यशवंतराव होळकर यांना देण्यात आलेले होते. इंग्रजानां यशवंतराव होळकर यांच्या हालचाली या आपल्या विरुध्द चाललेल्या आहेत. त्या हालचाली यशवंतरावांनी थांबवाव्यात यासाठी इंग्रजांनी अप्रत्यक्ष स्वरुपात त्यांना पत्राद्वारे चेतावणी देण्यात आलेली पहावयास मिळते. परंतु यशवंतराव होळकर हे इंग्रजांच्या विरुध्द लढा उभा करण्यासाठी देशी संस्थानिकांना एकत्रीत येण्याचे आव्हान करत होते. त्याला अनुसरुन इंग्रजांनी अप्रत्यक्ष धमकीवजा पत्राद्वारे कळवताना दिसतात. यशवंतराव

होळकर यांनी 10 फेब्रुवारी 1804 या इंग्रजांच्या पत्राला उत्तर देताना म्हणतात की.[65] होळकरांचे सर्व जुने हक्क आपणास मिळाले पाहिजेत. जेणेकरुन इंग्रजांनी होळकरांचा उत्तरेकडील काही प्रांतावर आपला कब्जा केलेला होता. जर ते हक्क मला मिळत नसतील तर "My country and property are upon the saddle of my horse" पुढे देवाची इच्छा असेल तर माझे शुर योध्दे ज्या दिशेला घोड्यांची तोंडे वळवतील त्यादिशेचा सारा प्रदेश माझ्या मालकीचा होऊन जाईल "The whole of the country in that directions shall come into my possession" यशवंतरावांना कोणत्याही परिस्थितीमध्ये इंग्रजांच्या विरुध्द लढा उभा करावयाचा होता. त्यासाठी त्यांनी इंग्रजांनी न सुटणाऱ्या प्रश्नांच्या अटी व शर्ती बद्दल सांगितले होते. ज्या अटी व शर्ती यशंवरावांनी इंग्रजापुढे ठेवल्या होत्या त्या इंग्रजांना कदापी मान्य होणाऱ्या नव्हत्या त्यासाठी यशवंतराव होळकरांनी इंग्रजांना धाक बसवा या उद्देशाने पत्राचे उत्तरे दिलेले दिसुन येते.

इ.स. 1804 फेब्रुवारी च्या पत्रात यशवंतराव होळकर वेलस्लीला म्हणतात.[66] युध्दक्षेत्रामध्ये इंग्रजांचे तोफखानादल भले ही माझ्या संख्येपेक्षा जास्त असेल परंतु मी आपल्या विशाल सैन्य संख्येच्या आधारावर शेकडो कोसांचा प्रदेश तुडवून इंग्रजांना कोणत्याही परिस्थिती मध्ये त्यांना या भारतभूमीवर आपले अस्तित्व निर्माण करु देणार नाही. मी माझ्या सैन्याद्वारे सातत्याने आक्रमण करुन शत्रुला हतबल करुन टाकील माझ्या सैन्यदलाचे आक्रमण हे सागरामध्ये येणाऱ्या लाटाप्रमाणे विनाशकारी असतील. 4 मार्च 1804 रोजी यशवंतराव होळकर यांचे लेकला पत्र.[67] माझा देश आणि माझी संपत्ती माझ्या घोड्याच्या खोगिरावर आहे ज्याही दिशेला माझ्या पराक्रमी सैनिकांचे घोडे वळतील त्या दिशेचा सर्वदेश आम्ही जिंकुन घेऊ, जर तुम्ही शहाणे आणि विचारी असाल तर माझे प्रतिनिधी सांगतील त्या महत्वाच्या विषयांचा आधी फडशा पाडाल, यशवंतराव होळकर यांचे लेकला पत्राद्वारे होळकरांच्या राज्याअंतर्गत चौथ व सरदेशमुखी वसुलीचे प्रांत होळकरांना परत द्यावे यासाठी त्यांनी इंग्रजांना संबोधलेले दिसुन येईल. जर त्यांच्या मागण्या मान्य न झाल्यास होणाऱ्या परिणामांना इंग्रजांनी तयार रहावे. अशी चेतावणी देण्यास यशवंतरावांनी कमी केलेले दिसत नाही.

इ.स. 1804 साली उन्हाळयात यशवंतराव होळकर यांचे बेत काय चालले होते त्याचे वर्णन खालील पत्रात आहे.[68] यशवंतराव होळकर सांबरच्या किल्ल्यानजीक व जयपुर जवळ मुक्काम करुन होते. त्यास जयपुर प्रांत बेचिराख करुन पंचवीस लाख खंडणी घेऊन तेथुन सडी फौज करुन घोडा राऊत निवडक लाख, सवालाख पावेतो बरोबर घेऊन कोटयास दाखल झाले पुढे पूर्वेस बंगाला वगैरे

मुलूख आहे. तिकडे जाऊन खंडण्या घ्याव्या, इंग्रजांनी पिच्छा केला असता बंगाल्यातून भोसले व नवाब यांच्या मुलखातुन आर्काट, चेनापट्टाण, श्रीरंग पट्टण इकडे यावे हा बेत आहे अथवा कबिले, तोफखाना वर्गेरेभारी, अजबाब मारवाडांत ठेऊन तेथे हरनाथासिंग व नागो जिवाजी पंचवीस, तीस हजार, फोजेनिशी आहेत. शिवाय मीरखान पठाण वीस हजार फौजेनिशी अजमेर प्रांती आहे. जीवलालसिंग वगैरे तिन सरदार चांदवड नजीक दहा, बारा हजार जमावकरुन दंगा करितात यशवंतराव होळकर यांनी राजपुत शासकांची मदत मिळविण्याचा प्रयत्न केला. या काळात यशवंतरावानी इतर सत्ताधीशांना पत्रे लिहीली.[69] यशवंतराव होळकर यांनी मोगल बादशहा, जाट, शीख इत्यादी संस्थानिकांना पत्रे लिहुन त्यांचे सहकार्य प्राप्त करण्याचा प्रयत्न केलेला दिसुन येतो परंतु त्यांना ज्या प्रकारे सहकार्य मिळायला पाहिजे होते तेवढ्या पध्दतीचे सहकार्य मिळाले नाही. याच वेळी यशवंतराव होळकर यांनी काबुलच्या शहा यास सहकार्य मागितले परंतु यात ही यशवंतरावांना यश आले नाही. यशवंतराव होळकर यांच्या हालचालीवर नियंत्रण घालण्यात यावे म्हणून इंग्रज अधिकारी लेक याने यशवंतराव होळकर यांची सर्व बाजुंनी नाकेबंदी करण्यात आली. यशवंतराव होळकर हे इंग्रजांच्या कुटनीतीला अयशस्वी करणारे होते. इंग्रज सेनापती कर्नल मॉन्सन वर यशवंतरावांनी भीषण हल्ला केला आणि शेवटी मॉन्सनला स्वत:चा जीव वाचवुन आगऱ्याच्या किल्ल्या मध्ये आश्रय घ्यावा लागला यशवंतराव होळकर यांच्या आक्रमक हल्ल्या समोर लेक सारख्या इंग्रज सेनापतीचा निभाव लागला नाही हे पहावयास मिळते.

यशवंतराव होळकर यांनी भोसल्यांकडे आपला वकील पाठवून इंग्रजांच्या विरुध्द लढ्यामध्ये भोसले यांनी मदत करावी अशी विनंती केली.[70] यशवंतरावांनी जोधपुरचा राजा, अंबुजी इंगळे आणि इतर भारतीय संस्थानिकांकडे ही आपला वकिल पाठवून सहकार्य करण्याची विनंती केलेली दिसते. त्याच बरोबर मचेडीचा रावराजा यास यशवंतराव होळकर यांनी अशाच आशयाचे पत्रे पाठविलेली दिसतात. यशवंतरावांची इंग्रजापासून भारतीय संस्थानिकांची सोडवणूक आणि त्यांची एकजुट करण्यासाठी किती धडपड होती. इंग्रजांना भारतातून हाकलून लावण्यासाठी यशवंतरावांच्या अंगी आपले देशप्रेम, आणि तळमळ दिसुन येते.

यशवंतराव होळकर यांनी राजे राजवाड्यांना इंग्रजाविरुध्द एकत्रीत येण्यासाठी आव्हाने करणारी पत्रे इंग्रजांच्या हाती लागली.[71] 4 एप्रिल 1804 रोजी इंग्रज अधिकारी लेक याने ही पत्रे ताबडतोब वेलस्लीला पाठविण्यात आली. त्या पत्रातील मजकुर हा असा होता की "इंग्रजांमुळे सर्व

संस्थाने कशी खालसा होत आहेत आणि आता त्याला उखडून टाकले नाही तर हिंदुस्थानातील हिंदु धर्मच काय इस्लाम ही उरणार नाही तेंव्हा सारे एकत्र या माझा घोडा आघाडीला आहे आणि आपण सारे या शत्रुला समुद्रापार हाकलण्यास सक्षम आहोत." यशवंतराव होळकर यांच्या पत्रातील भाषाही संस्थानिकांना आव्हान करणारी होती भारतातील संस्थाने इंग्रज एक एक करुन कशा पध्दतीने खालसा करत आहेत, आपले स्वत:चे नियंत्रण स्थापीत करत आहेत. त्यामुळे आपला धर्म सुध्दा अडचणीत आला आहे. धर्माच्या रक्षणासाठी तरी आपण सर्वजण एकत्र या आणि इंग्रजांच्या विरुध्द लढा दया. या लढ्यात मी सर्वात पुढे उभा आहे. आपण फक्त मला सहकार्य करा इंग्रजांना आपण सर्वजण मिळून या भारतभूमीतून हाकलुन लावु शकतो. अशा पध्दतीचा आत्मविश्वास संस्थानिकांना त्यांनी या पत्रातुन दिलेला पहावयास मिळतो.

3 मार्च 1804 रोजी दौलतराव शिंद्याचा वकील यशवंतराव होळकर यांच्याकडे येऊन दाखल झाला. त्यास यशवंतरावाने गुप्तपणे भेटुन कळविले.[72] शिंद्याचे यत्किंचित अहित करण्याचा माझा इरादा नाही. इंग्रजास नरम करावे येवढाच माझा हेतु आहे, इंग्रजांनी मराठ्यांचे राज्य बुडविले आहे त्याचा प्रतिकार करणे हेच आज अत्यंत निकडीचे माझे काम असुन त्यासाठी तुमचे अजमीरचे ठाणे मला तात्पुरते ताब्यात घेणे जरुर वाटले ते स्थळ जोधपुरकरास देऊन त्यांची मदत मी मिळविली आहे. युध्द संपल्यावर तुमचे अजमीर स्थळ तुम्हांस पूर्ववत परत मिळेल. यशवंतराव होळकरास जोधपुरच्या राज्याचे सहकार्य प्राप्त करण्यासाठी मराठेशाहीच्या अधिपत्याखाली असणाऱ्या आपल्या मराठा सरदाराच्या प्रांताना तात्पुरत्या स्वरुपात घेऊन जोधपुर राज्यास देऊन इंग्रजांच्या विरुध्द आपली लष्करी ताकद वाढविण्यासाठी केलेला हा तात्पुरत्या स्वरुपाचा करार गुप्तपणे शिंद्याच्या वकिलास बोलावून दाखवलेला पहावयास मिळतो. इ.स. 1805 सप्टेंबर मध्ये यशवंतराव होळकर अजमेरहुन पंजाबच्या दिशेने कुच करतात.[73]तेंव्हा लाहोर चे महाराजा रणजीतसिंह व दुसरे शीख राजांनी इंग्रजांच्या विरुध्द सहकार्य करण्याचे आश्वासन देण्यात आले होते. यशवंतरावांना काबुल च्या बादशहा कडून सहकार्याची अपेक्षा होती. त्याकाळात यशवंतरावांनी सगळया संस्थानिकांशी पत्र व्यवहाराद्वारे संपर्क केलेला होता. आक्टोबर मध्ये यशवंतराव होळकर यांनी नारनौल व जिंद वरुन पटियाला या ठिकाणी पोहोचले जिंदचे शीख राजा भागसिंह यांनी यशवंतराव होळकर यांना इंग्रजांच्या विरुध्द सहकार्य करण्याचे नाकारले त्यावेळी यशवंतराव पटियाला या ठिकाणी पोहोचले त्या

ठिकाणचा शीख राजा फतेहसिंह अहलुवालिया यानेही इंग्रजांच्या विरुध्द सहकार्य करण्यास यशवंतरावांना असमर्थता दाखवली.

29 नोव्हेंबर 1805 रोजी यशवंतरावांचे चुलत बंधुला पत्र.[74] मी पटियाला आणि अन्य ठिकाणांच्या शीख राजांना भेटी दिल्या आहेत. त्यांनी मला इंग्रजांच्या विरुध्द लढण्यासाठी माझ्या मोहिमे मध्ये सहकार्य करण्याचे आश्वासन दिले आहे. मला लाहोरचे महाराजा रणजितसिंह आणि आफगाणिस्तानच्या बादशहाचे मैत्रीपूर्ण सहाकार्य प्राप्त झालेले आहे. इंग्रजांच्या विरुध्द युध्दात लागणारी शस्त्रास्त्रे व साधन संपत्ती एकत्रीत करण्यासाठी मी 13 तारखेला सतलज नदी ओलांडून अमृतसर आणि लाहोरच्या जवळ जवळ येऊन पोहोचलो आहे, यशवंतराव इंग्रजांच्या विरुध्द आघाडी निर्माण करण्यासाठी आफगाणिस्तान लाहोर पर्यंत तेथील राजाचे सहकार्य मिळविण्यासाठी प्रत्यक्ष भेटी देण्याची त्यांची तळमळ दिसुन येईल. मराठेशाहीच्या गमावलेल्या प्रांताना मी परत मिळविण्याचा प्रयत्न सातत्याने करणार आहे असे यशवंतरावांना वाटत होते. दौलतराव शिंदे द्वारा मराठासंघाचा त्याग केल्याने मोठी हानी झाली आहे. शिंदे हे तात्पुरत्या स्वार्थासाठी इंग्रजांच्या आश्रयास गेले आहेत. त्यामुळे मराठेशाहीच्या राज्याचा यांनी नाश केला आहे. मला आशा आहे की मी अजुनही मराठेशाहीचा दबदबा व राज्य पुन्हा परत मिळविण्यासाठी प्रयत्न करत राहील.

महाराजा रणजितसिंह यशवंतराव होळकर यांना सहकार्य करण्या ऐवजी यशवंतरावांना इंग्रजा बरोबर करार करण्याचा सल्लादेत होता.[75] इंग्रजाद्वारे स्वत: करार करण्याचा हा प्रस्ताव ऐकुन यशवंतराव होळकर क्रोधीत झाले होते. यशवंतरावांनी रणजिंतसिंहाला उद्देशुन म्हणाले की, एका संकटात तुमचा मित्र, देश भक्त यांच्या विरुध्द आपले धर्माचे पालन असेल तर लक्षात ठेवा तुम्ही ज्या राज्याच्या मोहामध्ये पडुन आज माझ्या सारख्या देशभक्ताशी तुम्ही गद्दारी करत आहात त्यासाठी हा देश तुम्हाला कधीही माफ करणार नाही माझा हा तुम्हाला शाप आहे की तुमचे हे राज्य कदापि कायम स्वरुपात रहाणार नाही. जेंव्हा माझ्या कुळामध्ये सदैव राज्य कायम राहील ही दुरदृष्टी यशवंतरावांकडे होती. देशी राजांच्या  सहकार्या शिवाय फिरंग्याची शक्तीनष्ट करु शकत नाही.[76] यशवंतराव होळकरांना माहित होते की इंग्रजांच्या विरुध्द आपल्याला लढण्यासाठी, ध्येय, प्राप्त करण्यासाठी भारतातील लहान मोठ्या संस्थानिकांचे सहकार्य, एकजुट आवश्यक आहे. त्यासाठी त्यांनी पंजाबचे महाराज रणजितसिंहाची त्याच्या दरबारामध्ये आपला प्रमुख सेनापती अमीर खानासह भेट घेतली होती. त्या भेटीमध्ये यशवंतरावांनी प्रस्ताव ठेवला होता की, जर शीख इंग्रजांच्या विरुध्द लढण्यासाठी

मला सहकार्य करत असतील तर मी शीख धर्माची दीक्षा घेण्यास तयार आहे. असे शीखांच्या धर्मगुरुंना सांगितले, लोकोत्तर पराक्रमाच्या प्रसिध्दिचा यशवंतराव होळकर हा पुरुष शीख धर्म स्वीकारणार या कल्पनेमुळे शीखांचे धर्मगुरु आनंदी झालेले पहावयास मिळतात. यशवंतरावांना माहित होते की शीखांचे सहकार्य जर आपल्याला मिळाले तर याच्या जोरावर आपण इंग्रजांच्या विरुध्द लढावे असा यशवंतरवांच्या मनोदय होता जर मला शीख न करुन घेतल्यास मी इस्लाम धर्म स्वीकारीन.[77] यशवंतरावांनी शीखांमध्ये असा पेच निर्माण केला होता. यशवंतराव होळकर हे त्या कालखंडात अफगाणच्या अमीराकडे संपर्क ठेवून होते. अमीराने आश्वासन दिले होते की सहकार्य करणार, जर यशवंतराव शीख न होता मुसलमान झाले तर अमीर जास्त तळमळीने हालचाल करुन आपल्याला सहकार्य करेल. अशी अपेक्षा यशवंतराव होळकरांना होती.

इंग्रजांचा यशवंतरावांच्या योजनेला अयशस्वी करण्याचा प्रयत्न.[78] इंग्रजांना यशवंतराव शीख धर्म स्वीकारणार आणि आपल्या विरुध्द शीखांचा वापर करणार आहे. त्यावेळी इंग्रजांनी यशवंतराव होळकर यांच्या युध्दनितीच्या डावपेचालाच अयशस्वी करण्यासाठी कुटनीतीचा अवलंब इंग्रजांनी चालु केलेला पहावयास मिळतो. रणजितसिंहाचा काका बाघसिंहाला रणजितसिंहाची भेट घेण्यासाठी इंग्रजांनी सांगितले, त्यास सांगितले की तुमच्या पुतण्याला समजुन सांगा की स्वत:च्या हीत संबंधाना प्रथम प्राधान्य देऊनच कोणतेही पाऊल उचलावे बाघसिंहाला प्रथम अपमानित व्हावे लागले परंतु शेवटी बाघसिंहाच्या माध्यमातून इंग्रज यशस्वी झाले. रणजितसिंहाने यशवंतराव होळकर यांना सहकार्य केल्यास त्याचे काय दुष्परिणाम होतील याची जाणीव बाघसिंहाने रणजितसिंहाला करुन दिली. रणजितसिंह राजे यशवंतराव होळकर यांना म्हणतात.[79] महाराज दोनवर्ष झाली तुम्ही इंग्रजांचे बोचकारे काढले, या बोचकाऱ्यांनी माणूस जखमी होतो. मरत नाही. रणजितसिंहाचे हे उदगार ऐकताच त्वेशाने यशवंतराव होळकर म्हणाले. तुम्ही ज्याला बोचकारे म्हणता तो आम्हा मराठ्यांचा गनिमी कावा आहे आमच्या शिवप्रभुंनी दिलेला तो वारसा आहे, सिंगदी साहेब हे बोचकारे नरसिंहाच्या नखाचे आहेत अशा पद्धतीचे उद्‌गार यशवंतरावांनी काढले होते.

आज राणा आम्हाला सोडुन वेगळा झाला तर आमच्या समोर फार मोठे संकट निर्माण होणार आहे.[80] इंग्रजांच्या विरुध्द जे युध्द होणार आहे. त्यावेळी आपण सर्वजण आणि आपली संपत्ती, परिवाराला कोणत्या ठिकाणी सुरक्षितत ठेवणार आहेत. या संकट समयी राणाचे किल्ले ही आमच्यासाठी सुरक्षित असु शकतात. राणा बरोबर आम्ही शत्रुत्व निर्माण करुन कोणत्या पध्दतीने

आम्ही मग त्यांच्या किल्ल्यांचा फायदा घेऊ शकतो. यावेळी आम्हाला हे विसरता कामा नये की राणाच्या सोबत शत्रुत्व निर्माण करणे आमच्यासाठी संकटाचे डोंगर उभा करतील. मेवाड वाल्यांचा आमच्या सोबत विश्वास घात नाही.[81] यशवंतराव होळकर यांनी मेवाड राणाच्या सरदारांना उद्देशुन म्हणाले होते की, तुमच्या राणासाठी मी सर्वकाही सोडुन दिले आहे. शिंदयाच्या भयाची पर्वा न करता तुम्हाला सहकार्य केले, इंग्रजाच्या विरुध्द युध्द करण्यासाठी जी तयारी चालु आहे त्या तयारी मध्ये समस्त हिंदु जातीला एकत्रीत होणे आवश्यक आहे. अशा महत्वाच्या वेळी तुमच्या राणाने वेगळे राहुन, इंग्रजांच्या सोबत करार करण्याचा निर्णय केला आहे. राणाने एकदा म्हटले होते की, "आम्हाला दिल्लीच्या नेतृत्वाखाली राहाणे स्वीकार्य नाही" राणाचा आज स्वाभिमान कुठे आहे जो इंग्रजांच्या नेतृत्वाखाली आपले राज्य कारभार चालवण्यासाठी करार इंग्रजा सोबत केला.

निरंजनलाल नावाचा वकील हा यशवंतराव होळकर द्वारा मथुरे मध्ये वास्तव्यास होता.[82] यशवंतराव होळकर यांनी या वकिलाच्या माध्यमातून भरतपुरचा जाट राजा यांच्या बरोबर पत्रव्यवहार चालत असे या पत्रव्यवहारा विषयी इंग्रजांना बातमी समजल्यानंतर इंग्रजांनी असा निष्कर्ष काढला की इंग्रजांना भारताच्या बाहेर हाकलुन लावण्याच्या उद्देशाने भरतपूरच्या जाट राजालाच नव्हे तर अंतर्वेदीतील दुसऱ्याही अनेक राजांना निरंजन लालच्या माध्यमातून यशवंतराव होळकर यांनी पत्रव्यवहार चालवला होता हे निदर्शनास येते. स्वदेशातच नाहीतर आपले दूत तेहरान, फ्रांस आणि रुस या देशात पाठवून पत्रव्यवहार चालु केला होता. यशवंतराव होळकर यांनी इंग्रजांना देशाबाहेर करण्यासाठी देशांतर्गत संस्थाने आणि परदेशातील देशांना पण पत्राद्वारे सहकार्य करण्याचा त्यांनी सातत्याने प्रयत्न केलेला पहावयास मिळतो.[83] ह्या साऱ्या खटाटोपाचे अंतिम ध्येय हे इंग्रजांचे वर्चस्व या देशात ठेचुन काढावे, त्यांचा प्रभाव कमी करावा, आणि मराठेशाहीचे स्वातंत्र्य अबाधित ठेवावे हे एकच ध्येय त्यांचे होते. यशवंतरावांना इंग्रजांच्या कुटनितीचा अभ्यास होता. त्यामुळे या कालखंडात भारतभूमी वरिल कोणत्याही संस्थानिकाने यशवंतराव होळकर यांच्या शिवाय इंग्रजांना आव्हान कोणीही देऊ शकले नाही.

शीख सरदार दोलचा सिंह, रोहीला खंडाचे नवाब बम्बुखाँ आणि मेरठ संस्थानाची बेगम समरु इत्यादींना यशवंतराव होळकर यांचे पत्र.[84] प्रथम देश नंतर धर्म, आपल्याला जाती, धर्म, व राज्याचा विचार न करता देशाच्या हीतासाठी कार्य करणे आवश्यक आहे. शेवटी तुम्ही सर्वांनी इंग्रजांच्या विरुध्द युध्दाला सुरुवात करावी. भारतातील राजा, महाराजा आणि नवाबाला यशवंतराव होळकर

यांचे आव्हान.[85] या स्वातंत्र्य युध्दामध्ये तुम्ही मला सहकार्य करा मी संपूर्ण भारतातुन या इंग्रजांना हाकलुन देईपर्यंत विश्रांती घेणार नाही. परंतु यशवंतराव होळकर यांना भारतातील कोणत्याही संस्थानिकांनी सहकार्य केलेले दिसत नाही. यशवंतराव स्वत: एकटे इंग्रजांच्या विरुध्द युध्द करत होते. शेवट पर्यंत यशवंतराव हे भाग्यहीन साहसी योध्दे राहिले.

यशवंतराव होळकर यांना अन्य राजे, राजवाड्याकडून हवा तेवढा प्रतिसाद मिळत नव्हता. इंग्रज याक्षणी तरी गळाटुन गेले होते.[86] यशवंतराव होळकर यांना इंग्रजांची सत्य परिस्थिती माहित होती. सततच्या युध्दामुळे इंग्रजांची आर्थिक व लष्करी नुकसानी यशवंतरावांनी फार मोठ्या प्रमाणात केल्याने इंग्रज कमकुवत झाले होते. एक प्रकारे यशवंतराव होळकर यांनी भारतातील संस्थानिकांना एक प्रकारे संधी उपलब्ध करुन दिली होती. परंतु सगळे संस्थानिक शांत राहिले यशवंतरावांना वाटत होते की, जर आपण शहाआलम पातशहाला इंग्रजांच्या तावडीतुन सोडवले तर शहा आलमच्या आदेशाने तरी भारतातील संस्थानिक जे इंग्रजांच्या अधिपत्याखाली गेलेले नव्हते ते तरी आपल्याला सहकार्य करतील. अशा प्रकारचा पराकोटीचा आशावाद यशवंतरावांना होता. इंग्रजांची राजधानी कलकत्ता जिंकायची आणि इंग्रजांना भारतातुन हाकलुन लावण्यास भाग पाडावयाचे हा त्यांचा मनसुबा होता.

यशवंतराव होळकर हे जाणून होते की आपला इंग्रजांच्या विरुध्द मुकाबला होणार यासाठी त्यांनी युध्दाची तयारी केली होती.[87] यशवंतराव होळकर यांनी नागपूर, जोधपूर भरतपूर आणि भारतातील अन्य राजे, राजवाड्यांना व त्यांच्या सरदारांना पत्रव्यवहार करुन सर्व भारतीय राजांनी इंग्रजांच्या विरुध्द संघटीत होणे आवश्यक आहे असे त्यांना वाटत होते. यशवंतराव होळकर यांनी सतलज व व्यास गंगेच्या दोआबातुन 15 फेब्रुवारी 1806 रोजी व्यंकोजी भोसलेंना पत्र पाठविले.[88] राजश्री व्यंकोजी भोसले सेना धुरंधर गोसावी यास सकल गुणांलंकरण अखंडीत लक्ष्मी आलंकृत राजमान्य, स्नेही यशवंतराव होळकर रामराम विनंती उपरी स्वराज्यात जलचरांचा प्रसार विशेष झाला हा घडुन येण्यास्तव महाल मुलकाची आशा न ठेवता कळेल. त्या प्रमाणे फौज व कंपु वाढवुन करोडो रुपयांचे पेचात येऊन आज दोन अडीच वर्ष होत आली, रात्रंदिवस इंग्रजांसी मुकाबल्याचा प्रसंग घडत आला दरम्यान राजश्री दौलतराव शिंदे यांची मेळ करुन भेट घेतली त्यांचे आपले एकविचाराने पगडीवाले सामील राहतीलच या भावे आपल्याकडे पत्रांच्या रवानग्या होत गेल्या मेवाड प्रांती आलियावर ताम्रांस चोहोकडून पायबंद देऊन हारिस आणावे यास्तव पंजाब पावेतो यावयाचे केले.

इकडे लाहुरवाले वगैरे शीखांच्या भेटी होऊन सर्व सामल जाले. पोख्त जमाव झाल्यामुळे फिरंगी मागे पंचवीसतीस कोसांचे अंतराने येत गेले. त्यांनी पट्यालाचे मुक्कामा पासुन समेटाचे बोलणे लाविले. इकडील तयारी पाहुन सोबत त्यांनी राजे रजवाडे अनुकुल करुन दिल्लीचे सुमारे येऊन शह द्यावा. ते न करता कारभारी दुराशेत येऊन पुन्हा त्याची एकोपा ठेवून मेवाडात राहिले. पूर्वी स्वराज्यात ऐक्यता बहुत येणे करोन आज पावेतो व्यंगन पडता एकछत्री अंमल फैलावला होता. हल्लीच्या आपसातील चाली पाहुन सर्वास आपले घर रक्षणकरुन जमीनदारीने असावे हे प्राप्त झाले आपले येण्याची प्रतीक्षा होतीच तो योग न आला फौज सामल होईल हे कागदपत्री मात्र श्रवण झाले अथवा तिकडेच बंगाल्यात वगैरे बळ धाडले असते तरी किती उपयोग घडता? हिंदु धर्मास मुख्य आपले इरादे नमूद असावे ते काही एक दिसण्यात येईना स्वधर्मास एक आमचा नफा वरकडांची नुकसानी असाही अर्थ नाही सर्वत्रांची उमेद, अनुभव व प्रत्यय पाहुन अंग्रेजाकडून समेटाचे बोलणे झाले होते. त्यावरुन समेट करुन घेतला. फिरंगीकुच करुन माघारे दिल्ली प्रांती गेले. आमचे मुक्काम व्यासगंगा व सतलज नदीचे द्वबात आहे. इत:पर दरकुच माळवा प्रांती यावयाचे घडेल. वरकड घरोब्याचे विचार सनातन आहेत. ते यथाक्रम चालवावे इकडील दुसरा अर्थ मानु नये बहुत काय लिहीणे लोभ की जे हे विनंती मोर्तब.

यशवंतराव होळकर जयपुरच्या प्रदेशांत दंगल आरंभील्यावर युध्द सुरु करण्याचे हुकुम वेलस्लीने सोडले.[89] यशवंतराव होळकर यांनी दीडवर्ष युध्दाचा धुमाकुळ माजवला परंतु यशवंतराव लढले ते गनिमीकावा युध्दतंत्राने त्याजपुढे इंग्रजी तोफांचा इलाज कसा चालावा? माऱ्याच्या जागी तोफा आणण्यास अवकाश लागे, यशवंतराव होळकर हे एक जागी ठरेना, आज इथे तर उद्या येथून शंभर मैल दुर अशा पध्दतीच्या धावपळीच्या युध्दामध्ये इंग्रज हे हतबल झाले होते. तीन महिन्यात शिंदे, भोसल्यास नरम केल्याचा वेलस्लीचा अहंकार यशवंतराव होळकर यांनी उतरुन टाकला होता. नागपुरकर भोसले, यशवंतराव होळकर यास सामील झाला तर आपली धडगत नाही असे वेलस्लीला वाटत होते. त्यासाठी वेलस्लीने भोसल्यास कायम आपल्या बाजूने राखण्यासाठी पुण्याहुन कर्नल क्लोज यास तातडीने नागपुरास पाठविण्यात आले. यशवंतराव होळकर यांनी भोसल्यास आग्रह केला की तुम्ही पूर्वेकडून बंगाल्यावर स्वारी करा आम्ही इंग्रजास माळव्यातुन हुसकावुन लावतो चारही बाजुने इंग्रजांची नाकेबंदी केल्यावर जलचर कुठपर्यंत एकमेकांना सहकार्य करतील? या करिता तुम्ही तातडीने सैन्य पाठवावे अशा प्रकारे यशवंतराव होळकर यांनी नागपुरच्या भोसल्यास संदेश

पाठविण्यात आला होता. 2 नोव्हेंबर 1807 च्या पत्रामध्ये यशवंतराव होळकर लिहीतात.[90] आत्माराम शिवराम वाकडे आपले मनोगत राखतात ही चाल मार्गाचीच आहे, ते कुलीन आहेत. उचितास चुकणार नाहीत तिन्ही दौलतीत वडील माणूस आपण आपणा विरहीत आमच्या उद्योगा संबंधी संतोष मानणार दुसरा कोण आहे? येथे ही माणसास कमती नाही. काल महात्म्यानुरुप त्यांचे मनोगत राखणे प्राप्त दहा वर्षा मागे सर्व लहान मोठ्यांनी दौलत संरक्षित केली. सोबत्यास (सिंद्यास) माणसांचा जय चांगला त्यांचा व आमचा दुतर्फा बोज राखण्यास सेना साहेब सुभा हेच समर्थ आहेत. भानपुरा या ठिकाणी आल्यावर नवीन एकशे पंचवीस तोफा निर्माण करण्याचा कारखाना चालु केला. पूर्वी सैन्यामध्ये असणारी जुनी सैन्यदले मोडून नवीन निवडक माणसे निवडूण एकुण 12 बटालीयन उभारलेली आहेत. अजुन सहा बटालियन मध्ये नवीन सैन्याची भरती करण्यासाठी लोक वेगवेगळ्या ठिकाणी गेलेली आहेत. सैन्यदलात मराठे आणि काही पठाण सैन्याची भरती करण्यात आलेली आहे. इत्यादी वरील हालचाली वरुन यशवंतराव होळकर यांची इंग्रजांच्या विरुध्दची युद्ध करण्याची तयारी ही किती मोठ्या प्रमाणात होती हे दिसुन येते.

इंग्रज गळाठून गेला आहे तोवर दिल्लीवरच झंझावाती स्वारी करुन दिल्ली जिंकुन पातशहाला मुक्तकरावे हा धाडसी निर्णय यशवंतराव होळकर यांनी घेतला.[91] यशवंतराव होळकर यांनी आक्रमकपणे डावपेच ही आखले होते. यावेळी यशवंतरावांकडे एकुण सैन्य शक्ती ही (60,000) साठ हजार घोडदळ, पंधरा ते सोळा हजार (15 ते 16000) पायदळ आणि 200 च्या जवळपास तोफा ह्या उपलब्ध होत्या. ज्यावेळी यशवंतराव होळकर दिल्लीवर स्वारी करण्यासाठी जात असताना त्यांनी नागपुरच्या व्यंकोजी भोसले यांना पत्र पाठवून कलकत्यावर आक्रमण करण्याच्या सुचना देण्यात आलेल्या होत्या. त्यावेळी व्यंकोजी भोसलेनी यशवंतरावांच्या दिलेल्या सुचनानुसार आक्रमण करतो असे आश्वासन दिले खरे, परंतु शेवटपर्यंत तशा प्रकारे घडले नाही. त्यामुळे यशवंतराव होळकर यांना लाखाचे सैन्य आणि दोनशे तोफा हव्या होत्या. यशवंतरावांनी स्वत:च कलकत्यावर आक्रमणाची योजना आखली होती.[92] यशवंतरावांनी नागपुरच्या व्यंकोजी भोसल्यांना सातत्याने पत्रव्यवहार करुन थकले होते. त्यामुळे यशवंतरावांनी हे कार्य आता स्वत:लाच करावे लागणार होते. त्यांनी बंगाल आणि बिहार प्रांताना आपल्या नियंत्रणाखाली आणून कलकत्याच्या दिशेने त्यांनी कुच करण्यास सुरुवात केली यशवंतरावांची या महत्वाकांक्षेस इंग्रजी इतिहासकारांनी खिल्ली उडवली की, यशवंतराव होळकर इंग्रजांच्या विरुध्द युध्दात जिंकण्याच्या

लालसेने त्यांची बुध्दी भ्रष्ट झाली आहे असे इंग्रजी इतिहासकारांचे उदगार होते. यशवंतरावांना भारतातून इंग्रजांना हाकलुन लावावयाचे होते. त्यांच्यासाठी भारताचे स्वातंत्र्य सर्वोपरी होते. त्यासाठी त्यांनी सातत्याने अखंड भारत भ्रमण करुन संस्थानिकांना इंग्रजांच्या विरुध्द एकजुट व्हावे ही इच्छा जाहिर केली. त्यांनी कधी विश्रांती घेतली नाही. परंतु कोणत्याही भारतीय राजे, रजवाड्यांनी यशवंतरावांना सहकार्य केलेले दिसत नाही. स्वत:च्या हिंमतीवर इंग्रजांच्या विरुद्ध युद्ध केले व त्यांच्या तोडीचा शस्त्र व तोफखाना निर्माण करण्याचे त्यांचे सातत्याने प्रयत्न होते.

आधुनिक जगात इंग्रजांविरुध्द विजय मिळवावयाचा असल्यास तोफांशिवाय इलाज नाही.[93] यशवंतराव होळकर यांचे पक्के मत बनले होते की इंग्रजांच्या विरुद्ध लढण्यासाठी आपल्याकडे तोफखाना दल हे सक्षम असावे. त्यासाठी त्यांनी एकीकडे राज्याचा गाडा सुरळीत व्हावा यासाठी यशवंतरावांच्या हालचाली चालु होत्या. त्याचवेळी दुसरीकडे भानपुऱ्याला तोफा ओतण्याचा कारखाना उभारला. इंग्रजांची खरी शक्ती ही तोफा असुन त्यांच्याशी आपल्याला युध्दात विजय मिळवावयाचा असल्यास त्यांच्या सारखेच उत्तम प्रकारचे कार्यक्षम तोफखान्याची प्रचंड शक्ती आपल्या जवळ असणे आवश्यक आहे. या भावनेने यशवंतराव होळकर यांनी नव्या तोफा ओतण्याचा कारखाना चालु केला. यशवंतरावांनी या तोफखान्यातुन 200 तोफा रात्रदिवस कामकरुन निर्माण केल्या.

15 फेब्रुवारी 1806 रोजी यशवंतरावांचे व्यंकोजी भोसले यास पत्र.[94] मराठा साम्राज्याला परकियांनी बळकावले आहे. ईश्वरच जाणतो की त्यांच्या आक्रमणा विरुध्द गत अडीच वर्षापासून मी प्रत्येक वस्तुची आहुती दिलेली आहे. आणि रात्रं दिवस एकही क्षण न थांबता सतत संघर्ष करित आहे. मी दौलतराव शिंदे यांच्याकडे जाऊन त्याला समजावले की विदेशी सत्तेविरुध्द आपली सगळयांची एकजुट किती आवश्यक आहे. परंतु दौलतरांव शिंदेनी हे मान्य केले नाही. आपल्या पूर्वजांच्या परस्पर सहयोग आणि सदभावनेतुनच मराठा संघाचा जन्म झाला परंतु आता आपण मनमानी करित आहोत, तुम्ही लिहीले होते की तुम्ही माझ्या मदतीसाठी येत आहात परंतु तुम्ही वचनाचे पालन केले नाही, या योजने नुसार जर तुम्ही बंगालवर आक्रमण केले असते तर आपण इंग्रजी सत्तेला लोळविण्यात यशस्वी झालो असतो. यशवंतराव होळकरांचे एकमेव ध्येय हे इंग्रजांचा भारतातुन प्रभाव कमी करुन हद्दपार करावे ही त्यांची योजना होती परंतु त्यांना भारतातील

संस्थानिकांनी सहकार्य तर केलेच नाही परंतु मराठेशाहीतील सरदारांनीही त्यांना आधार देण्याचे कार्य केलेले दिसत नाही.

कल्पना वाढाव्यात असेच भाव दिसण्यात आले आपसातील कलह मोडुन मसलत प्राप्ती जाहली ते सांभाळावी हे चाल दिसेना.[95] यशवंतराव होळकर यांनी आपल्यावर हेकेखोरपणाच्या दुर्निनित्ताचा दोष येवू नये यासाठी यशवंतरावांनी नागपुरच्या भोसल्यांना मध्यस्थी करण्यास सुचवले होते, इतर मुद्दे बाजुला टाकुन चिरंजीव खंडेराव याजला मंडळीसह आम्हाकडे पाठवून देऊन त्रिवर्गांनी (शिंदे, भोसले, होळकर) एकविचारे मसलत सांभाळुन स्वराज्य राखावे, यातच सर्व मागणीचा समावेश समजावा, एक विचारे इंग्रजावर चाल केली असता त्याचा ही प्रसार होऊ पावणार नाही. इंग्रजांचा प्रभाव भारतातुन मोडून काढल्यावर मागण्यांची सारी कलमे योग्य प्रकारे निकालात काढण्याची हमी भोसले घेत असतील तर आपण इंग्रजां संबंधाच्या मसलतीत भागीदार होऊ हे न घडल्यास दिसेल तसे करावयास येईल. स्वत:ची मागणी क्षणभर दृष्टीआड ठेवून सर्वांनी स्वराज्य राखावे ही यशवंतराव होळकर यांची इच्छा यशस्वी होण्या इतकी समंजसपणा पेशवे, शिंदे, भोसले या तिघांनी दाखवलेला दिसत नाही. सर्वांचे जीव धोक्यात टाकुन एकमेकांना साह्य करणारे ऐक्य असावे अशी यशवंतरावांची तळमळ होती.[96] ही तळमळ अनेक पत्रांमधुन पहावयास मिळते. या तळमळीचे बीज हे मराठेशाहीचे पहिले वैभव आणि स्वकालीन दैन्याविषयी यशवंतरावांनी केलेल्या तुलनेत स्पष्टपणे दिसेल. जोपर्यंत मराठेशाहीतील मराठा सरदार हे एकत्रीत पणे, एकजुटीने राहिले होते. तो पर्यंत मराठेशाहीचा प्रभाव हा अखंड भारतामध्ये विस्तारीत होत होता. नंतरच्या कालखंडात मराठेशाहीतील आपसातील मतभेद, फुटीरतेमुळे मराठेशाहीची स्थिती ही कमकुवत झालेली आहे. अशा पध्दतीने यशवंतरावांनी मागचा आणि वर्तमान काळातील मराठेशाहीचा अनुभव सांगुन मराठा सरदारांना एकजुटीची महती सांगतात परंतु त्यांची तळमळ ही ओळखुन सहकार्य करण्याचा उद्देश या कालखंडातील मराठेशाहीच्या राज्यकर्त्या मराठ्यांमध्ये दिसत नाही. त्यामुळे यशंतरावांनी अखंड भारत निर्माणासाठी चालवलेला भारतातील लहान मोठ्या संस्थानिकाशी पत्र व्यवहार इत्यादी अयशस्वी होताना दिसुन येतो.

यशवंतराव होळकर यांनी इंग्रजांशी होणाऱ्या युध्दासाठी मराठा संघाला एकत्रीत करण्याचा भरपुर प्रयत्न केला.[97] जवळ जवळ मराठेशाहीतील सर्व मराठा सरदारांनी यशवंतराव होळकर यांना इंग्रजांच्या विरुध्द लढण्यासाठी सहकार्य करण्याचे आश्वासन दिले. परंतु दौलतराव शिंदेनी

यशवंतरावांना सहकार्य न करण्याचे सांगितले. त्यावेळी यशवंतरावांनी निश्चय केला की दौलतराव शिंदे एवढा शक्तिशाली मराठा सरदार असताना सुदधा मराठेशाहीच्या संरक्षणासाठी सहकार्य करु इच्छित नाही त्यावेळी मलाच मराठेशाही व देशाच्या प्रति इंग्रजांच्या विरुध्द लढावे लागेल. इंग्रजांचे वर्चस्व हाणुन पाडण्यासाठी मी माझा जीव पणास लावला आहे.[98] माझे इंग्रजांशी युध्द चालु आहे यावेळी भारतातील सर्व हिंदुनी इंग्रजांच्या विरुध्द व्हावयास पाहिजे. परंतु भारतातील काही संस्थानिक इंग्रजांना आपल्या डोक्यावर बसविण्यास, त्यांच्या नेतृत्वाखाली, प्रभावाखाली कार्य करण्यास उत्सुक असल्यामुळे तुमच्या संरक्षणाची जबाबदारी माझी नाही तुम्ही तुमचे आपसामध्ये पाहुन घ्या अशा पध्दतीने काही संस्थानिकांना ठणकावुन सांगितले होते भारतातुन इंग्रजाना हुसकावुन लावण्यासाठी रात्र दिवस कष्ट घेत आहे आणि तुम्ही या इंग्रजांना आपल्या डोक्यावर बसविण्यास आतुर झाला आहात. त्यावेळी तुम्ही तुमचे पाहुन घ्या अशी उपहासात्मक उदगार यशवंतरावांनी काढलेले आढळुन येतात.

होळकरांचे राज्य हे सुध्दा सरंजामीच राज्य होते.[99] परंतु या सरंजामी राज्याच्या लोभामध्ये यशवंतराव होळकर हे आपल्या कर्तव्यामध्ये कुठे चुकले नाहीत. यशवंतरावांनी आपल्या मातृभूमीच्या प्रेमापोटी आपल्या राज्याचा विचार न करता इंग्रजांच्या विरुध्द मराठेशाहीच्या बचावाकरिता तनमन धनाने संपूर्ण भारतात लहान मोठ्या संस्थानिकांनी एकत्रीत यावे. यासाठी प्रयत्नशील होते त्याच बरोबर इंग्रजांच्या विरुध्द लढण्यास भारत आपल्या घोड्याच्या टापुखाली तुडवीत होते. भोसल्यांनी बंगालकडे आणि शिंद्यानी दिल्लीकडे आपले सैन्य इंग्रजांच्या विरुध्द आक्रमण करण्यासाठी घेऊन गेले असते तर इंग्रजांना वेगवेगळ्या ठिकाणी धावाधाव करावी लागली असती पण तसे घडले नाही यशवंतराव होळकर यांच्या युध्दनितीचा हा भाग होता त्यासाठी त्यांनी भोसल्यांना बंगाल व शिंदयांना दिल्लीकडे पाठविण्याचा तगादा होता. त्यामुळे इंग्रजांचे सैन्य विखुरले असते. त्यांची शक्ती कमी झाली असती आणि त्या विभागलेल्या इंग्रजांच्या सैन्य दलावर आक्रमण करता आले असते. अशा पध्दतीची युध्दनिती यशवंतराव होळकर यांनी आखली होती.

भोसल्यांनी फौज पाठवितो असे लेखी आश्वासन दिले होते. त्यास अनुसरुन यशवंतराव होळकरांनी नंतर लिहीलेल्या एका पत्रात म्हणतात.[100] फौज सामल होईल हे कागदोपत्री मात्र श्रवण झाले अशा पध्दतीचे खोचक वाक्य यशवंतरावांनी भोसल्यास लिहिले आहे. आपले राज्य हे ज्या मराठेशाही राज्याचा अवयव श्रेष्ठ की आपले राज्य श्रेष्ठ यावरुन मराठेशाहीच्या बद्दल असणारी

निष्ठा, प्रामाणिकपणा हे यशवंतराव होळकर यांच्या चारित्र्यावरुन लक्षात येते. तत्व आणि कर्तबगारी या दोन्ही अंगाने विचार केल्यास यशवंतरावांची मनोभावना ही स्वातंत्र्यवीराची होती हे आपल्या लक्षात येईल. पहिले माझे राष्ट, माझा देश, धर्म, जात प्रदेश यांच्या पलीकडे जाऊन देश, राष्ट्रहीत पहाण्याची आवश्यकता आहे. माझ्या सारखेच तुम्हां सर्वांना इंग्रजा विरुध्द उभे राहिले पाहिजे.[101] यशवंतराव होळकर यांची ध्येय धोरणे ही इंग्रजांना भारतातून हद्दपार करण्यासाठी जंगजंग पछाडलेले होते. त्यांनी भारतातील व मराठेशाहीतील मराठा सरदार असो की संस्थानिकातील, राजेरजवाडे असोत त्यांना इंग्रजांच्या विरुध्द उठाव करण्यासाठी पत्रव्यवहार, बैठका आणि मराठेशाहीतील सरदारांना मराठा संघाच्या संघटनेखाली एकत्रीत करण्याचा त्यांचा प्रयत्न दिसतो. यशवंतरावांनी स्वत:च्या राज्याची पर्वा न करता. आपल्या देशाला इंग्रजांच्या जोखडातुन मूक्त करण्यासाठी प्रथम आपल्या देशाचा विचार केलेला दिसुन येईल. देशाच्या हितामध्येच आपले हित आहे. त्यांनी जातीपातीच्या धर्माच्या पलीकडे जाऊन आपल्या देशाच्या हीताचा विचार केलेला दिसतो. त्यासाठी त्यांनी भारतातील लहानमोठ्या राजे रजवाड्यांनी इंग्रजांच्या विरुध्द सर्वांनी एकत्रीत येऊन लढले पाहिजे अशी त्यांची भावना होती. जर आपण सर्वजण इंग्रजांच्या विरुध्द उठाव केला नाही तर इंग्रज भारतात त्यांच्या साम्राज्यवादी धोरणाचा विस्तार करुन आपले राज्य बळकावतील आणि मराठेशाहीचे राज्य त्यांच्या आखत्यारीत जाईल. त्यावेळी सर्वांनी एकत्र या असे आव्हान केलेले आपल्याला पहावयास मिळते.

यशवंतराव होळकर परशुरामभाऊ यांना पत्र लिहितात.[102] आजपर्यंत हिंदुराज्य सर्वांनी एकदिल राहुन चालविले अलीकडे ज्याचे त्याचे दौलतीत ग्रहकलह होऊन राज्यास विपर्यास पडून हिंदु धर्म नाहीसा होण्यात मुळ झाले. याचे छेदन करण्यास सर्वत्र एकदिल झाले पाहिजे. तरच मुळाचे छेदन होऊन स्वधर्माचार पूर्ववत प्रमाणे चालुन हिंदुची कायमी राहील इकडील क्रम जो आरंभीला आहे हाच यावद्देह चालवावा असे मनात आहे. यात परमेश्वर अनुकुल होऊन जे घडवीले ते खरे परंतु एकानेच असा प्रकार करुन सर्वत्रांनी तमासे पाहुन आपापली दौलत सांभाळुन असावे यातील परिणाम कसा हे मनी विचारुन ज्यांत हिंदुधर्माची कायमी व परिणामास नीट ते करावे याचा विचार तुम्हा सारख्यांनी न केला तरी दुसरे कोण करतील?

यशवंतराव इंग्रजांना काफर म्हणतात हा उल्लेख विचारात घेण्यासारखा असून.[103] यशवंतरावांची बुध्दी ही भारतातील हिंदु मुस्लीमांचा धर्मभेद करताना दिसत नाही. ख्रिस्ती इंग्रज हा

विरुध्दी विपशीत धर्माचा काफर अशी त्यांची भावना होती. इंग्रजांचा देशभर अनियंत्रीतपणा स्पष्ट झाल्यास हिंदु मुस्लीम यादोन्ही धर्माची वाताहत झाल्याशिवाय राहणार नाही. असे त्यांचे निश्चित त्याकाळी मत झाले होते. इंग्रज काफराला भारतातून हाकलून लावल्या शिवाय किंवा त्यांना दडपून टाकल्या शिवाय भारतातील कोणताही धर्म हा या देशामध्ये अस्तित्वात रहाणार नाही असे आपल्या पत्रामधून लिहीत असत, यशवंतरावांची दुरदृष्टी या ठिकाणी पहावयास मिळते. देशातील इंग्रजांच्या वाढत्या प्रभावाचा कोणकोणत्या घटकावर परिणाम होऊ शकतो याची त्यांना जाण होती. त्यासाठीच त्यांनी भारतात इंग्रजांचे वाढते प्रस्थ स्थिर होण्या अगोदर त्यांना या देशातून बाहेर काढल्या शिवाय येथील लहान मोठ्या संस्थानिकांना पर्याय नाही अशी त्यांची भावना होती.

स्वातंत्र्याच्या या युध्दासाठी सैन्यशक्ति आणि सैन्य शक्तिला धन संपत्तीची आवश्यकता असते.[104] यशवंतराव होळकर यांनी आपल्या लष्करी मोहिमेच्या काळात जयपूर, अजमेर या राजांकडून मोठ्या प्रमाणात धन संपत्ती वसुल करताना म्हणाले होते की, स्वातंत्र्याच्या लढाईसाठी इंग्रजांशी युध्द करने आवश्यक आहे. युध्दासाठी सैन्यशक्तिची आवश्यकता आहे सैन्य शक्तिसाठी धनसंपत्ती गोळाकरताना मी हे पहाणार नाही की समोरील राज्य कुणाचे आहे. यशवंतरावांची ही स्वातंत्र्यासाठी धडपड लक्षात येईल.

यशवंतराव होळकर यांनी लॉर्डलेक यास गोड पत्र लिहून कळविले.[105] इंग्रजांशी वाकडे वर्तन करण्याची मला, बिलकुल इच्छा नाही. उलट मी आपली मैत्री चाहतो इंग्रजांच्या विरुध्द यशवंतराव भारतातील संस्थानिकांना दुसऱ्या बाजूने संघटीत करण्याचा प्रयत्न करत होते तर एकीकडे इंग्रजांशी मैत्रीपूर्ण संबंध स्थापीत करण्याचा पत्रव्यवहार करत होते. यशवंतारावांची ही युध्द निती, आणि तयारीचा भाग होता. यशवंतराव होळकर आणि शीख सरदार, रोहीले सरदार यांच्या दरम्यान ठरले होते.[106] गुरुपालसिंग, रावसिंग, मीरसिंग, बंदगासिंग इत्यादी शीख सरदार व गुलाम महंमदा सारखे अजुन काही रोहीले सरदार व यशवंतराव होळकर यांच्या मध्ये विचार विनिमय होवून शेवटी असे ठरले की यशवंतराव होळकराचे सरदार पंडितराव यांच्या नेतृत्वाखाली दहा हजार घोडेस्वार इत्यादींनी एकत्रित येऊन हरिद्वार पासुन ते थेट प्रयाग पर्यंत गंगा आणि यमुना या नद्यांच्या मधील असणाऱ्या दुआबाच्या प्रदेशामधून इंग्रजांना हाकलुन लावुन हा सगळा प्रवेश आपल्या नियंत्रणा खाली घ्यायचा अशा पध्दतीची योजना यशवंतरावांनी आखलेली पहावयास मिळते.

यशवंतराव होळकर इंग्रजांच्या ध्येय धोरणाला चांगल्या पध्दतीने ओळखत होते.[107] यशवंतरावांनी दौलतराव शिंदेच्या पराभवाचे कारण हे त्यांच्या सैन्य दलातील युरोपियन सैन्य अधिकारी होते. यामुळे यशवंतराव होळकरांनी पहिले काम हे इंग्रजांच्या सोबत मिळून माझ्या विरुध्द षडयंत्र करणाऱ्या आपल्या सैन्य दलातील युरोपियन सैन्य अधिकाऱ्यांना मृत्युची शिक्षा दिली. त्यामुळे यशवंतरावांच्या जीवनातील सर्वात बुध्दीमत्ता पूर्ण कार्य म्हटले पाहिजे. 16 एप्रिल 1804 रोजी गर्व्हनर जनरलने यशवंतराव होळकरांशी युध्द सुरु करण्याचे हुकूम ठिकठिकाणच्या हस्तकास सोडिले.[108] इंग्रजांना माहित होते की यशवंतराव होळकर हा आपल्या विरुध्द युध्दाची तयारी करत आहे यास वेळीच आवरले नाही तर आपल्याला युध्दाचा सामना करावा लागेल. आपल्याला एका यशवंतराव होळकराशी नाही तर भारतातील लहान मोठ्या अनेक यशवंतराव होळकरांशी युध्द करावे लागेल आपले जे स्वप्न आहे. ते भारतात सत्ता स्थापीत व्हावी या स्वप्नास यशवंतराव होळकर आडकाठी आणत आहे. त्यासाठी सर्व इंग्रजांनी एकत्रीत येऊन यशवंतराव होळकराचा पराभव करावा लागेल असे इंग्रजांना वाटत होते. परंतु इंग्रज आपल्या विरुध्द युध्दकरण्यास तयारी करत आहेत. हे कळण्यास यशवंतरावांना वेळ लागला नाही. यशवंतरावांना मोठी ईर्षा होती की, जे कार्य इंग्रजांच्या विरुध्द शिंदे, भोसल्यांना करता आले नाही ते कार्य आपण स्वत: करुन दाखवू आणि इंग्रजांच्या विरुध्द युध्द हे गनिमीकावा युध्दतंत्राने करुन मराठेशाही राज्याचा बचाव करु यासाठी यशवंतरावांनी मराठा मंडळाची एकजुट करण्याची धडपड चालवली होती परंतु त्यास यश न येता स्वत: यशवंतरावांनी इंग्रजांच्या विरुध्द आपण आपल्या सैन्याच्या जोरावर लढण्याचे ठरवले ही भूमिका या ठिकाणी दिसते.

यशवंतराव होळकर यांनी वेलस्लीकडे आपला वकील पाठवुन न्याय मागितला.[109] यशवंतराव होळकर यांनी वेलस्लीकडे आपला वकिल पाठवून सांगितले की लॉर्ड लेकने आमच्या विरुध्द तोहमत चालविली आहे. आमचा व आमच्या दौलतीचा त्यांनी नि:पात चालवलेला आहे. त्यामुळे आम्हाला नाईलाजास्तव इंग्रजाच्या विरुध्द शस्त्र धरावे लागले आहे. जर तुम्ही आमची समजूत करुन दिलीतर माझी काहीच मागणे आपल्याकडे रहाणार नाही, इंग्रजांचा होळकरांच्या दौलतीवर आपले नियंत्रण स्थापित करण्याचा प्रयत्न सातत्याने चालु आहे. त्यामुळे आमचा प्रदेश आम्हाला परत देण्यात यावा. यशवंतराव होळकर यांनी दक्षिणेस वेलस्लीला पत्र लिहून तिकडचे परगणे परत मागितले.[110] होळकराचे परगणे इंग्रजांनी परत नाही केले तर समरांगणावर जरी तुमच्या

तोफखान्यापुढे माझा इलाज चालत नसला तरी शेकडो मैलांच्या दौडीमारुन अल्पावकाशात दुरदुरचे प्रदेश जाळुन लुटून टाकण्याचे सामर्थ्य मला आहे. तुम्हांस एका क्षणाचीही विश्रांती मी घेऊ देणार नाही. समुद्राच्या लाटांप्रमाणे होळकराच्या फौजा देशभर लोटु लागल्या म्हणजे लाखो प्राणांचा संहार होईल. त्याला विरोध करण्याची छाती कोणलाही होणार नाही. अशा प्रकारचे पत्र इंग्रजांना यशवंतराव होळकर यांनी पाठवलेले होते.

मी इंग्रज सेनापतीला श्वास घेण्याला क्षणाची ही फुरसत मिळु देणार नाही. शेकडो मैलांचा मुलुख तुडवून उदध्वस्त करीन व हजारो माणसांना संकटात टाकीन.[111] यशवंतराव होळकरांनी परंपरागत पध्दतीने मिळालेल्या प्रदेशांचा इंग्रजांनी कब्जा केला आहे. होळकरांचे प्रदेश जे काही इंग्रजांनी हस्तगत केले आहेत ते परत होळकरांना देण्यात यावेत जर तुम्ही ते प्रांत परत देणार नसाल तर मी इंग्रजांच्या सैन्याला व सेनाधिकाऱ्याला श्वास घेण्याची उसंत मिळु देणार नाही हजारो मैलांचा प्रदेश तुडवून उध्दवस्त केला जाईल. अशा पध्दतीची चेतावनी यशवंतराव होळकर यांनी इंग्रजांना दिली होती. 12 डिसेंबर 1803 रोजी वेलस्लीचे मेजर शॉला पत्र.[112] आम्ही जो पर्यंत पेशव्यांचा प्रदेश हस्तगत करत नाहीत आणि यशवंतराव होळकरांवर हल्ला करणार नाहीत. तो पर्यंत मराठा सरदारांना त्यांच्या प्रदेशातुन बाहेर काढण्यात यशस्वी होवून शकत नाहीत. इंग्रजांना माहिती होते की जर आपल्याला संपूर्ण भारतावर अधिराज्य गाजवायचे असेल तर प्रथम मराठेशाहीतील पेशवे व मराठा सरदारांना आपल्या नेतृत्वाखाली आणावे लागेल. त्याच बरोबर मराठेशाहीतील मराठा सरदार यशवंतराव होळकरांवर हल्ला करुन त्यांचा पराभव करावा लागेल. त्यावेळी आपण मराठेशाही आणि भारतावर आपली सत्ता स्थापित करण्यात दुसऱ्या कुणाचाही अडथळा येणार नाही. त्यासाठी अगोदर पेशवे आणि यशवंतराव होळकर यांचा पाडाव करावा लागेल त्यावेळी बाकीच्या मराठेशाहीतील सरदारांना त्यांच्या प्रेदशातून बाहेर काढण्यात यशस्वी होवू.

यशवंतराव होळकर यांनी इंग्रजांशी करार करुन ही त्यांच्या विरुध्द लढण्यासाठी संस्थानिकांची जमवा जमव चालु होती.[113] इंग्रजांशी यशवंतराव होळकर यांनी करार केल्या नंतरही त्यांच्या मनामध्ये इंग्रजा प्रति द्वेष कमी झाला नव्हता. यशवंतराव आपली लष्करी शक्ती वाढवुन इंग्रजांना भारताच्या बाहेर हाकलुन लावण्याच्या त्यांच्या हालचाली चाललेल्या होत्या. त्यासाठी त्यांनी भारतातील संस्थानिकांना पुन्हा पत्रव्यवहार करण्यास सुरुवात केली. यशवंतरावांनी ग्वाल्हेरचे दौलतराव शिंदे यांच्याशी पुन्हा संपर्क केला आणि मराठा मंडळाला मजबुत करण्याचा प्रयत्न केला.

परंतु दौलतराव शिंदेनी यशवंतरावांच्या पत्र व्यवहाराची माहिती ग्वाल्हेरचे इंग्रज रेसिडेंट यास देण्यात आली यावेळच्या रेसीडेंट मरसर याने गर्व्हनर जनरल यास 12 मे 1806 रोजी पत्राद्वारे कळविण्यात आले की, "यशवंतराव होळकर आणि दौलतराव शिंदे यांच्यामध्ये समेट होणार आहे. शिंदेना वाटते की या पत्राच्या बाबतीत रेसीडेंटास सांगण्यात यावे. पुन्हा ३० जुनला या पत्राद्वारे कळवतो की दोन्ही मराठा सरदारांमध्ये एक योजना तयार होणार होती इंग्रजांचे यशवंतरावांच्या बाबतीत प्रत्येक हालचालीवर लक्ष होते. इंग्रजांना यशवंतरावां पासुन अडथळा त्यांच्या ध्येय धोरणामध्ये निर्माण होत होता. त्यासाठी इंग्रजांचे यशवंतरावांवर लक्ष्य होते. त्या दृष्टीने यशवंतरावांच्या भारतातील लहान मोठे राजे, राजवाड्यांना एकत्रीत करण्याच्या हालचाली त्या वेळी चालु होत्या. असे निदर्शनास येते.

मराठ्यांची एक जूट बनवावी हा यशवंतरावांचा उद्देश, तर ही एकजुट फोडावी हा माल्कमचा डाव.[114] यशवंतराव होळकर यांनी इंग्रजांच्या विरुध्द मराठेशाहीतील मराठा सरदारांनी एकत्रीत येऊन इंग्रजांच्या विरुध्द उठाव करावा अशी यशवंतरावांची इच्छा होती त्यासाठी त्यांनी मराठा सरदारांची मने वळविण्याचा प्रयत्न सातत्याने पत्रव्यवहाराच्या माध्यमातून चालवला होता. परंतु इंग्रज अधिकारी जॉन माल्कमला माहीत होते की जर या मराठा सरदारांची एकजुट होत आहे तर आपल्या ध्येय धोरणांना अडथळे आणणारे हे मराठा राज्य आहे. त्यासाठी माल्कमने मराठा सरदारांना व्यक्तिगत भेटून पत्रव्यवहार करुन यशवंतरावांच्या उद्देशांना यशस्वी होऊ दयायचे नाही व त्यांच्यात एकमेकांमध्ये संशयाचे वातावरण निर्माण करुन एकजुट होऊ द्यावयाची नाही हा प्रयत्न माल्कमचा सातत्याने चालु होता. परंतु यशवंतरावांच्या नियोजना प्रमाणे शिंद्याचा तोफखाना, अमीरखानाचे धाडस, सर्जेरावाची अक्कल, यशवंतरावांची घोडदौड, यासर्वांनी एकजुटीने समोर आले तर इंग्रजांचा आपण प्रतिकार करु शकु ही गोष्ट प्रत्येकाला मान्य होईल या धास्तीने माल्कम अस्वस्थ होता. अशा परिस्थितीत माल्कमने मराठेशाहीतील मराठा सरदारांमध्ये भेदनीतीचा डाव टाकला आणि हा डाव यशस्वी झाल्याने यशवंतरावांचा इंग्रजांच्या विरुध्दच्या उद्देशाला बाकीच्या मराठा सरदारामध्ये सहकार्य मिळालेले दिसत नाही. त्यामुळे इंग्रजांची भेदनिती या ठिकाणी यशस्वी झालेली पहावयास मिळते.

इंग्रजांचे वर्चस्व हाणून पाडण्यासाठी मी माझा जीव पणास लावला आहे माझे त्यांच्याशी युध्द सुरु आहे.[115] यशवंतराव होळकर यांनी भारतातील राजे, राजवाडे, संस्थानिकांना आव्हान केले होते की, सर्वांनी एकत्रीत होऊन इंग्रजांच्या विरुध्द लढण्यासाठी सहभागी व्हा मी माझा जीव पणास लावला

आहे. या सर्व संस्थानिकांनी सहकार्य केले तर इंग्रजांना आपण पराभूत करु शकतो एवढा आत्मविश्वास यशवंतरावांना होता. परंतु संस्थानिक हे इंग्रजांच्या प्रभुत्वाखाली जाऊन बसले होते. काही इंग्रजांच्या नेतृत्वाखाली जाण्यास उत्सुक होते. त्यामुळे यशवंतरावांचा भ्रम निरास झाल्याने शेवटी यशवंतरावांनी या संस्थानिकांना उद्देशुन म्हटले की, तुम्हाला इंग्रजांच्या प्रभुत्वाखाली जायचे आहे तर तुमच्या संरक्षणाची जबाबदारी माझ्यावर नाही. तुम्ही संस्थानिकांनी आपसामध्ये एकमेकांनी पाहावे असे उदगार यशवंतरावांनी काढले होते. 6 मार्च 1805 रोजी गर्व्हनर जनरल वेलस्लीने लॉर्ड लेक यास पत्राद्वारे कळविले.[116] माझ्या तुम्हाला शुभेच्छा आहेत की कोणत्याही परिस्थिती मध्ये यशवंतराव होळकराशी करार करुन युध्द थांबविण्यात यावे कारण आम्ही यशवंतराव होळकरांस एवढे मामुली समजले होते परंतु आम्ही त्यास अजय बनवुन टाकले आहे. इंग्रज यशवंतराव होळकरांच्या युध्दमोहीमांमुळे जेरीस आले होते. इंग्रजांना यशवंतरावांच्या विरुध्द युध्दात मोठ्या प्रमाणात आर्थिक नुकसान सोसावे लागले. सैन्याच्या बटालियनच्या बटालियन यशंतरावांनी गारद करुन टाकल्या, भारतात आणि इंग्लंडच्या संसदेमध्ये यशवंतराव होळकर यांच्या धाडसाचे व कार्याची चर्चा होऊ लागली. इंग्रज अधिकारी गर्व्हनर वेलस्लीला आपल्या कार्य काळात प्रचंड मानहानी व आर्थिक नुकसान, त्याच बरोबर इंग्रज सेनाधिकारी गमवावे लागले भारतात यशवंतरावांनी इंग्रजांच्या विरुध्द केलेल्या उठावाचे समर्थन व चर्चा भारतभर पसरल्याने इंग्रजांनी आपले स्वप्न पूर्ववत करण्यासाठी नरमाईचे धोरण ठेवून गर्व्हनर जनरल वेलस्लीला यशवंतराव होळकरां बरोबर संधी करा असा आदेश आपल्या सैन्याधिकाऱ्यास द्यावे लागले. त्यामुळे यशवंतरावांची प्रतिमाही मराठेशाही सह भारतातील विविध संस्थानिकांमध्ये उजळुन निघाली हे पहावयास मिळेल भारतातील इतर संस्थानिक इंग्रजांशी संधी करार करण्यासाठी उत्सुक असताना इंग्रज हे यशवंतराव होळकर यांच्या बरोबर संधी, करण्यास आतुर होते. यावरुन असे लक्षात येते की, इंग्रज यशवंतरावांच्या पराक्रम, शौर्य कार्यकर्तृत्वामुळे भयभीत झालेले दिसुन येतात.

The Enterprising spirit, military character and Ambitious views of Jaswantrao Holkar render the reduction of his power a desirable object with reference to the complete establishment of tranquillity in india.[117] यशवंतराव होळकर हा मोठा रणशुर, धाडसी आणि महत्वाकांक्षी असल्यामुळे त्याचे सामर्थ्य नष्ट करुन टाकणे हे वेलस्लीच्या पत्रामधून व्यक्त केलेले मत आहे. जोपर्यंत यशवंतराव होळकरास नष्ट करणार नाहीत तोपर्यंत भारतात

इंग्रजांच्या साम्राज्यवादी ध्येय धोरणाला स्थापीत करण्यामध्ये हा अडथळा निर्माण करणार आहे. त्यासाठी यशवंतराव होळकरास नष्ट करणे हे किती महत्वाचे आहे. हे वेलस्लीच्या पत्रातून इंग्रजांच्या पोटातील खरा हेतू हा स्पष्ट होतो. यशवंतराव होळकर यांच्यामुळे देशी संस्थानिक टिकुन राहिले.[118] यशवंतराव होळकर यांचे इंग्रजांच्या विरुध्द शेवटच्या कालखंडात यशवंतराव आणि भरतपूरचा जाट राजा रणजितसिंह यांचे कार्य इंग्रजांच्या विरुध्द उल्लेखनीय राहिले आहे. जर वीर योध्दा यशवंतराव होळकर आपल्या युध्दनेतृत्व आणि युध्द कौशल्याच्या साहाय्याने इंग्रजांच्या विरुध्द युध्द केले नसते तर भारतातील एकंदरीत 700 लहान मोठ्या देशी संस्थानिकामधील एकही संस्थाने इंग्रजांच्या प्रभूत्वापासून वाचली नसती नि:संदेह यश्वंतराव होळकरांचे नाव भारताच्या पराक्रमी पुरुषांमध्ये सर्वोच्चस्थानी सदैव अजरामर राहिल.

लाथमारीन तिथे पाणी काढीन अशा कर्तबगारीचा पुरुष जसा वागेल तसाच यशवंतराव होळकरांचा वर्तनक्रम या काळात दिसतो.[119] यशवंतराव होळकरांचे ध्येयच एक होते कोणत्याही परिस्थिती मध्ये इंग्रजांना भारतातून काढावयाचे त्यासाठी त्यांनी इंग्रजांच्या विरुध्द लढण्यासाठी तोफा ओतण्याचा कारखाना, नवनवीन अत्याधुनिक शस्त्रास्त्रे बनविण्यास प्रारंभ केलेला होता. त्याचबरोबर वेळोवेळी इंग्रजांच्या विरुध्द युध्द चालू होते. यशवंतराव स्वत:च्या होळकर राज्यासाठी इंग्रजांच्या विरुध्द युध्द पुकारले नव्हे तर अखंड भारतातील राजे राजवाड्यांचा इंग्रजापासुन बचाव करण्यासाठी स्वातंत्र्य युध्द पुकारले होते. यशवंतरावांनी स्वराज्यासाठी, स्वधर्मासाठी आपण साऱ्या देशाला रणांगणाचे स्वरुप दिले आहे. अशा प्रकारची भावना त्यांच्या इंग्रजांच्या विरुध हालचाली आणि देशी संस्थानिकांना आव्हान व स्वातंत्र्यासाठी करण्यात येणाऱ्या पराक्रमावरुन स्पष्ट होते.

यशवंतराव होळकर यांच्यात संघटन निर्माण करण्याचे विशेष कौशल्य होते.[120] यशवंतराव होळकर यांनी भारतातील राजे, संस्थाने यास आपला मित्र बनवून इंग्रजांच्या विरुध्द एक मोठा शक्तिशाली संघ तयार केला होता. यशवंतरावांनी घोडदळाच्या माध्यमातून मैदानी प्रदेशातील गनिमीकावा युध्दतंत्राचा इंग्रजांच्या विरुध्द उपयोग करीत व त्यास युध्दामध्ये पराभव स्वीकारावा लागे अशा पध्दतीने यशवंतराव होळकर यांनी, आफगाणिस्तान, फ्रान्स, तेहरान, नेपाळ अशा अनेक परकीय शक्ती आणि देशी संस्थानिकातील काही राजे यांच्या सहकार्यातुन इंग्रजांच्या विरुध्द एक संघटन तयार केलेली पहावयास मिळते. यशवंतराव होळकर यांचे सर्वाधिक भव्य कार्य हे इंग्रजांच्या सैन्याला पराभूत करुन पळवणे होते.[121] यशवंतरावांनी इंग्रजांच्या भारतातील प्रभुत्वा खालील

संस्थानिकांना सोडवून इंग्रजांना बंगालच्या एका राज्यापुरते मर्यादीत करुन टाकले होते. सातत्याने इंग्रजांचा यशवंतरावाद्वारे पराभव होत होता आणि इंग्रजांना एका मर्यादीत भुभागामध्ये लोटून दिले होते. परंतु यशवंतरावांना देशी संस्थानिकांनी सहकार्य वेळीच केले असते तर अजुन वेगळेच चित्र पहावयास मिळाले असते.

मराठेशाहीत यशवंतराव होळकर हे एकच प्रबळ सरदार आता राहिले होते त्यांच्या जवळ 60,000 घोडदळ व उत्कृष्ट तोफखाना होता.[122] मराठेशाहीतील मराठा सरदार शिंदे, पवार, गायकवाड, पेशवे इत्यादी कमकुवत तर झाले होतेच परंतु यातील काही सरदारांनी इंग्रजांचे नेतृत्व मान्य केल्याने मराठेशाहीत यशवंतराव होळकर हे एकटेच इंग्रजांच्या विरुध्द युध्द लढत होते. त्यामुळे मराठेशाही ही विविध कारणांनी कमकुवत झालेली असताना तिचे गतवैभव पुन्हा प्राप्त करण्यासाठी यशवंतराव होळकर हे इंग्रजांच्या विरुध्द एकटे मराठा सरदार लढत होते. इंग्रजांच्या विरुध्द लढण्यासाठी यशवंतरावांनी मोठ्या प्रमाणात तोफखाना आणि शस्त्रास्त्रे व घोडदळाची संख्या मोठ्या प्रमाणात वाढविलेली या कालखंडात पहावयास मिळते. यशवंतराव होळकर हे एक मात्र मराठेशाहीतील मराठा सरदार होते ज्यांनी अखंड भारताला खंड खंड विभागात विभागणाऱ्या परकीय शक्तीला आव्हान दिले होते. त्यांनी आपल्या तलवारीच्या जोरावर इंग्रजांना हातबल केलेले पहावयास मिळते. मराठेशाहीतील प्रमुख मराठा सरदारांचा यशवंतराव होळकर यांना विरोध असतानाही त्यांनी स्वपराक्रमाने स्वत:च्या कष्टाने गेली दोन वर्षे इंग्रजांच्या विरुध्द युध्द करुन इंग्रजांना त्राही त्राही करुन सोडले ही गोष्ट असामान्य कर्तृत्वाचीच गणली पाहिजे पेशवा बाजीराव, दौलतराव शिंदे, भोसले इत्यादी मराठेशाहीतील मराठा सरदार यशवंतराव होळकर यांचे इंग्रजाच्या विरुध्दचे कौतुक करत व हे लांबून पहात होते.

एक राष्ट्र परकीयांची हकालपट्टी एतद्देशीयांचा अंमल हेच यशवंतराव होळकर यांच्या अविरत संघर्षा मागील खरे आणि एकमेव कारण आहे.[123] यशवंतराव होळकर यांनी इ.स. 1803 साली केलेला इंग्रजांच्या विरुध्दचा संघर्ष हा मुळातच त्यांनी स्वत:साठी केलेला दिसत नाही. त्यांचे स्वत:चे राज्य होळकरशाही सुरक्षित असतानाही त्यांनी उत्तर भारतात इंग्रजांच्या विरुध्द 1803 पासून ज्या ज्या युध्दमोहिमा केलेल्या आहेत. त्या सर्व युध्दमोहीमा ह्या देशी संस्थानिकांना इंग्रजांच्या प्रभुत्वाखाली न जाता आपण आपल्या भारत भूमीवर स्वतंत्र राहु ही त्यांची अपेक्षा होती. वेगवेगळ्या विभागामध्ये विभागलेल्या देशी संस्थानिकांना अखंड भारताच्या स्वप्नपूर्तीसाठी इंग्रजांच्या विरुध्द

एकत्र या अशा प्रकारचे आव्हान यशवंतराव होळकर करत होते व इंग्रजांच्या विरुध्द सर्वांनी एकत्रीत यावे यासाठी यशवंतरावांनी 1803 नंतरच्या सर्व लढाया या इंग्रजांच्या विरुध्द केलेल्या आहेत. यशवंतरावांनी भारतातील एकाही देशी संस्थानिकाशी त्यांनी युध्द केलेले दिसत नाही हा यशवंतरावांचा देशाभिमान प्रथम या ठिकाणी पहावयास मिळतो.

## 5.4 **यशवंतराव होळकर यांचा वाढता प्रभाव :-**

यशवंतराव होळकर यांचा दौलतराव शिंदे यांच्याशी गनिमीकावा युध्दतंत्राने युध्द चालु होते. त्या दरम्यानचा यशवंतरावांचा प्रवास हा गतिमानतेने चालु होता.[124] 14 आक्टोबर 1801 रोजी इंदुरहून जलदगतीने जाऊन नोव्हेंबर मध्ये पुन्हा इंदुर मध्ये धडकले आणि पुन्हा आपले होळकरशाहीचे राज्य शिंद्याकडून घेतले. त्यानंतर यशवंतराव होळकर इंदुरहून गतिमानतेने घोडदौंड करुन 15 नोव्हेंबरला हटादे याठिकाणी पोहोचले. हटादे हे ठिकाण इंदूरहून 12 मैल अंतरावर उत्तर आणि पश्चिममेला आहे. या हटादे ठिकाणाहुन पुन्हा यशवंतराव 23 नोव्हेंबर ला महेश्वर या ठिकाणी पोहोचले या ठिकाणाहून परत यशवंतराव 2 डिसेंबर ला इंदूरला येऊन पोहोचले तेव्हा लवकरात लवकर घोडदोड करुन 6 जानेवारी 1802 रोजी प्रतापगड या ठिकाणी पोहोचले, व तेथून जानेवारी महिन्याच्या शेवटी झाबुआ आणि नाथद्वारा या ठिकाणी पोहोचले अशा पध्दतीने यशवंतराव होळकर यांचा प्रवास हा पहावयास मिळतो. 14 आक्टोबर 1801 ते 6 जानेवारी 1802 पर्यंतचा हा प्रवास यशवंतरावांनी होळकरशाही शिंद्याच्या ताब्यातून घेण्यासाठी केलेला आहे शेवटी यशवंतरावांनी होळकरांचे राज्य पुन्हा प्राप्त केलेले पहावयास मिळते.

मराठेशाही मध्ये आता मराठा सरदार यशवंतराव होळकर हा एकच असा सरदार होता ज्याने इंग्रजांच्या विरुध्द आपली तलवार चालवली होती.[125] यशवंतराव होळकर यांनी इंग्रजांच्या प्रभुत्वाखाली असणाऱ्या प्रदेशात उपद्रव करण्याच्या दृष्टीने जयपूर राज्याच्या सीमामध्ये आक्रमण करण्यास सुरुवात केली होती. ज्यामुळे इंग्रजांच्या ध्येय धोरणाला पुढील काळात मर्यादा येणार होत्या असे दिसुन येते. यशवंतराव होळकर हे इंग्रजांचा सातत्याने पराभव करत होते.[126] यशवंतरावांची यश र्किती ही चारही दिशेला पसरत गेली, देश, विदेशात त्यांच्या शौर्य पराक्रमाची चर्चा होऊ लागली इंग्रजांच्या विरुध्द यशवंतरावांनी युध्द पुकारले होते. त्या युध्दात सातत्याने इंग्रजा विरुध त्यांचा विजय होत होता. भारतातील संस्थानिक जे इंग्रजांच्या अधिपत्याखाली गेले होते. त्यांना आता यशवंतराव

होळकर यांच्या शौर्य, धाडस पराक्रमा बद्दल कुतुहल वाटत होते. त्यांना आशा वाटत होती की इंग्रजांच्या नियंत्रणा खालुन आपल्याला ही व्यक्ती स्वातंत्र्य मिळवून देऊ शकते व भारतातून इंग्रजांचा पाडाव यशवंतरावच करु शकतात अशी आशा या लहान मोठ्या संस्थानिकांना वाटत होती. त्यामुळे इंग्रजांचा सातत्याने यशवंतराव पराभव करत असल्याने इंग्रजांनी यशवंतराव होळकरांना बदनाम करण्यासाठी इंग्रज एकमेकांना पत्रव्यवहार करताना लुटारु, राक्षस, खुनी अशा पध्दतीचा उल्लेख, पत्र व्यवहारात करु लागले. यावरुन असे लक्षात येईल की, भारतातील इंग्रजांच्या प्रभुत्वाला धक्का किती मोठ्या प्रमाणात यशवंतराव देत होते. यावरुन इंग्रज, हताष, हतबल झालेले पहावयास मिळतात. त्यात मुकूंदराखिंडीतील कर्नल मॉन्सन च्या विरुध यशवंतरवांनी केलेले युध्द हे जग प्रसिध्द आहे.

इंग्रजांच्या पराभवा विषयी दु:ख जाहीर करताना गर्व्हनर जनरलने पत्र आर्मस्ट्रॉंग यास लिहीले.[127] यापत्रामध्ये आर्मस्ट्रॉग याच्या नावे 20 जुलै रोजीच्या पत्रातून असे निष्पन्न होते की, कर्नल मॉन्सनचे सैन्य यशवंतराव होळकराच्या आक्रमक धोरणामुळे पाठीमागे सरकत आहे म्हणजे यशवंतराव होळकरांनी कर्नल मॉन्सनला मुकुंदराखिंडी मध्ये आणुन त्यास हाल हाल करुन त्याच्या सैन्यास जेरीस आणले हे दिसुन येते. 17 ऑगस्ट 1804 रोजी मार्क्विर्स वेलस्लीने एक वैयक्तिक पत्र जनरल लेक यास पाठवले होते. त्या पत्रात असे वर्णन करण्यात आलेले आहे की कर्नल मॉन्सन चे सैन्य आपल्या तोफखाना, साधन सामग्री ची हानी सहन करुन माळवा प्रांतास सोडुन गेला आहे. यशवंतरावांच्या या मुकूंदराखिंडीतल्या युध्दात आपले युध्दकौशल्य व युध्दनितीचा उपयोग करुन इंग्रजांवर आपली जरब बसवलेली पहावयास मिळते.

2 सप्टेंबर 1804 रोजी गर्व्हनर जनरलला इंग्रजांचा पराभव झाल्याने दु:ख व्यक्त करताना लॉर्ड लेकने पत्र पाठवले.[128] या अपमान जनक घटने विषयी मी काहीही करु शकत नाही. मला माझ्या सैन्य बटालियनातील सर्वोत्तम आणि मोठ्या प्रमाणात मृत्यूमुखी पडलेल्या सैनिकांवर शोक व्यक्त करावा लागत आहे. या वरुन असे लक्षात येईल की कर्नल मॉन्सन च्या मुकूंदराखिंडीतील पराभवावर लॉर्ड लेक यास शोक व्यक्त करावा लागत आहे. या युध्दात मोठ्या प्रमाणात इंग्रजांचे सैन्य मारले गेले आणि सैन्य बटालियन मधील असणाऱ्या चांगल्या सैन्य अधिकारी व सैन्यास मला मुकावे लागले आहे या पेक्षा नुकसान दुसरे कोणते असु शकत नाही. आर्थर वेलस्लीने आपल्या प्रमुख सेनापतीवर टीका करताना लिहीले की कर्नल मॉन्सन चा पराभव हा एकविनाश होता.[129] यशवंतराव होळकर यांचा कर्नल मॉन्सनच्या विरुध्दचे युध्द हे सर्व इंग्रजांनी पाहिले व अनुभवले होते.

यशवंतरावांचा युध्दाच्या बाबतीत असणारा अनुभव, प्रामाणिकपणा, निष्ठा ही मुकूंदराखिंडीतील युध्दात दिसुन येते. यशवंतरावांनी मुकूंदराखिंडीतील युध्दामध्ये शांत संयमाने आपली युध्दनिती, डावपेच, गनिमी युध्दतंत्र, रणनिती, कशा पध्दतीने कर्नल मॉन्सनवर हल्ला करावयाचा हे तंत्र त्यांनी ऐन पावसाळा असणाऱ्या ऋतु मध्ये अनुभवला इंग्रज सैन्याविरुध्द केलेली युद्ध रणनिती ही इंग्रजांनी पाहिली होती. त्यामुळे आर्थर वेलस्लीला आपल्या सैन्य प्रमुखावर टीका करताना कर्नल मॉन्सनचा युध्दात पराभव झाला नाही तर विनाश झाला आहे असे उदगार काढलेले दिसतात.

11 सप्टेंबर 1804 रोजी मार्क्विस वेलस्लीने लॉर्ड लेकला पत्राद्वारे कळवले की.[130] आम्हाला पाठीमागे काय झाले याचा विचार न करता पुढील भविष्य काळाचा विचार करावा लागेल. यशवंतराव होळकर इंग्रजांच्या पायदळाचा पराभव करुन त्यांच्याकडे असणाऱ्या तोफा ह्या हस्तगत कराव्यात जर आपण सर्वांनी मिळून यशवंतराव होळकरांचा पराभव केला तरच संपूर्ण संकटे आणि भयाचे वातावरण नाहीसे होऊ शकेल. यशवंतरावांच्या कार्य कर्तृत्वाचा भारतात इंग्रजांच्या विरुध्द प्रभाव वाढलेला होता. यशवंतरावांनी कर्नल मॉन्सनचा मुकूंदरा खिंडीत पराभव केल्याने इंग्रजांची संपूर्ण भारत भर बदनामी झाली, इंग्रजांचे सैन्य मोठ्या प्रमाणात युध्दात मारले गेले. तोफखाना, शस्त्रास्त्रे लुटले गेले. इंग्रजांना या युध्दामुळे हतबल व्हावे लागले. लॉर्ड लेकच्या बटालियन मधील सैन्य मोठ्या प्रमाणात ठार झाले. त्यामुळे मार्क्विर्स वेलस्लीने लॉर्ड लेक यास पत्र पाठवून पाठीमागे झालेल्या घटनांना विसरुन पुढील काळात उदभवणाऱ्या संकटाचा सामना करण्यासाठी सज्ज राहावे लागेल. अशा प्रकारचा संवाद लॉर्ड लेकशी साधलेला दिसतो.

वेलस्ली म्हणतो, यशवंतराव होळकरांची शक्ती कमी करणे आवश्यक झाले आहे.[131] कारण यशवंतराव होळकर हे मोठे पराक्रमी व युध्द कौशल्यात निपुण आणि महत्वाकांक्षी आहेत. यशवंतराव इंग्रजांच्या विरुध्दच्या मोहिमामध्ये सातत्याने विजय प्राप्त करावयाचे त्यामुळे इंग्रजांना यशवंतरावां बद्दल त्यांच्या मनात दहशत निर्माण झाली होती. यशवंतरावांची लष्करी क्षमता दिवसेंदिवस वाढत होती भारतातील लहान मोठी काही संस्थाने जी इंग्रजांच्या अधिपत्याखाली नसलेली ती यशवंतरावांच्या आव्हानाला समर्थन देवून यशवंतरावांच्या लष्करी व्यवस्थेमध्ये वेगवेगळ्या विभागामध्ये सहभागी होऊन शक्तीमध्ये वाढ होत होती. संस्थानिकांचा यशवंतरावांना पाठिंबा वाढत होता. त्यामुळे वेलस्लीला वाटत होते की यशवंतराव होळकरांची शक्ती कमी करणे

आवश्यक आहे. यशवंतराव हे युध्दविद्यामध्ये व साहसी, पराक्रमी, युध्दनितीच्या बाबतीत सर्वश्रेष्ठ व युध्दनेतृत्वात उत्कृष्ट होते. त्यामुळे यशवंतरावानी इंग्रजांचा सातत्याने पराभव केलेला दिसुन येतो.

22 मार्च 1804 रोजी जनरल लेकचे वेलस्लीला पत्र.[132] जर होळकराला आत्ताच नष्ट केले नाही तर पावसाळ्या नंतर तो कमालीचा उपद्रवी ठरेल. या राक्षसाने मला जेवढे अस्वस्थ केले आहे तसे कधी ही कोणी केले नसेल. हा माणूस इंग्रजांचा सर्वात घातकशत्रु आहे यात शंका बाळगू नये अशा दरोडेखोराचे कौतुक करताना मला संकोच वाटतो आहे. तो स्वत: माझ्यावर चालुन येणार नाही असेच दडपण वाढवत राहील आणि जर मी त्याच्यावर चालुन गेलो तर तो हुलकावण्या देत सरळ आपल्या प्रदेशात घुसून वाटेत आडवे येईल ते उध्दवस्त करत पुढे जाईल. जनरल लेकचा अंदाज खरा ठरला होता. कारण यशवंतराव होळकरांची लष्करी शक्ती ही वाढत होती. युध्दाप्रति त्यांची निष्ठा, प्रामाणिकपणा सातत्याने आढळुन येते. यशवंतरावांच्या इंग्रजांच्या विरुध्दच्या हालचाली, डावपेच त्यांचे युध्द कौशल्य, युध्दनेतृत्व, युध्दतंत्र जनरल लेकने अनुभवले होते. त्यामुळे त्याने वेलस्लीला पूर्व चेतावनी पत्राद्वारे कळवली होती. यशवंतरावांचे घोडदळ हे त्यावेळी इंग्रजांच्या विरुध्द गतिमानतेने कार्यरत होते. इंग्रजांनी यशवंतरावांचा पाठलाग करण्याचा सातत्याने प्रयत्न केला. परंतु यशवंतराव होळकर हे इंग्रजांबरोबर सदैव पाठशिवणीचा खेळ खेळत त्यामुळे इंग्रज कंटाळून गेले होते. इंग्रजांच्या सैन्यावर एक प्रकारची दहशत यशवंतरावांनी पसरवलेली होती. यशवंतराव होळकर हे जर युध्द मोहीमेवर निघाले असता. शत्रुच्या प्रदेशावर तीव्रतेने आक्रमण करत त्यांच्या मार्गामध्ये येणाऱ्यांना उध्दवस्त करुन पुढे निघुनजाई एवढी गतिमानता यशवंतरावांच्या सैन्यदलामध्ये असायची त्यामुळे जनरल लेकने यशवंतराव होळकरांचा इंग्रजांच्या प्रति असणाऱ्या हालचाली योग्य वेळी मर्यादीत केल्या नाही तर यशवंतराव इंग्रजांच्या ध्येय धोरणामध्ये आडकाठी बनु शकतो. त्यासाठी लेकने वेलस्लीला पत्राद्वारे कळवले की वेळीच यशवंतराव होळकरांचा बंदोबस्त करावा.

8 जुन 1804 रोजी गर्व्हनर जनरल याने लॉर्ड लेकला पत्र पाठवले.[133] त्या पत्रात असे म्हणतो की यशवंतराव होळकर द्वारा झालेल्या पराभवामुळे इंग्रजांना मोठ्या प्रमाणात नुकसान सोसावे लागले, इंग्रजांचा अपमान झाला यामुळे कंपनी शासन हे संकटात पडु शकते आणि याचे दुष्परिणाम इंग्रजांना भोगावे लागू शकतात. यासाठी जेवढ्या लवकर होईल तेवढ्या लवकर यशवंतराव होळकराला संपवावे लागेल. यासाठी आपल्याला जास्तीत जास्त कष्ट घ्यावे लागतील हे इंग्रजांना कळुन चुकले होते. भारतातील वेगवेगळ्या संस्थानिकांना आपण आपल्या नियंत्रणात घेतलेले आहे.

मराठेशाहीतील काही मातब्बर मराठा सरदारांना पण आपण आपल्या प्रभावाखाली कराराच्या माध्यामातून जवळ केलेले आहे. परंतु मराठेशाहीतील हा एकमेव मराठा सरदार यशवंतराव होळकर इंग्रजांच्या साम्राज्यवादी, विस्तारवादी ध्येय धोरणाला घातक ठरु शकतो. यशवंतराव होळकरांच्या सतत इंग्रजांच्या विरुध्द युध्दात त्यांचा विजय होत आहे त्यावेळी हे संस्थानिक आपले प्रभुत्व धुडकावतील यशवंतराव होळकराला संपवावे लागेल. तरच आपले स्थान व नियंत्रण प्रभुत्व या देशावर मिळविण्याचे पूर्ण होऊ शकते. त्यासाठी यशवंतरावांच्या विरुध्द इंग्रजांनी लवकरात लवकर एकत्रीत होऊन त्यास संपवावे.

यशवंतराव होळकर यांना चारही बाजुने घेरण्याची इंग्रजांची रणनिती.[134] यशवंतराव होळकरांना इंग्रजांनी कुटनिती व युध्दनितीच्या माध्यमातून रोखण्यासाठी वेगवेगळया विभागातील सैन्य, जमा करण्यास सुरुवात केली. इंग्रज सैन्यदलांनी वेगवेगळया दलांमध्ये विभक्त होऊन चारही दिशांनी यशवंतराव होळकर यांच्या विरुध्द युध्दकरण्यासाठी मोहीमा काढल्या या वेगवेगळया सैन्यदलांचे नेतृत्व हे जनरल लॉडलेक च्या नेतृत्वाखाली एक बटालियन तर जनरल वेलस्लीच्या नेतृत्वाखाली एक बटालियन, कर्नल मॉन्सन, कर्नल मरे, जीन बॅप्टीस्ट, फिलौसे इत्यादी महत्वाच्या सैन्य अधिकाऱ्यांच्या नेतृत्वाखाली यशवंतरावांना चारही बाजुने घेरण्यासाठी तयार झाली होती. विशेष करुन दौलतराव शिंदे यांची एक बटालियन इंग्रजांच्या बाजुने आणि यशवंतराव होळकर यांच्या विरुध्द लढण्यासाठी इंग्रजांच्या सैन्य बटालियन मध्ये सामील झालेली होती. हे पहावयास मिळते. यशवंतरावांच्या विरुध्द इंग्रजांची युध्द योजना ही लॉर्ड लेकच्या नेतृत्वाखाली सैन्यदल हे राजपुतानाच्या दिशेने कुच केलेले पहावयास मिळते तर, दौलतराव शिंदेनी आपले सैन्यदल, बापुराव शिंदेच्या नेतृत्वाखाली माळवा प्रांतावर कब्जा मिळविण्यासाठी रवाना केले, बापुराव शिंदे, आणि जीन बॅप्टिस्ट, फिलौसे यांनी एकत्रीत येऊन भेलसा,साष्टा, सिंहोर इत्यादी ठिकाणांवर कब्जा मिळवला, कर्नल मरेच्या नेतृत्वाखाली गुजरातमधील सैन्य कार्यरत होते तर वेलस्लीच्या नेतृत्वाखाली बॉम्बे बटालियन सह चांदवडच्या दिशेने प्रयाण केले होते परंतु वेलस्ली च्या मार्गामध्ये पावसाचे संकट आणि अधिक तापमान असल्यामुळे वेलस्लीला परत जावे लागले.

यशवंतराव होळकर यांची दुरदृष्टी आणि इंग्रजांची होळकरां विरुध्द युध्द योजना अयशस्वी.[135] यशवंतराव होळकर यांना चारही बाजुने घेरण्याची रणनिती ही वेलस्ली मुंबईला आपल्या सैन्यासह परत गेल्याने अयशस्वी तर ठरलीच यशवंतराव होळकर यांना त्यांच्या गुप्तहेरा

करवी इंग्रजांच्या आपल्या विरुध्द चालणाऱ्या हालचालीची माहिती मिळत होती. त्यामुळे यशवंतराव होळकर हे पण तयारी मध्ये होतेच, त्यांनी स्वत: एकट्याने आपल्या युध्दकौशल्याच्या गुणांवर इंग्रजांना थकवलेले दिसुन येते. यशवंतरावांनी इंग्रजांच्या कुटनितीच्या माध्यमातून चालणाऱ्या युध्द योजनांना अयशस्वी केलेले आहे.

एक यशवंतराव होळकर वगळता इतर मराठा सरदारा पैकी कोणत्याही मराठा सरदारामध्ये उल्लेखनीय अशी क्षमता नव्हती.[136] मराठेशाहीत इतर मराठा सरदारांमध्ये इंग्रजांच्या विरुध्द उठाव करण्याची क्षमता नव्हती इतर सरदारांनी इंग्रजांचे नेतृत्व मान्य केले होते. त्यामुळे त्यांच्यात इंग्रजांच्या विरुध्द जाण्याची हिंम्मत नव्हती. यशवंतराव होळकरांच्या इंग्रजांच्या विरुध्द चालणाऱ्या मोहीमेसाठी इतर मराठा सरदार असो की भारतातील संस्थानिकांमध्ये लष्करी नेतृत्व, धाडस, शौर्य, पराक्रम इंग्रजांच्या विरुध्द गाजविण्याची क्षमता नव्हती. हे सर्व यशवंतरावांच्या कार्यकर्तृत्वावर अवलंबुन होते तर काही संस्थानिक इंग्रजांच्या सहकार्यासाठी इंग्रजांच्या संपर्कामध्ये जाण्यासाठी त्यांचे प्रभुत्व मान्य करण्यासाठी उत्सकु होते. लॉर्ड लेकचे गर्व्हनर जनरल ला पत्र·[137] मला एवढे दु:ख ह्या दुष्टामुळे झाले आहे. की पहिले कधी एवढे झाले नव्हते, आम्ही मोठ्या प्रमाणात आर्थिक खर्च सोसुन रणांगणावर उभे राहण्यासाठी मजबुर झालो आहोत. जर आम्ही पाठीमागे येतोत तर यशवंतराव होळकर जयपूरवर हल्ला करेल. आणि त्या ठिकाणाहुन एक करोड रुपये वसुल करु शकतो. अशा पध्दतीने तो आपल्या सैन्यदलास पूर्वीपेक्षा अधिक सक्षम व शक्तिशाली बनवेल, जर मी पुढे जातो तर एखादा मार्ग मोकळा राहिला तर तो त्या ठिकाणाहुन निघुन जाईल आणि आमच्या ताब्यात असणाऱ्या प्रदेशामध्ये घुसुन त्या प्रदेशाला नुकसान पोहचु शकतो किंवा तो प्रदेश जाळुन टाकीण. अशा पध्दतीचे पत्र लॉर्ड लेक याने गर्व्हनर जनरल यास पाठवले होते. या पत्रातुन असे लक्षात येईल की इंग्रजांना यशवंतरावांच्या युध्दनितीद्वारे मोठ्या प्रमाणात आर्थिक नुकसान सहनकरुन मोठ्या प्रमाणात सैन्यदले रणांगणावर उभे करावे लागत आहे. एवढे भय यशवंतरावांचे इंग्रजांना होते. जर रणांगणातुन माघार घेतली तर त्याचा आपल्या आखत्यारीत प्रदेशावर हल्ला करुन त्या प्रदेशातुन धनसंपत्ती वसुलकरुन आपली सैन्य शक्ती वाढवेल अशी भीती इंग्रजांना होती त्यामुळे इंग्रजांना यशवंतरावांच्या युध्द योजना अयशस्वी करण्यासाठी मोठ्या प्रमाणात सैन्यदलावर खर्च करावा लागत होता. व यशवंतराव आपल्या विरुध्द युध्दनितीच्या माध्यमातून हल्ले करुन आपले प्रदेश व सैन्य सामग्री, शस्त्रास्त्रे, सैन्याला नुकसान पोहचवु शकतो ही भिती इंग्रजांना होती त्यामुळे इंग्रज सैन्य अधिकारी लॉर्ड लेक

इच्छा नसताना ही यशवंतरावांना रोखण्यासाठी रणांगणावर मोठ्या प्रमाणावर आर्थिक नुकसान सहन करुन उभा राहिलेला होता.

यशवंतराव होळकर यांचे वेलस्लीला पत्र.[138] समरांगणावर जरी तुमच्या तोफखान्या पुढे माझा इलाज चालत नसला तरी शेकडो मैलांच्या दौडीमारुन अल्पावकाशात दुरदरुचे प्रदेश जाळुन, लुटून टाकण्याचे सामर्थ्य मला आहे. तुम्हास एका क्षणाची विश्रांती मी घेवू देणार नाही. यशवंतरावांची ही इंग्रजांना चेतावणी होती. जर होळकरांच्या प्रदेशाना परत दिले नाही तर यशवंतरावांचा झंझावात पहावयास मिळतो. यशवंतराव होळकरांनी इंग्रजांच्या विरुध्द सातत्याने मिळवलेल्या विजयाची चर्चा मराठेशाही पर्यंत पोहचत होती.[139] यशवंतराव होळकरांनी इंग्रजांच्या विरुध्द सातत्याने विजय मिळवल्यामुळे मराठेशाही व भारतातील इतर संस्थानिकांमध्ये चर्चा होत होती. त्याच बरोबर या सर्वांना आशा वाटत होती की, यशवंतरावांचे इंग्रजांच्या विरुध्दच्या कार्यामुळे संस्थानिकांना इंग्रजापासुन मुक्त करणारा एकमेव हा यशवंतराव आहे. तोच इतर संस्थानिकांना इंग्रजांच्या प्रभावापासून रोखू शकतो. अशा पध्दतीची आशा निर्माण झालेली पहावयास मिळते, श्री केळकर लिहीतात की, मराठ्यांना यशवंतराव होळकरांवर विश्वास होता की यशवंतराव होळकर हे कधी ही हार मानणारे नाही शेवटी ज्यावेळी यशवंतराव होळकर आणि इंग्रजांमध्ये युध्दाला सुरुवात झाली त्यावेळी यशवंतराव होळकर यांच्या विजयाच्या बातम्या पुण्यातील बाजार पेठे मध्ये चर्चेस येऊ लागल्या. तशाच प्रकारची बातमी पसरली होती की यशवंतराव होळकरांनी 300 इंग्रज सैन्याला बंदी बनवले असून त्यांचे नाक कापूस सोडून देण्यात आले आहे, ज्यामध्ये 200 इंग्रज सैनिक पुण्यामध्ये आले आहेत. या सैनिकांना आपल्या मायदेशी परत जाण्यासाठी मुंबईला पाठविण्यात आले आहे. परंतु या ठिकाणच्या इंग्रजांनी भीतीने जर हे सैन्य इंग्लंडला गेले तर आपली बदनामी होईल या उद्देशाने या इंग्रज सैनिकांना सागरामध्ये जलसमाधी देण्यात आली. अशा प्रकारची चर्चा मराठेशाही मध्ये व नागरिकांमध्ये चर्चेल्या जात होत्या. पटवर्धन यांचा वकील पेशव्यांच्या दरबारामध्ये राहत होता. तो यशवंतराव होळकर यांच्या विजयाची आणि इंग्रजांच्या पराभवाची माहिती सातत्याने पटवर्धन यांना पत्राद्वारे लिहुन पाठवीत एका पत्रामध्ये तो लिहीतो की डाक व्यवस्थेद्वारे अशी बातमी आली आहे की यशवंतराव होळकर यांची शक्ती वाढली आहे. इंग्रज पेचात पडले आहेत. आणि शिंदयाचे ही पत्र मिळाले त्यात त्यांनी लिहीले आहे की यशवंतरावांची फार मोठी शक्ती वाढली आहे यशवंतरावांनी लॉर्ड लेकच्या सैन्य बटालियन कापुन काढिल्या आहेत. दहा, बारा सैन्याच्या बटालियन घेऊन यमुना

नदी ओलांडून लखनऊच्या दिशेने लॉर्ड लेक जात असता त्यास यशवंतराव होळकरांनी चारही बाजूने घेरले आहे. अशा पध्दतीचे वर्णन पत्रामध्ये करण्यात आलेले आहे.

यशवंतराव होळकर यांची दुरदृष्टी आपल्या राजदरबारामध्ये एकाही इंग्रज अधिकाऱ्याला ठेवले नव्हते.[140] यशवंतराव होळकर यांना माहीत होते की, आपल्या इंग्रजांच्या विरुध्द चालणाऱ्या हालचाली, युध्द योजना, डावपेच, मोहीमा इत्यादी विषयी माहिती इंग्रजांना मिळु नये व आपल्या राज्यातंर्गत इंग्रजांना गुप्त कारवाया करण्यासाठी संधी उपलब्ध होऊ नये यासाठी त्यांनी इंग्रज अधिकारी आपल्या राज्यांतर्गत व राज दरबारामध्ये ठेवण्यास मनाई केली होती. त्याच बरोबर त्यांना माहित होते की, दौलतराव शिंदेचा पराभव हा राज्यातंर्गत दरबारामध्ये इंग्रज अधिकारी व सैन्यदलात इंग्रज हे अधिकारी इंग्रजांना सातत्याने माहिती पुरवीत होते या माहितीच्या आधारेच इंग्रजांनी शिंद्याच्या सैन्याचा पराभव केला होता. हा अनुभव यशवंतरावांना आल्याने त्यांनी आपल्याकडे इंग्रज अधिकारी ठेवण्यास सातत्याने टाळाटाळ करत होते. या ठिकाणी यशवंतराव होळकर यांच्या युध्द कौशल्य, रणनितीचा बुध्दीमत्तापूर्ण कार्य पहावयास मिळते.

25 एप्रिल 1805 रोजी लॉर्ड लेकचे गर्व्हनर जनरल यास पत्र.[141] लॉर्ड लेक म्हणतो की, मी यशवंतराव होळकरांचा पाठलाग करु शकत नाही. कारण या राक्षसाला सर्वात जास्त आनंद हा युरोपियन सैनिकांना ठार मारण्यात येतो. यशवंतराव होळकर यांची दहशत मोठ्या प्रमाणात इंग्रजांमध्ये पसरलेली होती. यशवंतरावांची युध्द योजना ही शत्रुच्या सैन्यावर प्रखरतेने आक्रमण करुन शत्रु सैन्याला कापून काढीत त्यामुळे शत्रुसैन्य युध्दाच्या मैदानामधून स्वत: चा जीव वाचविण्यासाठी सैरावैरा पळत सुटत त्यामुळे इंग्रजांना यशवंतरावां बद्दल भय वाटत असे. त्यात इंग्रज सैन्य अधिकारी व इंग्रज सैन्यावर प्रथम हल्ला करुन ठार करत त्यामुळे यशवंतरावांच्या विरुध्द इंग्रज सैन्य युध्द करण्यास घाबरत अशा पध्दतीने यशवंतराव होळकरां बद्दल लॉर्ड लेकने गर्व्हनर जनरल वेलस्ली यास पत्र व्यवहार केलेला पहावयास मिळतो. इंग्रज अधिकारी लॉर्ड लेक लिहीतो की.[142] मी एवढा पहिले कधी भयभीत झालो नाही जेवढा या यशवंतराव होळकरांमुळे होत आहे. ज्यामुळे आम्हाला मोठ्या प्रमाणात आर्थिक खर्च करुन सैनिकांच्या बटालियन ठेवाव्या लागत आहेत. यावरून यशवंतराव होळकरांची इंग्रजांच्या विरुध्द चालणाऱ्या युध्दमोहिमा ह्या लक्षात येतात. सर्व इंग्रजांना भारतातुन हाकलुन लावण्यासाठी यशवंतरावांनी चालवलेल्या युद्ध मोहिमेचा इंग्रजांना किती मोठ्या प्रमाणात आर्थिक खर्च करावा लागत होता त्यामुळे यशवंतरावांना वेगवेगळ्या द्वेषपूर्ण नावाने त्यांचा

उल्लेख इंग्रज करत होते. भारतात एकमेव हा लढवय्या मराठेशाहीतील मराठा सरदार यशवंतराव धडपडताना दिसेल यशवंतराव आपल्या मराठेशाही आणि देशाप्रति असणारी निष्ठा, देशप्रेम व आपल्या भूमी वरुन परकीय शक्तींना बाहेर काढण्यासाठी चाललेला त्यांचा अविरत संघर्ष पहावयास मिळतो. यशवंतरावांची लष्करी ध्येय धोरणे सैन्य संख्या, शस्त्रास्त्रे, तोफखाना, रॉकेटदल, बंदकुधारी दल इत्यादी मुळे इंग्रजांचा यशवंतराव सातत्याने पराभव करत होते. त्यासाठी इंग्रजांना स्वत:च्या संरक्षणासाठी मोठ्या प्रमाणात आर्थिक नुकसान सहन करुन यशवंतराव होळकरांची शक्ति कमी करण्यासाठी त्यांच्या सरदारांना फोडण्याचा प्रयत्न चालवला तेव्हा इंग्रज यशवंतरावांच्या सरदारांच्या हालचालीवर लक्ष ठेवून दिसतात. पत्र व्यवहार असो, लष्करी व्यवस्थेतील अंतर्गत संघर्ष असेल इत्यादी गोष्टीवर इंग्रजांची नजर होती. कशाही पध्दतीने यशवंतराव होळकरास रोखण्यासाठी इंग्रजांनी कुटनितीच्या माध्यमातून प्रयत्न केलेले पहायला मिळतात.

यशवंतराव होळकर यांच्या सततच्या विजयाने इंग्रज अधिकारी भयभीत झाले.[143] यशवंतराव होळकर यांच्या नेतृत्वाखाली इंग्रजांचा सातत्याने पराभव होत होता त्यामुळे इंग्रज अधिकारी भयभीत झालेच होते परंतु त्यांना असे वाटत होते की, जर यशवंतराव होळकरास लवकरात लवकर जर संपवले नाही तर भारतातील लहान मोठे राजे, राजवाडे हे सुध्दा इंग्रजांच्या विरुध्द लढण्यासाठी पुढे येतील मग एका यशवंतराव होळकराच्या विरुध्द न लढता अशा असंख्य यशवंतराव होळकराशी लढावे लागेल. ज्यावेळी अशी परिस्थिती निर्माण जर झाली तर इंग्रजांचे स्वप्न हे भारतावर आपले साम्राज्य स्थापीत करण्याचे अपुर्ण राहु शकेल त्यासाठी जेढ्या लवकर यशवंतराव होळकरास संपविण्यासाठी प्रयत्न करता येतील तेवढ्या लवकर करावेत अशी इंग्रजांच्या मनामध्ये होते. त्यासाठी अजुन यशवंतराव होळकर आपल्यावर युध्द लादू शकतो. आर्थिक, सैनिकी, नुकसान करु शकतो त्याच बरोबर आपली बदनामी संपूर्ण लहान मोठ्या संस्थानिकांमध्ये अजुन होण्यापेक्षा त्यास लवकरात लवकर संपवावे यासाठी इंग्रज भयभीत झालेले पहावयास मिळतात.

गर्व्हनर जनरल वेलस्लीचे लॉर्ड लेकला पत्र.[144] मला एवढा पश्चाताप होत आहे की, यशवंतराव होळकर तुमच्या तावडीतून कसा काय निसटला त्याला नष्ट करणे फार महत्वाचे आहे त्याशिवाय आपल्याला चैन पडु शकत नाही. या पत्राच्या वर्णना वरुन असे लक्षात येईल की इंग्रजांना यशवंतराव होळकर यांनी किती हतबल केले होते. सततच्या पराभवामुळे इंग्रजांची बदनामी होत होती. यशवंतरावाला संपवल्याशिवाय भारतावर आपण आपले राज्य स्थापीत करु शकत नाहीत

भारतातील इतर संस्थानिक आपल्या प्रभुत्वाखाली आणले परंतु हा मराठेशाहीतील एकमेव मराठा सरदाराचा आपण पराभव करु शकत नाहीत वेगवेगळ्या प्रकारे यशवंतराव होळकरांची शक्ति कमी करण्याचा प्रयत्न केला परंतु त्यांची लष्करी शक्ती ही कमी होण्या ऐवजी वाढत आहे आणि आपला पराभव होत आहे आर्थिक नुकसान मोठ्या प्रमाणात होत आहे. कुटनितीच्या माध्यमातून यशवंतरावांना संपवण्याचा प्रयत्न केला तेथे ही तो संपत नाही. त्यामुळे इंग्रजांना यशवंतराव होळकर संपवल्या शिवाय चैन पडणार नाही. अशी भावना वेलस्लीने आपल्या पत्रातुन व्यक्त करताना दिसेल. गर्व्हनर जनरल वेलस्ली हतबल झाला.[145] ज्यावेळी इंग्रजांना यशवंतराव होळकर यांच्या विरुध्द युध्दात विजय मिळत नव्हता. त्यावेळी गर्व्हनर जनरल वेलस्लीने लॉर्ड लेक, मद्रास, बॉम्बेच्या गर्व्हनरांना पत्र पाठविले की यशवंतराव होळकरा बरोबर चाललेले युध्द बंद करण्यात यावे जेणे करुन अजुन इंग्रजांची आर्थिक व सैनिकी नुकसान होणार नाही अशा पध्दतीचे पत्र व्यवहार भारतातील वेगवेगळ्या गर्व्हनरांना करण्यात आलेले पहावयास मिळते.

यशवंतराव होळकर यांच्या घौडदौडी बद्दल गर्व्हनर जनरल वेलस्ली विवश झाला.[146] भारतात इंग्रजांच्या हीतांच्या संरक्षणा करिता गर्व्हेनर जनरल या पदावर वेलस्लीची नियुक्ती करण्यात आलेली होती. वेलस्लीला ही चिंता वाटत होती की, यशवंतराव होळकर यास कशा पध्दतीने आपल्या नियंत्रणाखाली आणावे यासाठी चिंतेत होता. इंग्रजांनी यशवंतरावांच्या विरुध्द सतत युध्द केले त्या युध्दात इंग्रजांचा यशवंतराव होळकर यांनी पराभव केला आहे. त्यामुळे वेलस्ली दु:खी होता. त्यामुळे आता इंग्रज अजुन यशवंतराव होळकरांच्या विरुध्द युध्दकरण्यासाठी तयार नव्हते. त्यावेळी वेलस्लीने लॉर्ड लेकला पत्र पाठवून सांगितले की, यशवंतराव होळकरां बरोबर कोणत्याही प्रकारचे युध्द नकरता सर्व प्रकारच्या प्रश्नां बाबतीत आपण निर्णय घ्यावा." अशा पध्दतीचे पत्र वेलस्लीने लॉर्ड लेक यास पाठवले होते. या पत्रातुन स्पष्टपणे जाणवते की इंग्रज यशवंतराव होळकरां बाबतीत सर्व प्रकारचे पर्याय वापरुन झाले होते तरी तो आपल्याला शरण येत नाही. शेवटी इंग्रजांना यशवंतरावाच्या विरुध्दचे युध्द बंद करावे लागले. या ठिकाणी संपूर्ण भारतातील इंग्रज हे यशवंतरावांच्या बाबतीत हतबल व विवश झालेले पहावयास मिळतात.

कलकत्ता येथील इंग्रज समितीने लॉर्डलेक यास पत्राद्वारे कळवले.[147] कोणत्याही प्रकारे यशवंतराव होळकरांशी करार करण्यात यावा. तुम्ही जेवढा उशीर कराल तेवढे कंपनी शासनाला घातक ठरु शकते, कारण यशवंतराव होळकरांद्वारे संपूर्ण भारतातील लहान, मोठ्या संस्थानिकांना

इंग्रजांच्या विरुध्द केलेले आव्हान, जागृतीची आग जर संपूर्ण भारतात पसरली तर या आगीला विझवण्यास इंग्रज सरकारच्या हाताबाहेर जाऊ शकेल. एकीकडे भारतातील लहान मोठ्या राजे, राजवाडे, संस्थानिकांना आपल्या बरोबर करार करण्यासाठी त्यांच्यावर दबाब इंग्रज आणित होते. या कराराच्या माध्यमातून इंग्रज या संस्थानिकांवर आपले प्रभुत्व स्थापीत करत त्यांना अगदी काही मर्यादीत स्वरुपाचे हक्क राजांना इंग्रज देत बाकी संपूर्ण संस्थानिकांवर इंग्रजांचे राज्य चाले. हे सर्व संस्थानिकांनी इंग्रजांचे नेतृत्व स्वीकारल्यामुळे या संस्थानिकांना गुलामासारखे इंग्रजांशी संबंध ठेवावे लागले. परंतु इंग्रजांच्या या ध्येय धोरणाचा अभ्यास त्यांची निती काय आहे हे यशवंतराव होळकर यांनी ओळखुन जे संस्थानिक इंग्रजांच्या विरुध्द लढण्यासाठी तयार होऊ शकतात. अशांना उद्देशुन यशवंतरावांनी इंग्रजांच्या विरुध्द उठाव करण्यास सांगितले स्वत: यशवंतरावांनी आपली लष्कराची शक्ती वाढवली, इंग्रजांसारखा अत्याधुनिक तोफखाना निर्मितीचा कारखाना निर्माण केला. वेगवेगळ्या अत्याधुनिक शस्त्रांचे उत्पादन घेऊ लागले, इंग्रजांच्या विरुध्द यशवंतरावांनी सातत्याने विजय मिळवला. इंग्रजांचे आर्थीक नुकसान केले मोठ्या प्रमाणात इंग्रज अधिकारी सैन्य युध्दात ठार झाले, इंग्रजांचा या युध्दातील पराभवामुळे संपूर्ण राजे राजवाड्यांमध्ये बदनामी झाली. इत्यादी सर्व प्रकारच्या यशवंतरावांच्या युध्द कौशल्यपूर्ण गुण, युध्द योजना, रणनिती, डावपेच, इत्यादी विषयी इंग्रज यशवंतरावाला रोखण्यात अपयशी ठरल्याने त्याचबरोबर यशवंतरावांच्या लष्कराची शक्ति कमी करण्यासाठी कुटनितीद्वारे त्यांच्या सरदारांना फोडण्याचा प्रयत्न, इत्यादी विषयीचे प्रयोग इंग्रजांनी वापरुन झाले तरी यशवंतराव होळकर इंग्रजांना शरण येत नाहीत भारतातील लहान मोठ्या संस्थानिकांना इंग्रजांनी शरण आणले परंतु शेवटी इंग्रजांना यशवंतराव होळकरां पुढे शरणागती पत्करावी लागली. इंग्रजांनी स्वत:हुन यशवंतरावाशी कोणत्याही परिस्थिती (करार) करण्यात यावा यासाठी इंग्रज अधिकाऱ्या मार्फत प्रयत्न कलकत्याच्या इंग्रज समितीने चालवले होते. यशवंतरावांचे शौर्य, धाडस, पराक्रम, निष्ठा, देशप्रेम आणि अखंड भारताची संकल्पना या ठिकाणी प्रथम यशवंतराव होळकर यांनी रुझवलेली पहावयास मिळते.

युध्दात जय मिळणे ही गोष्ट केवळ फौजेच्या तयारीवर अवलंबुन नसते.[148] युध्दात विजय मिळविण्यासाठी सैन्याचे नेतृत्व करणारा सेनानायक हा अनुभवी चतुर असला पाहिजे, त्या बरोबरच कपटविद्येचा सारखा मारा करण्याची पात्रता व परिस्थिती नुसार फायदा योग्य वेळी घेणारा असावा लागतो. त्या सेनानायकाच्या अंगी चतुराई असावी लागते. या सर्व गोष्टींचा विचार करता.

मराठेशाहीतील दुसरा बाजीराव पेशवा, दौलतराव शिंदे, रघुजी भोसले या तिघां ऐवजी यशवंतराव होळकर हे श्रेष्ठ गणले जातील. यशवंतराव होळकरांस मोठी अडचण नडली ती पैशाची इतर संस्थानिकांनी व मराठेशाहीतील मराठा सरदारांनी बाहेर राहुन जरी पैशाचा पुरवठा केला असता तरी यशवंतराव होळकरांनी एकट्याच्या जीवावर इंग्रजांना वठणीवर आणले असते, यशवंतरावांनी इंग्रजांच्या विरुध्द केलेली मुत्सद्देगिरीत भारतातील राजे, राजवाडे मराठेशाहीतील सरदार नगण्य ठरतात.

## संदर्भ सूची

1) रामकृष्ण गोपाळ भिडे, वाईकर; इंग्रजांनी हिंदुस्थान कसा घेतला, चिरंजीव ग्रंथ प्रकाशन, सदाशिव पेठ, टिळक रस्ता पुणे-2,1963, पृ-41

2) कित्ता, पृ-44.

3) कित्ता, पृ-52.

4) Major Evans Bell (Ed); Last counsel of unknown counsellor, publication Macmillan and co-landan, 1877 PN-165.

5) डॉ. विरेंद्र गोपालसिंह बैस; ब्रिटीश कंपनी राजवटीतील भारत (1757-1856) प्रकाशन सर साहित्य केंद्र, गणराज अपार्टमेंट राजापेठ, बस स्टॉप, हुडकेश्वर रोड, नागपुर-34, 2015 पृ-17.

6) कित्ता, पृ-18.

7) कित्ता, पृ-19.

8) कित्ता, पृ-49.

9) कित्ता, पृ-58.

10) कित्ता, पृ-59.

11) Dr. S.G.Vaidya; Peshwa Bajirao II and the Down Fall at the Maratha power, Pragati Prakashan. 87-A Dhantoli Nagpur- 12, 1976, PN-95, 182.

12) एस.एस. त्यागी; आधुनिक भारत (1707-1857), राधा प्रकाशन अंसारी रोड, दरियागंज, नई दिल्ली-02, पृ-154.

13) कित्ता, पृ-154.

14) कित्ता, पृ-155.

15) डॉ. स्टुअर्ट गार्डन; द मराठाज (1600-1818) डायमंड प्रकाशन, 26413 शनिवार पेठ 302 अनुग्रह अपार्टमेंट ओंकारेश्वर मंदीराजवळ पुणे, पृ-197.

16) डॉ. उमेश कदम; फ्रेंच मराठा संबंध (1668-1818); प्रकाशन पुष्पनंद 12, विठ्ठल स्मृती कोकण एक्सप्रेस हॉटेल जवळ कर्वेरोड, कोथरुड पुणे. 38, 2011, पृ-228.

17) डॉ. स्टुअर्ट गार्डन; द मराठाज (1600-1818) डायमंड प्रकाशन, 26413 शनिवार पेठ 302 अनुग्रह अपार्टमेंट ओंकारेश्वर मंदीराजवळ पुणे, पृ-197.

18) डॉ. उमेश कदम; फ्रेंच मराठा संबंध (1668-1818); प्रकाशन पुष्पनंद 12, विठ्ठल स्मृती कोकण एक्सप्रेस हॉटेल जवळ कर्वेरोड, कोथरुड पुणे. 38, 2011,पृ-36.

19) कित्ता, पृ-37.

20) कित्ता, पृ-197.

21) डॉ. स्टुअर्ट गार्डन; द मराठाज (1600-1818) डायमंड प्रकाशन, 26413 शनिवार पेठ 302 अनुग्रह अपार्टमेंट ओंकारेश्वर मंदीराजवळ पुणे, पृ-191.

22) कित्ता, पृ-192.

23) डॉ. उमेश कदम; फ्रेंच मराठा संबंध (1668-1818); प्रकाशन पुष्पनंद 12, विठ्ठल स्मृती कोकण एक्सप्रेस हॉटेल जवळ कर्वेरोड, कोथरुड पुणे. 38, 2011, पृ-199.

24) डॉ. स्टुअर्ट गार्डन; द मराठाज (1600-1818) डायमंड प्रकाशन, 26413 शनिवार पेठ 302 अनुग्रह अपार्टमेंट ओंकारेश्वर मंदीराजवळ पुणे,पृ-200.

25) डॉ. उमेश कदम; फ्रेंच मराठा संबंध (1668-1818); प्रकाशन पुष्पनंद 12, विठ्ठल स्मृती कोकण एक्सप्रेस हॉटेल जवळ कर्वेरोड, कोथरुड पुणे. 38, 2011, पृ-196.

26) डॉ. स्टुअर्ट गार्डन; द मराठाज (1600-1818) डायमंड प्रकाशन, 26413 शनिवार पेठ 302 अनुग्रह अपार्टमेंट ओंकारेश्वर मंदीराजवळ पुणे,पृ-190.

27) कित्ता, पृ-199.

28) प्रा. महल्ले, प्रा. पाठक; मराठा सत्तेचा इतिहास, विद्या प्रकाशन, रुईकर रोड, नागपुर-02,1997, पृ-166.

29) शरद कोलारकर; मराठ्यांचा इतिहास, श्री मंगेश प्रकाशन 23, फार्म लँड, नवी रामदास पेठ नागपूर-10, 1987 पृ-596.

30) ज.द.जोगळेकर; भारतातील युध्दशास्त्राची उपेक्षा, मनोरमा प्रकाशन 1021/ सी माधववाडी, खोलीक्र-11, नायगाव क्रॉस रोड दादर, मुंबई 14, 1996 पृ-38.

31) कित्ता, पृ-212.

32) गो.स. सरदेसाई; ब्रिटिश रियासत खंड-2, पॉप्युलर प्रकाशन प्रा.लि. 35-सी पंडित मदनमोहन मालवीय मार्ग, ताडदेव मुंबई,-34-1993, पृ-177.

33) गो.स. सर देसाई; मराठी रियासत खंड-8 पॉप्ल्युलर प्रकाशन प्रा.लि. 301 महालक्ष्मी चेंबर्स 22 भूलाई देसाई रोड, मुंबई -26 2010, पृ-471.

34) कित्ता, पृ-618,

35) डॉ. बी.एल. ग्रोवर; आधुनिक भारताचा इतिहास, प्रकाशन एस चाँद अॅण्ड कंपनी लि. 7361 रामनगर, नई दिल्ली-55, पृ-155.

36) Sir Alfred Iyal; British Dominion In india, Oriental Books Reprient coporation book Publishers, 54 Rani Jhansi road, New delhi-55, 1973 पृ-250.

37) गो.स. सरदेसाई; मराठी रियासत खंड-8, पॉप्युलर प्रकाशन प्रा.लि. 301 महालक्ष्मी चेंबर्स,22 भुलाभाई देसाई रोड, मुंबई-26, 2010, पृ-471.

38) कित्ता, पृ-471.

39) डॉ. स्टुअर्ट गार्डन; द मराठाज (1600-1818) डायमंड प्रकाशन, 26413 शनिवार पेठ 302 अनुग्रह अपार्टमेंट ओंकारेश्वर मंदीराजवळ पुणे, पृ-219.

40) एस.एस. त्यागी; आधुनिक भारत (1707-1857) राधा प्रकाशन अंसारी रोड, दरियागंज नई दिल्ली-110002, पृ-162.

41) कित्ता , पृ-160.

42) मधुसुदनराव होलकर; होलकरों का इतिहास, प्रकाशक आखिल भारतीय होलकर महासंघ wB-19-गली नं-1 शकरपूर, दिल्ली 110092, 1992, पृ-399.

43) डॉ. स्टुअर्ट गार्डन; द मराठाज (1600-1818) डायमंड प्रकाशन, 26413 शनिवार पेठ 302 अनुग्रह अपार्टमेंट ओंकारेश्वर मंदीराजवळ पुणे, पृ 177.

44) एस.एस. त्यागी; आधुनिक भारत (1707-1857) राधा प्रकाशन अंसारी रोड, दरियागंज नई दिल्ली-110002, पृ-159.

45) ज.द.जोगळेकर; भारतातील युध्दशास्त्राची उपेक्षा, मनोरमा प्रकाशन 102/सी माधववाडी, खोली क्र-11 नायगाव क्रॉस रोड, दादर, मुंबई-14 1996-पृ-161.

46) गो.स. सरदेसाई; ब्रिटिश रियासत खंड-2, पॉप्युलर प्रकाशन प्रा.लि. 35-सी पंडित मदनमोहन मालवीय मार्ग, ताडदेव मुंबई,-34-1993,पृ-238.

47) कित्ता, पृ-355.

48) कित्ता, पृ-345.

49) कित्ता, पृ-382.

50) कित्ता, पृ-353.

51) डॉ. दीपा दिनेश सावळे/मोरे; मराठ्यांचा इतिहास, एज्युकेशनल प्रकाशन, गोकुळवाडी, औरंगपुरा, औरंगाबाद -2013, पृ-466.

52) कित्ता, पृ-467.

53) गो.स. सरदेसाई; मराठी रियासत खंड-8. रामदास भटकळ, पॉप्युलर प्रकाशन, प्रा.लि. 301, महालक्ष्मी चेंबर्स,22 भुलाभाई देसाई रोड, मुंबई, 26 2010, पृ-347.

54) डॉ. दीपा दिनेश सावळे/मोरे; मराठ्यांचा इतिहास, एज्युकेशनल प्रकाशन, गोकुळवाडी, औरंगपुरा, औरंगाबाद -2013, पृ-467.

55) यशवंत नरसिंह कोळकर; होळकरांची कैफियत, हनुमान छापखाना, 300 सदाशिवपेठ, पुणे-2, 1954, पृ-167.

56) डॉ. गणेश मतकर; वीरश्रेष्ठ प्रथम यशवंतराव होळकर, अहिल्या प्रकाशन 3104 सुदामानगर, ई-सेक्टर, इंदौर-09, 1999, पृ-48.

57) John Malcolms; political History of india-vol-I.PN-348

58) संजय सोनवणी; महाराजा यशवंतराव होळकर, पुष्प प्रकाशन, भारत बुक हाऊस 1788, सदाशिवपेठ, देशमुखवाडी, पुणे-30, 2011, पृ-72.

59) नवभारत टाईम्स प्लस; सोमवार 17 फखरी 1997.

60) न.र.फाटक; श्रीमन्ममहाराज यशवंतराव होळकर, वि.पु. भागवत, मौजे प्रिंटिंग ब्युरो खटाववाडी, मुंबई-4, 1967, पृ-177.

61) गो.स. सरदेसाई; मराठी रियासत खंड-8, रामदास भटकळ, पॉप्युलर प्रकाशन, प्रा.लि. 301, महालक्ष्मी चेंबर्स,22 भुलाभाई देसाई रोड, मुंबई, 26 2010, पृ-325.

62) कित्ता, पृ-318.

63) संजय सोनवणी; महाराजा यशवंतराव होळकर, पुष्प प्रकाशन, भारत बुक हाऊस 1788, सदाशिवपेठ, देशमुखवाडी, पुणे-30, 2011, पृ-105.

64) कित्ता, पृ-105.

65) गो.स. सरदेसाई; मराठों का नवीन इतिहास भाग-3 (1772-1848) वैभव प्रेस, सर्वन्टस ऑफ इंडिया सोसायटी होम सुंन्धराम रोड, गिरगांव, मुंबई-4, पृ-455.

66) संजय सोनवणी; महाराजा यशवंतराव होळकर, पुष्प प्रकाशन भारत- बुक हाऊस 1788, सदाशिव पेठ, देशमुखवाडी पुणे-2011, पृ-77.

67) गो.स. सरदेसाई; मराठी रियासत खंड-8, रामदास भटकळ, पॉप्युलर प्रकाशन, प्रा.लि. 301, महालक्ष्मी चेंबर्स,22 भुलाभाई देसाई रोड, मुंबई, 26 2010, पृ-321.

68) शरद कोलारकर; मराठ्यांचा इतिहास, (1600-1818) मंगेश प्रकाशन, श्री शांतादुर्गा निवास 23, नवी रामदास पेठ नागपूर-10 1988, पृ-664.

69) कित्ता, पृ-588.

70) डॉ.गणेश मतकर; सांस्कृतिक इतिहास आणि होळकर राज्य, प्रकाशन नविन फोटो कॉपी शिवविलास पॅलेस राजवाडा परिसर इंदौर 1999, पृ-78.

71) बंडे शारदा गोविंदराव; मराठेकालीन होळकर संस्थान, कल्पना प्रकाशन-6 एच.आय.जी. कॉलनी, आयटीआय जवळ, नांदेड-02,2009 पृ-269.

72) मधुसुदनराव होलकर; होलकरोंका इतिहास, न्युज्ञान प्रेस 495, डी.डी.ए. कॉम्पलेक्स, शहजादा बाग, इन्द्रलोक दिल्ली-35 1992, पृ-452.

73) कित्ता, पृ-453.

74) कित्ता, पृ-455.

75) बंडे शारदा गोविंदराव; मराठेकालीन होळकर संस्थान, कल्पना प्रकाशन-6 एच.आय.जी. कॉलनी, आयटीआय जवळ, नांदेड-02,2009, पृ-279.

76) न.र.फाटक; श्रीमन्ममहाराज यशवंतराव होळकर, वि.पु. भागवत, मौजे प्रिंटिंग ब्युरो खटाववाडी, मुंबई-4, 1967, पृ-109.

77) मधुसुदनराव होलकर; होलकरोंका इतिहास, न्युज्ञान प्रेस 495, डी.डी.ए. कॉम्पलेक्स, शहजादा बाग, इन्द्रलोक दिल्ली-35 1992, पृ.455.

78) श्रीकांत बरिंगे; क्रांतीची मशाल पेटवा, प्रकाशन ब्लु कॅनन, नागपुर-2015, पृ-101.

79) कर्नल जेम्स टॉड; राजस्थान का इतिहास भाग-1, प्रकाशन साहित्यगार, धामाणी मार्केटकी गली, चौडा रास्ता जयपूर-2008, पृ-306.

80) कित्ता, पृ-307.

81) शिवराम महादेव परांजपे; मराठ्यांच्या लढ्यांचा इतिहास 1802 ते 1818, रा.रा. शंकर नरहर जोशी चित्रशाळा प्रेस 1026 सदाशिव पेठ पुणे 1934, पृ-279.

82) वा.वा. ठाकुर; होळकरशाहीचा इतिहास भाग-2, प्रकाशन होळकर गर्व्हरमेंट प्रेस इंदुर-1, पृ-185.

83) मधुसुदनराव होलकर; होलकरोंका इतिहास, न्युज्ञान प्रेस 495, डी.डी.ए. कॉम्पलेक्स, शहजादा बाग, इंन्द्रलोक दिल्ली-35 1992, पृ-435.

84) कित्ता, पृ-442.

85) संजय सोनवणी; महाराजा यशवंतराव होळकर, पुष्प प्रकाशन भारत- बुक हाऊस 1788, सदाशिव पेठ, देशमुखवाडी पुणे-2011, पृ-85.

86) डॉ.गणेश मतकर; सांस्कृतिक इतिहास आणि होळकर राज्य, प्रकाशन नविन फोटो कॉपी शिवविलास पॅलेस राजवाडा परिसर इंदौर 1999, पृ-28.

87) संजय सोनवणी; महाराजा यशवंतराव होळकर, पुष्प प्रकाशन भारत- बुक हाऊस 1788, सदाशिव पेठ, देशमुखवाडी पुणे-2011, पृ-104,105.

88) गो.स. सरदेसाई; ब्रिटीश रियासत खंड-2, पॉप्ल्युलर प्रकाशन प्रा.लि. 35 सी. पंडित मदनमोहन मालवीय मार्ग, ताडदेव मुंबई 34,1993, पृ-187.

89) कित्ता, पृ-377.

90) संजय सोनवणी; महाराजा यशवंतराव होळकर, पुष्प प्रकाशन भारत- बुक हाऊस 1788, सदाशिव पेठ, देशमुखवाडी पुणे-2011, पृ-88.

91) कित्ता, पृ-106.

92) शरद कोलारकर; मराठ्यांचा इतिहास, (1600-1818) मंगेश प्रकाशन, श्री शांतादुर्गा निवास 23, नवी रामदास पेठ नागपूर-10 1988, पृ-595.

93) बंडे शारदा गोविंदराव; मराठेकालीन होळकर संस्थान, कल्पना प्रकाशन-6 एच.आय.जी. कॉलनी, आयटीआय जवळ, नांदेड-02,2009, पृ-272.

94) न.र.फाटक; श्रीमन्ममहाराज यशवंतराव होळकर, वि.पु. भागवत, मौजे प्रिंटिंग ब्युरो खटाववाडी, मुंबई-4, 1967, पृ-48.

95) कित्ता, पृ-180.

96) डॉ. गणेश मतकर; वीरश्रेष्ठ प्रथम यशवंतराव होलकर, नवीन फोटो कॉपी शिवविलास पॅलेस, राजवाडा इंदौर 1999, पृ-25.

97) न.र.फाटक; श्रीमन्ममहाराज यशवंतराव होळकर, वि.पु. भागवत, मौजे प्रिंटिंग ब्युरो खटाववाडी, मुंबई-4, 1967,पृ-100.

98) कित्ता, पृ-179.

99) संजय सोनवणी; महाराजा यशवंतराव होळकर, पुष्प प्रकाशन भारत- बुक हाऊस 1788, सदाशिव पेठ, देशमुखवाडी पुणे-2011, पृ-123.

100) न.र.फाटक; श्रीमन्ममहाराज यशवंतराव होळकर, वि.पु. भागवत, मौजे प्रिंटिंग ब्युरो खटाववाडी, मुंबई-4, 1967, पृ-180.

101) न.चि. केळकर; मराठे व इंग्रज, प्रकाशन मॉडर्न बुक डेपो, बाजीराव रस्ता पुणे-2,1918, पृ-13.

102) न.र.फाटक; श्रीमन्ममहाराज यशवंतराव होळकर, वि.पु. भागवत, मौजे प्रिंटिंग ब्युरो खटाववाडी, मुंबई-4, 1967, पृ-166.

103) यशवंत वासुदेव शास्त्री खरे; ऐतिहासिक लेख संग्रह, खंड -15,

104) संजय सोनवणी; महाराजा यशवंतराव होळकर, पुष्प प्रकाशन भारत- बुक हाऊस 1788, सदाशिव पेठ, देशमुखवाडी पुणे-2011, पृ-105

105) कित्ता, पृ-105.

106) शिवराम महादेव परांजपे; मराठ्यांच्या लढ्यांचा इतिहास (1802 ते 1818) प्रकाशन चित्रशाळा प्रेस, 1026 सदाशिव पेठ पुणे-1934, पृ.-229

107) मधुसुदनराव होलकर; होलकरोंका इतिहास, न्युज्ञान प्रेस 495, डी.डी.ए. कॉम्पलेक्स, शहजादा बाग, इंन्द्रलोक दिल्ली-35 1992, पृ-411.

108) गो.स. सरदेसाई; ब्रिटीश रियासत खंड-2, पॉप्ल्युलर प्रकाशन प्रा.लि. 35 सी. पंडित मदनमोहन मालवीय मार्ग, ताडदेव मुंबई 34,1993, पृ-325

109) बंडे शारदा गोविंदराव; मराठेकालीन होळकर संस्थान, कल्पना प्रकाशन-6 एच.आय.जी. कॉलनी, आयटीआय जवळ, नांदेड-02,2009, पृ-276.

110) प्रा. आठवले, डॉ. सासवडकर; मराठी सत्तेचा विकास आणि ऱ्हास, प्रकाशन महाराष्ट्र विद्यापीठ, ग्रंथ निर्मिती मंडळ, विधी महाविद्यालय परिसर महात्मा गांधी मार्ग नागपूर-01, 1974, पृ.305.

111) न.र.फाटक; श्रीमन्ममहाराज यशवंतराव होळकर, वि.पु. भागवत, मौजे प्रिंटिंग ब्युरो खटाववाडी, मुंबई-4, 1967, पृ-105.

112) मधुसुदनराव होलकर; होलकरोंका इतिहास, न्युज्ञान प्रेस 495, डी.डी.ए. कॉम्पलेक्स, शहजादा बाग, इंन्द्रलोक दिल्ली-35 1992, पृ-407.

113) मधुसुदनराव होलकर; होलकरोंका इतिहास, न्युज्ञान प्रेस 495, डी.डी.ए. कॉम्पलेक्स, शहजादा बाग, इंन्द्रलोक दिल्ली-35 1992,पृ-459.

114) कित्ता, पृ-190.

115) संजय सोनवणी; महाराजा यशवंतराव होळकर, पुष्प प्रकाशन भारत- बुक हाऊस 1788, सदाशिव पेठ, देशमुखवाडी पुणे-2011,पृ-100.

116) मधुसुदनराव होलकर; होलकरोंका इतिहास, न्युज्ञान प्रेस 495, डी.डी.ए. कॉम्पलेक्स, शहजादा बाग, इंन्द्रलोक दिल्ली-35 1992,पृ-447

117) शिवराम महादेव परांजपे; मराठ्यांच्या लढ्यांचा इतिहास(1802 ते 1818) प्रकाशन चित्रशाळा प्रेस 1026, सदाशिव पेठ पुणे-1934,पृ-229.

118) मधुसुदनराव होलकर; होलकरोंका इतिहास, न्युज्ञान प्रेस 495, डी.डी.ए. कॉम्पलेक्स, शहजादा बाग, इंन्द्रलोक दिल्ली-35 1992,पृ-456.

119) न.र.फाटक; श्रीमन्ममहाराज यशवंतराव होळकर, वि.पु. भागवत, मौजे प्रिंटिंग ब्युरो खटाववाडी, मुंबई-4, 1967, पृ-91.

120) यशवंत वासुदेव शास्त्री खरे; ऐतिहासिक लेख संग्रह भाग-5, पृ-79.

121) कर्नल जेम्स टॉड; राजस्थान का पुरातत्व एवं इतिहास भाग-2, प्रकाशन साहित्यगार धामाणी मार्केट की गली, चौडा रास्ता जयपूर-2008, पृ-427.

122) मधुसुदनराव होलकर; होलकरोंका इतिहास न्युज्ञान प्रेस, 495 डी.डी.ए. कॉम्पलेक्स शहजादा बाग, इंद्रलोक दिल्ली-381.

123) घनश्याम होलकर; महाराजा यशंतराव होलकर, नेशन प्रेस, ओलडनं-38, नवीन नं-6 मॅकनिकोलस रोड, चेटपेट चेन्नई 31, 2018, पृ-111.

124) कित्ता, पृ-70.

125) कित्ता, पृ-103

126) कित्ता,पृ-103

127) कित्ता, पृ-103.

128) कित्ता, पृ-103.

129) मधुसुदनराव होलकर; होलकरोंका इतिहास, प्रकाशन आखिल भारतीय होलकर महासंघ wB-19 गली नं.-1 शकरपुर, दिल्ली 110092, 1992, पृ-407.

130) संजय सोनवणी; महाराजा यशवंतराव होळकर, पुष्प प्रकाशन भारत, बुक हाऊस 1788, सदाशिवपेठ, देशमुवाडी पुणे-30, 2011, पृ-72.

131) कित्ता, पृ-77.

132) मधुसुदनराव होलकर; होलकरोंका इतिहास, प्रकाशन आखिल भारतीय होलकर महासंघ wB-19 गली नं.-1 शकरपुर, दिल्ली 110092, 1992,पृ-414.

133) कित्ता, पृ-416.

134) कित्ता, पृ-419.

135) डॉ. सुमन वैद्य; अखेरचा पेशवा, प्रगती प्रकाशन 87 अ धंतोली नागपुर-12 1994, पृ-66.

136) गो.स. सरदेसाई; मराठों का नवीन इतिहास, शिवलाल अग्रवाल ॲन्ड कंपनी, जयपूर-1964, पृ-455.

137) मधुसुदनराव होलकर; होलकरोंका इतिहास, प्रकाशन आखिल भारतीय होलकर महासंघ wB-19 गली नं.-1 शकरपुर, दिल्ली 110092, 1992, पृ-413.

138) मधुसुदनराव होलकर; होलकरोंका इतिहास, प्रकाशन आखिल भारतीय होलकर महासंघ wB-19 गली नं.-1 शकरपुर, दिल्ली 110092, 1992,कित्ता, पृ-441.

139) कित्ता, पृ-429.

140) कित्ता, पृ-450.

141) कित्ता, पृ-413.

142) कित्ता, पृ-430.

143) मधुसुदनराव होलकर; होलकरोंका इतिहास, प्रकाशन आखिल भारतीय होलकर महासंघ wB-19 गली नं.-1 शकरपुर, दिल्ली 110092, 1992, पृ-436.

144) कित्ता, पृ-417.

145) कित्ता, पृ-451.

146) नवभारत टाईम्स प्लस, सोमवार 17 फरवरी 1997.

147) बंडे शारदा गोविंदराव; मराठेकालीन होळकर संस्थान, कल्पना प्रकाशन-6 एच.आय.जी. कॉलनी आयटी आय जवळ नांदेड -02 2009, पृ-275.

148) मधुसुदनराव होळकर; होलकरोंका इतिहास, प्रकाशन अखिल भारतीय होलकर महासंघ डब्ल्यु बी-19, गल्ली नं-1 शकरपुर, दिल्ली 110092, 1992, पृ-367.

# प्रकरण सहावे
# यशवंतराव होळकर यांच्या लढाया

---

6.1 प्रस्तावना

6.2 इ.स. 1799 साली यशवंतराव होळकर आणि डूंड्रेक यांच्यात युध्द

6.3 होळकर आणि शिंदे यांच्यातील युध्द

6.4 25 जुन 1801 रोजी यशवंतराव आणि मेकन्टायर मधील युध्द

6.5 सतवास वर आक्रमण

6.6 नर्मदा किनाऱ्या वरील युध्द (जुन 1801)

6.7 17 जुलै 1801 रोजी यशवंतरावांचे हेसिंगवर आक्रमण

6.8 क्षिप्रा वकान नदीच्या प्रदेशावरील युध्द (5 आक्टोबर 1801)

6.9 आक्टोबर 1801 चे युध्द

6.10 14 आक्टोबर 1801 चे युध्द

6.11 20 व 21 ऑगस्ट 1802 चे युध्द

6.12 नारायणगावचे युध्द (3 आक्टोबर 1802)

6.13 बारामतीचे युध्द (आक्टोबर 1802 )

6.14 हडपसरचे युध्द (25 आक्टोबर 1802)

6.15 बुंदेलखंडाचे युध्द (22 मे 1804)

6.16 मुंकुदराखिंड युध्द

6.17 मथुरा युध्द

6.18 दिल्लीचे युध्द

6.19 फरुखाबादचे युध्द (16 नोव्हेंबर 1804)

6.20 26 आक्टोबर 1804 चे युध्द

6.21 ढीगचे युध्द (3 नोव्हे 1804)

6.22 ढीगचे युध्द (20 नोव्हेबर 1804)

6.23 भरतपूरचे युध्द

# प्रकरण सहावे
# यशवंतराव होळकर यांच्या लढाया

### 6.1 प्रस्तावना :-

वयाच्या 12 व्या वर्षा पासून रणांगणावर आपली उपस्थिती दाखवणारा यशवंतराव होळकर आपल्या तरुण वयामध्ये संघर्ष करित होळकरशाहीचे राज्य पुर्न स्थापीत करण्यासाठी स्वकियांशी केलेला संघर्ष हा त्यांच्यासाठी महत्वाचा ठरलेला आहे. मराठेशाहीवर येणाऱ्या परकिय आक्रमकांना थोपविण्यासाठी स्वत:च्या राज्याकडे लक्ष न देता अखंड भारतासाठी एकाकी इंग्रजांशी झुंज देण्यासाठी भारतातील लहान मोठ्या संस्थानिकांना आव्हाण करुन इंग्रजांच्या विरुध्द स्वत: लढायाच्या माध्यामातून इंग्रजांना हतबल करणारा यशवंतराव होळकर यांच्या लढायांचा अभ्यास करण्यात येणार आहे.

### 6.2 इ.स. 1799 साली यशवंतराव होळकर आणि डूंड्रेक यांच्यात युध्द :-

यशवंतराव होळकर यांचा ६ जानेवारी 1799 रोजी राज्यभिषेक झाल्यानंतर राज्यभिषेक सोहळा चालु असता त्यावेळी काशीराव होळकर यांचा फ्रेंच सेनापती डुंड्रेक इंदौर मध्ये यशवंतराव होळकर यांच्या विरुध्द युध्द करण्यासाठी युध्दाची तयारी करत होता.[1] त्यावेळी यशवंतराव होळकर यांच्याकडे सैन्यदलात भरती होण्यासाठी सांजापूर येथून अब्दुल रहमान हा 200 घोडे स्वार, 400 पायदळा सह भरती झाला. सरदार गोसाई बरोबर रॉकेट दलाद्वारे युध्द करणारे दल ही सामील झाले होते. यशवंतराव होळकर यांच्या राज्यभिषेकानंतर होळकरशाहीच्या राज्याकडे एकंदरीत 8000 घोडदळ, 15000 पायदळ, एवढी सैन्य संख्या पहावयास मिळते.

इ.स. 1799 सालच्या प्रारंभी यशवंतरावांच्या राज्याभिषेक सोहळ्या दरम्यान काशीराव होळकराच्या नेतृत्वाखाली काम करणाऱ्या त्यांच्या सैन्यदलाचा फ्रेंच सेनापती डूंड्रेक ने यशवंतराव होळकर यांच्या सैन्यावर हल्ला केला.[2] या युध्दामध्ये दोन्ही बाजुने बंदुकधारी दलाद्वारे एकमेकांच्या विरुध्द गोळ्यांचा वर्षाव झालेला पहावयास मिळतो. या युध्दा मध्ये कुलीखानाचा मुलगा कालेखान हा मारला गेला त्यावेळी यशवंतराव होळकर यांचे लष्करातील वेगवेगळे सैन्यदले ही नदी किनाऱ्यावर एकत्रीत येत होते. त्याचवेळी फ्रेंच सेनापती डूंड्रेक चा जावई प्लुमेट हा डूंड्रेकच्या मदती

करीता एक सैन्य बटालियन आणि दोन तोफा घेऊन पोहोचला होता. प्लुमेटने काही काळ यशवंतरवांच्या सैन्यावर गोळीबार करुन नाकेबंदी करण्याचा प्रयत्न केला. परंतु तो जास्त वेळ यशवंतरावांना रोखु शकला नाही, या युध्दात यशवंतरावांचा सरदार गोसाई याने आपल्या शौर्य, धाडस पराक्रमाचा परिचय करुन दिला. परंतु तो जास्त वेळ या युध्दामध्ये टिकु शकला नाही, त्याच वेळी गुजरातहून हरमुतखान, बुलंदखान, अकबरखान इत्यादी सरदार हे 400 पायदळ आणि गुंजाकुंवर 400 घोडदळासह, कृष्णाजी महाडीक 100 घोडदळा बरोबर यशवंतराव होळकर यांना सहकार्य करण्यासाठी सामील झाले होते, जदुनाथ सरकार लिहीतात की.[3] इ.स. मार्च,1799 च्या सुरुवाती च्या काळात फ्रेंच सेनापती डूंड्रेक सैन्याच्या बटालियन व मोठ्या प्रमाणात घोडदळ घेऊन महेश्वर पासून 6  मैल अंतरावर उत्तर पूर्व मध्ये चोली नावाच्या ठिकाणाकडे रवाना झाला या ठिकाणी यशवंतराव होळकर आणि काशीरावाचा सेनापती डूंड्रेक यांच्या मध्ये घनघोर युध्द झाले. या युध्दामध्ये यशवंतरावांना हार पत्करावी लागली. यशवंतरावांनी या पराभवानंतर आपले युध्द कौशल्य, पणास लावून, युध्दयोजना आखली जामघाट आणि सिमरुर घाटाला आपल्या आखत्यारीत घेतले. जेणे करुन महेश्वर इंदौर या मार्गावर नजर ठेवण्यात येईल. या कामासाठीची जबाबदारी यशवंतरावांनी कुश्वाह बक्षी आणि चिमनाभाऊ यांच्याकडे 1000 घोडदळ आणि 200 पायदळ सैन्यासह देण्यात आली. या ठिकाणी यशवंतराव होळकरांच्या युध्दनितीचा परिचय होतो. त्यावेळी यशवंतरावांनी डुंड्रेकच्या लष्करी छावणीवर हल्ला करुन कब्जा मिळवला या छावणीवर आपल्या विश्वासू सैन्याची नियुक्ती केल्याने डुंड्रेकच्या समोर मोठी अडचण निर्माण झाली होती. कारण ज्या महेश्वर इंदौर मार्गावरुन डुंड्रेकच्या सैनिकांना रसदपुरवठा अन्य साधनसामग्री येत होती. तो रसद पुरवठा यशवंतरावांच्या सैनिकांनी लुटला होता. यशवंतरावांना माहित होते की जर आपण रसद पुरवठा बंद केला तर डुंड्रेकच्या सैन्याची उपासमार होऊन सैन्य त्यास सोडून जातील तशाच प्रकारे डुंड्रेकच्या सैन्याच्या हालचाली चालु झाल्या होत्या. या ठिकाणी यशवंतरावांची युध्द योजना यशस्वी होताना दिसुन येते. शेवटी डुंड्रेक ने हतबल होऊन यशवंतराव होळकर यांना शरण आला. एप्रिल 1799 मध्ये डुंड्रेकचा पूर्वीच्या पध्दतीचा मान होता तशाच पध्दतीने त्याचा मानसन्मान केला. या युध्दा नंतर यशवंतरावांची किर्ती व लष्कराच्या शक्तीमध्ये मोठ्या प्रमाणात वाढ झालेली पहावयास मिळते. एकंदरीत विचार करता या युध्दातील यशवंतरावांच्या युध्द योजना यशस्वी झालेल्या पहायला मिळतात. शत्रुसैन्याच्या ठिकाणाची माहिती आपल्या गुप्तहेरा द्वारे घेऊन त्याच्या रसद पुरवठा करणाऱ्या मार्गावर आपल्या सैन्याची ठाणी बसविणे जेणे करुन शत्रुला रसद पुरवठा

होणार नाही शत्रुच्या हालचाली विषयी माहिती मिळविण्याकरीता आपल्या सरदाराची नियुक्ती करणे हे युध्दकौशल्याचे गुण अंगी असल्याचे निष्पन्न होते. त्याला अनुसरुन शत्रुसैन्यावर आक्रमण करणे किंवा त्यास हतबल करुन शरण आणणे हे यशवंतरावांच्या युध्दनिती, डावपेचा मध्ये यशस्वी होताना दिसुन येतात.

## 6.3 होळकर आणि शिंदे यांच्यातील युध्द :-

यशवंतराव होळकर यांना आपल्या मोहीमे दरम्यान गुप्तेराद्वारे माहिती मिळाली की दौलतराव शिंदेचे सैन्य युध्दकरण्यासाठी येत आहे.[4] त्यावेळी यशवंतराव होळकर यांनी रामपुरा, भानपुरा या परिसरात असलेला आपला सरदार शामराव महाडीक यास बोलावून घेतले व महेश्वरहुन युध्दासाठी लागणारी युध्द सामग्री भवानी शंकर बक्षी व श्यामराव महाडीक यांच्या नेतृत्वाखाली हिंग्लाज गडावर पाठवून देण्यात आली, स्वत: यशवंतराव हलक्या शस्त्रासह रवाना झाले. मार्गामध्ये त्यांना गुप्तहेराद्वारे माहिती देण्यात आली की महिदपुरचा कमाविसदार तुळसाजी वाघ हा शिंद्याच्या हल्ल्यात मारला गेला आहे व महीदपुरच्या किल्ल्यावर कब्जा केला असुन तुळसाजी वाघांकडे असणारी धन संपत्ती 500 शिक्के, घोडे, पाच हात्ती इत्यादी सामग्रीची लुटा शिंदयाच्या सैनिकांनी केलेली आहे. यशवंतरावांनी आपल्या सरदारांना महिदपूरकडे जाण्याचे आदेश दिले होते हे सरदार त्या ठिकाणी पोहचण्याच्या अधीच शिंदयाचे सैन्य त्या ठिकाणाहुन निघुन गेलेले होते. तो पर्यंत यशवंतरावांनी शिंद्याच्या मंदसौर परिसरामध्ये जबरन वसुली करुन सीतामऊ या ठिकाणी पोहोचले होते. यशवंतराव वरखेडा या ठिकाणी गेले असता. 50,000 हजार रुपये नजराणाच्या स्वरुपात मंदसौर या ठिकाणी भेट म्हणून देण्यात आले तेथुन यशवंतराव होळकर यांनी महिदपुर या ठिकाणी लष्करी छावणी घातली व लागलीच उज्जैन पासुन 6 कोस दूर अंतरावर पनवहार नावाच्या ठिकाणी होळकर आणि शिंदे सैन्याची समोरा समोर भेट होऊन युध्दाला प्रारंभ झाला या युध्दात दोन्ही बाजू कडील काही सैन्य जखमीतर काही मारले गेले. त्याचवेळी नेवारी जवळ फलोज हा सैन्याच्या दोन बटालियन घेऊन पोहचला होता. त्यावेळी त्याच्या सोबत चौधरी शोभा राम आला फ्लोजला मदत करण्यासाठी होसींग पण सामील झालेला पहावयास मिळतो. दुसऱ्या दिवशी यशवंतरावांनी तीव्रतेने आक्रमण करुन आपल्या छावणीत दाखल झाले.

यशवंतरावांना त्यांच्या गुप्तहेरा द्वारे माहिती मिळाली की, ब्रेगिंग हा सैन्याच्या दोन बटालियन घेऊन सतवास ला पोहचला आहे. त्यावेळी त्याचा पाठलाग करुन त्यास सतवासहुन पळवुन लावले यावेळी यशवंतराव होळकर यांच्या बरोबर फ्लुमेट आणि अन्य सैन्यदल होते दुसऱ्या दिवशी दोन्ही बाजुने मोठ्या प्रमाणात एकमेकांच्या विरुध्द तोफाद्वारे तोफगोळे टाकण्यात आले. या युध्दामध्ये यशवंतरावांचा सरदार मुर्तजाखान यांचा घोडा मारला गेला. काही सैन्य जखमी झाले शेवटी यशवंतरावांचा विजय झाला त्यानंतर 11 आक्टोबर 1801 रोजी यशवंतराव उज्जैनला पोहचले. या धावपळीच्या युध्दामध्ये यशवंतरावांनी उज्जैनवर विजय मिळविण्यासाठी त्या अगोदरच गुप्तहेराद्वारे मिळालेल्या माहितीच्या आधारे यशवंतरावांनी शिंदयाच्या सैन्याचा पराभव हा आपल्या युध्दकौशल्यावर केलेला पहावयास मिळतो.

## 6.4 25 जुन 1801 रोजी यशवंतराव आणि मेकन्टायर मधील युध्द :-

यशवंतराव होळकर यांच्या सैनिकांनी उज्जैन च्या उत्तरे कडुन दौलतराव शिंदेच्या सैन्याला पाठलाग करुन पळवुन लावले.[5] त्यांच्या ठिकाणी आपले ठाणे स्थापीत करुन त्यांनी शिंद्याच्या एक- एक सैन्य तुकडीवर आक्रमण करण्याची योजना आखुन कुच केले यशवंतराव होळकर यांनी उज्जैन च्या बगले वरुन जलद गतीने प्रस्थान केले आणि लवकरात लवकर नेवरी या ठिकाणी पोहचले त्या ठिकाणी त्यांनी 25 जुन 1801 रोजी शिंद्याचा सेनापती मेकन्टायर याच्यावर आक्रमण केले या युध्दात मेकन्टायर हा सुध्दा धाडसाने लढला परंतु यशवंतरावांच्या शौर्या पुढे त्याचा निभाव लागु शकला नाही, शेवटी त्यास हार पत्करावी लागली यशवंतरावांनी मेकन्टायरच्या दोन युरोपियन अधिकारी दाजी बाबुराम मुलचंद आणि राजा मोहम्मदच्या मुलास बंदी बनवले या युध्दाच्या लुटीतुन यशवंतरावांच्या हाताला मेकन्टायरचे 200 घोडे, 400 बंदुका आणि 7 तोफा हस्तगत केलेल्या पहावयास मिळतात.

## 6.5 सतवास वर आक्रमण :-

यशवंतराव होळकर यांनी मेकन्टायरच्या विरुध्द विजय मिळविल्या नंतर यशवंतराव होळकर सतवासवर आक्रमण करण्यासाठी आपल्या सैन्यास रवाना केले.[6] सतवासच्या रणांगणावर मोठ्या प्रमाणात यशवंतरावांचे सैनिक एकत्रीत जमले होते. यशवंतरावांचे सैन्य पुढे जात शिंदयाच्या सैन्यावर हल्ले करत त्यावेळी शिंदयाच्या सैनिकांनी स्वत:चा बचाव करण्यास

त्यांच्याकडून कृती झालेली दिसत नाही. यशवंतरावांचे सैन्य शिंदयाच्या लष्करी ठाण्यावर हल्ले करत राहिले. या ठिकाणी शिंदयाचा सेनापती ब्राऊनरिंग हा हजर होता. ज्यावेळी यशवंतराव होळकर यांचे सैन्य सतवासच्या दिशेने कुच करण्यास सुरुवात केली असता गतिमानतेने सतवासच्या जवळ यशवंतरावांचे सैन्य आले शिंद्याचा सेनापती ब्राऊनरिंग याने तोफांद्वारे तोफगोळे टाकण्यास सुरुवात केली. त्यामुळे यशवंतरावांच्या सैन्याची गती ही मंदावली त्यामुळे हे सैन्य परत जाऊन आपल्या सोबत तोफा आणि सैन्यास घेऊन परत आले असता तो पर्यंत ब्राऊनरिंग हा या ठिकाणाला सोडून पळुन गेला होता. ब्राऊनरिंगने सतवास पासुन 18 मैल अंतरावर पुन्हा सैन्याची जमाव जमव करुन यशवंतरावांच्या सैन्याची वाट पहात उभा राहिला होता. ब्राऊनरिंगच्या मदतीसाठी शिंद्याच्या सर्व बटालियन आलेल्या होत्या. तेथुन जवळच दौलतरावा शिंदे आपली लष्करी छावणी टाकुन बसलेले होते. शिंद्याचे सेनापती देवजी गौली व सदाशिवराव 2 जुलै रोजी आपल्या सैन्याच्या दोन बटालियन घेऊन ब्राऊनरिंगच्या मदतीसाठी आला होता. दुसरीकडे यशवंतराव होळकर पुढे जाऊन सतवासवर आपला कब्जा मिळवला परंतु त्या ठिकाणी यशवंतरावास ब्राऊनरिंग भेटला नाही.

### 6.6. 4 **जुलै** 1801 **यशवंतरावांचे ब्राऊनरिंगवर आक्रमण** :-

सतवासवर यशवंतरावांनी कब्जा मिळवल्यानंतर यशवंतरावास त्याठिकाणी ब्राऊनरिंग सापडला नाही.[7] त्यावेळी यशवंतरावांनी पुढे जाऊन यशवंतराव होळकर यांचे सरदार प्लुमेट आणि कुशवाह बक्षी चार सैन्य बटलियान मोठ्या प्रमाणात रिसाला, आठ तोफा घेऊन जलदगतीने पुढे चालले असता शिंद्याच्या सैन्या जवळ पोहचताच ब्राऊनरिंग ने यशवंतरावांच्या सैन्यावर तोफा आणि बंदुकाद्वारे हल्ला केला. हे युध्द घनघोर झाले आणि दोन्ही बाजुने तोफांचा वापर मोठ्या प्रमाणात करण्यात आलेला पहावयास मिळतो. या युध्दामध्ये यशवंतरावांचा सेनापती प्लुमेट हा आपल्या सैन्यासह शिंद्याच्या सैन्या विरुध्द चांगली कामगीरी करुन प्लुमेट शेवटी हा ब्राऊन रिंगच्या समोर जाऊन उभा राहीला शिंद्यांनी आपले राखीव ठेवण्यात आलेल्या तोफांद्वारे प्लुमेटच्या सैन्यावर तोफगोळे टाकण्यात येऊ लागल्याने या युध्दात यशवंतरावांचे बरेच सैन्य व प्लुमेटही जखमी झाला अशा परिस्थितीचा फायदा घेऊन शिंद्यांचे सैन्य यशवंतरावांच्या सैन्यावर आक्रमकतेने हल्ला चढविल्यामुळे अशा नाजुक परिस्थितीचा पाहुन यशवंतराव होळकर यांनी तीव्रतेने येऊन आपल्या सैन्याचा बचाव करत ब्राऊनरिंग वर जलदगतीने आक्रमण करुन

ब्राऊनरिंगच्या सैन्याला कापुन काढिले यशवंतराव होळकर यांनी आपल्या युध्दकौशल्याच्या गुणांवर जवळ दिसणाऱ्या पराभवाला विजयामध्ये बदलण्याची क्षमता त्यांच्यात होती. यावेळी त्यांनी सतवासच्या युध्दात असेच केलेले पहायला मिळते. यावेळी यशवंतरावांनी आपल्या सैनिकांना पुन्हा एकत्रित करुन शिंद्याच्या सैन्याविरुध्द आक्रमण करुन आपल्या तोफा हस्तगत केल्या आणि आपल्या गुप्तहेरा द्वारे मिळालेल्या माहितीनुसार उज्जैनहुन दौलतराव शिंदे आपल्या विरुध्द लढण्यासाठी येत आहे. त्यामुळे यशवंतरावांनी शिंद्याच्या दोन्ही सैन्यामध्ये फसण्या अगोदर इंदौरला कुच केले पाहिजे तेंव्हा यशवंतरावांनी सतवास सोडून इंदौरला जाऊन पोहचले.

## 6.7 नर्मदा किनाऱ्यावरील युध्द (जुन 1801) :-

उन्हाळ्यातील नर्मदा किनाऱ्यावरील हे युध्द इतिहासामध्ये प्रसिध्द झालेले आहे.[8] दौलतराव शिंदे च्या प्रशिक्षीत युरोपियन सैन्य अधिकाऱ्यांचा मुकाबला यशवंतराव होळकर यांच्या अप्रशिक्षीत, उत्साही आणि जन्मजात विलक्षण बुध्दिमता असणाऱ्या सैन्याशी झाला होता.

- युध्दाचे क्षेत्र हे —नर्मदा नदीच्या दक्षिण किनाऱ्या पासून उत्तरेकडे इंदौर व उज्जैन पर्यंत पसरलेले होते.
- जुन 1801 ते आक्टोबर पर्यंत चार महिने पर्यंत घनघोर युध्द चालले होते.
- दोन्ही बाजुने मोठ्या प्रमाणात युध्दामध्ये रक्तपात झाला होता.
- नर्मदा आणि उज्जैन च्या मध्ये असणारा भौगोलिक प्रदेश हा निर्जन झाला होता.

## 6.8 17 जुलै 1801 रोजी यशवंतरावांचे हेसिंगवर आक्रमण :-

यशवंतराव होळकर यांचा सरदार आमीरखान याने आपली लष्करी छावणी उज्जैन पासुन 20 मैल अंतरावर उज्जैनच्या उत्तर पूर्व दिशेला टाकली होती.[9] यशवंतरावांनी उज्जैन पासून काही मैल अंतरावर दक्षिणेला येऊन पोहचले. 17 जुलैच्या तिसऱ्या प्रहरी दोन तास अगोदरच हेसिंगवर आक्रमण केले. शिंद्याची फौज गंगाशाह टेकडी आणि अंकपाटा याच्यामध्ये थांबली होती. या सैन्यदलाची पाठही उज्जैन शहराच्या भिंतीकडे होती. त्यादिवशी सायंकाळी केवळ दोन्ही बाजुने तोफांद्वारे युध्द झाले सूर्यास्तानंतर यशवंतराव होळकर हे आपल्या 2 मैल दुर अंतरावर असणाऱ्या लष्करी छावणीत पोहोचले होते. यशवंतरावांच्या सैन्या समोरील भागाचे नेतृत्व हे कुश्वाह बक्षी

यांच्याकडे होते तर रात्रीच्यावेळी आमीरखानाचे सैन्य आणि यशवंतरावांच्या दोन बटालियन ज्या प्लुमेट व यशवंतराव यांच्या समजल्या जात होत्या त्यांनी समोर पाठविण्यात आले जे शिंद्याच्या सैन्य ठिकाणांना अडवुन थांबविण्याचे कार्य यांच्याकडे होते.

यशवंतराव होळकर ही एक अशी व्यक्ती होती जी जवळ पराभव दिसताना सुदधा या पराभवाला विजयामध्ये परावर्तित करण्याची त्यांच्यात ताकद होती.[10] यशवंतरावांनी अशाच पध्दतीने हेसिंगच्या सैन्याला चारही बाजुने वेढा देऊन त्यांच्यावर गतिमानतेने हल्ला केला. यशवंतरावांचे पायदळ सैन्य हे शिंद्याच्या सैन्यदलास पाठीमागे सरकविण्यात यशस्वी झाले आणि त्यांच्या संरक्षणासाठी आमीर खानाला यावे लागले. पठाणांनी आक्रमण केले परंतु शिंद्याच्या तोफ माऱ्या पुढे त्यांनाही पाठीमागे यावे लागले. त्याचवेळी युध्दाच्या रणांगणावर मुसळधार पाऊसाला सुरुवात झाल्याने शिद्यांच्या तोफा व बंदुका या पावसामध्ये निकामी ठरल्याने यशवंतराव होळकर यांच्या सैन्याने आपल्या पारंपारिक शस्त्राद्वारे जसे भाला, तलवार, फर्सा, इत्यादी द्वारे शिंद्याच्या सैनिकांना कापुन काढिले शिंद्याद्वारे लढणारे सैन्य 6 पायदळ बटालियन व तीन ते साडे तीन हजार घोडदळ होते. या युध्दात शिंद्याचे 2000 सैन्य ठार झाले तर मोठ्या प्रमाणात सैन्य जखमी झाले 12 युरोपियन अधिकाऱ्या ऐवजी 8 युरोपियन अधिकारी या युध्दात मारले गेले. 30 तोफा यशवंतरावांनी हस्तगत केल्या. हेसिंगच्या नेतृत्वाखाली 12 बटालियन नष्ट झाल्या या युध्दात केवळ हेसिंग आपले प्राण वाचविण्यात यशस्वी झाला. 21 सप्टेंबर 1801 रोजी उज्जैनवर यशवंतराव होळकर यांनी विजय मिळवल्यानंतर उज्जैन मधुन 15 लाख रुपये वसुल केले. यशंवतराव होळकर यांनी आपल्या सैनिकांना चेतावणी दिली की, कोणत्याही सैन्यदलाने उज्जैन लुटण्याचा प्रयत्न करु नये यशवंतरावांच्या आदेशानुसार कुठेही त्यांच्या सैनिकांनी लुटमार केली नाही काही काळानंतर यशवंतरावांनी उज्जैन मधुन मोठ्या प्रमाणात धन संपत्ती वसुल केलेली पहायला मिळते.

### 6.9 क्षिप्रा व कान नदीच्या प्रदेशावरील युध्द (५ आक्टोबर 1801) :-

यशवंतराव होळकर यांनी उज्जैनवर आपला अधिकार जमविल्यानंतर दौलतराव शिंद्यानी सर्जेराव घाटगे यास इंदौरवर हल्ला करण्यास सांगितले होते. त्या दृष्टीने ऑगस्ट 1801 मध्ये यशवंतराव होळकर यांच्या लष्करातील युरोपियन सैन्य अधिकारी शेवेलियर डुंड्रेक आणि त्यांचा जावई प्लुमेट यशवंतरावांशी विश्वास घात करुन शिंद्याना जाऊन मिळाला त्यामुळे यशवंतराव

होळकर यांच्या सैन्याला मोठ्या प्रमाणात नुकसान सहन करावे लागले. त्यामुळे यशवंतराव होळकर यांनी खबरदारी म्हणून आपल्या लष्करामध्ये असणाऱ्या युरोपियन सैन्य अधिकारी फ्लुरी आणि गेल यास बंदी बनविण्यात आले. कारण यशवंतरावांना संशय होता की हे दोन्ही युरोपियन सैन्य अधिकारी आपल्याशी विश्वासघात करुन शिंद्याच्या गोटात सामील होतील ही दुरदृष्टी यशवंतरावांकडे होती त्यामुळे त्यांनी खबरदारीचा उपाय म्हणून हा निर्णय घेतलेला पहावयास मिळतो.

दौलतराव शिंद्याने आपला सेनापती सर्जेराव घाटगे आणि ब्राऊनरिंग या दोघांना विशाल सैन्य संख्या आणि शक्तीशाली तोफखाना देऊन इंदौरवर हल्ला करण्यासाठी पाठविण्यात आले. 5 आक्टोबर 1801 रोजी यशवंतराव होळकर आणि सर्जेराव घाटगे आणि ब्राऊनरिंग यांच्यात युध्दाला सुरुवात झाली. हे युध्द क्षिप्रा व कान नदीच्या प्रदेशात मोठ्या प्रमाणात घनघोर युध्दाला सुरुवात झाली. हे युध्द दहा दिवस सातत्याने चालु होते. यशवंतराव होळकर यांनी प्रथम बंदुकधारी सैन्यदलाचा वापर करुन शिंद्याच्या सैन्या विरुध्द युध्द केले. तर नंतर गनिमीकावा युध्द तंत्राच्या साहाय्याने युध्द लढण्यास सुरुवात केली त्यामुळे शिंद्याच्या सैन्याचे फार मोठे नुकसान या युध्दात झाले.

या युध्दात स्वत: यशवंतराव होळकर यांनी शौर्य, धाडस पराक्रम दाखवला यशवंतराव हे प्रत्येक युध्दात ज्या ठिकाणी घनघोर युध्दचालु आहे. अशा शत्रुच्या गोटात घुसून शत्रु सैन्याविरुध्द लढत होते हे त्यांचे वैशिष्ट्ये आहे. शिंद्याच्या लष्करात सैन्य हे 12 बटालियन, 2000 घोडदळ होते. यशवंतराव होळकर यांच्या लष्करामध्ये सैन्य बटालियन 10 होते तर, 5000 रोहीले, 12000 मराठा घोडदळ 15000 पठाण घोडदळ व 98 तोफा होत्या या युध्दात यशवंतराव होळकर यांचा विजय झालेला दिसून येतो.

### 6.10 11 आक्टोबर 1801 चे युध्द :-

11ऑक्टोबर 1801 रोजी यशवंतराव होळकर आपले सर्व सैन्य दले घेऊन शिंद्याचा सेनापती फ्लोजच्या सैन्य बटालियन वर आक्रमण केले.[11] फलोजचे सैन्या यशवंतरावांच्या तीव्रगतीने केलेल्या आक्रमणास सहन करु शकली नाही. रणांगणातून फ्लोजच्या सैन्याने पळ काढला यशवंतराव होळकर व त्यांचे सैन्य शिंद्याच्या सैन्याचा पाठलाग करत व त्यांना कापुन

काढत यशवंतरावांचे सैन्य तीव्रतेने पुढे जात त्यामुळे यशवंतरावांच्या सैन्याचा असा समज झाला की आपला संपूर्ण विजय झालेला आहे. तेव्हा यशवंतरावांच्या सैनिकांनी शिंद्याच्या लष्करी छावण्यांना लुटण्याचा प्रयत्न चालवला त्यावेळी यशवंतराव होळकर हे शिंद्याचा सेनापती ब्राऊनरिंग याच्या जवळ पोहचले असता ब्राऊनरिंगने यशवंतरावांच्या सैन्यावर तोफांद्वारे हल्ला केल्याने यशवंतरावांचे सैन्य मोठ्या प्रमाणात या हल्ल्यात मारले गेले काही जखमी झाले. त्यावेळी शिंद्याच्या घोडदळ सैन्याने 50 घोडे स्वारासह यशवंतराव होळकर यांना चारही बाजुने घेरण्यात आले त्यावेळी यशवंतराव होळकर यांनी पाहिले की आता या वेढ्यातुन बाहेर पडणे अवघड आहे तेंव्हा यशवंतरावांनी मोठ्या शौर्याने युध्द लढले व मोठ्या प्रमाणात शिंद्याच्या सैन्याला यावेळी कापुन काढले त्यावेळी त्यांच्या सोबत फक्त पाच सैनिक या युध्दात राहिले होते तरी यशवंतराव होळकर यांनी आपल्या युध्दनेतृत्व, युध्दकौशल्याच्या गुणांवर, या युध्दात त्यांनी आपला बचाव केलेला पहावयास मिळतो.

### 6.11 14 ऑक्टोबर 1801 चे युध्द :-

ब्राऊनरिंग आणि सर्जेराव घाटगे इंदौरच्या दिशेने येत असता. त्यांना यशवंतराव होळकर यांनी रोखल्याने यांच्यामध्ये घनघोर युध्द झाले.[12] युध्दामध्ये यशवंतरावांनी शिंद्याच्या दोन सेनापतीचे फार नुकसान केले. यशवंतराव होळकरांकडे असणाऱ्या लष्करातील युरोपियन सैन्य अधिकारी शेवेलियर डुंड्रेक आणि प्लुमेट विश्वासघात करुन शिंद्याच्या गोटात जाऊन सामील झाले होते. ज्यामुळे युरोपियन पध्दतीने तयार केलेली सेना ही नेतृत्वाच्या अभावी युध्दात कुचकामी ठरली. तरी सुध्दा हरनाथ चेला याने तोफांचे संचालन केले परंतु यास युध्दाचा अनुभव नसला तरी ही हरनाथ चेला याने युध्द केले. शेवटी हे सैन्यदल विखुरले गेले. युध्द हे दिवसभर घनघोर चालु होते. शिंद्याच्या सैन्याने आमीरखान पेंढारीवर आक्रमकपणे हल्ला केल्याने त्याच्यावर आलेले संकट पाहुन स्वत: यशवंतराव होळकर आमीरखानाच्या मदती करीता पुढे सर सावले शिंद्याच्या सैन्यावर तुटून पडले शिंद्यानी तीन तोफा यशवंतरावाच्या सैन्याद्वारे लुटल्या होत्या त्या तीन तोफा यशवंतरावांनी परत हस्तगत केल्या परंतु तोपर्यंत आमीरखानाचे सैन्य रणांगण सोडून गेले होते. संध्याकाळ झाली तेव्हा युध्द थांबले शेवटी यशवंतराव होळकर हे या ठिकाणाहुन कुशलगढ आणि जामघाटच्या दिशेने कुच केले. त्या ठिकाणी सर्व सैन्याला परत एकत्रीत केलेले पहावयास मिळते.

यशवंतराव होळकर यांनी गनिमीकावा युध्दतंत्राचा वापर करुन शिंद्याच्या सैनिकांची दमछाक व त्यांना थकविण्यासाठी घोडदळाच्या माध्यमातून शिंद्याच्या प्रदेशात धुमाकुळ घालुन त्यांच्या सैन्यास हतबल केले होते. यशवंतरावांची घोडदौड एवढ्या तीव्रगतीने व्हावयाची की शत्रुच्या प्रदेशात व सैन्यात विध्वंस झालेला पहायला मिळतो. यावेळी इंदौर शहराची सुरक्षिततेची जबाबदारी गुजा कुंवर आणि कृष्णा महाडिक यांच्यावर सोपविलेली होती, परंतु सर्जेराव घाटगेने इंदौर शहरावर आपला कब्जा मिळवला व तेथील नागरिकांना लुटण्यात आले. धनसंपत्तीच्या लालसेने घरे खोदण्यात आली त्याच बरोबर राजवाडयाला आग लावण्यात आली या राजवाड्यातील वरील पाचमजले जळुन खाक झाली होती. महिलांनी आपली अब्रु वाचविण्यासाठी विहिरी मध्ये उड्या मारुन बलिदान दिले. इंदौरमधील व्यापारी व सावकारांनी सर्जेराव घाटगेला 15 लाख देण्याचे प्रस्ताव ठेवला परंतु त्यास कोणत्याही प्रकारे न जुमानता तो शहर उध्वस्त करत होता. यशवंतराव होळकर यांनी युध्दात लढत असताना स्वत:स वाचवले आणि इंदौर पासून 50 कि.मी. दुर अंतरावर असणाऱ्या जामदुर्ग वर जाऊन शत्रुसैन्याविरुध्द लढण्याची तयारी चालवली नोव्हेंबर 1801 मध्ये यशवंतरावांनी नवीन सैन्य भरती करुन आपल्या लष्कराची उभारणीकरुन इंदौरला परत आले. त्यावेळी इंदौर मध्ये कुणी दिवा लावण्यासाठी शिल्लक राहिला नव्हता त्यावेळी यशवंतराव होळकर यांनी इंदौर येथे मुक्काम करुन जुन्या इंदौर मध्ये वास्तव्यास असणाऱ्या नागरिकांना धीर देण्याचे काम केले पुन्हा नवीन रुपात इंदौर शहराला वसविण्यात आले. प्रशासकीय व्यवस्था दुरुस्त करुन सुरळीत करण्यात आली शेवटी 10 नोव्हेंबर 1801 रोजी इंदौरवर यशवंतरावांनी अधिकार प्राप्त केले. 15 नोव्हेंबर रोजी यशवंतराव हटादे या ठिकाणी पोहचले हटादे हे ठिकाण इंदौर पासुन 12 मैल अंतरावर उत्तर- पश्चिमेला आहे. त्याठिकाणाहून यशवंतराव होळकर महेश्वरला जाऊन पोहचले तेथून परत 2 डिसेंबर ला पुन्हा इंदौरला पोहचले तेथून लवकरात लवकर कुचकरुन 6 जानेवारी 1802 रोजी प्रतापगढ, मंदसौर या ठिकाणी पोहचले पुन्हा जानेवारीच्या शेवटी झाबुआ आणि नाथद्वारा या ठिकाणी गेले. यशवंतरावांचा इंदौर वर झालेल्या हल्ल्यानंतरचा प्रवास थक्क करणारा आहे राज्याची घडी व्यवस्थीत बसविण्यासाठी त्यांनी हा प्रवास केलेला आढळुन येतो.

## 6.12 20 व 21 ऑगस्ट 1802 चे युध्द :-

पेशव्यांचा सेनापती पांडोजी कुंजरला पुण्याकडे येणाऱ्या यशवंतराव होळकर यांच्या सैन्याला रोखुन धरण्यासाठी.[13] पांडोजी कुंजरच्या नेतृत्वाखाली 2500 ते 3000 सैन्याची एकतुकडी गारदौंडच्या दिशेने रवाना केली व या सैन्यदलाने लवकरात लवकर गारदौंड जवळ पोहचुन आपली लष्करी छावणी लावली होती. 20 आणि 21 ऑगस्ट 1802 च्या मध्यरात्री छावणीत झोपलेल्या पांडोजी कुंजरच्या सैन्यावर अचानकपणे गनिमी युध्द तंत्राचा उपयोग करुन हल्ला करण्यात आला. यशवंतरावाच्या बंदुकधारी सैन्यदलाने पांडोजी कुंजरच्या सैन्यावर गोळयांचा वर्षाव केल्याने कुंजरच्या सैन्यदलामध्ये गोंधळाची स्थिती निर्माण झाली होती. त्यावेळी यशवंतरावांच्या सैन्याने छावणीतील कुंजरच्या सैन्याची रसद पुरवठा, लष्करी व अन्य साधन सामग्री लुटून घेतल्याने कुंजरचे सैन्य भयभीत होवून छावणी सोडून पुण्याच्या दिशेने पळुन गेले. त्यावेळी डोडच्या आजुबाजुला असणाऱ्या गावांवर आपला अधिकार मिळवला त्यानंतर यशवंतरावांनी फतेहसिंह मानेला आदेश देण्यात आला की आपण आता पाठीमागे यावे अशा पध्दतीने पांडोजी कुंजरच्या सैन्याचा पराभव यशवंतराव होळकरांच्या सैनिकांनी केलेला पहावयास मिळतो. एकंदरीत विचार करता या युध्दामध्ये पेशव्यांच्या पांडोजी कुंजरच्या नेतृत्वाखालील सैन्यास आपल्या नेतृत्वाविषयी असणारी निष्ठा, प्रामाणिकपणा, हा दिसुन येत नाही कुंजरच्या नेतृत्वाखालील सैन्याला पगार देण्यास पैसा नव्हता तरी पांडोजी कुंजरने यशवंतरावांच्या सैन्याला रोखण्यासाठी सैन्याची जमवा जमव करुन आला होता. याठिकाणी त्या सैन्यदलाची युध्द करण्यासाठीची मानसिकता काय असु शकते हे लक्षात येते.

दुसरीकडे ध्येयाने प्रेरीत नेतृत्वावर विश्वास असणाऱ्या यशवंतराव होळकर यांच्या सैनिकांनी फतेहसिह मानेच्या नेतृत्वाखाली आणि यशवंतराव होळकर यांच्या युध्दनिती व युध्द योजनेच्या मार्गदर्शनाखाली तसेच आपल्या उत्कृष्ट गुप्तेहेरांच्या माहितीवर आधारीत यशवंतरावांनी हे युध्द लढलेले आपल्याला पहावयास मिळते.

## 6.13 नारायण गावचे युध्द (3 आक्टोबर 1802) :-

यशवंतराव होळकर यांनी सप्टेंबर 1803 मध्ये जुन्नरवर आपला कब्जा करुन त्या ठिकाणी मोठ्या प्रमाणात धन संपत्तीची वसुली केल्यानतर सप्टेंबर अखेर प्रयाण केले.[14] त्यावेळी या

ठिकाणी शिंद्याचे सैन्य हे सदाशिव भाऊच्या नेतृत्वाखाली पोहचले तेंव्हा यांच्या सैन्याची संख्या ही 10,000 व एक सैन्य बटालियन शस्त्रसज्ज तयार होती. त्याच बरोबर सोबत 40 तोफा होत्या. नारायण गावा जवळ हे सर्व सैन्यदल एकत्रीत आले. 3 आक्टोबर 1803 रोजी प्रत्यक्ष युध्दाला सुरुवात झाली. हे युध्द ज्या रणांगणावर लढण्यात येत होते. त्या रणांगणाचे क्षेत्रफळ 72 मैल लांब अहमदनगर पासुन पुण्या पर्यत होते. यशवंरावांच्या सैन्याने शिंद्याच्या सैनिकांना थांबवुन थांबवुन व टप्प्या टप्याने त्यांच्यावर हल्ले चढवत. यशवंतराव होळकर यांची युध्दातील गतिमानताही आक्रमक व तीव्रतेची असे व शत्रुच्या गोटावर तुटून पडत आणि शत्रुला कापुन काढत ही प्रत्येक युध्दातील त्यांचे वैशिष्ट्ये होते. यशवंतरावांचे सैन्य रणांगणावर कधी एकत्रीत व्हावयाचे तर कधी शत्रु मारा करण्याचा अंदाज असेल त्यावेळी वेगवेगळ्या दिशेने विखुरले जात शत्रुला हल्ला कुणावर करावा ह्या भ्रमात त्यास टाके तर कधी शत्रुला आपल्या मागे पाठलाग करावयास लावून कोसो दूर पर्यंत त्यास घेऊन जात आणि शत्रु थकला किंवा परत माघारी फिरला की त्याचा पाठलाग करुन त्यास जेरीस आणावे, ठार करावे, भाल्याच्या टोकाद्वारे त्यास डिवचणे अशा पध्दतीची यशवंतरावांची मैदानी प्रदेशातील घोडदळाची गमिनीकावा युध्दतंत्र होते. यशवंतराव होळकर यांचे सैन्य युध्दाच्या रणांगणातुनच शत्रुची रसद पुरवठा लुटत आणि आपल्या सैन्यासाठी याचा उपयोग करी, यशवंतरावांचे घोडदळ हे फतेहसिंह माने, भवानी शंकर बक्षी, आमीरखान, शाहमतखान, इत्यादींच्या नेतृत्वाखाली कार्यरत होते. तर पायदळ सैन्य बटालियन हे युरोपियन अधिकारी हार्डिज, आर्मस्ट्राँग आणि विकर्स यांच्या नेतृत्वाखाली कार्यरत होते. यांच्या सोबतीला यशवंतरावांचा शक्तिशाली तोफखानाही असायचा.

5 आक्टोबर 1802 रोजी यशवंतराव होळकर यांचा सरदार शाहमतखानच्या नेतृत्वाखाली शिंद्याच्या फौजावर नारायणगाव येथे आक्रमण करण्यात आले यशवंतरावांच्या सैनिकांनी शिंद्याच्या फौजांना युध्दामध्ये तुडवले होते व त्यांच्या तोफा हस्तगत करण्यात आल्यामुळे शिंद्याच्या सैनिकांना माघारी पळुन जात असता त्याचवेळी यशवंतराव होळकर हे युध्दात उतरल्याने घनघोर युध्द झालेले पहावयास मिळते. यशवंतरावांच्या उपस्थितीत हे युध्द दोन दिवस चालले. या युध्दामध्ये यशवंतरावांनी वीरता पूर्वक कामगीरी केलेली पहावयास मिळेल. या युध्दामध्ये यशवंतरावांचा सरदार शाहमतखान जखमी झाला. शिंद्याच्या सैन्याचे मोठ्या प्रमाणात नुकसान झाले. यशवंतरावांचाही घोडा या युध्दामध्ये जखमी झाला. यशवंतरावांच्या पगडी व अंगरखावर छर्रे

लागले होते. सुदैवाने यशवंतराव जखमी झाले नाहीत यशवंतराव होळकर यांची एक सवय ही प्रामुख्याने होती ती सवय म्हणजे कोणत्याही युध्दामध्ये रणांगणावर असताना प्रथम शत्रुच्या गोटामध्ये आक्रमकपणे हल्ला करीत शत्रुच्या गोटामध्ये एकटे तीव्रतेने आत जात व स्वत:च्या जीवाची पर्वान करता शत्रुच्या सैन्याला कापुन काढत असे त्यामुळे त्यांच्या सैन्याचा आत्मविश्वास वाढे आणि शत्रुवर यशवंतरावांचे सैन्य तुटून पडत होते. त्यामुळे प्रत्येक युध्दात यशवंतरावांचा सहभाग असल्याने त्यांच्या सैन्याचे मनोबल वाढुन शत्रुवर विजय मिळवीत.

## 6.14 **बारामतीचे युध्द** (8 **आक्टोबर** 1802) :-

यशवंतराव होळकर यांचे सैन्य जसजसे पुण्याच्या जवळ येत आहे तसे पेशव्यांचे सरदार आणि यशवंतरावांच्या सरदारामध्ये संघर्षाला सुरुवात झाली.[15] यशवंतरावांचा सरदार फतेहसिंह माने हा सामर्थ्यशाली सेनापतीमध्ये त्याची गणना करण्यात येते. यशवंतरावांच्या सैन्याला रोखण्यासाठी पेशव्यांनी त्रिंबक महिपत उर्फ नाना पुरंदरेच्या नेतृत्वाखाली पांडोजी कुंजर, गणपतराव पानसे, मालोजी घोरपडे इत्यादीना पाठविण्यात आले होते, नाना पुंरपरे सैन्य घेऊन बारामतीच्या जवळ 7 मैल अंतरावर पश्चिमेला असणाऱ्या जळगाव परिसरात थांबले होते. फतेहसिंह माने यावेळी मेडद गावाजवळ होते. यशवंतराव होळकर यांनी फतेहसिंह मानेला युध्दाला सुरुवात करण्यापूर्वी आज्ञा केली होती की जोपर्यंत समोरुन 50 तोफांचे गोळे डागले जात नाहीत. तो पर्यंत प्रत्युत्तर द्यावयाचे नाही. येथे यशवंतरावांची मराठेशाही बद्दल असणारी निष्ठा लक्षात येईल. ज्यावेळी समोरुन 50 तोफगोळे डागुन झाल्यास फतेहसिंह माने यांनी नाना पुरंदरे यांच्या सैन्यावर तोफा द्वारे हल्ला करण्यास सुरुवात केली. फतेहसिंह माने आपल्या घोडदळासह आक्रमकपणे पुरंदरेच्या सैन्यावर तुडुन पडले. त्यामुळे पुरंदरचे सैन्य विखुरले गेल्याने या सैनिकांनी रणांगणातुन पळकाढला. सर्वात अगोदर पांडोजी कुंजर हा पळाला या युध्दामध्ये पुरंदरेच्या सैन्यातील मालोजी घोरपडे या सरदाराने आपल्या पराक्रमाचा परिचय या युध्दात करुन दिला परंतु तो जास्त वेळ टिकु शकला नाही. सोबती रणांगण सोडुन जात आहेत. त्यावेळी एकाकी सरदार काय करु शकतो. मालोजी घोरपडे या युध्दात जखमी झाल. गणपत पानसे यांच्या तोफा व अन्य साधन सामग्री फतेहसिंह माने यांनी जप्त केली.[16] युध्द संपताच फतेहसिंह माने यांनी मराठेशाहीचा असणारा जरीपटका याला मानवंदना देऊन नाना पुरंदरे सासवडला पळुन गेला होता. त्यांच्याकडे दोन दिवसामध्ये सन्मानाने ध्वज पाठवून देण्यात आला. मालोजी घोरपडे युध्दात जखमी झाला असता

त्यास आपल्या छावणी मध्ये आणुन इलाज करुन पालखीमध्ये बसवुन सन्मानाने परत पाठविण्यात आले. असे उदाहरण इतिहासामध्ये क्वचित घडले असेल शत्रुच्या विरुध्द रणांगणात लढुन जखमी झालेल्या सरदारास सन्मानाने त्यावर इलाज करावा आणि परत पाठवावे ध्वजाचा अवमान न करता सन्मानपूर्वक परत पाठवावा ही आपल्या नेतृत्वाने दिलेल्या शिस्तीचे, आज्ञेचे, निष्ठा, प्रामाणिकपणा व यशवंतराव होळकर सारख्या नेतृत्वाबद्दल असणारे निस्सीम प्रेम यामुळेच हे सर्व घडु शकते ते यशवंतराव होळकर यांच्या युध्द नेतृत्व, युध्दकौशल्या चा विजय म्हणावा लागेल. जे त्यांच्याकडे असणाऱ्या सरदारांच्या माध्यामातून दिसुन येतो.

## 6.15 **हडपसरचे युध्द** (25 **आक्टोबर** 1802) :-

### 6.15.1 **पार्श्वभूमी** :-

इ.स. 1802 हे वर्ष दक्षिण हिंदुस्थानात यशवंतराव होळकर यांचे वर्ष म्हणून ओळखल्या गेले यशवंतरावांसमोर दोन प्रमुख उद्दिष्टये होती.[17] यशवंतराव होळकर यांना पुण्याकडे स्वारी घेऊन येण्याची कारणे वेगळी होती. परंतु परिणामा विषयीच जास्त चर्चा झालेली पहावयास मिळते. त्यांचा पुण्याच्या रोखाने येण्याचा मानस हा होता की होळकरशाहीच्या वारसा बाबतीत पेशव्यांकडून न्याय मिळविणे आपला पुतण्या खंडेराव याची दौलतरावाच्या ताब्यातुन सुटका करणे या कारणासाठी पेशव्यांकडे न्यायमागण्यासाठी यशवंतराव होळकर पुण्याकडे येण्यासाठी निघाले असता त्यांनी तापी नदीच्या काठी खानदेशात थालनेर या ठिकाणी प्रमुख लष्करी केंद्र स्थापीत केलेले पहावयास मिळते. या लष्करी केंद्रातुनच यशवंतराव होळकर यांच्या सरदारांना पुण्याच्या दिशेने कोण कशा पध्दतीने जावयाचे यांचे नियोजन आपल्या सरदारांना यशवंतरावांनी दिलेले होते. यशवंतराव पुण्याच्या दिशेने येत असता त्यांनी 23 आक्टोबर 1802 रोजी बारामतीहुन यशवंतराव होळकरांनी पेशव्यांना पत्र लिहीले.[18] तुम्ही मालक आहात तेंव्हा तुमच्या विरुध्द हात उचलण्याची माझी मुळीच इच्छा नाही. शिंद्या बरोबरच्या माझ्या झगड्यात तुम्ही योग्य व सलोख्याचा निवाडा दिला तर ते तुम्हाला भूषणावह ठरेल. मराठीराज्य बळकाविण्यासाठी इंग्रज दाराशी टपुन बसले आहेत. शिंदे होळकरांनी परस्परांच्या सहकार्याने व नेकीने सेवा केली तर ते टाळता येईल. निरुपयोगी काथ्याकुट करण्यात फुकट वेळ घालविण्यास माझ्याकडे वेळ नाही. आणि स्वबळावर अनुकूल निकाल मिळविण्याचा माझा निर्धार आहे. समोपचाराने हा तंटा मिटविण्याची मी तुम्हाला ही अखेरची संधी

देतो आहे. रक्तपात टाळावा अशी तुमची इच्छा असल्यास तुमच्या तर्फे बाळोजी कुंजर, दाजीबा देशमुख आणि शिंद्या तर्फे बाबुराव आंग्रे व निंबाजी भास्कर यांना शर्ती ठरविण्यासाठी माझ्याकडे धाडावे. हेच लोक फक्त जबाबदारीने बोलु शकतात निर्णयाप्रत येऊ शकतात. दुसऱ्या कोणाशी मी बोलणार नाही ही मध्यस्थ मंडळी आली नाही आणि शस्त्राने निर्णय ठरविणे माझ्यावर लादले गेले तर तुम्ही सर्वस्वी तटस्थ राहावे अशी मी मागणी करतो, मी फक्त शिंद्याच्याच माणसांशी झुंजेन होणारा करार शिंद्याला प्रतिकुल असला तरी तुम्ही पुणे सोडून जाऊ नये मी तुमचा शिंद्या इतकाच निष्ठावान चाकर आहे.[19] माझे भांडण शिंद्याशी असुन ते माझ्या मार्गाने मिटविण्याची माझी सिध्दता आहे. त्याच्या हातातले बाहुले बनुन तुम्ही राज्याचे नुकसान करता आहात इंग्रज बाहेर वाट पहात उभे आहेत. तुम्ही मालका सारखे वागा मला चाकरा सारखे वागु द्या.

पाराशर दादाजी पेशव्यांना म्हणतात.[20] गेल्या चार महिन्या पासुन आम्ही न्याय मागण्या करिता ठाण मांडून बसलेलो आहोत तुम्ही होळकरांच्या बाबतीत कोणताच निर्णय घेतलेला नाही. आम्ही किती दिवस सहन करणार अशा पध्दतीने त्यांनी पेशव्यांना उद्देशुन बोलत होते. वारंवार विनंत्या करुन ही पेशवे दखल घेत नाही हे यशवंतरावांच्या लक्षात येताच नाईलाजाने पुण्याकडे त्यांनी कुचकेले. तत्पुर्वी यशवंतराव होळकर थालनेर लष्करी छावणी पासून हडपसर पर्यंत येण्यासाठी यशवंतरावांनी कमालीची व्युहरचना आखलेली पहावयास मिळते.

यशवंतराव होळकर यांची व्युहरचना.[21] थालनेर पासुन यशवंतरावांनी निघण्यापूर्वी आपल्या सैन्याची तीन विभागा मध्ये विभागणी केली १) प्रथम विभाग - घोडदळाचे नेतृत्व शहामतखान २) दुसरा विभाग - फतेहसिंह माने ३) तिसऱ्या विभागाचे नेतृत्व स्वत: यशवंतराव होळकर यांनी केले शहामतखान आणि फतेहसिंह माने या दोन सरदारांना आक्रमक व गतिमानतेने हालचाली करता याव्यात यासाठी यशवंतरावांनी मोठ्या प्रमाणात घोडदळाचा पुरवठा करण्यात आला. 4 मे रोजी यशवंतराव होळकर आणि त्यांच्या सैन्यदलाने थालनेर जवळील लष्करी छावणी सोडून पुण्याच्या दिशेने प्रस्थान केलेले आढळुन येते. यशवंतराव होळकर यांच्या व्युहरचने ठरवून दिलेल्या मार्गानुसार सरदारांनी कुचकेले यात शहामतखान नाशिक प्रांतामध्ये गेला तर फतेहसिंहमाने अहमद नगर भागाकडे गेला. त्यावेळी यशवंतरावांनी आपल्या सरदारांना वेगवेगळ्या मार्गाने पाठवून दिल्यावर काहीकाळ यशवंतराव हे धुळे जळगाव परिसरात राहिले होते.

शहामतखान हा नाशिक प्रांताला तुडवून सिन्नर जवळ येऊन थांबला. त्याचवेळी यशवंतराव होळकर हे संगमनेर या ठिकाणी येऊन पोहचले होते. यशवंतराव संगमनेर या ठिकाणी येऊन थांबण्याचे कारण म्हणजे, नाशिक व नगर हे दोन्ही प्रांत सारख्याच अंतरावर होते. जर एखाद्या वेळी शहामतखान किंवा फतेहसिंह माने यास जर मदतीची आवश्यकता पडली तर त्यांना सहकार्य करण्यासाठी तात्काळ जाता यावे यासाठी यशवंतराव होळकर हे दोन्ही सरदारांच्या मध्ये समांतरपणे चालत होते. हा त्या पाठीमागचा उद्देश या ठिकाणी यशवंतरावांचा दिसुन येईल. त्यावेळी दौलत राव शिद्यांच्या व अन्य मराठा सरदारांचे सैन्यदल हे एकत्रित येवून यशवंतरावांच्या सैन्यावर आक्रमण करण्याच्या तयारीत होते त्यामुळे यशवंतरावांनी आपल्या सैन्यदलास यांच्या विरुध्द युध्द करावे लागु नये यशवंतरावांच्या व्युहरचने मागील हेतू स्पष्ट होतो. पुढे चालून शहामतखान हा नाशिक, सिन्नर, राहुरी, ओलांडून फतेहसिंह माने यास सामील झाला. कारण एक मार्ग हा शत्रु पासून मोकळा झालेला होता. त्याचबरोबर अहमदनगर ते पेडगाव पर्यंतचा सर्व प्रदेश यशवंतरावांच्या आखत्यारित आलेला होता. पावसाळ्याचे दिवस असल्याने फतेहसिंह माने व शहामतखान यास दौंड जवळ लष्करी छावणी लावून एक महिना त्या ठिकाणी थांबावे लागले कारण भीमानदीला पावसाळ्याचे दिवस आसल्याने पाणी जास्त होते. त्यामुळे या दोन्ही सरदारांना नदी ओलांडता येणे शक्य नव्हते.

21 ऑगस्ट रोजीच्या मध्यरात्री यशवंतरावांच्या पेंढारी सैनिकांनी नावे मध्ये बसून भीमा नदी भर पुरामध्ये ओलांडून किनाऱ्यावर आले. या पेंढारी सैन्याला पांडोजी कुंजरच्या सैन्याशी लढावे लागले नाही. परंतु यशवंतरावांचे सैन्य त्यांच्या लष्करी छावणी गारदौंडवरून त्यांना परत पाटस या ठिकाणी येवून थांबावे लागले. यशवंतरावांना पेशव्या बरोबर युध्द करावयाचे नव्हते. त्यांची इच्छाही नव्हती. तो पर्यंत यशवंतराव होळकर संगमनेर येथे पोहचले होते.

यशवंतरावांची युध्द योजना.[22] यशवंतरावांच्या सैनिकांना मार्ग रोखून धरण्यासाठी शिंद्याची फौज सज्ज होती त्यामुळे यशवंतरावांना याचा अंदाज आला होता. यशवंतराव होळकरांचा सरदार हा त्यावेळी पंढरपूर येथे होता त्याने त्या दिशेने पुण्याकडे कुच करावे आणि जेजुरीला येऊन थांबावे आणि पुण्यावर दबाव निर्माण करावा तर दुसरा सरदार शहामतखान याने जुन्नरच्या प्रांतात शिरावे व शहामतखान हा पुण्याजवळील गणेशखिंडी पर्यंत येऊन पोहचला होता व परत यशवंतराव होळकर यांना येऊनच सामील झालेला पहायला मिळे. अशा पध्दतीने यशवंतरावांनी पुण्यावर दोन्ही बाजूने

आक्रमण करण्यासाठीची युध्द योजना आखण्यात आली होती. कालांतराने यशवंतरावांचा सरदार फतेहसिंह माने याने मोरगाव या ठिकाणी आपली लष्करी छावणी टाकली याठिकाणी यशवंतराव हे फतेसिंह माने यास येऊन सामील झाले याकाळामध्ये फतेहसिंह माने आजारी पडल्याने यशवंतरावांनी सर्व लष्करी हालचाली करण्याच्या थांबविण्यात आल्या थोड्या कालावधीनंतर त्यांनी आपल्या लष्कराची छावणी जेजुरी पासून 3 मैल अंतरावर स्थापीत केली.

शेवटचा प्रयत्न म्हणून यशवंतराव होळकर यांनी पेशव्यांना पत्र पाठवले आपल्याला आद्यापही पेशव्यांकडुन न्यायाची आपेक्षा असुन शिंदे - होळकर यांच्यात सन्माननीय तोडगा काढण्यात यावा दोघांना बरोबरीचा सन्मान पेशव्यांनी द्यावा. याबाबतीत चर्चा करण्यासाठी व तोडगा काढण्यासाठी पेशव्यांनी प्रथम दर्जाच्या बाळोजी कुंजर, लिंबाजी भास्कर प्रतिनिधींना चर्चेसाठी पाठवावे" अशा प्रकारचे पत्र यशवंतरावांनी पेशव्यांना पाठवले होते. हे पत्र पेशव्यांना 23 आक्टोबर 1802 रोजी प्राप्त झालेले दिसते. परंतु ज्या प्रतिनिधीना पाठविण्यासंबंधी सांगितले होते. ते न पाठविता कमी दर्जाचे प्रतिनिधी पेशव्यांनी पाठवले होते त्यास यशवंतरावांनी भेटण्याचे नाकारले पेशवा याठिकाणी मनुष्य स्वभावाचे आकलन करण्यास कमी पडलेला दिसुन येईल. यशवंतराव होळकर यांची लष्करी शक्ती आणि नेतृत्वाचा विचार करता असे लक्षात येईल की त्यांनी जर ठरवले असते तर पेशव्यांच्या सैनिकांना त्यांनी युध्दात कापुन काढले असते. परंतु मराठेशाहीशी असलेली निष्ठा, प्रामाणिकपणा हा दिसुन येतो. यशवंतरावांनी शेवटच्या क्षणा पर्यंत पेशव्यांची विनंती समेट घडवून आणण्यासाठी प्रयत्न केले हे लक्षात घेण्यासारखे आहे.

बाजीराव पेशव्यांनी यशवंतराव होळकरांच्या पहिल्या पासुन असणाऱ्या मागण्या ह्या दौलतराव शिंद्यांनी होळकरांचा वारस खंडेराव, यशवंतरावांची आई यमुनाबाई, पत्नी लाडाबाई, मुलगी भीमाबाई इत्यादी शिंद्यांच्या कैदेमध्ये गेली सात वर्षे होती. त्यांची सुटका करण्यासाठी पेशव्यांच्या माध्यामातून यशवंतरावांनी विनंत्या चालवल्या होत्या कारण पेशवे हे मराठेशाहीचे प्रमुख होत. दौलतराव शिंद्यानी अकारण अपराध केलेले होते दुसऱ्या मल्हारावांचा खुन, होळकरांचे राज्य आपल्या घशात घालण्याचा प्रयत्न करणे व पेशव्यांच्या माध्यमातून होळकरांच्या राज्यावर जप्ती आणण्याचे प्रयत्न करणे, काशीराव होळकरास अकारण झुलवत ठेवणे इत्यादी अपराध शिंद्यानी केले होते. तरीही यशवंतरावांनी पेशव्यांकडे शेवटी विनंती करुनही काही प्रतिसाद मिळत

नाही. तेव्हा शिंद्याच्या विरुध्द युध्द करणे अटळ झाले आहे. त्या दृष्टीने यशवंतरावांनी हडपसरचे रणांगण गाठले.

### 6.15.2 **प्रत्यक्ष हडपसर चे युध्द :-**

25 आक्टोबर 1802 रोजी रविवार आणि दिवाळीच्या सण होता.[23]

- "बेनोवरी" या ठिकाणाहुन शिंद्याचे सैन्य कुचकरुन हडपसरच्या रणांगणात येऊन उभे राहीले.
- यशवंतराव होळकर हे आपल्या सैन्यदलासह कंवडी या ठिकाणाहुन कुचकरुन हडपसरच्या रणांगणात शिंद्याच्या सैन्या समोर येऊन उभे राहीले.
- घोरपडी-वानवडी- हडपसर या तिन्ही गावांच्या मैदाना वर हे युध्द लढले गेले.

### 6.15.3 **यशवंतराव होळकर यांची सैन्य संख्या :-**

यशवंतराव होळकर यांची सैन्य संख्या ही १ लाख ४४ हजार (यामध्ये घोडदळ, पायदळ, तोफखाना, बंदुकधारीदळ) होती.

1) आमीरखान – पठाण घोडदळ प्रमुख 2) कर्नल हार्डिज – ४ बटालियन्स

3) कर्नल विकर्स – ५ बटालियन 4) डोड- ३ बटालियन 5) आर्म स्ट्रॉंग -4 बटालियन

6) सरदार फतेहसिंह माने च्या नेतृत्वाखाली :- बंदुकधारी दळ, वैयक्तिक घोडदळ

7) शाहमत खानाकडे- पायदळ पठाण सैन्य होते. या सर्वांसोबत यशवंतरावांचा देशी रिसाला होता.

8) रोहीले, बंगश सैन्यदल 9) यशवंतरावांची खांडे फौज 10) नागो शिवाजी शेनवीच्या नेतृत्वाखाली दक्षिण सेना 11) भवानी शंकर बक्षीच्या नेतृत्वाखाली – हिंदुस्तानी सैन्यदल

12) स्वत: यशवंतराव हे एका डोंगरावरुन हडपसरच्या रणांगणावर उभ्या असणाऱ्या सैन्याचे निरीक्षण करित होते. 13) यशवंतरावांच्या चारही बाजुला हुजरात हे सैनिक उभारलेले होते.

14) यावेळी यशवंतरावांच्या जवळ तोफा 100 होत्या.

*** यशवंतरावांची जमेची बाजु :-**

1. प्रत्येक सैनिक मग तो पठाण, पेंढारी, हिंदु, मुसलमान असो प्रत्येकाला आपल्या सेनापतीवर विश्वास होता.
2. प्रत्येक युध्दात शिपाया प्रमाणे त्यांचा सेनापती त्यांच्या खांद्याला खांदा लावुन लढत असे त्यामुळे शिपाया मध्ये व सेनापतीत मित्रत्वाची भावना निर्माण झाली होती.
3. युध्दात प्रत्येक सैनिक हा आक्रमकपणे जीवाची पर्वान करता शत्रुसैन्यावर हल्ला करी.

*** दौलतराव शिंद्याची सैन्य संख्या :**

1. 125000 (घोडदळ, पायदळ, विलायती कंपू).[24]
2. भाडोत्री पेंढारी सैनिक
3. पेशव्यांचे सैन्य-4 बटालियन 6000 रिसाला

### 6.15.4 दौलतराव शिंद्याचे सरदार :-

सदाशिवराव भास्कर बक्षी याच्या नेतृत्वाखाली शिंद्याचे सैन्य हडपसरच्या युध्दात उभारले होते. यांच्या साथीला, १) समरलँडची ४ बटालियन सोबत कॅप्टन 2) डेण्ज कॅप्टन डग्लस 3) मोंशियर होनोर इत्यादी होते 4) अंबाजी इंगळे – कुल्ब अलीखानच्या नेतृत्वाखाली 7 बटालियन

### 6.15.5 युध्दाला सुरुवात :-

सकाळी दोन तास आपण वाट पाहु आणि शत्रुने हल्ला केल्या नंतरच आपण लढाईला प्रारंभ करु असे यशवंतराव होळकर यांनी जाहीर केले होते.[25] यशवंतरावांनी युध्दाच्या मैदाना वर सुदधा शेवट पर्यंत पेशवे माझ्या मागण्या मान्य करतील परंतु नियतीला ते मान्य नव्हते यशवंतरावांनी आपल्या प्रामाणिक, निष्ठेचे दाखले रणक्षेत्रात युध्द काही तासावर चालु होण्या पर्यंत वाट पाहिली त्याचा काहीही उपयोग झाला नाही. युध्दाला प्रत्यक्ष सुरुवात सकाळी 9 वाजता झाली प्रथम शिंद्याच्या तोफखानाद्वारे तोफ गोळे डागण्यास सुरुवात झाली.

### 6.15.6 तोफाद्वारे युध्दाला सुरुवात :-

यशवंतराव होळकर तोफखानाद्वारे गोळाबारी करण्याची तयारी करीत असता.[26] यशवंतरावांनी आदेश दिला की जोपर्यंत समोरुन 25 तोफगोळे डागले जात नाहीत तो पर्यंत आपण युध्दाला सुरुवात करावयाची नाही कारण **"पेशव्यांचा ध्वज हा माझ्या मालकाचे प्रतिक आहे."** त्यामुळे त्याचा मान ठेवून प्रथम आपल्या कडुन युध्दाला सुरुवात करावयाची नाही. हे यशवंतरावांची भावना होती. मराठेशाही बद्दल असणारी, आस्था, निष्ठा ही यशवंतरावांच्या कार्यकर्तृत्व आणि आपल्या सैनिकांना केलेल्या आव्हानातुन स्पटपणे दिसुन येते.

समोरुन 25 तोफ गोळे डागल्यानंतर यशवंतराव होळकर यांनी आपल्या सैन्याला युध्द करण्याची आज्ञा देण्यात आली. त्यांचा तोफखाना आक्रमकतेने, गतिमानतेने शत्रुच्या सैन्यावर तोफगोळे टाकण्यास सुरुवात केली. दोन्ही बाजुने तोफांद्वारे युध्द चालु झाले. तब्बल ३ तास तोफा दोन्ही कडील चालु होत्या. या तीन तासा मध्ये मोठ्या प्रमाणात दोन्ही बाजूने तोफ गोळे एकमेकांवर टाकण्यात आले. त्यानंतर दोन्ही सैन्यदले एकमेकांच्या विरुध्द हडपसरच्या युध्दभूमीमध्ये भिडले.

### 6.15.7 यशवंतरावांचे निरीक्षण आणि कृती :-

शिंद्याच्या तोफांनी यशवंतरावांच्या सैन्याला मोठ्या प्रमाणात नुकसान पोहचवले होते. युध्दभूमीवर डी बोईन व सदाशिवराव भास्करने कढवी झुंज यशवंतरावांच्या सैन्याला दिली. आमीरखान हा शिंद्याच्या गराड्यात सापडल्याने कर्नल हार्डिंग हा आपल्या सैन्यासह पुढे येवून आमीरखानाला युध्दात सहकार्य केल्याने व तो स्वत: सुरक्षित झाल्याने, कुल्बअली खानाच्या सैन्याला या दोघांनी हादरुन सोडवले व त्याच्या सैन्यावर तुटुन पडले. आतापर्यंत युध्दभूमीवर चालणाऱ्या आपल्या व शत्रुच्या सैन्याचे निरीक्षण यशवंतराव करत होते. परंतु शिंद्याच्या तोफांचा मारा आपल्या सैन्याला जास्त बसत आहे. त्यावेळी त्यांनी आपल्या सोबत असणाऱ्या सैनिकांसह युध्दात उतरले आणि प्रथम गतिमानतेने शिंदेच्या तोफांवर हल्ला करुन शिंद्याच्या तोफांच्या तोंडे शिंद्याच्याच सैन्याकडे फिरवून शिंद्याच्या सैन्यावर तोफ गोळे टाकण्यास सुरुवात केली व त्यांचा तोफखाना बंद पडला या तोफखान्याच्या पाठीमागे असणारा कुल्ब अलीखानावर घोडदलाद्वारे आक्रमकतेने हल्ला केला. युध्दात ज्या ठिकाणी घमासान युध्द चालु होते त्या ठिकाणी यशवंतराव गतिमानतेने घुसून शत्रु सैन्याला कापुन काढील. त्यांच्या सोबत त्यांचे सरदारही शत्रु सैन्यावर तुटन

पडले. या युध्दात कुल्बअली यशवंतरावांच्या माऱ्यामध्ये ठार झाला. यशवंतराव होळकर असे व्यक्ती होते. जो पराभव जवळ दिसत असताना सुध्दा या पराभवाला विजयामध्ये बदलण्याची ताकद त्यांच्यामध्ये होती, त्यांनी आपल्या रणांगणा वरील सैन्याचे निरीक्षण करुन आपल सैन्य कुठे कमकुवत होत आहे. त्यांना कशा पध्दतीने सहकार्य करावे. शत्रुसैन्याची ताकद कशात आहे. यासर्व घटकाचे निरीक्षण करुन त्यादृष्टीने कृती करण्यास युध्दाच्याभूमीमध्ये उतरत व शत्रुसैन्याला सळोकी पळो करुन सोडीत हे त्यांचे युध्दातील युध्द कौशल्याचे गुण दिसुन येतात. व त्या दृष्टीने युध्द योजना आखुन आपल्या सैन्याची व स्वत: कृती करताना दिसतात.

### 6.15.8 **यशवंतरावांचा आक्रमक हल्ला :-**

यशवंतराव होळकर यांनी शिंद्याच्या सैन्यावर गतिमानतेने हल्ला चढवला.[27] हा हल्ला एवढा प्रखर होता की शिंद्याच्या सैन्याला सहन झाला नाही. यशवंतरावांची युध्दनितीच अशी असायची की प्रत्येक युध्दात ते आक्रमकपणे, जलदगतीने शत्रुच्या सैन्यात घुसुन त्यांना कापित असत त्यामुळे शत्रु सैन्याची एक संघ शक्ति दुभंगली जायची हे सैन्य विखुरल्याने त्यांची शक्ती कमकुवत होत त्यावेळी हे सैन्य रणांगणातुन दिसेल त्या दिशेने सैरावैरा पळत सुटायचे पळुन जाणाऱ्या शत्रु सैन्याला घेराव घालुन हल्ला करावयाचे त्यांच्या लष्करी छावण्यांना लुटायचे. युध्दाच्या दरम्यान शत्रुच्या शस्त्रास्त्र पुरवठा व्यवस्थेवर हल्ला करायचा त्यांची शस्त्रास्त्रे हिसकावुन घ्यावयाची, शिंद्याच्या सैन्यांनी या युध्दात बैलगाड्या भरुन तोफांसाठी लागणारा दारुगोळा आणुन ठेवला होता. तो दारुगोळा यशवंतरावांनी आपल्या तोफा द्वारे उध्दवस्त केला जेणे करुन शिंद्याचा तोफखाना हा बंद पडेल.

यशवंतराव होळकर यांचे या युध्दातील युध्द नेतृत्व, कार्यकर्तृत्व, युध्द योजना, रणनिती, त्यांचे शौर्य, पराक्रम पाहुन पेशव्यांचे सैन्य भयभीत झाले होते. शेवटी त्यांनी हडपसरच्या रणांगणा मधून पळ काढला. त्यांच्यात एवढी क्षमता नव्हती की यशवंतरावांच्या सैन्या विरुध्द लढा देतील. यशवंतराव होळकर ज्या ज्या वेळी शत्रुच्या विरुध्द युध्दात उतरले. त्या त्या वेळी त्यांच्या सैन्यात उत्साह संचारलेला असायचा एक प्रकारे यशवंतरावांच्या सैन्याला युध्दात लढण्यासाठी ऊर्जा मिळत असे. शत्रुच्या विरुध्द जीवाची बाजीलावून लढायचे.

**6.15.9 यशवंतरावांना विजय हा युध्द कौशल्याच्या गुणांवर मिळाला :-**

यशवंतराव होळकर यांनी या युध्दामध्ये व्यक्तीगत पराक्रम करुन.[28] युध्दात स्वत:चा पराभव होण्यापासून आपल्या सैन्याला वाचवले आणि विजय संपादन केला हडपसरच्या युध्दात शिंद्याचे घोडदळ तर पळत सुटले होते. पायदळ सैन्य कसे बसे आपला जीव वाचविण्याचा प्रयत्न करत मागे सरकत राहिले, पेशव्यांची हुजुरात तर कधीच युध्दाच्या मैदानातून गायब झालेली होती.

1. शिंद्यांचे 4 पैकी 3 युरोपियन अधिकारी युध्दात ठार झाले.
2. यशवंतरावांचा सरदार फतेहसिंहमाने याने शिंद्याच्या पळुन जाणाऱ्या घोडदळाचा पाठलाग करुन त्यांची वाताहत केली.
3. हडपसरच्या युध्दात शिंद्याचे सैन्य 6000 ठार झाले. 400 सैन्य जखमी झाले.
4. शिंद्याचे सरदार, सदाशिव भास्कर बक्षी, कुल्ब अली खान कॅप्टन डेव्ज, कॅप्टन केटस, कॅप्टन डगलस, इत्यादी सरदार आणि युरोपियन सैन्य अधिकारी व हजारो सैन्य या युध्दात ठार झाले एका युरोपियन सैन्य अधिकाऱ्याने मौंशियर होनोरे याने यशवंतराव होळकर यांच्यापुढे आत्मसमर्पण केले.
5. शिंद्याच्या बटालियन ह्या नष्ट झाल्या त्यांचा तोफखाना व युध्द साधन सामग्री रसद पुरवठा इत्यादी यशवंतरावांच्या सैनिकांनी हस्तगत केले.

यशवंतराव होळकरांच्या सैन्याचे नुकसान या युध्दामध्ये एक तृतीयांश एवढे (1600) सैनिक मारले गेले. कर्नल हार्डिज या युध्दात तोफ गोळा लागल्याने त्याचा मृत्यू झाला. व कर्नल विकर्स आणि अन्य सैन्यदलातील सैनिक जखमी झाले. हडपसरच्या युध्दामध्ये यशवंतराव होळकर यांचा संपूर्ण विजय झालेला पहायला मिळतो. गो.स. सरदेसाई युध्दाबद्दल लिहीतात की, या घनघोर युध्दामध्ये यशवंतराव होळकर हा निर्भय पणे प्रत्येक स्थानावर जात असे. युध्द क्षेत्राचे निरीक्षण करत आणि आपल्या सैनिकांना मार्गदर्शन करत असे. त्यांच्या दृष्टिकोनातून सैन्यामध्ये अस्थिरता दिसुन आली की, लागलीच त्यास थांबवून त्यावर उपाय योजना युध्दाच्या रणांगणात करत युध्दातील विजय मिळविण्यासाठी लागणारी जिद्द, चिकाटी, सातत्य, युध्द नेतृत्व, युध्द डावपेच, रणनिती, युध्दातील उद्दिष्टये, याच्यावर यशवंतरावांची युध्दातील यशस्वीता ही त्यांच्या जीवनातील उत्कृष्ट उपलब्धी आहे असे म्हणावे लागेल.

### 6.15.10 **यशवंतरावांची शिस्त** :-

यशवंतराव होळकर यांनी हडपसरच्या युध्दामध्ये शिंद्याच्या सैन्याचा पराभव केल्यानंतर यशवंतराव होळकरांनी पुण्यामध्ये प्रवेश केला.[29] त्यावेळी पुण्यातील नागरीकांनी असा विचार केला की, युध्दात कोणीही जिंकु पण लुट आपलीच होणार असा समज पुण्यातील नागरिकांचा झाला होता. परंतु ज्यावेळी यशवंतरावांनी पुण्यात प्रवेश केला त्यावेळी त्यांनी आपल्या सरदार, सैनिकांना चेतावणी दिली की, कोणताही सैनिक पुण्यामध्ये कुणाचीही लुट करणार नाही जर कोणी लुटण्याचा प्रयत्न केला तर त्याचे तुकडे-तुकडे करण्यात येतील. त्यांच्या या चेतावणी मुळे यशवंतरावांच्या कोणत्याही सैन्य अधिकारी, सैनिकांनी पुण्यामध्ये कुणालाही लुटले नाही हे सर्व यशवंतरावांच्या कडक शिस्तीमुळे झालेले पहावयास मिळेल. त्याच बरोबर त्यांनी वरील दिलेल्या चेतावणीमुळे त्यांचा मराठेशाही बद्दलचा आदर, सन्मान हा पहायला मिळतो.

एक लुटालुट करणारा गावठा शिपाई जी प्रतिमा बाजीराव पेशव्यांच्या दरबारामध्ये त्यांच्या खुषमस्कऱ्यांनी यशवंतराव होळकर यांची निर्माण केली होती.[30] ती यशवंतराव होळकर यांची प्रतिमा, कुठल्या कुठं वाहुन गेली एक झुंजार, लढवय्या सेनापती म्हणून सगळे जण यशवंतरावांना ओळखु लागले होते. यशवंतरावांची प्रतिमा ह्या युध्दात उजळून निघाली, इंग्रजांना मराठेशाही मध्ये पुढे चालुन यशवंतरावांशी युध्द करावे लागते की काय असे वाटणे साहजिक आहे. इंग्रजांना आपल्या स्वप्नातील भारत हा साम्राज्य विस्ताराच्या दृष्टीने करावयाचा आहे. त्याच्या आड भविष्यात हा मराठेशाहीतील मराठा सरदार यशवंतराव होळकर अडचणीचा ठरु शकेल असे त्यांना वाटले सुध्दा नसेल. यशवंतरावांनी पुणे सोडण्याचा निर्णय घेतला.[31] इंग्रजांच्या विरुध्द लढण्यासाठी मराठेशाहीतील मराठा सरदारामध्ये एकी होत नाही, शिंदे व भोसले यांनी याबाबतीत आपली भूमिका स्पष्टपणे मांडली नाही. इंग्रजांच्या विरुध्द आपल्याला लढावे लागेल. त्यासाठी यशवंतरावांनी पुणे सोडण्याचा निर्णय घेतला आणि उत्तरेकडे परत आपला प्रवास चालु केलेला पहायला मिळतो.

### 6.16 **बुंदेल खंडचे युध्द** (22 **मे** 1804) :-

16 एप्रिल 1804 रोजी वेलस्लीने यशवंतराव होळकर यांच्या विरुध्द युध्द करण्याचे आपल्या प्रत्येक प्रांतातील रेसिडेंट यास व सैन्य अधिकाऱ्यास सांगितले होते.[32] इंग्रजांनी युध्दाला

सुरुवात करण्यापूर्वी प्रत्यक्ष यशवंतराव होळकर यांनी इंग्रजांच्या विरुध्द युध्दाला सुरुवात केलेली पहावयास मिळते. यशवंतराव होळकर हे इंग्रजांच्या विरुध्द युध्दकरण्यासाठी आपल्या लष्कराला तयारीतच ठेवले होते. लॉर्ड लेक हा बुंदेलखंडात आपल्या सैन्यासह उपस्थित होता. बुंदेल खंडातील स्थानिक सरदारांवर दबाव आणून इंग्रजा बरोबर करार करण्यासाठी लॉर्ड लेक प्रवृत्त करत होता. त्यावेळी यशवंतराव होळकरास लॉर्ड लेकने अति आत्मविश्वासाने पत्र पाठवले त्या पत्रामध्ये आम्ही तुमची शक्ति संपवण्याचे मन बनवले आहे हा निश्चय करण्यात आला. यशवंतरावांनी इंग्रजांच्या विरुध्द आपले एक सैन्य दल पाठविण्यात आले. यशवंतरावांच्या सैनिकांनी तीव्रगतीने जाऊन कूच नावाच्या ठिकाणावर 21 मे 1804 रोजी कर्नल फॉसेटच्या लष्करी छावणीवर हल्ला करण्याचा निर्णय घेण्यात आला.[33] यशवंतराव होळकर यांनी आमीरखान व 5000 पेंढारी सैन्य घेऊन फॉसेटच्या लष्करी छावणीवर अचानक पणे हल्ला करण्यात आला. फॉसेटच्या दोन बटालियनची यशवंतरावांनी कत्तल केलेली पहायला मिळते. फॉसेटकडे रसद पुरवठा होता तो यशवंतरावांच्या सैनिकांनी लुटून घेतला. त्यावेळी फॉसेट हा यशवंतरावांच्या कृतीला पाहून घाबरुन पळाला तो बेटवालाच जाऊन थांबला यशवंतराव होळकरांचे सैन्य परत जाताना त्यांना तोफा, बंदुका, दारुगोळा व रसद पुरवठा इत्यादी आपल्या सोबत घेऊन गेले.

कर्नल फॉसेट च्या पत्राचे वर्णन, इंग्रजांना आपल्या गुप्तहेराद्वारे आक्रमणाची बातमी समजली होती. त्यास प्रखर विरोध करण्यासाठी कूच येथे सैन्याची जमवाजमव करुन लढण्याची तयारी केली तरीही आमचा युध्दामध्ये एवढा मोठा पराभव झाला. आमचे सगळे सैन्य या युध्दात झालेल्या पराभवामुळे इंग्रजांचा फार मोठा अपमान झाला होता. इंग्रजांच्या विरुध्द यशवंतराव होळकर यांचे पहिले युध्द होते. ही तर फक्त सलामी होती. इंग्रजांचे बलाढ्य सैन्यदल इथुन पुढच्या कालखंडात पळत रहाणार होते. हे यशवंतरावांच्या युध्दनितीवरुन लक्षात येते.

28 मे 1804 रोजी लॉर्ड लेकचे पत्र लॉर्ड लेकने कर्नल फॉसेटच्या अयोग्यते विषयी पत्र लिहीले होते, कर्नल फॉसेट जो कि युध्दाच्या रणांगणापासून दुर अंतरावर 450 गोरे शिपाई आणि 4 बटालियनांसह तळ ठोकलेला होता. परंतु फॉसेटने यशवंतराव होळकर यांच्या सैन्या विरुध्द युध्द लढले नाही. बहुतेक हा यशवंतराव होळकराच्या झंझावाता पुढे भयभीत झाला असेल या कारणामुळे आमचा पराभव झाला आहे. त्यामुळे कर्नल फॉसेटला निलंबीत करण्यात यावे असे लॉर्ड लेकने आपल्या पत्रामध्ये लिहीले होते. यशवंतरावांचा दरारा, त्यांचे लष्करी धोरण,

कार्यकर्तृत्वामुळे फॉसेट हा भयभीत होऊ शकतो असा आरोप त्याच्यावर लॉर्ड लेकने लावला होता. या ठिकाणी यशवंतरावांचे युध्द नेतृत्व इंग्रजांच्या विरुध्द यशस्वी झालेले दिसुन येते.

### 6.16.1 8 जुन 1804 रोजी गर्व्हनर जनरलचे लॉर्ड लेक यास पत्र :-

इंग्रजांच्या पराभवामुळे मोठा अपमान झाला आहे, यासाठी जेवढ्या लवकर होईल तेवढ्या लवकर यशवंतराव होळकरास संपविण्यात यावे यासाठी आम्हाला फार कष्ट घ्यावे लागतील. यशवंतरावांचा इंग्रजांच्या विरुध्द प्रथम विजय झाल्याने इंग्रजांना आपला अपमान झाल्यासारखा वाटत होता. भारतातील संस्थानिकांमध्ये इंग्रजांचे अस्तित्व दरारा जो होता तो बुंदेल खंडाच्या युध्दात यशवंतरावांनी पराभव केल्याने इंग्रजांचे भारतातील साम्राज्यवादी धोरणास अडथळे निर्माण होऊ शकतात. त्यासाठी यशवंतराव होळकरास प्रथम संपवावे लागेल. अशा प्रकारची भावना, विचार इंग्रजांच्या पत्र व्यवहारामध्ये आढळुन येते.

श्री सुंदरलाल लिहीतात की, यशवंतराव होळकराबरोबर इंग्रजांचे ज्या प्रकारचे युध्द झाले होते. त्या प्रकारचे युध्द दौलतराव शिंदे आणि रघुजी भोसले बरोबर यशवंतराव होळकरांचे झालेले युध्द हे केवळ लहान मुलांचा खेळ होता असे संबोधण्यात येते. यशवंतरावांनी यांच्या पेक्षा बलाढ्य सैन्य असणाऱ्या इंग्रजांचा पराभव केला. तेंव्हा हे दोघाजनांसोबतचे युध्द हे बाहुला बाहुलीचा खेळ होता असे वर्णन करता येईल.

## 6.17 मुकुंदराखिंड युध्द :-

16 जुन 1804 रोजी यशवंतराव होळकर यांचा टोंक व रामपुरा येथील मजबुत किल्ला मॉन्सन व लेक ने हस्तगत केला.[34] आगऱ्याहुन दक्षिणेकडे येताना प्रथम जयपूरचा मुलुख लागतो. त्या प्रदेशाच्या दक्षिणेकडील भागास बुंदी व कोटा दोन राज्य असुन या प्रांतात नद्या नाले, अडचणीचा प्रदेश आसल्याने या ठिकाणी पावसाळ्यामध्ये सैन्याच्या हालचाली ह्या अशक्य होतात. कोटा राज्याच्या दक्षिणेला पूर्व पश्चिम डोंगरांची रांग आसल्याने ही रांग राजपुताना व माळवा प्रांताची सीमा समजण्यात येते.

उत्तरेकडील घोडदळांची पलटणी ह्या लेफ्टनंट ल्युकनच्या हाताखाली कर्नल मॉन्सन बरोबर होती वर जी डोंगरांची रांग सांगितली आहे त्यात मुकूंदरा नावाची खिंड कोटाच्या दक्षिणेला

सुमारे 30 मैल अंतरावर असून तिलाच माळव्याचे प्रवेशद्वार समजले जाते. या मुकुंदराखिंडी पासून दक्षिणेच्या कडील भागास यशवंतराव होळकर यांच्या मुलुखाची सुरुवात होते. 1 जुलै रोजी कर्नल मॉन्सन याने हिंग्लाजगड आपल्या ताब्यात घेतला हा किल्ला कॅप्टन मरे याच्या मार्गावर आसल्याने तो किल्ला आपल्या ताब्यात असावा ज्यामुळे इंग्रजांच्या सोईचे होते. युध्दारंभी यशवंतरावाने जोधपूरच्या राजास आपल्या गोटामध्ये सामील करुन घेतले.[35] जोधपुरच्या राजाने महत्वाचे ठिकाण अजमीर महादजी शिंद्यानी जिंकुन घेतल्या पासून ते आपल्याला परत मिळावे अशी त्या राजाची इच्छा होती. शिंद्याचा उत्तर हिंदुस्थानातील प्रदेश हा मोकळा दिसताच यशवंतराव होळकर यांनी अजमीरचा ताबा घेऊन तो जोधपूरकरास परत दिला शिवाय यशवंतरावांचा जनानखाना व पुतण्या खंडेराव होळकर यास जोधपुरच्या राजाकडे ठेवण्यात आले त्यामुळे यशवंतराव होळकर हे स्वत: सडा होऊन शत्रुचा पाठलाग करण्यासाठी मोकळे झाले.

### 6.17.1 8 जुलै 1804 चे युध्द :

8 जुलै 1804 रोजी यशवंतराव होळकर यांनी कर्नल मॉन्सनवर मुकुंदराखिंडी च्या जवळ आक्रमकपणे हल्ला केला.[36] या हल्ल्यामध्ये कर्नल मॉन्सचे सैन्य यशवंतरावांनी तीव्रतेने कापुन काढले. कर्नल मॉन्सन आणि यशवंतराव यांच्यामध्ये घनघोर युध्द झाले. या युध्दामध्ये इंग्रजांच्या सैन्याचा यशवंतरावांनी पराभव केला. कर्नल मॉन्सन कोटा राज्याचे सैन्यदल व ल्युकन चे सगळे बटालियन या युध्दात ठार झाले. बापुजी शिंदे आणि कर्नल मॉन्सन या युध्दाच्या रणक्षेत्रातुन स्वत:चा जीव वाचवून रणांगण सोडून पळाले होते. या युध्दामध्ये यशवंतराव होळकर यांनी शिंद्याच्या 700 सैनिकांना युध्दाच्या रणक्षेत्रात ठार केले होते. या युध्दामध्ये यशवंतरावांचा विजय झाला युध्दातील सर्व शस्त्रास्त्रे, रसद पुरवठा, अन्य साधन सामग्री कर्नल मॉन्सनच्या सैन्याकडून लुटण्यात आली. या युध्दात इंग्रजांच्या सैन्य बटालियन मधील सैन्य मोठ्या प्रमाणात जखमी झाले. बहुतांशी सैन्याला यशवंतरावांनी बंदी बनवले कॅप्टन ल्युकनला जखमी अवस्थेत पकडण्यात आले. काही काळानंतर यशवंतरावांच्या बंदीवासात असताना ल्युकनचा मृत्यू झाला हा तोच ल्युकन होता जो दौलतराव शिंदेशी विश्वासघात करुन अलीगड चा किल्ला इंग्रजांच्या ताब्यामध्ये दिलेला होता तो स्वत: इंग्रजांच्या फौजेत सामील झाला होता.

यशवंतरावांनी इंग्रजांचा पराभव केल्याने त्यांना अपमानजनक पराभव वाटत होता. कर्नल मॉन्सनला हा पराभव जिव्हारी लागल्याने त्याने आपल्या सैन्या सह पाठीमागे जाऊन परत जाण्यास निघाला व हिंलाजगडावर जाऊन पोहचला विजयी यशवंतराव होळकर यांनी पुन: हिंग्लाजगडावर आक्रमण करुन आपल्या ताब्यात घेतला त्या ठिकाणाहून कर्नल मॉन्सन माघारी पळून जात होता कर्नल मॉन्सनची एवढी ही हिंम्मत झाली नाही की थांबुन यशवंतराव होळकर यांच्यावर आक्रमण करावे.

### 6.17.2 **११ जुलै 1804 रोजी कर्नल मॉन्सनवर यशवंतरावांचा पुन्हा हल्ला :**

11 जुलै 1804 रोजी यशवंतराव होळकर यांनी पुन्हा कर्नल मॉन्सनवर हल्ला केला.[37] या हल्लयाची तीव्रता पाहुन इंग्रजांचे सैन्य रणांगणातून सैरावैरा पळत सुटले होते. रणांगणात यशवंतरावाद्वारे कर्नल मॉन्सनचे मोठ्या प्रमाणात सैन्य ठार केले काही जखमी झाले त्या वेळी या सर्वांना सोडून कर्नल मॉन्सन पळत होता कर्नल मॉन्सन कोटा राज्यात पोहचण्याचा त्याचा प्रयत्न होता परंतु यशवंतरावांनी सातत्याने त्याचा पाठलाग करत राहीले. तेव्हा 12 जुलै 1804 रोजी कर्नल मॉन्सन कोटाला पोहचला कोटाच्या राजाने जालिम सिंहाने हाडाद्वारे मदतीची अपेक्षा व्यक्त केली होती. परंतु यशवंतराव होळकर यांच्या युध्दातील कार्यकतृत्वामुळे जालीम सिंहाने भयभीत होवून कर्नल मॉन्सनला किल्लयाच्या आत आश्रय देण्याविषयी त्यास नकार कळवला त्यामुळे कर्नल मॉन्सन याने विचार केला की बुंदीला जाऊन चंबळ नदीला ओलांडण्यात येऊ शकते. त्यावेळी त्याने 14 जुलै 1804 रोजी कर्नल मॉन्सन ने आजुबाजुच्या गावांमधून सैन्याला लागणारी रसरद पुरवठा आणि या ठिकाणाहुन लवकरात लवकर निघुन जावे हा त्याचा हेतू होता. कारण यशवंतराव होळकर त्याचा सातत्याने पाठलाग करित होते त्याला त्याचे भय होते की आपला निभाव यशवंतरावांपुढे लागणार नाही.

15 जुलै 1804 रोजी कर्नल मॉन्सनचा तोफखाना पावसाळा चालु असल्याने तोफा ह्या चिखला मध्ये रुतुन बसल्या होत्या व त्या तोफा निकामी झाल्या लष्कराला रसद पुरवठा कमी पडत होता. त्यामुळे रसद पुरवठा पावसाळ्यात मिळणे अशक्य झाले होते. कर्नल मॉन्सन निसर्ग चक्राच्या फेऱ्यात आडकल्याने त्याने आपल्या तोफा आहे त्या ठिकाणी सोडून दारु गोळयाला आग लावून दिली होती. कारण बुंदीच्या राजाने कर्नल मॉन्सनच्या चिखलात रुतुन बसलेल्या तोफा बाहेर

काढण्यास यशवंतरावांचा झंझावात पाहुन सहकार्य करण्यासाठी आला नाही. परंतु त्याचा व्यवहार हा इंग्रजांच्या प्रति मित्रत्वाचे राहिले होते. पहिल्याच पावसाळ्यात मुकुंदराखिंडी मध्ये कॅप्टन मॉन्सनशी यशवंतराव होळकर यांनी जे धावपळीचे युध्द केले त्यास इतिहासामध्ये तोडच नाही. यशवंतराव होळकर एवढा गनिमीकावा युध्दतंत्राने लढणारा मराठेशाहीतील मराठा सरदार, हा उत्तर मराठेशाहीच्या काळात दुसरा कोणी झालाच नाही अशी त्यांच्या शौर्य, पराक्रमाची चर्चा ही सर्व भारतीय संस्थानिकांमध्ये सर्व तोमुखी झालेली पहावयास मिळते.

28 जुलै 1804 रोजी गर्व्हनर जनरलचे लेक यास पत्र.[38] इंग्रजांच्या पराभवा विषयी दु:ख व्यक्त करताना 28 जुलै रोजी गर्व्हनर जनरल यांनी जनरल लेक यास पत्र पाठवले होते. त्या पत्रात गर्व्हनर जनरल म्हणतात की, आर्मस्ट्राँगच्या नावाने आपले 20 जुलैच्या पत्रातुन असे कळते की कर्नल मॉन्सनचे सैन्य बटालियन हे यशवंतराव होळकरांच्या सैन्या समोरुन पाठीमागे येत आहे. आणि मुकुंदरा खिंडीकडे माघारी पळत आहे. ही बातमी खुप वेदनादायी आहे जो पर्यंत आम्ही जास्त कष्ट घेणार नाहीत तोपर्यंत आमची गेलेली अब्रु पुन्हा मिळवू शकत नाहीत. मला भीती वाटते की जेवढे नुकसान झाले आहे तेवढे नुकसान भरुन काढण्यसाठी वेळ आता निघुन गेलेली आहे. एकंदरीत या पत्रावरुन विचार केला असता असे लक्षात येईल की गर्व्हनर जनरल लॉर्ड लेक यास उद्देशुन म्हणतात. की जो पर्यंत तुम्ही स्वत: सैन्यबटालियन सहित यशवंतराव होळकर यांच्यावर हल्ला करणार नाहीत तोपर्यंत आपल्याला युध्दामध्ये यशस्वी होण्याची आशा नाही. यशवंतरावांनी कर्नल मॉन्सनवर केलेल्या हल्ल्यामुळे संपूर्ण भारतातील इंग्रज हतबल व भयभीत झालेले पहावयास मिळतात.

### 6.17.3 **यशवंतराव होळकरांची दहशत :-**

ग्रँट डफने कोटाच्या बद्दल वर्णन केले आहे की, ज्यावेळी इंग्रजांच्या सैन्यासह कर्नल मॉन्सन आश्रयासाठी कोटा राज्याचा राजा जालीमसिंह हाडा यांच्याकडे पोहचला त्यावेळी जालिमसिंहाने कर्नल मॉन्सन आणि त्याच्या सैन्याला आश्रय देण्याचे थोडही साहस दाखवले नाही. एवढा यशवंतराव होळकर यांच्या शौर्य, पराक्रमाची त्यावेळी दहशत होती जालीमसिंहाने कर्नल मॉन्सनला कोटा राज्यामध्ये शरण तर दिलेच नाही त्यास व त्याच्या सैन्याला लागणारी अन्नधान्याचा

रसद पुरवठा करण्याचे सुद्धा नाकारले यशवंतराव इंग्रजांच्या सैन्य, अधिकाऱ्याचा पाठलाग करुन त्यांना जेरीस आणले होते.

जालिमसिंहाच्या अशा प्रकारच्या वागण्याने विवश होऊन कर्नल मॉन्सन ने कोटा राज्या पासुन माघारी जाणे उचित समजले. कर्नल मॉन्सनने रोमंच घाट जवळच्या नदीला ओलांडण्याचे त्याने ठरवले होते. परंतु या नदीला पुर आल्याने आणि सैन्याला लागणारी रसद पुरवठा कमी आसल्याने आजुबाजुच्या परिसरातुन सैन्याला उपजिविकेसाठी लागणारे अन्नधान्य गोळा करण्यासाठी नदीच्या किनाऱ्यावर कर्नल मॉन्सनला आपली लष्करी छावणी टाकावी लागली. मुकुंदराखिंडीच्या पावसाळ्यातील युध्द योजना यशवंतरावांनी आखुन कर्नल मॉन्सनला युध्द न करता परत आगऱ्याच्या दिशेने फिरावे लागले आणि यशवंतरावांचा कर्नल मॉन्सनचा सातत्याने केलेल्या पाठलागामुळे इंग्रज सैन्य हतबल झालेले पहायला मिळेल. देशी संस्थानिकांनी या काळात यशवंतरावांच्या इंग्रजांच्या विरुध्दच्या लष्करी कारवाया पहाता कर्नल मॉनसनला कोटा राज्याच्या राजाने सहकार्य न करण्याचे धोरण दिसुन येते. एवढी यशवंतरावांची दहशत या काळात कर्नल मॉन्सन आणि देशी संस्थानिकांवर पडलेली दिसेल.

### 6.17.4 **यशवंतरावांनी दंड वसुल केला :-**

कु. गुप्ता लिहीतात की, ज्यावेळी इंग्रज शासनाने कोटा राज्याचा राजा जालिमसिंहाला कर्नल मॉन्सनला आश्रय का दिला नाही, असे विचारले असता जालिमसिंहाने त्याच वेळी असे उत्तर दिले की मी कर्नल मॉन्सनच्या सैन्याला किल्ल्याच्या बाहेर एक इमारत असुन तुमच्या सैन्याला आश्रयासाठी ही इमारत मोकळी करुन ठेवू का असा प्रस्ताव जालिमसिंहाने कर्नल मॉन्सन पुढे ठेवला होता. परंतु या प्रस्तावाला कर्नल मॉन्सनने अमान्य केले होते. त्याचे असे मत होते की, माझे सैन्यदल अशा पध्दतीने मोकळ्या ठिकाणावर ठेवून दोन्ही बाजुने आक्रमणाचा सामना करु शकत नव्हती कर्नल मॉन्सनला जालिमसिंहावर पण विश्वास राहिलेला नव्हता. तेंव्हा कोटा राज्याच्या परिसरामध्ये काही काळ कर्नल मॉन्सन थांबला. त्यामुळे यशवंतराव होळकर यांनी कोटा राज्याचा राजा जालिमसिंहा हाडा कडून दंड म्हणून 10 लाख रुपये घेतले होते.

### 6.17.5 **यशवंतरावांची युध्दनिती :-**

जगदिश सिंह गहलौत लिहीतात की, कर्नल मॉन्सनच्या सैन्याने प्रथम यशवंतराव होळकर यांच्या राज्यामध्ये प्रवेश केला होता यशवंतरावांनी कर्नल मॉन्सनच्या विरुध्द युध्दाला लगेच सुरुवात केली नाही. कारण यशवंतराव आपल्या विशाल सैन्य संख्येच्या सहकार्याने कर्नल मॉन्सनच्या सैन्याला घेरण्याचा त्यांची योजना होती. यशवंतरावांच्या इंग्रजांच्या विरुध्द चालणाऱ्या लष्करी हालचाली पाहुन कर्नल मॉन्सन आपल्या सैन्यासह कोटा राज्याच्या सीमा मध्ये परत गेला. आणि मुकुंदराखिंडीमध्ये आश्रयास गेला. जाते वेळी कर्नल मॉन्सन याने कोटा राज्यात यशवंतराव होळकर यांना रोखण्यासाठी काही सैन्य बटालियन ठेवण्यात आलेले होते.

### 6.17.6 **युध्दाचे ठिकाण :-**

कर्नल मॉन्सनच्या सैनिकांनी पिपल्या नावाच्या ठिकाणी यशवंतराव होळकर यांच्या सैन्या दरम्यान युध्द झाले या युध्दात कोटा राज्यात कर्नल मॉन्सनने यशवंतराव होळकर यांना रोखण्यासाठी ठेवण्यात आलेली सैन्य बटालियन मधील इंग्रजांचे मोठ्या प्रमाणात सैन्य होळकरांच्या सैनिकांनी ठार केले. या युध्दामध्ये आप्पा अमरसिंह हा सुध्दा मारला गेला. परंतु त्याचे सैन्य हे पळुन जाण्यात यशस्वी झाले. इंग्रजांचा सैन्य अधिकारी कॅप्टन ल्युकन ही या युध्दात मारला गेला यावेळी मुकुंदराखिंडी मध्ये असणारा कर्नल मॉन्सन हा कोटा शहरामध्ये येऊन पोहचला कर्नल मॉन्सनने कोटा या शहरामध्ये आश्रय घेण्याचा विचार करत होता परंतु कोटाचा राजा जालिमसिंह हाडा याने कर्नल मॉन्सनला आश्रय देण्यास असमर्थता दाखवली परंतु कर्नल मॉन्सनला आपली सैन्याची मदत देण्याचे आश्वासन दिले होते.

कर्नल मॉन्सनला कोटा राज्याचा राजा जालिमसिंहाने आश्रय देण्यास नकार दिल्याने कर्नल मॉन्सन घाबरुन गेला होता. शेवटी त्याने यशवंतराव होळकरांच्या विरुध्द युध्द न करता दिल्लीच्या दिशेने जाणे सोयीचे समजले होते, दिल्लीकडे परत जाताना कर्नल मॉन्सनच्या सैन्याची संख्या कमी होत गेली काही त्यास सोडून गेले तर काही यशवंतरावांच्या सैन्यानी रस्त्यामध्ये ठार केले. शेवटी दिल्लीला पोहचुन आपल्या पराभवाचे प्रमुख कारण हे कोटाच्या राजाने सहकार्य केले नाही जे पूर्ण असत्य होते कोटाच्या सैन्यामुळेच कर्नल मॉन्सन बचावला होता.

### 6.17.7 **यशवंतरावांचे कोटावर आक्रमण :-**

कर्नल मॉन्सनला कोटाचा राजा जालिमसिंह हाडा याने जर सह कार्य केले नसते तर कर्नल मॉन्सनचा पराभव करण्यात आला असता.[39] असे यशवंतराव होळकर यांना वाटत होते. शेवटी यशवंतरावांनी कोटाराज्यावर आक्रमण केले. या आक्रमणाला प्रतिउत्तर जालिमसिंहाने देण्याचे ठरवले यशवंतराव आणि जालिमसिंहा मध्ये करार करण्यात आला हा करार चंबळ नदीच्या मधोमध होड्याद्वारे भेटण्याचे निश्चित करण्यात आले. कोटा किल्ल्याच्या खाली चंबळ नदी वाहते या नदीमध्ये दोघांची भेट झाली यशवंतराव होळकर यांनी पीपल्या या ठिकाणी झालेल्या युध्दाच्या अटी शर्तीचे 10 लाख रुपयाची मागणी केली परंतु जालिमसिंहाने चर्चेअंती 3 लाख रुपये देऊन यशवंतराव व जालिमसिंहा दरम्यानची चर्चा थांबवून दोघेही संमतीने परत फिरले.

### 6.17.8 **कर्नल मॉन्सनचे बापु शिंदेस असहकार्य :-**

कर्नल मॉन्सन ला ज्या वेळी कोटाच्या राजाने सहकार्य केले नाही. त्यावेळी त्याने बुंदी मार्गे चंबळ नदीला ओलांडून रामपूरा या ठिकाणी पोहचण्याचे ठरवले होते. परंतु त्या दिवशी मुसळधार पाऊस पडल्याने कर्नल मॉन्सनला थांबावे लागले. त्यावेळी बापु शिंदे यांनी कर्नल मॉन्सनची साथ सोडली कारण कर्नल मॉन्सनला बापु शिंद्यावर विश्वास नव्हता यामुळे बापु शिंद्याला प्रथम पुढे करुन युध्द लढत स्वत: पाठिमागे राहत तेंव्हा बापु शिंद्याचे मोठ्या प्रमाणात युध्दात हानी होत होती. तर दुसरीकडे बापु शिंदे आणि त्याचे सैन्य कर्नल मॉन्सनच्या रसद पुरवठा यावर अवलंबून होते. त्यामुळे कर्नल मॉन्सन बापू शिंद्यांना वेळेवर धन व रसद पुरवठा करत नसल्याने बापु शिंद्याचे सैन्य स्वतंत्र होत, वेळेवर सैन्याचे वेतन होत नव्हते. तेव्हा बापु शिंद्याचे सैन्य आपल्या सरदारावर नाराज दिसत होते. ज्यावेळी कर्नल मॉन्सन चंबळ नदीला ओलांडून जाण्याचा विचार करत होता. त्यावेळी बापु शिंद्याने कर्नल मॉन्सनला उद्देशुन म्हणाला की, आपण चंबळ नदी ओलांडून गेल्यावर त्या होड्यांना परत आमच्याकडे पाठवून द्यावे. जेणे करुन मी आणि माझे सैन्य चंबळ नदी ओलांडून पलीकडे येऊ कर्नल मॉन्सनने लवकरात लवकर चंबळ नदी होड्याच्या माध्यमातून ओलांडली व पुढच्या दिशेने धावत सुटला कर्नल मॉन्सने एवढा भयभीत झाला होता की, त्याने चंबळ नदी ओलांडून गेल्यानंतर मॉन्सने ज्या होड्यातुन त्याने नदी ओलांडली होती. त्या होड्या त्याने परत बापु शिंदेकडे न पाठवता पुढे निघुन गेला. बापु शिंदे आपल्या सैन्यासह कर्नल परत होड्या पाठवून देईल

या आशेवर वाट पहात राहिला परंतु ज्यावेळी त्याना माहित झाले की कर्नल मॉन्सन हा चंबळ नदी ओलांडून गेल्यावर होड्या परत पाठवलेल्या नाहीत तर त्या तेथेच सोडून पळून गेला आहे तेंव्हा बापू शिंदे याने आपला जीव वाचविण्यासाठी परत कोटा राज्यात पोहचला आणि कोटा किल्ल्यात आश्रय घेतला.

### 6.17.9 बापु शिंदे यशवंतरावांना शरण आला :-

बापु शिंदे कोटा राज्यात परत येताना यशवंतरावांनी त्याचा आक्रमकपणे पाठलाग करण्यास सुरुवात केली. ज्यावेळी बापु शिंदे कोटा किल्ल्यात आश्रयाला गेल्यावर यशवंतरावांनी किल्ल्यास वेढा दिला. त्यावेळी बापु शिंद्याला उमजलेकी आपण इंग्रजांना मदत करुन आपण आपल्या देश, धर्माच्या विरुध्द कार्य करत आहोत तेंव्हा बापु शिंद्याच्या सैनिकांनी त्यांना सांगितले की आपण यशवंतराव होळकर यांच्या स्वातंत्र्य युध्दात सामील व्हावे यातच सर्वांचे हीत आहे. कोटा राज्याचा राजा जालिमसिंहाने व बापु शिंद्यांनी यशवंतराव होळकरापुढे आत्मसमर्पण केले. यशवंतरावांचा स्वभाव वैशिष्ट्ये असे होते की ते जेवढे शिस्तीचे कडक होते तेवढेच भावनिक पण होते. त्यांनी बापु शिंद्याचा सन्मान करुन आपल्या सैन्यदलात समावेश करुन घेतला आणि बापु शिंदे हा सुध्दा यशवंतरावांच्या स्वातंत्र्य युध्दामध्ये सहभागी झाला.

### 6.17.10 कर्नल मॉन्सनचा पाठलाग :-

कर्नल मॉन्सन यशवंतराव होळकर यांच्या भयाने पळत होता. जुलै 1804 रोजी कर्नल मॉन्सन चंबळनदीच्या किनाऱ्यावर पोहचला त्यावेळी चंबळ नदीला पुर आल्याने कर्नल मॉन्सनची गति कमी झाली होती तरी त्याने चंबळ नदी ओलांडली श्री सुंदरलाल याविषयी लिहीतात की, कर्नल मॉन्सन हा 17 जुलै रोजी चंबळ नदीवर पोहचला होता नदीला पूर आलेला असतानाही त्याने सर्व प्रथम आपला तोफखाना हत्तीच्या सहकार्याने नदी पार करण्यास यशस्वी झाला त्यानंतर त्याने हळु हळु काही सैनिकांना हत्तीवर बसवून सुरक्षितपणे नदी ओलांडली तर काही लाकडाच्या ओंडक्याच्या साहाय्याने काही सैन्य लहान मार्ग काढुन पायदळ सैन्य अशा पध्दतीने दहादिवसाच्या आत संपूर्ण सैन्यासहीत चंबळनदी ओलांडण्यात यशस्वी झाले. यशवंतराव होळकर यांचे घोडदळ कोटाच्या पुढे येऊन कर्नल मॉन्सनच्या सैन्याला जेरिस आणत होते. या गोंधळाच्या परिस्थिती मध्ये मॉन्सनच्या सैन्यातील शेकडो सैन्य यशवंतराव होळकर यांच्या हल्ल्यात मारले गेले काही सैन्य

चंबळ नदीत बुडून मेलेतर काही चिखलात फसून राहिले, काही सैन्य आजारी पडुन मृत्यू मुखी पडले त्यावेळी कर्नल मॉन्सन हा अजुन पळत सुटला व आपल्या सैन्या सहित 26 जुलै 1804 रोजी रामपुरा या ठिकाणी पोहचला होता. जनरल लॉर्ड लेकला कर्नल मॉन्सनच्या पराभवाची बातमी मिळताच आगऱ्याहुन कर्नल मॉन्सनच्या मदतीसाठी सैन्याच्या बटालियन पाठविण्यात आल्या त्या बटालियन मध्ये दोन पलटणी ह्या देशी सैन्याच्या तर काही घोडदळ सैन्य व 6 तोफा, दारुगोळा आणि रसद पुरवठा इत्यादी होता. लॉर्ड लेकने कर्नल मॉन्सनला आदेश दिला की परत जाऊन यशवंतराव होळकर वर आक्रमण करावे परंतु यशवंतराव होळकर यांच्या घोडदळा पुढे जाण्याची कर्नल मॉन्सनच्या सैन्याची हिमंत नव्हती, मॉन्सन यशवंतरावांच्या प्रखर आक्रमकतेपुढे एवढा भयभीत झाला होता की, त्यास कोणत्याही प्रकारची संकटे अंगावर घेण्याची त्याची तयारी नव्हती "मार्क्विस वेलस्लीने वैयक्तीक जनरल लॉर्ड लेक यास पत्र पाठवेल.[40] कर्नल मॉन्सन व त्याचे सैन्य तोफखाना, दारुगोळा, रसद पुरवठा इत्यादीचे नुकसान सोसुन माळवा प्रदेश सोडून गेला आहे एवढी भयानकता यशवंतरावांच्या हल्ल्यात दिसुन येते. यशवंतरावांचा सातत्याने कर्नल मॉन्सनचा पाठलाग व या पाठलागात यशवंतरावांच्या सैन्याने केलेली मॉन्सनच्या सैनिकांची हानि यामुळे कर्नल मॉन्सन हा परत आगऱ्याच्या दिशेने पळत होता. ही सगळी इतभूत माहिती इंग्रज अधिकाऱ्यांना मिळत होती.

२२ ऑगस्ट 1804 रोजीच्या रात्री कर्नल मॉन्सन आपल्या सैन्यासह अंधाऱ्यारात्रीमध्ये पळुन कुशलगडाच्या दिशेने गेला त्याला आशा होती की, कुशलगड या ठिकाणी शिंद्याचा सेनापती सदाशिव भास्कर हा त्याला सहकार्य करेल त्यावेळी सदाशिव भास्करकडे सैन्याच्या 6 पलटणी आणि 21 तोफा होत्या त्या आपल्याला यशवंतरावांच्या विरुध्द उपयोगी ठरतील अशी त्याची अपेक्षा होती.

### 6.17.11 **यशवंतरावाचे पुन्हा एकदा आक्रमण** (24 **ऑगस्ट** 1804)

कर्नल मॉन्सन हा कुशलगडच्या दिशेने रामपुऱ्याहुन येत होता त्यावेळी यशवंतरावांनी त्याचा पाठलाग चालवला त्यावेळी 23 ऑगस्ट 1804 रोजी यशवंतराव त्याच्या पासुन 4 मैल अंतरावर होते 24 ऑगस्ट रोजी यशवंतरावांनी कर्नल मॉन्सनच्या सैन्यावर बनास नदीच्या किनाऱ्यावर साहसिक आक्रमकपणे हल्ला करुन मॉन्सनच्या सैन्याला यशवंतरावांनी कापुन

काढले. त्यावेळी मॉन्सनचे सैनीक यशवंतरावांच्या कृतीने भयभीत झालेली होती. या युध्दात यशवंतरावांच्या आक्रमक व गतिमानतेने केलेल्या हल्ल्यामुळे मॉन्सनचे सैन्य हा हल्ला सहन करु शकली नाही आणि युध्दभूमीतुन या सैन्याने पळ काढला खुद कर्नल मॉन्सन आपल्या सैन्य, रसदपुरवठा, दारुगोळा इत्यादी साधन सामग्री सोडून कुशलगडाच्या दिशेने पळाला या युध्दात यशवंतरावांचा विजय झाल्याने त्यांच्या घोडदळ सैन्यदलांनी हजारो इंग्रजी सैनिकांना ठार केले होते. लगेचच यशवंतरावांनी बनास नदी ओलांडून पुन्हा कर्नल मॉन्सनचा पाठलाग करण्यास सुरुवात केली होती. इंग्रजांच्या सैन्यावर विषम परिस्थिती मध्ये यशवंतराव होळकर यांनी संहारक आक्रमण करुन ज्या मध्ये कर्नल मॉन्सनचे मोठे नुकसान झाले. मॉन्सनच्या माघारी याचे सैन्य मारले गेले व काही नदीत बुडुन मेले. या युध्दामध्ये यशवंतराव होळकर यांनी फार जवळुन मॉन्सनचा पाठलाग केला. बनास नदीच्या युध्दामध्ये यशवंतरावांच्या तोफखान्याचा तोपची माकनसिंह मारला गेला आणि त्यांच्याकडे असणाऱ्या बंदुका ह्या हस्तगत केल्या परंतु यशवंतराव होळकर यांनी स्वत: या युध्दात धाडसाने पुढे येऊन कर्नल मॉन्सनच्या विशाल सैन्य बटालियनचे नुकसान करुन त्याचे सैन्य या युध्दात मोठ्या प्रमाणात मारले गेले यशवंतराव हे बनास नदीला पुर आल्याने नदी ओलांडून तोफा घेऊन जाऊ शकले नाही. त्यावेळी त्यांनी स्वत: घोडदळाला सोबत घेऊन नदीत पोहुन नदी ओलांडली आणि इंग्रजांचे सैन्य अधिकारी आणि सैन्याचा पाठलाग यशवंतरावांनी केला. त्यावेळी कर्नल मॉन्सन हा कुशलगडच्या किल्ल्यावरच्या दिशेने पळत होता. शेवटी 25 ऑगस्ट च्या रात्री कर्नल मॉन्सन हा कुशलगड या ठिकाणी पोहचला.

### 6.17.12 **पुन्हा यशवंतरावाचे आक्रमण :-**

26 ऑगस्ट 1804 रोजी यशवंतराव होळकर यांनी कर्नल मॉन्सनवर परत एकदा आक्रमण केले. या आक्रमणा मध्ये मॉन्सनचे बरेचसे सैन्य मारले गेले. मॉन्सनला या धावपळीमध्ये थांबून यशवंतरावांवर हल्ला करण्याची हिंम्मत झाली नाही. यशवंतरावांनी सातत्याने प्रखर हल्ले मॉन्सन व त्याच्या सैन्यावर केले. या हल्ल्यात अजुन इंग्रजांचे नुकसान मोठ्या प्रमाणात झालेले पहायला मिळते. या हल्ल्यात मॉन्सनचे काही सैन्य मारले गेले तर काही जखमी झाले. तरीही कर्नल मॉन्सन हा पळत राहिला. शेवटी 27 तारखेला कर्नल मॉन्सन हिंडोनगडावर पोहचला यशवंतराव होळकर यांनी सतत पाठलाग केल्याने मॉन्सन आणि त्याचे सैन्य घोडदौडीने थकले होते. त्यांना भुक आणि पाणी भेटले नसल्याने ते व्याकुळ झाले होते. फतेहपुरला यशवंतरावांनी कर्नल मॉन्सनवर शेवटचे

आक्रमण केले.[41] कर्नल मॉन्सनला यशवंतरावांपुढे शरण येण्या विषयी दुसरा पर्याय नव्हता. यशवंतराव होळकर यांनी कर्नल मॉन्सनचा पाठलाग हा भर पावसाळ्यामध्ये 250 मैल आणि अडीच महिने सातत्याने चालवला होता. भारतातच नाहीतर जागतिक स्तरावर अशा पध्दतीचे युध्द यशवंतराव होळकर यांच्या शिवाय कोणी केले नसेल, ते ही इंग्रजांच्या विरुध जो की जगात त्यांच्या एवढा दबदबा त्या काळी कोणत्याही देशाचा नसेल अशावेळी इंग्रजांची बदनामी संपूर्ण भारतात व जगभर झालेली पहावयास मिळते. युध्द योजनेत यशवंतराव यशस्वी झालेले दिसतात तर 28 ऑगस्ट रोजी यशवंतरावांचा विजय झाला. एकंदरीत 10,000 सैन्य व 3 हजार बुणगे सामानाची ने आण करणारे यशवंतरावांनी युध्दात ठार केले. शेवटी कर्नल मॉन्सन 30 ऑगस्ट 1804 रोजी राहिलेल्या सैन्यासह आगऱ्याला पोहचला.

2 सप्टेंबर 1804 रोजी लॉर्ड लेकने गर्व्हनर जनरल यास पत्राद्वारे कळविले.[42] या अपमानजनक घटने बद्दल जास्त काही सांगु शकत नाही कारण अनेक कारणांमुळे माझे मन इतके परेशान आहे की मी या दुर्घटने मुळे आलेली संकटे आणि त्यांच्या कारणांना लक्षात ठेवू शकत नाही. या पेक्षा चांगल्या सैन्य बटालियन कधी नाहीते युध्दात कार्य केले असेल, मला हे सांगताना अतिशय दु:ख होत आहे की जर लेफ्टनंट एण्डरसनचा जबाब योग्य असेल तर माझ्या सैन्य बटालियन मधील चांगले सैन्य आणि संपूर्ण 5 बटालियन व सहा पलटणी या युध्दात नष्ट झालेल्या आहेत. देवालाच माहीत आहे की, आता त्या सैन्य दलाची उणीव कशी भरुन काढावी. या बरोबर मला माझ्या चांगल्या सैन्य बटालियनच्या चांगल्या सैनिकांच्या मृत्युवर शोक व्यक्त करावा लागत आहे. या पत्रावरुन यशवंतरावांचे युध्दनेतृत्व दृष्टीस पडते. युध्दाच्या भूमीतील आपली प्रामाणिकता, निष्ठा, प्रेम सैन्य दलांवरचा विश्वास हे नेतृत्वाला साजेसे संघटन असते. कर्नल मॉन्सन व त्यांच्या सैन्य अधिकाऱ्याचा पराभव हा त्यांच्या जिव्हारी लागला. भारतातील संस्थानिकांना एकीकडे आपल्या प्रभुत्वाखाली घेत असताना दुसरीकडे मराठेशाहीतील एक युवा तरुण मराठा सरदार स्वत:च्या कर्तृत्वावर उदयास येतो आणि आपल्या कर्मभूमीच्या संरक्षणासाठी सातत्याने लढा देतो हे मुकुंदरा खिंडीतील युध्दावरुन लक्षात येते. कर्नल मॉन्सन म्हणतो, सध्या मी या घृणास्पद आणि विनाशकारी घटनेवर आणखी काही सांगु.[43] एक लहान तुकडी मी कधीच घेतली नाही मी माझी बटालियन गमावली आहे व 6 सैन्याच्या तुकड्या ज्या दिवशी त्यांची जागा कशी घेतील हे फक्त देवच जाणे एवढा हताश कर्नल मॉन्सन झालेला होता. या वरुन यशवंतराव

होळकर यांची कर्नल मॉन्सनच्या विरुध्द केलेल्या धावपळीच्या युध्दातून इंग्रजी सैन्याची पडझड झालेली पहावयास मिळते जी कधीही भरुन निघणारी नव्हती.

आर्थर वेलस्ली लिहीतो की, कर्नल मॉन्सनची बरबादी ही आज पर्यंतच्या आमच्या सैन्य आचरणातील खरोखरच सर्वांत मोठी व सर्वाधिक लज्जेचे कृत्य आहे.[44] इंग्रजांचा एका भारतीय सरदाराने इंग्रज सैन्य अधिकाऱ्याचा 250 मैल, अडीच महीने पाठलाग करुन त्याचा पराभव केला. इंग्रजांच्या सैन्य इतिहासातील सर्वांत अपमान जनक पराभव झालेला आहे. हा पराभव एवढा जिव्हारी लागला की यशवंतरावांना वेगवेगळ्या प्रकारची नावे ठेवण्यात येऊ लागली. सेनापती लेकचे गर्व्हनर जनरल ला पत्र 2 सप्टेंबर रोजी पाठवले.[45] या घटनेने इंग्रजांच्या लष्करी प्रतिष्ठेचे तोंड काळे झाले आहे, कर्नल मॉन्सनच्या हाताखाली उत्तम निवडक लढाऊ पथके होती, वेगवेगळ्या गोऱ्या अंमलदारांनी लिहीलेल्या हकीकती जरी खऱ्या असतील तर, ज्यांना इंग्रजी लष्कराचा फुलोरा, मोहोर म्हणता येईल अशा कसलेल्या पलटणींचा या काळात नाश झाला हा निष्कर्ष काढणे भाग आहे. त्या बरोबर अनेक उत्कृष्ट तरुण वीर मृत्युने गिळले असुन त्या सर्वांची जागा कशी भरुन निघणार हे एक ईश्वरच जाणे. यशवंतराव होळकर एक अतिशय सक्रिय व त्रासदायक शत्रु म्हणून इंग्रजांना सिध्द झाला.[46] वेगाने घोडदौड करणाऱ्या कारवाया पध्दतशीरपणे लुटणे, त्रास देणे आणि गनिमी कावा युध्दतंत्राच्या साहाय्याने हल्ले करणे या हल्ल्याच्या पारंपारिक पध्दतीने युध्द करणारा इंग्रजांच्या विरुध्द सिध्द झालेला पहावयास मिळतो, जो पर्यंत कर्नल मॉन्सन त्याच्या लष्करी छावणी पासुन दुर अंतरावर गेला त्यावेळी यशवंतराव होळकर यांनी गनिमीकावा युध्द तंत्राच्या साहाय्याने त्याच्यावर हल्ले केले आगऱ्याच्या दिशेने नदी ओलांडून मॉन्सन जात असता यशवंतराव होळकर यांनी कर्नल मॉन्सनच्या संपूर्ण सैन्याचा नाश केला.

लष्करी विचारवंत थॉम्स मन्रो म्हणतो की, यशवंतराव होळकर याने कर्नल मॉन्सनवर मिळविलेला विजय प्रत्यक्ष लढाई पेक्षा त्या आधीच्या लष्करी हालचाली व लष्करी डावपेच यांच्या मुळे मिळालेला आहे.[47] यशवंतरावांच्या लष्करी हालचाली ज्या गतीने वाढल्या होत्या त्या मुकुंदराखिंडीच्या वारंवार जाण्यायेण्याने तेथील भौगोलिक परिस्थिती आणि नैसर्गिक हवामानाचा अभ्यास त्यांना झालेला होता. यशवंतरावांच्या वेगवेगळ्या युध्दमोहिमा ह्या सातत्याने चालु असल्याने त्यांना युध्दातील डावपेच, रणनिती इत्यादी विषयी त्यांचा अनुभव वाढलेला असल्याने इंग्रजांना कर्नल मॉन्सन यशवंतरावांच्या टाकलेल्या डावपेचामध्ये अडकत चालला होता. त्यामुळे

त्याचा परिणाम त्यास भोगावे लागले आणि इंग्रजांचा सैन्य अधिकारी कर्नल मॉन्सनचा अपमान जनक पराभव यशवंतरावांनी केलेला दिसुन येईल. यशवंतराव होळकर यांनी कर्नल मॉन्सनचा जो पराभव केला त्याचे प्रतिध्वनी सर्वत्र उमटले.[48] कर्नल मॉन्सनचा जो पराभव मुकुंदराखिंडी मध्ये झाला. त्यामुळे इंग्रजांना मोठा धक्का बसला यशवंतराव होळकरांसारख्या माणसाने शिस्तबध्द अशा इंग्रज सैन्याचा पराभव करावा यामुळे सर्वच आश्चर्य चकित झाले, जनरल वेलस्लीला पराभवाचे दु:ख होऊन तो आपली काय चुक झाली याचा विचार करु लागला विचार विनिमया करिता वेलस्लीने आपला भाऊ ऑर्थर वेलस्ली यास बोलावून घेतले आणि एकुण पराभव जिव्हारी लागल्याने त्याने परखडपणे आढावा घेऊन त्याच्या संदर्भा मध्ये वेलस्लीने योग्य त्या शिफारशी केलेल्या दिसतात.

यशवंतराव होळकर यांनी कर्नल मॉन्सन चा पराभव केल्याने इंग्रजांची नाचक्की झाली.[49] इंग्लंड मध्ये अशी जोरदार चर्चेला सुरुवात झाली होती की एक यशवंतराव होळकर यास इंग्रजांना आपल्या नियंत्रणा मध्ये आणण्यास अयशस्वी झाले तेव्हा भारतात इंग्रज आपली कशी सत्ता कायम करु शकतील. अशा प्रकारची चर्चा चालु होती. इंग्रजांच्या साम्राज्यवादी धोरणात आतापर्यंत भारतीय संस्थानिक एकही अडथळा ठरु शकला नव्हते. त्यामुळे इंग्रजांचा आत्मविश्वास हा जास्त फोफावलेला होता.त्यामुळे इंग्रजांना असा एक मराठेशाहीतील मराठा युवा सरदार आपल्या साम्राज्यवादी, विस्तारवादी धोरणां मध्ये अडथळा ठरु शकतो मुकुंदराखिंडीतील हे एक उदाहरण होते. पुढे चालुन काय काय पहावे आणि परिणाम काय भोगावे लागतील याविषयी इंग्रजांच्या अंतर्गत विचार मंथन चालु झालेले होते. त्यावेळी भारतातील आपली सत्ता कायम करण्यासाठी कोणकोणत्या युक्त्या कराव्यात जेणे करुन यशवंतरावांचा बिमोड करुन आपली सत्ता भारतात कायम करता येईल या विषयी इंग्रज सातत्याने प्रयत्नात होते.




मुकुंदरा खिंडीतील यशवंतराव होळकर यांच्या युध्दातील पराक्रमाबद्दल प्रसिध्द इतिहासकार जॉन पेंबल म्हणतो.[50] Here was a Maratha Leader who, though encumbered with something like 200 guns, managed to pursure and harass at the height of the Monsoon though the black cotton soil of malwa and across two rivers, a ligtly equipped british force for a distance of 250 milies it was a remarkable acwivement which as lake admitted afforded proofs of a greater degree of efficieney and enterprise than colled have been expected and rendered it difficult to estimate what they might venture to undertake or be able to ccomplish"

शत्रुनेही प्रशंसा करावी असा अशक्य वाटणारा विजय जागतिक युध्द इतिहासामध्ये नोंदले गेलेले मुकुंदराखिंडीतील युध्द होय.

## 6.18 मथुरा युध्द :

ग्रँट डफने या युध्दाचे वर्णन अशा प्रकारे केले आहे की.[51] यशवंतराव होळकर यांनी इंग्रजांना आपल्या राज्याच्या सीमांमधून पळवुन लावले होते. इंग्रजांना भय होते की यशवंतराव होळकर हा उत्तरेकडील प्रदेशात इंग्रजांच्या प्रभावाखाली असणाऱ्या दोआबवर आक्रमण तर करणार नाहीना यासाठी इंग्रजांनी यशवंरावांना रोखण्यासाठी गर्व्हनर जनरल याने इंग्रजांच्या सैन्याची संख्या वाढवली आणि दिल्ली, मथुरा, आग्रा इत्यादी ठिकाणांची सुरक्षा वाढविण्यात आली. यशवंतरावांना रोखण्यासाठी इंग्रजांच्या 5 सैन्य बटालियन रवाना झाल्या होत्या.

1) प्रथम सैन्य बटालियनचे नेतृत्व – जनरल लॉर्ड लेकच्या नेतृत्वाखाली कानपुरहून रवाना झाली.
2) दुसरी बटालियन – दिल्ली, अग्राच्या मध्ये असणाऱ्या डोंगरावर थांबली होती.
3) तिसरी बटालियन - बुंदेलखंड या ठिकाणी होती
4) चौथी बटालियन – उज्जैन या ठिकाणी शिंद्याचे सैन्य
5) पाचवी बटालियन – कर्नल मरेच्या नेतृत्वाखाली गुजरात या ठिकाणी होती.

ज्यावेळी कर्नल मॉन्सनचा यशवंतरांवानी पराभव केला होता. त्यावेळी कर्नल मॉन्सन हा आगऱ्याच्या दिशेने पळत होता. त्याचा पाठलाग यशवंतरावांनी शेवटपर्यंत केला. तत्पूर्वी इंग्रजांनी पाचठिकाणी यशवंतरावांना रोखण्यासाठी जी युध्द योजना आखली होती. त्यास अयशस्वी करुन यशवंतराव या पाच ठिकाणाच्या इंग्रजांच्या सैन्याला डावलून मथुरेच्या जवळ येऊन पोहचले होते. इंग्रजांनी मथुरेच्या रक्षणासाठी मोठ्या प्रमाणात सैन्य ठेवण्यात आले. परंतु यशवंतरावांच्या सैन्यापुढे हे इंग्रजांचे सैन्य टिकु शकले नाही. लॉर्ड लेक कानपुरहुन यशवंतरावांच्या विरुध्द लढण्यासाठी पुढे निघाला त्यावेळी यशवंतरावांनी आपल्या गनिमीकावा युध्द तंत्राच्या पध्दतीने युध्दाला सुरुवात केली आणि लॉर्डलेकच्या सैन्याला जेरीस आणले. यशवंतरावांची युध्द निती ही त्यावेळी लहान, लहान गटांमध्ये विभागून इंग्रजांच्या सैन्यावर हल्ला करत आणि यांची रसद पुरवठा लुटून घेत. यशवंतराव होळकर यांना मथुरा या ठिकाणी आपल्या सैन्याला लागणारे अन्न धान्याचा मोठा साठा उपलब्ध होता. ज्यावेळी त्यांची पुढील युध्द योजना ही दिल्लीवर आक्रमण करुन दिल्ली आपल्या ताब्यात घेण्याचा त्यांचा विचार होता त्यावेळी यशवंतरावांकडे सैन्यदल हे 60,000 घोडदळ, 15000 पायदळ 192 तोफा होत्या यशवंतरावांच्या नावाने इंग्रजांच्या सैन्यात दहशत निर्माण झाली होती. ज्यावेळी यशवंतराव मथुरा या ठिकाणी येत आहेत ही बातमी कळताच त्यावेळी काही इंग्रज सैन्य अगोदरच मथुरा सोडून गेले होते एवढी दहशत भय इंग्रजी सैन्य अधिकारी व सैन्यामध्ये पसरलेली होती.

मथुरेच्या युध्दात यशवंतरावांनी त्यांच्या सैन्याची इंग्रजांच्या विरुध्दची रणनिती ही फार रोमांचकारी आखली होती गनिमी युध्दतंत्राच्या साहाय्याने मैदानी प्रदेशात यशवंतरावांचे सैन्य इंग्रजांच्या सैन्याविरुध्द लहान-लहान गटामध्ये आपले घोडदळ विभागुन पुन्हा लवकरात लवकर एकत्रीत व्हावयाचे इंग्रजांच्या घोडदळांना ज्यावेळी यशवंतरावांच्या सैन्याविरुध्द लढण्याचा आदेश

इंग्रज सैन्याअधिकारी द्यावयाचे त्यावेळी यशवंतरावांचे सैन्य रणांगणातुन पळत सुटायचे आणि इंग्रज घोडदळास आपला पाठलाग करावयास लावयाचे, ज्यावेळी इंग्रजांचे घोडदळ पाठलाग करुन थकायचे त्यावेळी परत आपल्या सैन्यदलाकडे परत येत असताना यशवंतरावांचे सैन्य या घोडदळाचा पाठलग करत त्यांच्यावर हल्ले करत, बंदुका चालवत, भाले फेकत अशा पध्दतीने यशवंतरावांची युध्दनिती इंग्रजांच्या घोडदळा विरुध्द असायची अशा प्रकारे इंग्रजांचे सैन्य युध्दात बहुसंख्येने मारले जायचे, कधी कधी तर लपुन छपुन इंग्रजांच्या उजव्या आणि डाव्या बगले पर्यंत यशवंतरावांचे सैन्य घोडदळ पोहचायचे व हल्ला करायचे तर काही सैन्य इंग्रजांच्या अन्नधान्य, दारुगोळा इत्यादी रसदपुरवठा लुटायचे चारही बाजुने इंग्रजांच्या सैन्यावर आक्रमण करायचे ज्यामुळे इंग्रजांना कोणत्या दलाकडे लक्ष द्यावे या गोंधळाच्या मनस्थिती मध्ये टाकावयाचे ही युध्दनिती यशवंतरावांची असायची.

मथुरेवर ज्यावेळी यशवंतरावांनी आक्रमण केले त्या वेळी मथुरेतील इंग्रज अधिकारी स्केनर हा आगऱ्याच्या दिशेने पळाला[52] त्यावेळी यशवंतरावांनी त्याच्या संपत्तीवर कब्जा करण्यासाठी भवानी शंकर, नजीबखान व गोमाजी शिंदे या तीघांना जबाबदारी देण्यात आलेली होती. इंग्रज सैन्य अधिकारी स्केन यमुना नदीच्या किनाऱ्यावर होता. त्या ठिकाणी यशवंतरावांना सहाशे देशी रिसालदार सैन्य मिळाले जे स्केनरच्या नेतृत्वाखाली कार्यरत होते. त्यांनी यशवंतरावांच्या सैन्यामध्ये सामील होण्यास सुरुवात केली त्याच दरम्यान नाहर अलीखान नावाच्या सैनिकाने यशवंतरावांपुढे आत्मसमर्पन करुन यशवंतरावांच्या लष्करामध्ये कार्य करण्यासाठी विनंती करण्यात आली ग्रेम मेकर नावाच्या इंग्रज सैन्य अधिकाऱ्याच्या कोठीला आपल्या कब्जात घेऊन त्यास आपल्या सैन्यदलाच्या साधन सामग्रीला ठेवण्यास उपयोगात आणले हरनाथ सिंहाने त्या ठिकाणी असणाऱ्यांना दंड देऊन पैशाची मागणी केली त्यावेळी त्यांच्याकडून सांगण्यात आले की आपण जी कोठी हस्तगत केली आहे त्याच्या एका खोलीमध्ये मोठ्या प्रमाणात मीठाचा साठा करुन ठेवण्यात आला होता. त्याठिकाणी त्यास 13 लाख रुपये नगदी रोख स्वरुपात मिळाले. अशा पध्दतीने यशवंतरावांना धनसंपत्ती, रसद पुरवठा आणि सैन्य मिळाल्याने त्यांनी दिल्लीवर आक्रमण करुन पातशहाला इंग्रजांच्या नियंत्रणातुन मुक्त करावे हा निर्णय यशवंतरावांनी घेतलेला दिसुन येतो.

## 6.19 दिल्लीचे युध्द (8 आक्टो-1804) :-

दिल्ली मध्ये 7 ऑगस्ट ते 13 ऑगस्ट 1804 दरम्यान हरनाथ सिंह, कर्नल ऑक्टर लोनी यांच्या दरम्यान बऱ्याच वेळा एकमेकां विरुध्द चकमकी झाल्या होत्या.[53] कर्नल ऑक्टरलोनी हरनाथ सिंहामध्ये चाललेल्या चकमकीमुळे कर्नल ऑक्टरलोनी किल्ल्याचा आश्रय घेऊन प्रत्येकवेळी आपला बचाव करत होता. त्यावेळी हरनाथ सिंहाने दिल्लीच्या किल्ल्याला चारही बाजुने खड्डे खोदुन सैन्याचा वेढा देण्यात आला. ही तयारी करण्या व्यतिरिक्त नजफ गडाहून रेवारी या ठिकाणी येऊन पोहचला त्यावेळी हरनाथ सिंहाने शेख कुदरत दौला व सदानंद पंडित या दोघांना 50 घोडदळासहीत यशवंतराव होळकर यांची भेट घेण्यास पाठविले होते. त्यावेळी यशवंतराव होळकर हे आपल्या सैन्यासह दिल्लीच्या समोर येऊन उभे ठाकले. यावेळी यशवंतरावाकडे मोठ्या प्रमाणात सैन्य होते, 1) 60,000 घोडदळ, 2) 15 ते 16000 पायदळ 3) 190 ते 200 तोफा इत्यादी दिल्लीवर स्वारी करण्याच्या उद्देशाने तयारी केलेली पहायला मिळते. 8 ऑक्टोबर रोजी यशवंतरावांनी दिल्लीस वेढा घातला त्यावेळी यशवंतरावांनी प्रथम आपल्या तोफखान्यातील तोफाद्वारे दिल्लीच्या किल्ल्यावर गोळाबारी करण्यास सुरुवात केली यावेळी दिल्लीच्या संरक्षणाकरिता इंग्रज सैन्य अधिकारी लेफ्टनंट कर्नल ऑक्टरलोणी, लेफ्टनंट कर्नल बर्न यांच्यावर जबाबदारी सोपविण्यात आलेली होती.

यशवंतरावांनी वेगवेगळ्या आघाड्यावर युध्दाला सुरुवात करुन दिल्लीचा पाडाव करण्याचा सातत्याने त्यांनी प्रयत्न चालवला होता. इंग्रजांनी कधी स्वप्नातही विचार केला नसेल की यशवंतराव होळकर दिल्लीवर चालुन येईल. त्याचवेळी पातशहाला असे वाटत होते की यशवंतराव होळकर आपल्याला इंग्रजांच्या नियंत्रणा पासुन मुक्त करण्यासाठी आलेला आहे. ही बातमी त्यास समजताच त्याच्या आशा पल्लवीत झालेल्या पहावयास मिळतात. दिल्लीच्या पातशहाने इंग्रजांच्या विरुध्द यशवंतरावांचा विजय व्हावा यासाठी देवाकडे प्रार्थना करु लागला होता. त्यावेळी पातशहाने यशवंतरावांना महाराजाधिराज राज राजेश्वर अलिजा बहादुर असा किताब बहाल केला होता. दिल्लीचा वेढा 7 दिवस यशवंतरावांच्या सैनिकांनी दिला यशवंतराव दिल्ली जिंकणार हा आत्मविश्वास त्यांना होता. परंतु त्यांचा विश्वास जो पहिल्यापासून त्यांच्या पडत्या काळात त्यांच्या सोबत असलेला भवानी शंकर खत्री हा लालसे पोटी ऐन यशवंतराव दिल्ली जिंकण्याच्या तयारीत असताना इंग्रजांना जाऊन सामील झाला. त्यामुळे यशवंतराव निराश झाले पुढे दिल्लीला वेढा देऊन

काही उपयोग नाही. अशी त्यांची भावना झाली त्याचवेळी यशवंतरावांनी दिल्लीचा वेढा उठवला जेणे करुन आपल्या सैन्यदलात फितुरी होऊ नये असे त्यांना वाटत होते. त्यामुळे त्यांनी दिल्ली सोडण्याचा निर्णय घेतला तीव्रगतिने जनरल लॉर्ड लेक दिल्लीकडे येत आहे. त्यावेळी यशवंतरावांनी दिल्लीच्या आणि लॉर्ड लेकच्या सैन्यामध्ये फसण्या अगोदर लॉर्ड लेकवर हल्ला केला. लॉर्डलेक या हल्ल्यात बचावला गेला पाठीमागे राहिलेल्या इंग्रज सैन्यावर यशवंतरावांच्या सैन्याने आक्रमण करुन इंग्रजांच्या सैन्याला ठार केले. काहींना बंदी बनविण्यात आले. शेवटी यशवंतरावांनी दोआब उध्वस्त करुन आयोध्येच्या दिशेने निघुन गेले. यशवंतराव होळकर हे एकटे इंग्रजांच्या विरुध्द लढण्यास सक्षम होतेच त्यांना दिल्लीचा विजय हाता तोंडाशी आलेला विजय सोडुन द्यावा लागला. यशवंतरावांनी आपले सैन्यदल ढीगच्या किल्ल्याकडे पाठवून देण्यात आले आणि स्वत: यशवंतराव मोजक्या घोडदळासह फरुखाबाद या ठिकाणी निघुन गेले.

| Siege of Delhi | |
|---|---|
| Part of the Second Anglo-Maratha War | |
| Date | 8–19 October 1804 |
| Location | Delhi, Mughal Empire |
| Result | Holkar withdrawal, British retain Delhi to the Mughal Emperor, Shah Alam II. |
| **Belligerents** | |
| East India Company<br>Mughal Empire | Holkar faction of the Maratha Confederacy |
| **Commanders and leaders** | |
| Shah Alam II<br>David Ochterlony<br>Gerard Lake | Yashwantrao Holkar |
| **Strength** | |
| 2,000 regulars<br>1,500 irregulars[1]<br>5,000–10,000 Mughal Garrison | 60,000 cavalry<br>15,000 infantry |

## 6.20 फरुखाबादचे युध्द (16 नोव्हेंबर 1804)

ज्यावेळी यशवंतराव आपल्या मोजक्या सैन्यासह फरुखाबादला आले त्यावेळी फरुखाबादच्या नवाबाने यशवंतरावांच्या स्वागतासाठी लहानसा कार्यक्रम जेवणाचा ठेवण्यात आला होता.[54] यशवंतरावांचा आणि सैन्याचा सातत्याने रात्र दिवस इंग्रजांच्या विरुध्द चाललेले युध्द त्यामुळे थोडा आराम मिळावा या उद्देशाने यशवंतरावांचे सैन्य खाण्या पिण्याचा आनंद घेत होते. परंतु यशवंतरावांच्या गुप्तहेराद्वारे त्यादिवशी यशवंतरावांच्या सैन्य अधिकाऱ्यांना बातमी कळाली होती की आपल्या जवळपास लॉर्ड लेकने लष्करी छावणी टाकलेली आहे. लॉर्ड लेकचे रात्री यशवंतरावांच्या सैन्यावर हल्ला करण्याचे नियोजन चालु आहे. परंतु यशवंतरावांच्या या सैन्य अधिकाऱ्यांनी या माहितीला मुहंमदखान अफ्रीदी याने ही माहिती खरी असु शकते. परंतु गणपतराव

याने ही माहिती खोटी ही असु शकते. या चर्चेमध्ये येणाऱ्या शत्रुच्या कारवाईला गंभीरतेने घेतले नाही, लॉर्ड लेक आपल्या सैन्यासह 50 कोस दुर आहे आणि तो एवढ्या लवकर येऊन हल्ला करेल अशी शक्यता कमीच आहे कारण आपल्या सैन्यात आणि लॉर्ड लेकच्या सैन्यामध्ये ५० कोसा चे अंतर असल्याने हल्ला होणे अशक्य आहे अशा अति आत्मविश्वासाच्या भ्रमामध्ये यशवंतरावांचे सैन्यअधिकारी राहिले.

16 नोव्हेंबर 1804 रोजीच्या मध्यरात्री यशवंतराव होळकर यांच्या लष्करी छावणीवर अचानकपणे लॉर्डलेकने हल्ला चढवला होता. बंदुकांच्या फैरी झडत होत्या त्यावेळी यशवंतरावांचे सैन्य साखर झोपे मध्ये आराम करत होते. ज्यावेळी यशवंतरावांच्या छावणीमध्ये दारुगोळ्याच्या साठ्याचा आवाज मोठा आला त्यावेळी यशवंतराव आणि त्यांच्या सैन्याला आपल्यावर हल्ला झाला आहे त्यावेळी त्यांनी स्वत:ला सावरण्यास सुरुवात केली, यशवंतरावांचा घोडा त्याचे नाव "वीरा" होते तो या इंग्रजांच्या चालणाऱ्या बंदुकांच्या फैरीमध्ये एक गोळी लागून ठार झाला. यशवंतरावांनी दुसऱ्या घोड्यावर स्वार होऊन मैनपुरीच्या दिशेने निघुन गेले. मैनपुरी येथील इंग्रजांच्या असणाऱ्या लष्करी छावणीला आगलावण्यात आली सातत्याने घोड्यावर स्वार होऊन बलदेव घाटाला ओलांडून कोडूला झील या ठिकाणी पोहचले त्याठिकाणी त्यांनी पुन्हा आपली लष्करी छावणीची निर्मिती करुन पुढील युध्द योजना व रणनिती तयार करण्याच्या कार्यामध्ये गुंतलेले पहायला मिळतात.

फरुखाबादच्या या युध्दामध्ये यशवंतरावांच्या सैन्याने 150 इंग्रजी सैन्याला ठार केले. लॉर्ड लेकचे सैन्य यशवंतरावांच्या सैन्यापेक्षा 5 पट मोठे होते. यशवंतराव तर मोजक्या सैन्यासह फरुखाबादला आले होते. या हल्ल्याचा फायदा लॉर्ड लेक यास व्हावयास पाहिजे होता लेककडे सैन्यदल मोठ्या प्रमाणात असुन ही तो यशवंरावांना पकडण्यात अयशस्वी झाला. जनरल लॉर्ड लेकची मोठ्या प्रमाणात असणाऱ्या सैन्याची फळी यशवंतरावांनी मोडुन काढली यशवंतरावांनी फरुखाबादेतुन लगेच ढीगच्या किल्ल्याकडे धाव घेतली यशवंतरावांनी आपला व सैन्याचा मोर्चा ढीगच्या किल्ल्याकडे वळवला यशवंतराव ढीगकडे जात असता लॉर्ड लेककडे मोठ्या प्रमाणात सैन्य असुन ही त्यांचा पाठलाग करण्याची हिंम्मत झाली नाही. त्यावेळी लॉर्ड लेकने वेलस्लीस उद्देशुन सांगितले की "असल्या सैतानी शत्रुला तोंड द्यायची हिंम्मत तत्कालीन कोणत्याही इंग्रजी सैन्याधिकाऱ्या मध्ये नव्हती." एवढी दहशत यशवंतरावांची संपूर्ण इंग्रजांवर निर्माण झालेली दिसते.

यशवंतरावांचे युध्द नेतृत्व डावपेच, रणनिती युध्दातील आक्रमकता, तीव्रता, उद्दिष्टां मध्ये सातत्य इत्यादीमुळे इंग्रजांचे सैन्य मोठ्या प्रमाणात मारले गेले, काही भारतीय इंग्रजांच्या सैन्यामध्ये भरती झाले होते त्यांना यशवंतरावांनी बाजुला केले. अशा प्रकारे यशवंतराव होळकरांच्या माध्यमातून नेतृत्व त्या काळात उदयास आले होते. फरुखाबादहुन यशवंतराव होळकर ढीगच्या दिशेने मार्गस्थ झाले त्यावेळी सहारणपूरहून जात असताना शामली या ठिकाणी यशवंराव आणि बर्न मध्ये युध्द झालेले पहायला मिळते.

| Battle of Farrukhabad | |
| --- | --- |
| Part of the Second Anglo-Maratha War | |
| **Date** | 14 November 1804 |
| **Location** | Farrukhabad, Uttar Pradesh, India |
| **Result** | Maratha victory[1] |
| **Belligerents** | |
| Maratha Empire | East India Company |
| **Commanders and leaders** | |
| Yashwantrao Holkar | Gerard Lake |

## 6.21 26 **आक्टोबर** 1804 **चे युध्द** :-

यशवंतराव होळकर यांना गुप्तहेराद्वारे माहिती मिळाली होती.[55] की आपल्या राज्याच्या काही भागावर इंग्रजांनी कब्जा केला आहे. याची माहिती त्यांना मथुरेमध्ये असताना मिळाली होती. त्यावेळी यशवंतरावांनी अचानकपणे दिल्लीवर स्वारी करावयाची असे ठरवले होते. त्या पाठीमागे यशवंतरावांची युध्दनितीचा हा एक भाग होता. जर आपण दिल्लीवर आक्रमण केले तर इंग्रजांचे संपूर्ण सैन्य दिल्लीकडे येईल व आपल्या भागावर त्यांनी मिळवलेला कब्जा सोडतील ही त्यांच्या युध्दनितीचा भाग होता. परंतु दिल्ली काही आपल्या ताब्यात येत नाही स्वकियांनी विश्वासघात केल्याने यशवंतरावांना दिल्लीला सात दिवस वेढा देऊन विजय लवकरच मिळत होता परंतु स्वीकियांच्या अशा विश्वासघातामुळे त्यांनी दिल्लीचा वेढा उठवला आणि गुप्तहेराद्वारे त्यांना माहिती मिळाली की जनरल लॉर्ड लेक दिल्लीकडे येत आहे त्यावेळी यशवंतरावांनी दिल्ली सोडून जाण्याचा निर्णय घेतला. त्यावेळी यशवंतरावांनी 26 आक्टोबर 1804 रोजी यांच्या घोडदळाने पाणिपतच्या खाली यमुना नदीला ओलांडून कर्नल बर्नवर आक्रमण करण्याचे ठरवले होते. यशवंतराव होळकर दिल्लीहुन सहारणपूरच्या दिशेने जात होते. त्यावेळी त्यांना शीख सरदार

दोलचासिंह, नवाब बंबुखान आणि बेगम समरु यांच्याद्वारे यशवंतरावांना सहकार्याची अपेक्षा होती. यशवंतराव होळकर यांनी शीख सरदार दोलचासिंह, रोहीलाखंडाचा नवाब बबुखान, मेरठ प्रांताची बेगम समरु, इत्यादींना पत्र पाठवून कळवले की, प्रथम देश नंतर धर्म, आम्हाला जाती, धर्म, व राज्याच्यावर उठुन देशहितासाठी कार्य करावे लागणार आहे. आपण सर्वजण इंग्रजांच्या विरुध्द युध्दाला सुरुवात करावी.

ज्यावेळी यशवंतराव होळकर सहारनपुरला चालले होते. त्यावेळी दिल्ली आणि सहारनपूर च्यामध्ये असणाऱ्या शामली या ठिकाणी परत येणाऱ्या इंग्रजांच्या सैन्यावर यशवंतरावांनी प्रखरतेने हल्ला केला. या हल्ल्यात मोठ्या प्रमाणावर इंग्रजांचे सैन्य मारल्या गेले. यशवंतरावांच्या या आक्रमक हल्ल्याने इंग्रज सैन्य भयभीत झाले होते. कर्नल बर्न आणि त्याचे सैन्य यशवंतरावांशी युध्द करण्याऐवजी स्वत:चे संरक्षण करत होते. संध्याकाळ पर्यंत यशवंतराव होळकरांच्या विजयी घोडदळाने कर्नल बर्न ला आणि त्याच्या सैन्याला तिन्ही बाजुने वेढा दिला होता. परंतु रात्रीच्या अंधाराचा फायदा घेऊन कर्नल बर्न गुपचुप या ठिकाणाहुन पळुन गेला. अशा पध्दतीने यशवंतराव होळकर ज्या ज्या दिशेला, प्रातांमध्ये जातील तेथील इंग्रजांचा त्यांनी पराभव केलेला पहावयास मिळतो. यावरुन यशवंतरावांचे लष्करी धोरण, युध्द सज्जता, सैन्याची नेतृत्वाविषयी असणारी निष्ठा, प्रामाणिकपणा भारतातील देशी संस्थानिकांनी सहकार्य केले नाही तरी स्वत: आपल्या लष्करी क्षमतेनुसार इंग्रजांच्या विरुध्द आपला लढा चालु ठेवलेला दिसुन येईल. यशवंतराव होळकर या ठिकाणाहुन ढीगच्या दिशेने आपला मार्गक्रमण चालु केलेला दिसतो.

### 6.22 **ढीगचे युध्द** (3 **नोव्हेंबर** 1804) :-

3 नोव्हेंबर 1804 रोजी यशवंतराव होळकर यांच्या अनुपस्थिती मध्ये.[56] यशवंतरावांचा सरदार बापु शिंदे, मिर्जा अशरफबेग बरारसिंह, गोमाजी शिंदे यांच्या नेतृत्वाखाली सैन्य एकत्रीत येऊन ढीगच्या रणांगणांवर हे युध्द इंग्रजांच्या विरुध्द लढण्यात आले हे युध्द यशवंतराव होळकर यांचे सरदार आणि इंग्रजांमध्ये घनघोर युध्द झालेले पहायला मिळते. या युध्दामध्ये यशवंतरावांच्या सैन्याचे मोठे नुकसान झाले या युध्दात 643 इंग्रजांचे सैन्य ठार झाले ज्या मध्ये 22 इंग्रज सैन्य अधिकाऱ्यांचा समावेश होता तर यशवंतरावांच्या सैन्याची संख्या 2000 होती या युध्दामध्ये

इंग्रजांचा सैन्य अधिकारी जनरल फ्रेजरचा या युध्दामध्ये मृत्यु झाला. त्याच्या जागी इंग्रजांच्या सैन्याचे नेतृत्व कर्नल मॉन्सन याने केले होते.

### 6.23 **ढीगचे युध्द** (20 **नोव्हेंबर** 1804) :-

यशवंतराव होळकर हे एका निश्चित ध्येयाने त्यांनी ढीगच्या किल्ल्याकडे जाण्यास मथुरा गोवर्धन द्वारे पोहचले.[57] ज्यावेळी यशवंतराव ढीगला पोहचले त्यावेळी जाट राजा रणजित सिंहाने यांचे जोरदार स्वागत केले होते. यशवंतरावांच्या मदतीसाठी रणजित सिंहाने आपला मुलगा लक्ष्मण सिंह आणि दीवाण बरारसिंह यांच्या नेतृत्वाखाली सैन्यदलाच्या तीन पलटणी त्यावेळी तयार करण्यात आलेल्या होत्या. जाट राजाने इंग्रजांसोबत करार केलेला असतानाही यशवंतरावांना त्याने सहकार्य करुन आपल्या राज्यात बोलावले होते.

### 6.23.1 **यशवंतरावांचा पाठलाग** :-

सर रॉबर्टस लिहीतात की, यशवंतराव होळकर यांनी आपल्या घोडदळासह गंगा-यमुना नदीच्या मध्ये असणाऱ्या सुपीक प्रदेश दोआबाला लुटण्याचा व अवध आणि रोहीलाखंडामध्ये प्रवेश करण्याच्या उद्देशाने यशवंतरावांनी यमुना नदी ओलांडल्याने इंग्रज अधिकारी लॉर्ड लेक यशवंतरावांच्या या कृत्यामुळे द्विधा मनस्थिती मध्ये पडला होता. जनरल लेकने आपल्या सैन्यदलाचे दोन गटामध्ये विभागणी करुन एक सैन्यदल कर्नल फ्रेजरच्या नेतृत्वाखाली पायदळ, तोफखाना व देशी घोडदळाच्या दोन पलटणी सह फ्रेजरला ढीगच्या दिशेने रवाना केले तर दुसरे सैन्य दल स्वत: लॉर्ड लेक आपल्या नेतृत्वाखाली घेऊन यशवंतराव होळकरांचा पाठलाग करण्यासाठी दोआबात शामली या ठिकाणी पोहचला दोन दिवसानंतर जनरल लेकने 5 नोव्हेंबर रोजी यमुना नदी ओलांडून कर्नल डॉनच्या नेतृत्वाखाली पायदळ, घोडदळाच्या दोन पलटणी होत्या परंतु त्यातील कर्नल डॉनला पायदळ सैन्यदल घेऊन यशवंतरावांच्या पायदळाचा पाठलाग करण्यासाठी ढीगच्या दिशेने लॉर्ड लेकने पाठवले होते.

कर्नल फ्रेजर हा आपले सैन्य घेऊन 12 नोव्हेंबर रोजी ढीगच्या किल्ल्या जवळ येऊन पोहचला 17 नोव्हेंबर रोजी जनरल लॉर्डलेक फरुखाबाद या ठिकाणी यशवंतराव होळकर यांच्या जवळ येऊन पोहचला होता. परंतु त्याचे यशवंतरावांवर हल्ला करण्याचे धाडस झाले नाही. त्यावेळी यशवंतराव आपल्या घोडदळासह ढीगच्या किल्ल्यामध्ये जाऊन पोहचले हे सर्व जनरल

लेक आपल्या डोळयांनी पहात होता. परंतु त्याची यशवंतरावांना रोखण्याचे धाडस झाले नाही. या सर्व घडामोडीची माहिती गर्व्हनर जनरल यास माहिती झाल्याने त्याने जनरल लेक यास पत्राद्वारे कळवले की, मला या गोष्टीचा पश्चाताप होत आहे की यशवंतराव होळकर हा तुमच्या तावडीतुन कसा निसटुन गेला. त्याचा सर्वनाश करणे फार महत्वाचे आहे. त्याशिवाय आम्हाला चैन पडणार नाही" यशवंतराव इंग्रजांचा एका पाठोपाठ एक पराभव करत होते. त्यामुळे इंग्रजांना भीती वाटत होते की भारतातील आपले साम्राज्याविस्ताराचे स्वप्न रोखण्यासाठी हा यशवंतराव आड येत आहे वेळीच त्याचा बंदोबस्त जर केला नाही तर भारतातील लहान मोठे संस्थानिक जागृत होऊन आपल्या विरुध्द युध्द करण्यास तयार होतील. एका यशवंतराव होळकरां विरुध्द आज आपण युध्द करत आहोत उद्या हजारो यशवंतराव होळकरां बरोबर युध्द करावे लागेल. त्यासाठी यशवंतराव होळकरांचा सर्वनाश करावा लागेल. त्याशिवाय इंग्रजांना चैन पडणार नाही. अशी भावना त्याकाळी इंग्रजांची यशवंतरावांच्या कार्यकर्तृत्वामुळे झालेली होती.

### 6.23.2 जनरल लॉर्ड लेक ढीग किल्ल्या समोर आला :-

जनरल लेक हा आपल्या सैनिकांसह 2 आक्टोबरला ढीगच्याकिल्ल्या समोर आला आणि ढीगच्या किल्ल्यावर आक्रमण करण्याच्या तयारीला लागला तब्बल एक महिना लेकने किल्ल्याच्या बाहेर वेढा देऊन उभा राहीला शेवटी 13 डिसेंबर रोजी यशवंतराव होळकर आणि इंग्रजांमये युध्दाला सुरुवात झाली. जनरल लेकने मोठ्या प्रमाणात ढीगच्या किल्ल्यावर तोफा द्वारे गोळाबारी करण्यास सुरुवात केली तर ढीगच्या किल्ल्या मधून यशवंतरावांचे सैन्य व जाटाच्या सैनिकांनी धर्नुधारी दलाद्वारे बाणांचा अग्नि वर्षाव इंग्रजांच्या सैन्या विरुध्द करण्यात येत होता. किल्ल्याच्या आतून यशवंतरावांचे सैन्य तेलामध्ये कापसाचे बोळे भिजवून लॉर्ड लेकच्या सैन्यावर धनुष्यबाणाद्वारे फेकण्यात येत. अशा पध्दतीने ढीग किल्ल्याच्या बाहेरुन व आतुन एकमेकांवर हल्ले चढविण्यात येत होते. हे हल्ले एकंदरीत 10 दिवसापर्यंत चालु होते त्यातच यशवंतरावांच्या सैनिकांनी तोफाद्वारे मोठ्याप्रमाणात इंग्रजांच्या विरुध्द तोफ गोळे टाकल्याने यामध्ये बहुसंख्य इंग्रज सैनिक ठार झाले तर काही जखमी पहायला मिळतात. इंग्रज सैन्य अधिकारी लॉर्ड लेकने ढीगच्या किल्ल्याला असणारा दरवाजा तोडण्यासाठी युध्द चालु होण्या अगोदर 10 डिसेंबर रोजी मोठ्या तोफा व दारुगोळा अगोदरच आणुन ठेवला होता. इंग्रज त्यांच्या युध्द योजने नुसार टप्या टप्याने

चालले होते. प्रथम तोफाद्वारे किल्ल्यातील सैन्यावर तोफ गोळे डागण्याचा परिणाम दिसत नसेल तर किल्ल्याचा दरवाजा तोडणे ही योजना होती.

### 6.23.3 **यशवंतराव व जाट सैनिकांचा प्रखर हल्ला :-**

20 नोव्हेंबर रोजी जनरल लॉर्ड लेकने ढीगच्या किल्ल्याला वेढा घातला होता.[58] या वेळी या किल्ल्या मध्ये यशवंतरावांचे सैन्य हे मोजकेच होते यावेळी यशवंतराव होळकर हे ढीगच्या किल्ल्यात मोजके सैन्य ठेवून महत्वाच्या सैन्यदलासह भरतपुरचा जाट राजा रणजिंत सिंहाच्या भेटीला इंग्रजांच्या विरुध्द मदत व वाटाघाटी करण्यासाठी गेले. तेंव्हा जनरल लेक हा आपल्या सैन्यासह ढीगच्या किल्ल्याच्या समोर उभा राहुन किल्ल्याला वेढा देऊन या किल्ल्याच्या बाजुने खंदक खोदले होते कारण ढीगच्या किल्ल्यास तोफांचा भडीमार करुन किल्ल्याची तटबंदी फोडण्याचा त्यांचा प्रयत्न होता. इंग्रजांच्या चालणाऱ्या या कारवाया यशवंतरावांच्या अनुपस्थितीमध्ये त्यांच्या सैनिकांनी आक्रमकपणे जोराचा प्रतिहल्ला केला. या प्रतिहल्ल्यामध्ये इंग्रजांचे सैन्य बंदुकाच्या फैरी व तोफाद्वारे टाकण्यात येणाऱ्या तोफगोळेच्या माऱ्या मध्ये सातत्याने मारले जात होते.

23 नोव्हेंबर रोजीच्या मध्यरात्री दुसऱ्यांदा जनरल लेकने ढीगच्या किल्ल्याला तिन्ही बाजुनी वेढलेले असताना हल्ला चढविला होता. यावेळी जनरल लेकने मोठ्या प्रमाणात तोफाद्वारे गोळाबारी चालु केली होती. या गोळाबारी मध्ये किल्ल्याची तटबंदी फोडण्यात जनरल लेक यशस्वी झाला. परंतु यशवंतरावांचे सैन्य यावेळी सावध आसल्याने सैन्य तयारीत होते. जनरल लेक हा आपल्या सैन्याने फोडलेल्या तटबंदी मधुन किल्ल्याच्या आत प्रवेश करावा यासाठी प्रयत्नात होता. परंतु यशवंतरावांचे आणि जाटांचे सैन्य इंग्रजांच्या सैन्यावर प्रखरपणे आक्रमण करत होते. या आक्रमणा मध्ये जनरल लेकचे सैन्य मोठ्या प्रमाणात मारले गेले. त्यावेळी यशवंतरावांचे सैन्य हे ढीगच्या बालेकिल्ल्या मध्ये निघुन गेले. इंग्रजाचे सैन्य आत आल्यानंतर पुन्हा एकदा युध्दाला सुरुवात झाली.

24 नोव्हेंबर च्या रात्री यशवंतरावांच्या सैन्याने ढीगच्या किल्ल्यातुन बाहेर पडताना आक्रमकपणे घोडदळ किल्ल्याच्या बाहेर येताना लेकच्या सैन्याला कापुन, दोन गटामध्ये विभागुन आक्रमकतेने किल्ल्याच्या बाहेर पडले आणि भरतपुरच्या दिशेने निघुन गेले. यावेळी

यशवंतरावांच्या सैन्याने गमिनीकावा युध्दतंत्राचा वापर करुन जनरल लेकच्या सैन्याचे मोठ्या प्रमाणात नुकसान केलेले दिसुन येते. यशवंतरावांच्या अनुपस्थिती मध्ये यशवंतरावांचे सैन्य गनिमी युध्द तंत्रात किती निष्णात होते हे त्यांच्या सैन्यदलाला दिलेल्या प्रशिक्षणावरुन दिसुन येतो. ज्यावेळी यशवंतरावांच्या सैनिकांनी ढीगचा किल्ला सोडला त्यावेळी किल्ला हा रिकामा इंग्रजांच्या हाती देण्यात आलेला होता. ढीगच्या किल्ल्यावर 34 तोफा आणि सैन्याला लागणारा अन्नधान्याचा साठा हा एवढा इंग्रजांच्या हाती लागला होता.

यशवंतराव होळकर इंग्रजांच्या विरुध्द सहकार्य मिळविण्यासाठी रणजित सिंहाकडे पाठिंबा मिळविण्यासाठी गेले होते.[59] त्यावेळी यशवंतरावांना रणजीतसिंहाने पाठिंबा दिला. यशवंतराव होळकर यांनी इंग्रजांचा सातत्याने केलेला पराभव पाहुन रणजित सिंह हा प्रभावीत झालेला होता. रणजित सिंहाने इंग्रजांशी मैत्रीपूर्ण करार केलेला असताना ही त्याने यशवंतराव होळकर यांना सहकार्य करण्याचे वचन दिले होते. एवढ्या संघर्षाच्या कालखंडात हा एक प्रकारचा यशवंतराव होळकर यांना दिलासा देणारी घटना होती.

28 डिसेंबर रोजी जनरल लॉर्ड लेकने यशवंतरावांचा केलेला पाठलाग.[60] सैन्यावर केलेला खर्च, त्याचा काही उपयोग झाला नाही उलट सैन्य मारले गेले, जखमी झाले, शस्त्रास्त्रे लुटून नेली, रसद पुरवठा, लुटला विनाकारण मोठ्या प्रमाणात नुकसान झाले इत्यादी सर्व गोष्टी पाहुन जनरल लॉर्ड लेकने ढीगचा किल्ला सोडला ढीगच्या युध्दामध्ये इंग्रजांचे 227 सैन्य ठार झाले, ज्या काही तोफा ढीगच्या किल्ल्यावर यशवंतरावांच्या सैनिकांनी सोडल्या होत्या त्या तोफा यशवंतराव होळकर यांनी मुकुंदराखिंडी युध्दात कर्नल मॉन्सनचा पराभव करुन हस्तगत केलेल्या होत्या. यावेळी यशवंतराव हे भरतपुरच्या किल्ल्यामध्ये वास्तव्यास होते रणजित सिंहाने यशवंतराव होळकरांना इंग्रजांच्या विरुध्द सहकार्य करण्यास संमती दिली आहे ही बातमी जनरल लॉर्ड लेक यास चिंतेमध्ये टाकणारी होती. जनरल लेक आपल्या वरिष्ठांच्या आदेशानुसार भरतपुरच्या दिशेने सैन्यासह निघाला त्यावेळी त्यास चिंता वाटत होती की मुकुंदराखींडी मध्ये ज्या पध्दतीने यशवंतराव होळकर याने कर्नल मॉन्सनचा पाठलाग करुन 250 मैलाचा प्रदेश तुडवत अडीच महिन्यांच्या काळात कर्नल मॉन्सनचा पराभव केला आणि शेवटी मॉन्सनला आगऱ्याला पळुन जावे लागले तशा प्रकारची स्थिती आपली यशवंतराव तर करणार नाहीना अशी भीती, चिंता जनरल लेक यास वाटणे साहजिक होते.

## 6.24 भरतपुरचे युध्द :-

भरतपुरचा किल्ला हा भारतातील शक्तिशाली किल्ल्या पैकी एक आहे.[61] या किल्ल्याची निर्मिती महाराजा सुरजमल यांच्याद्वारे इ.स. 1733 साली बांधण्यास सुरुवात झाली एकंदरीत हा पूर्ण किल्ला बांधण्यासाठी 8 वर्षाचा कालखंड लागला आहे. या किल्ल्या मध्ये दोन खंदक खोदलेले आहेत तर एक खंदक हे भरतपुर शहराच्या भिंतीच्या आतुन खोदण्यात आले. दुसरे खंदक हे भरतपुर शहराच्या भिंतीच्या बाहेरुन खोदण्यात आले होते. भरतपुर च्या या किल्ल्याची रचनाही लष्करी दृष्टिकोनातुन महत्वाचे होती. या शहराच्या तटबंदी बाहेरुन असणाऱ्या खंदकाची रुंदी ही 250 फुट आणि खोली 20 फुट होती. ज्यावेळी हा खंदक खोदण्यासाठी माती काढण्यात आली होती तिचा उपयोग हा शहराच्या बाजुने मोठी भिंत (तटबंदी) बनविण्यासाठी वापरात आणली ही माती संपूर्ण शहराला सुरक्षेसाठी तटबंदी बनविण्यास कामात आणली. किल्ल्याच्या आत खोदण्यात

आलेला खंदक ज्यास सुजान गंगा असे नाव देण्यात आले होते. त्याची रुंदी ही 175 फुट आणि खोली 40 फुट होती. याच्या निर्मितीसाठी मोठ्या प्रमाणात चुना आणि दगड हा वापरात आणला होता. प्रमुख किल्ल्याच्या भिंती ह्या 100 फुट उंच आणि 30 फुट रुंद होत्या. यामुळे भरतपुरच्या किल्ल्याची तटबंदी ही मातीच्या भिंतीनी बनवलेल्या होत्या त्याभिंतीला लागुन खंदक खणलेला असा हा दुर्लघ्य किल्ला म्हणून गणला जातो. त्याचबरोबर या किल्ल्याच्या सुरक्षेसाठी तटबंदी वरती मोठमोठ्या तोफा जागोजागी युध्दाच्या दृष्टीने शत्रु पक्षावर मारा करण्यासाठी ठेवण्यात आलेल्या होत्या.

भरतपूर राज्याचे शासक हे जाट राजा रणजित सिंह हे होते रणजित सिंहाचे सैन्यदल आणि नागरीक हे या भरतपूर शहराच्या आत वास्तव्यास असायचे.[62] त्यावेळी यशवंतरावांचे सैन्य भरतपुरात येऊन पोहचले होते. यशवंतरावांना भरतपुरच्या किल्ल्यामध्ये जोरदार स्वागत करण्यात आले. यशवंतरावांनी आपले कडवट घोडदळ भरतपुरच्या किल्ल्यापासून खिंडी या ठिकाणी लष्करी छावणी उभारुन इंग्रजांना किल्ल्याच्या आतुन व बाहेरुन त्यांच्यावर आक्रमण करता यावे यासाठी ठेवण्यात आले होते. त्याचबरोबर या इंग्रजी सैन्यावर गनिमीकावा युध्दतंत्राद्वारे हल्ले करण्यात यावे हा यशवंतरावांचा उद्देश होता. दुसरे कारण म्हणजे भरतपुरच्या किल्ल्या अंतर्गत असणाऱ्या यशवंतराव आणि जाट यांच्या सैन्यास शस्त्रास्त्रे, अन्नधान्य, दारुगोळा इत्यादीचा बाहेरुन पुरवठा व्हावा यासाठी घोडदळावर जबाबदारी देण्यात आली होती. यशवंतरावांची या ठिकाणी दुरदृष्टी आपल्याला दिसुन येते. शत्रु-पक्षाकडून किल्ल्याच्या आत असणाऱ्या सैन्याला कोंडीत पकडता येऊ नये हा त्यामागचा उद्देश होता. भरतपुरच्या किल्ल्यामध्ये यशवंतराव होळकर येण्याचे कारण म्हणजे जाट राजा रणजित सिंह हा यशवंतरावांचा मित्र होता. यशवंतरावा सारखा धाडसी, शुरवीर, पराक्रमी नेतृत्व यामुळे तो प्रभावीत झाला होता. त्यामुळे त्याने यशवंतरावांच्या आव्हानाला मान देऊन त्यांना सहकार्य करण्याचे त्याने घोषित केले होते. रणजित सिंहाने इंग्रजाबरोबर मैत्रीपूर्ण करार केलेला असताना ही त्याने यशवंतरावास सहकार्य करण्याचे ठरवले होते. म्हणजे या काळात यशवंतरावांचे नेतृत्व, कर्तृत्व हे इंग्रजांच्या विरुध्द लढण्यास परिचित झाले होते.

### 6.24.1 गर्व्हनर जनरलचे लॉर्ड लेक यास पत्र :-

रणजित सिंह जाटाला सांगण्यात यावे की यशवंतराव होळकर यांना सहकार्य करण्याचे नाकारले तर आम्ही आपले राज्य परत तुम्हाला देऊन टाकु.[63] इंग्रज यशवंतरावांच्या सततच्या

कारवायांनी त्रस्त झाले होते. त्यांना माहित होते की जर अशाच पध्दतीने यशवंतराव होळकराचा पाठलाग करत गेलो तर त्यातुन आपलाच पराभव सातत्याने तो करत आहे आर्थिक नुकसान, सैन्य मारले जात होते. तेव्हा यशवंतरावांना कोणत्याच देशी संस्थानिकांनी सहकार्य करु नये त्यासाठी इंग्रजाचे आतापर्यतचे प्रयत्न यशस्वी झाले. आताही यशवंतरावास रणजित सिंह सहकार्य करत असेल तेंव्हा जनरल लॉर्ड लेक हा चिंताग्रस्त झाला होता.

### 6.24.2 **जनरल लॉर्ड लेक भरतपुरास आला :-**

जनरल लॉर्ड लेक हा यशवंतरावांच्या सैनिकांनी रिकामा केलेला किल्ला ताब्यात घेऊन यशवंतराव होळकर यांचा पाठलाग करण्यासाठी भरतपुराकडे 26 डिसेंबर 1804 रोजी ढीगच्या किल्ल्यातुन बाहेर पडला. आणि 3 जानेवारी 1805 रोजी भरतपुर या ठिकाणी पोहचला. यावेळी भरतपूरच्या किल्ल्यावर यशवंतराव आणि रणजित सिंहाचे सैन्य यावेळी त्याठिकाणी होते त्यावेळी लॉर्ड लेकने भरतपुरच्या किल्ल्यास वेढा घातला तेंव्हा लेक बरोबर इंग्रज सैन्य अधिकारी कर्नल मॉन्सन, कर्नल मरे, कर्नल डॉन, कर्नल बर्न, मेजर जनरल जोन्स, जनरल स्मिथ, कर्नल जेटलॅड, सीटन इत्यादी सैन्य अधिकाऱ्यांच्या सहकार्याने जनरल लॉर्ड लेकने वेढा दिला होता. त्यावेळी लेकने जाट राजा रणजित सिंहास संदेश पाठविण्यात आला होता की, यशवंतराव होळकर यास आमच्या स्वाधीन करावे परंतु रणजित सिंहाने उत्तर पाठवले की मी अशा प्रकारचे कोणतेही कृत्य करु इच्छित नाही, एकतर माझा किल्ला राहील, नाही तर मी माझे प्राण देऊन टाकीण रणजित सिंहाने यशवंतराव होळकर हा भारताचा महान देशभक्त आणि रक्षक आहे या स्वरुपात यशवंतरावांचे भरतपुरच्या किल्ल्यावर स्वागत केले होते.

### 6.24.3 **यशवंतराव व रणजित सिंह मध्ये विचारमंथन :-**

ज्यावेळी यशवंतराव होळकर हे भरतपुरास पोहचले होते त्यावेळी रणजित सिंहा बरोबर भविष्यात इंग्रजांच्या विरुध्द युध्द करण्यासाठी युध्द योजना आखण्याची तयारी चालु होती.[64] या युध्द योजनेच्या माध्यमातुन वेगवेगळ्या सरदारांवर कोणकोणत्या जबाबदाऱ्या दयावयाच्या याचे नियोजन करण्यात आले होते. त्यावेळी यशवंतरावांनी भरतपुरच्या युध्दाचे नेतृत्व स्वत:कडे घेतले होते. त्या दृष्टीने त्यांनी अशरफखान, मोहम्मदखान, आफ्रिदीखान, बहादुरखान या सरदारांशी चर्चा करुन त्यांना युध्दासाठी लागणाऱ्या साधन सामग्रीच्या मागणी विषयी चर्चा करुन शस्त्रास्त्रे, तोफा,

दारुगोळा, अन्नधान्याचा साठा, पुरवठा या विषयी त्यांचे मत ऐकूण तशा प्रकारची तरतुद करुन युध्दासाठी तयार राहण्यास सांगितले.

जाट राजा रणजिसिंह स्वभावाने धाडसी, थोरमनाचा व भिडस्त होता.[65] रणजित सिंहाला यशवंतरावांनी आपल्या जुन्या मैत्रीचे दाखले देऊन इंग्रजांच्या विरुध्द लढण्यासाठी सहकार्य करावे अशी विनंती केली होती. ही विनंती रणजित सिंहाने नाकारावी याचे धाडस त्यास होत नव्हते. त्यावेळी रणजित सिंहाने ढीग व भरतपुरच्या बाहेर यशवंतरावांच्या सैन्याला खिंडी या ठिकाणी लष्करी छावणी साठी जागा देण्यात आली होती इंग्रजांशी मैत्रीपूर्ण करार केलेला असतानाही रणजित सिंहाने देश, धर्मासाठी यशवंतरावांच्या झंझावाताला पाहुन त्याने सहकार्य केलेले पहावयास मिळते. इंग्रजा पासुन जर भारताला कोणी वाचवू शकेल तर तो यशवंतराव होळकर वाचवू शकेल.[66] अशा प्रकारची ख्याती सर्वत्र देशी संस्थानिकांमध्ये पसरली होती. त्यामुळे इंग्रजांना यशवंतराव ह मोठा शत्रु आणि जाटांना नायक वाटत होते या घडामोडीमुळे इंग्रज जेरीस आले होते इंग्रजांना वाटत होते की, जाट राजा रणजित सिंहास यशवंतरावां पासून वेगळे कसे करता येईल. हा नवीन प्रश्न इंग्रजां समोर उभा राहिला होता. इंग्रजांनी वेगवेगळ्या प्रकारे रणजितसिंहाला यशवंतरावांपासून बाजुला करण्यासाठी आमिषे, धमक्याचे पत्र पाठविण्यात आले त्याचा काही फरक पडेना. शेवटी इंग्रजांची मानसिकता झाली की यशवंतरावाच्या विरुध्द युध्द केल्याशिवाय पर्याय नाही.

### 6.24.4 प्रत्यक्ष युध्दाला सुरुवात :-

2 जानेवारी 1805 रोजी लॉर्ड लेक हा आपल्या सैन्यासह भरतपुरच्या किल्ल्यासमोर येऊन उभा राहिला किल्ल्याच्या भौवती लेकने आपल्या सैन्याचा वेढा देऊन, 7 जानेवारी 1805 रोजी प्रत्यक्ष युध्दाला सुरुवात झाली. दोन्ही बाजुने मोठ्या प्रमाणात एकमेकांवरती हल्ले, तोफगोळे डागण्यात आले. जनरल लेकने मोठ्या प्रमाणात किल्ल्याच्या तटबंदीवर तोफांचा मारा केला परंतु ते तोडण्यात लेकला यश आले नाही त्यावेळी यशवंतरावांच्या व जाटाच्या सैनिकांनी धुर्नधारी दलाचा उपयोग करुन इंग्रजांच्या सैन्यावर बाणांचा वर्षाव करण्यात येत होता. त्याच बरोबर, भाला, फर्सा, बंदुकांच्या फैरी झाडण्यात येत होत्या. किल्ल्याच्या बाहेर यशवंतरावांनी ठेवलेल्या घोडदळ सैनिकांनी गनिमीकावा युध्दतंत्राने लेकच्या सैन्यावर हल्ले करत. युध्द एवढे घनघोर व भयानक

स्वरुपाचे चालले होते की 12 दिवस हे युध्द चालले या युध्दात इंग्रजांचे सैन्य मोठ्या प्रमाणात मारले गेले. हजारोंच्या संख्येने किल्ल्याच्या बाहेर जखमी अवस्थेत इंग्रजांचे सैन्य पडलेले होते.

### 6.24.5 कर्नल जेटलँड चा युध्दात मृत्यू :-

भरतपुरच्या किल्ल्याची तटबंदी जनरल लेकने तोफांचा मारा करुन एक भाग तोडण्यात यशस्वी झाले होते.[67] लेकचे धोरण हे आपले सैन्य किल्ल्यामध्ये घुसण्यासाठी पुढे चालुन आले. परंतु त्यांच्या धोरणास यशवंतराव आणि जाटांच्या सैनिकांनी मोठ्या पराक्रमाने जनरल लेकच्या सैन्याला थोपवले या दरम्यान या दोन सैन्यामध्ये घनघोर युध्द झाले या युध्दात इंग्रजांच्या सैन्याला किल्ल्यात प्रवेश न करु देण्यासाठी प्रत्येक वेळी इंग्रजांच्या सैन्याला अयशस्वी केले. या युध्दात मोठ्या प्रमाणात इंग्रजांचे सैन्य मारले गेले. त्या तटबंदीच्या आत आलेले इंग्रज सैन्य जेरीस येऊन बाहेर आले. या झटापटीच्या युध्दामध्ये जनरल लेकचा सैन्याधिकारी कर्नल जेटलँड या युध्दामध्ये मारला गेला यशवंतरावांचे सैन्य स्वत:च्या जीवाची पर्वा न करता इंग्रजांकडून येणारे तोफ गोळे त्यांच्या आजुबाजुला पडत असतानाही इंग्रजांनी जो तटबंदीचा भाग तोफाद्वारे फोडला होता तो परत यशवंतरावांच्या सैन्याने बुजवण्यास सुरुवात केली होती. एकीकडे युध्दाला सुरुवात झालेली असताना दुसरीकडे सैन्य किल्ल्याच्या तटबंदीला बुजवण्यात कार्यमग्न होते. ही आपल्या नेतृत्वाविषयी असणारी निष्ठा, प्रामाणिक पणा युध्दाबद्दल असणारी अस्था इत्यादीच्या माध्यमातून यशवंतरावांच्या सैन्याचे जाटांच्या सैन्याचे धाडस, शौर्य, पराक्रम, राष्ट्र, धर्म इत्यादी बद्दल प्रेम आढळुन येईल.

### 6.24.6 जानेवारी 1805 रोजीचे युध्द :-

जानेवारी 1805 रोजी पुन्हा एकदा लॉर्ड लेकने भरतपुरच्या किल्ल्यावर हल्ला केला.[68] या हल्ल्यात लेकने मोठ्या प्रमाणात तोफखान्याद्वारे गोळाबारी चालु केली. या गोळाबारीमध्ये तटबंदी बुजवण्याच्या अगोदरच लेकने यांच्या वर हल्ला करण्यासाठी तयारी केली होती. त्यादृष्टीने लेकने दोन इंग्रजी पलटणी तयार ठेवल्या होत्या. यशवंतरावांच्या सैनिकांनी लेकच्या सैनिकांवर हल्ला करण्यापूर्वी अगोदरच तटबंदीच्या बाहेर येऊन आक्रमकपणे प्रतिहल्ला या सैन्यावर केला त्यावेळी लेकचे सैन्य सैरावैरा पळु लागले तेंव्हा यशवंतरावाच्या सैनिकांनी त्यांचा पाठलाग करुन त्यांना

कापुन काढिले या युध्दामध्ये जनरल लॉर्ड लेकचे सैन्यअधिकारी, क्रॉसवेल, स्वदेना, मेटलँड इत्यादी मारले गेले इंग्रजांचे 400 पेक्षा जास्त यशवंतरावांच्या सैनिकांनी युध्दात ठार केले.

9 जानेवारीच्या युध्दात इंग्रजांचे फारमोठे नुकसान झाले. यशवंतरावांच्या सैन्यदलातील 22 सैनिक या युध्दात मृत्यु मुखी पडले जनरल लेकचे भवितव्य हे या युध्दाच्या निकालावर अवलंबुन होते. यशवंतराव होळकर हे भारतातील इंग्रजांच्या विस्तारवादी धोरणाच्या आड येतो की काय अशी त्यांची भावना झाली होती. त्याच बरोबर इंग्रजांना असे वाटत होते की, कलकत्या वरुनच आपल्याला व्यापर करावा लागेल की काय हे या युध्दा वरुन ठरणार होते. त्यामुळे जनरल लेक ला हा एक प्रकारे इशाराच होता. त्यावेळी जनरल लेकने स्वत:ची सर्व शक्ती पणाला लावून भरतपुरच्या किल्ल्यावर सातत्याने हल्ले चालु केलेले होते. जो पर्यंत भरतपुरच्या किल्ल्याची तटबंदी पाडण्यात यशस्वी होत नाही तो पर्यंत जनरलेक ला व त्याच्या सैनिकाला या किल्ल्यामध्ये प्रवेश करता येणे व यशवंतरावांच्या सैन्याविरुध्द समोरासमोरची लढाई करता येणे अशक्य होते.

भरतपुरच्या किल्ल्यावरुन यशवंतरावांचे व जाटांचे सैन्य मोठ्या प्रमाणात इंग्रजांच्या सैन्यावर तोफाद्वारे मारा सातत्याने चालवत होते यामुळे इंग्रजांच्या सैन्याचे दररोज सातत्याने नुकसान होत होते. स्वत: यशवंतराव होळकर भरतपुरच्या किल्ल्याबाहेर तळ ठोकुन इंग्रजांच्या हालचाली वर लक्ष ठेवुन होते. यशवंतराव हे लेकच्या लष्करी छावणीवर गनिमी कावा युध्द तंत्राच्या साहाय्याने हल्ले करत होते. त्यामुळे लेकला आपली लष्करी छावणी हलवण्याची वेळ आली होती. लॉर्ड लेकला आपल्या सैन्याची सुरक्षा करण्यासाठी मोठ्या प्रमाणात सैन्य दलाची जमवा जमव करण्यासाठी सोय करावी लागत.

### 6.24.7 **जनरल लेकचा पुन्हा हल्ला :-**

21 जानेवारी 1805 रोजी भरतपुरच्या किल्ल्यावर हल्लाकरुन जनरल लेक आपल्या सैन्यासह किल्ल्यामध्ये प्रवेश करण्यासाठी सातत्याने प्रयत्नात होता.[69] परंतु यशवंतरावांच्या व जाटांच्या सैनिकांनी सातत्याने जनरल लेकला अयशस्वी करण्यात येत होते. कारण भरतपुरच्या किल्ल्या भौवती मोठा खंदक हा 50 ते 40 फुट रुंद असुन यामध्ये पाणी भरलेले असायचे त्यामुळे बाहेरुन येण्या जाण्यासाठी मार्ग एकच असल्याने जनरल लेकने खंदका वर लाकडी फळया टाकुन व शिड्या लावून किल्ल्याच्या आत दोन नंबरच्या दरवाजा पर्यंत जाऊन हल्ला करावा अशी ही

योजना आखलेली होती. इंग्रजांची युध्दनिती ही शत्रुच्या प्रदेशाचा, सैन्याचा पुरवठा व्यवस्थेचा, सहकार्य करणाऱ्या मित्रांचा अभ्यास करुन युध्दाची योजना आखत त्याच प्रमाणे जनरल लेकने यावेळी भरतपुरच्या किल्ल्या भौवती खंदकाला सुरुंग लावून उडविण्याची त्याची योजना होती. व दोन नंबरच्या दरवाजा जवळ सैन्य किती आहे. याचा अंदाज जनरल लेकने आपल्या सैन्याच्या टेहाळणीच्या माध्यमातून घेण्यात आलेला होता. त्यादृष्टीने जनरल लेकने पुन्हा भरतपुरच्या किल्ल्यावर 21 जानेवारी रोजी हल्ला चढवला पण त्यात तो यशस्वी होऊ शकला नाही.

### 6.24.8 **कर्नल मॅक्रॉय यांच्याकडे जबाबदारी :-**

21 जानेवारीच्या युध्दाची जबाबदारी ही जनरल लेकने कर्नल मॅक्रॉय याच्याकडे देण्यात आलेली होती. कर्नल मेक्रॉयच्या नेतृत्वाखाली भरतपुरच्या किल्ल्यावर हल्ला करण्यास सांगुन स्वत: जनरल लेक दोन नंबरच्या दरवाजाकडून हल्ला करण्याची त्याची युध्दनिती होती. जेणे करुन यशवंतरावांच्या व जाटांच्या सैन्याचे लक्ष कर्नल मेक्रॉयच्या सैन्याकडे ठेवुन आपण स्वत: दुसरीकडून भरतपुरच्या किल्ल्यामध्ये जाण्यासाठी यशवंरावांच्या व जाटाच्या सैनिकांच्या हल्ल्यापासून वाचण्यासाठी ही युध्द योजना आखली होती.

### 6.24.9 **यशवंतराव होळकरांची रणनीती :-**

ज्यावेळी जनरल लेकने कर्नल मॅक्रॉयच्या नेतृत्वाखाली किल्ल्यावर हल्ला करण्यास सांगितले. त्यावेळी कर्नल मॅक्रॉय आपल्या सैन्यासह खंदकाला ओलांडून जाण्यासाठी शिड्या व लाकडाचा उपयोग करे पर्यंत यशवंतरावांच्या सैन्याने कोणत्याही प्रकारचा हल्ला केला नाही साधी एकही बंदुकीची गोळी कर्नल मॅक्रॉय व त्याच्या सैन्यावर चालवली नाही. त्यांना तशी सक्त ताकीद यशवंतरावांनी दिलेली होती. त्यामुळे कर्नल मॅक्रॉयच्या सैन्याच्या हालचाली कशा पध्दतीने चालु आहेत. त्यावर यशवंतरावांच्या सैन्याची टेहळणी पथके लक्ष देऊन होती. यशवंतरावांनी सैनिकांद्वारे अगोदरच इंग्रजांच्या विरुध्द युध्द योजना तयार करुन ठेवण्यात आलेली होती. ज्यावेळी कर्नल मेक्रॉय खंदकावर शिड्या व लाकडाचे ओंढके टाकुन त्यास ओलांडून येण्याचा प्रयत्न सातत्याने करतील त्यावेळी यशवंतरावांनी खंदकाच्या वरच्या बाजुला असणाऱ्या बंधाऱ्यामध्ये पाण्याचा साठा करुन ठेवलेला होता. ज्याही वेळी इंग्रजांचे सैन्य हा खंदक ओलांडण्याचा प्रयत्न करतील त्यावेळी वरील बंधाऱ्यामध्ये साठवून ठेवण्याात आलेल्या पाण्याला खंदका मध्ये सोडून द्यावयाचे

जेणे करुन खंदक हा ओसंडून वाहु लागल्यास कर्नल मेक्रॉयच्या नेतृत्वाखाली हल्ला करणाऱ्या इंग्रजी सैन्यदले, खंदकावरती ठेवण्यात आलेल्या फळया, शिड्या, लाकडाचे, ओंडके इत्यादी सैन्यासह पाण्याच्या प्रवाहामध्ये वाहुन जात होते त्यामुळे कर्नल मेक्रॉयच्या सैन्यात गोंधळाची स्थिती निर्माण होऊन सैन्य किल्ल्याकडे न जाता परत माघारी फिरत होते. अशा पध्दतीची रणनिती यशवंतराव होळकर यांनी आखली होती आणि जनरल लेक यास अशा पध्दतीची योजना आपल्या सैन्याविरुध्द यशवंतराव होळकर अंमलात आणेल ही अपेक्षा त्यास नव्हती.

पाण्याचा हल्ला यशवंतरावाच्या सैन्याने केल्यानंतर जनरल लेक व कर्नल मेक्रॉयच्या सैन्यावर बंदुकांच्या फैरी झाडण्यास सुरुवात झाली. या हल्ल्यामध्ये इंग्रजांचे सैन्य 500 ते 600 ठार झाले. या युध्दा मध्ये ज्या कर्नल मेक्रॉयच्या नेतृत्वाखाली युध्द लढण्यात आले होते त्या कर्नलचा मृत्यू या युध्दामध्ये झाला. त्याच्यासह त्याचे सैन्या अधिकारी ही ठार झाले. एकंदरीत पहाता जनरल लेकसाठी हा युध्दातील पराभव आणि आपले सैन्य अधिकारी या युध्दात यशवंतरावांच्या व जाटांच्या सैन्याने ठार केले आहेत. हा त्याच्यासाठी फार मोठा धक्का होता. जनरल लेकला यशवंतराव होळकर यांच्या प्रत्यक्ष युध्दनिती, युध्द नेतृत्व डावपेचांचा सामना करावयाचा होता. त्यास अजुन यशवंतरावांच्या मैदानी प्रदेशातील गनिमी कावा युध्द तंत्राचा उपयोग कसा केला जातो. याचा अनुभव घ्यावयाचा आहे. लॉर्ड लेकने आपल्या एका पत्रामध्ये युध्दाचे वर्णन केले आहे की.[70] भरतपुरच्या किल्ल्याच्या समोर असणारा खंदक इतका अरुंद व खोल होता की आम्ही जेवढ्या वेळेस किल्ल्या मध्ये जाण्याचा प्रयत्न केला त्या त्या वेळी आम्ही अयशस्वी ठरलोत किल्ल्याच्या रक्षकांनी आमच्यावर एवढे नेम धरुन तोफांचे गोळे व हल्ले करण्यात आल्याने आमचे मोठ्या प्रमाणात नुकसान झाले आहे.”

### 6.24.10 इंग्रजांची दिशाभूल :-

भरतपुर किल्ल्याच्या बाहेर उभी असणारी इंग्रज फौजेवर यशवंतरावांच्या सैनिकांनी गनिमीकावा युध्द तंत्राच्या साहाय्याने हल्ले चढवले होते. त्यावेळी यशवंतराव होळकर हे भरतपुरच्या किल्ल्या बाहेर निवडक सैन्यासह बाहेर पडले. त्यावेळी त्यांनी जनरल लेकच्या लष्करी छावणीवर आक्रमकपणे हल्ला केला होता. यशवंतरावांची या हल्ल्या मागील योजना वेगळी होती. जनरल लेकने भरतपुरच्या किल्ल्याला दिलेला वेढा उठवुन निघुन जावे. अशा प्रकारची इच्छा

यशवंतरावांची होती. परंतु हा वेढा काही जनरल लेक उठवण्याच्या बेतात दिसत नाही तेव्हा यशवंतरावांनी आपल्या गुप्त हेराद्वारे आपला सरदार आमीरखान यास बुंदेल खंडा मध्ये जाऊन हल्ले करण्याचा आदेश देण्यात आला कारण हा प्रांत इंग्रजांच्या ताब्यामध्ये होता. त्यामुळे या प्रांतावर हल्ले केल्यास जनरल लेकचे लक्ष भरतपुरच्या किल्ल्याकडे न राहता व त्याची सैन्य संख्या कमी होईल या उद्देशाने यशवंतरावांनी आमीर खानास बुंदेलखंडावर आक्रमण करण्याचे सांगितले होते. यशवंतरावांची ही युध्द योजना इंग्रजांची दिशाभूल करण्यासाठी योजना कार्यान्वित करण्यात आलेली होती. जनरल लेकने बुंदेलखंडात आमीरखानला रोखण्यासाठी स्मिथला सैन्यासह पाठविण्यात आले. भरतपुरच्या किल्ल्याला दिलेला वेढा कमकुवत व्हावा या उद्देशाने यशवंतरावांनी बुंदेलखंडाची मोहीम आमीरखानाला करण्यासाठी सांगितले होते. यशवंतराव होळकर यांची ही युध्दनिती जी इंग्रजांची दिशाभूल करणारी होती ती या ठिकाणी यशस्वी झालेली पहायला मिळते.

### 6.24.11 **जनरल लेकचे सैन्य मदतीचे आव्हान :-**

भरतपुरच्या किल्ल्यावर यशवंतराव होळकर यांच्या विरुध्द केलेला दोन वेळा हल्ला हा अयशस्वी झालेला आसल्याने या हल्ल्या मध्ये मोठ्या प्रमाणात जनरल लेकला नुकसान सोसावे लागले. तब्ब्ल एक महिन्या पर्यंत भरतपुरचा किल्ला इंग्रजांनी लढवला या युध्दात होणाऱ्या सातत्याने पराभवामुळे जनरल लेकच्या सैन्यदलाची हानी मोठ्या प्रमाणात यशवंतरावांच्या धर्नुधारी दळ, बंदुकधारीदल तोफखाना दलाद्वारे करण्यात आली अन्न धान्याचा पुरवठा कमी होत गेला त्याचबरोबर यशवंतरावांनी बुंदेलखंडावर आमीर खानास हल्ले करण्यासाठी पाठवल्याने जनरल लेक यास आमीर खानाला रोखण्यासाठी कर्नल स्मिथच्या नेतृत्वाखाली सैन्यदले पाठवावी लागली. त्या सोबत दारु गोळा, तोफखाना, काही रसद पुरवठा द्यावा लागल्याने जनरल लेक यास पर्यायी सैन्य बटालियन दारुगोळा, रसद पुरवठा आपल्या सैन्यासाठी आवश्यक साधन सामग्रीसाठी वाट बघण्याशिवाय पर्याय नव्हता. जनरल लेक यास यावेळी भरतपुरचा किल्ला आपल्या ताब्यात कसा येईल. यासाठी नवनवीन युध्द योजना करत बसण्याशिवाय दुसरा पर्याय नव्हता जनरल लेकने गर्व्हनर जनरल वेलस्ली यास तात्काळ एक पत्र पाठवून सांगितले की, सैन्य बटालियन पाठविण्यासाठीचा वृत्तांत आहे. त्याचबरोबर हा पण संदेश आहे की जो पर्यंत मोठ्या प्रमाणात सैन्य तुकड्या मला आपल्या कडून येत नाहीत तो पर्यंत आम्ही युध्द करण्याच्या मनस्थिती मध्ये नाहीत.

या दरम्यानच्या काळात यशवंतराव होळकर यांनी भरतपुरच्या किल्ल्याबाहेर आपली लष्करी छावणी होती त्या छावणी मध्ये यशवंतरावांनी योजना आखुन किल्ल्याच्या समोर असणारा जनरल लेक हा आपली लष्करी छावणी टाकुन उभा होता. त्याच्या लष्करी छावणीवर यशवंतराव आणि त्यांचे सैन्य गनिमी युध्द तंत्राच्या साहाय्याने लेकला जेरीस आणत होते.

### 6.24.12 12 **फेब्रुवारी** 1805 **चे युध्द** :-

जनरल लेक याने गर्व्हनर जनरल वेलस्लीस केलेल्या पत्रा द्वारे सैन्य बटालियन ची मागणी मान्य करुन वेलस्लीने इंग्रजाच्या बटालियन जनरल लेक कडे पाठविण्यत आल्या त्यावेळी जनरल लेकने 12 फेब्रुवारी 1805 रोजी भरतपुरच्या किल्ल्यावर हल्ला चढविण्यात आला हा हल्ला करण्यापूर्वी जनरल लेक यास मेजर जनरल जोन्स हा आपल्या सैन्य बटालियन घेऊन भरतपुरास येऊन सामील झाला होता. याच्या बरोबर गुजरातचे सैन्य बटालियन हे सुध्दा आले होते. त्यावेळी जनरल लेकने भरतपुरच्या किल्ल्यावर वर सांगितलेल्या तारखेला तोफखान्याचा प्रथम वापर करुन तोफगोळे किल्ल्यावर टाकण्यात येत होते. युध्दाला सुरुवात झाली होती हे युध्द इंग्रजांच्या सैन्य अधिकाऱ्यांना जीवन मरणाचे युध्द होते. एवढ्या तीव्रतेने इंग्रजांचे सैन्य आणि सैन्याधिकारी या युध्दा मध्ये लढताना दिसत होते. परंतु शेवटी पुन्हा एकदा त्यांची निराशा झालेली पहावयास मिळते.

### 6.24.13 **यशवंतराव होळकर यांची दुरदृष्टी** :-

12 फेब्रुवारीच्या युध्दात यशवंतराव होळकर यांना भरतपुरच्या किल्ल्याबाहेर येऊन जनरल लेक व त्याच्या सैन्य अधिकाऱ्यावर आक्रमण करता आले असते. परंतु यशवंतरावांनी तसे नकरता त्यांनी संपूर्ण परिस्थितीचा आढावा घेत. इंग्रजांच्या चालणाऱ्या युध्द कारवाया आणि बुंदेलखंडावर हल्ले करण्यासाठी पाठविण्यात आलेला सरदार आमीर खानाच्या आपल्या विरुध्दच्या हालचाली इंग्रजांना आमीर खान हा अंतर्गत मिळालेला होता परंतु इंग्रजांच्या विरुध्द आपण लढत आहोत असा भासवित होता. हे यशवंतरावांच्या गुप्तहेरा द्वारे त्यांना बातमी कळाली होती. त्याच बरोबर इंग्रजांचे प्रयत्न रणजित सिहांकडे यशवंतरावांना दिलेला पाठिंबा काढुन घेण्यासाठी इंग्रजांचे वकील रणजित सिंहाची मन धरणीकरत होते. हे यशवंतरावांना माहित होते.

भरतपुरच्या जाट राजाचे इंग्रजाद्वारे चालवले जाणारे मनधरणीचे प्रयत्न हे त्यामध्ये रणजित सिंहाचे मत परिवर्तन होवू नये देशातील लहान मोठे संस्थानिकातील राजे, रजवाडे , आपल्या बाजुने

आणि इंग्रजांच्या विरुध्द लढण्यासाठी सहकार्य करण्यासाठी समोर येतील या प्रयत्नांमध्ये यशवंतराव होळकर होते भरतपूरच्या युध्दात यशवंतरावांना जनरल लेक व त्याचे सैन्य सैन्याधिकाऱ्याविरुध्द गनिमीकावा युध्दतंत्राचा वापर करुन लेकयास जेरीस आणले होते व सर्वांचे सहकार्य प्राप्त झाले तर इंग्रजांच्या विरुध्द जोरदार आक्रमण करण्याची यशवंतरावांची युध्द योजना होती, या युध्दात आपल्या सैन्यादलाचे कमीत कमी नुकसान व जनरल लेकच्या सैन्याचे जास्तीत जास्त नुकसान करण्याच्या हेतुने त्यांनी युध्दाची योजना आखली होती. त्यादृष्टीने त्यांनी प्रथम हल्ला हा गनिमीकावा युध्दतंत्राच्या माध्यमातून करण्याची त्यांची योजना होती. जेणे करुन जनरल लेक च्या सैन्याची दमछाक होईल आणि त्यांचे मनोर्धेर्य कमकुवत होईल. अशा पध्दतीची टप्याटप्याने जनरल लेकच्या सैन्यावर हल्ले करण्याची योजना आखण्यात आलेली होती. अशापध्दतीची यशवंतराव होळकर यांची दुरदृष्टी दिसुन येते.

### 6.24.14 **जनरल लेकचा शेवटचा प्रयत्न** :-

जनरल लेकने वेलस्लीला सैन्याची आणि दारुगोळ्याची मागणी केली होती. त्याची पूर्तता झाल्याने लेकने भरतपुरच्या किल्ल्यावर अजुन एकदा हल्ला करण्याचे ठरवल्याने त्यावेळी जनरल लेकने तोफखानाद्वारे करण्यात येणाऱ्या माऱ्याचा वेग हा कमी प्रमाणात तटबंदी वर जाऊन गोळे आदळत होते. त्यावेळी जनरल लेकने भरतपुरच्या किल्ल्याची टेहळणी करुन किल्ल्याच्या आत पर्यंत तोफगोळे जाऊन यशवंतरावांच्या व जाटांच्या सैन्याचा व किल्ल्याच्या तटबंदीच्या बरोबर तोफा उंचीनुसार ठेवण्यासाठी मचाण बांधण्यात आल्या होत्या. किल्ल्याच्या बाहेरुन तोफा ठेवण्यासाठी व त्या तोफांद्वारे टाकण्यात येणारे तोफ गोळे हे किल्ल्याच्या आत पडतील या सोयीने मचाण उभारलेल्या होत्या. जनरल लेकचा भरतपुरच्या किल्ल्यावर अंतिम हल्ला हा जोराचा करण्याचा आणि त्यात यश संपादन करण्यासाठीचा हा आटोकात प्रयत्न होता. त्यादृष्टीने जनरल लेकने भरतपुरच्या किल्ल्यावर व तटबंदीवर तोफांचा भडीमार करण्यास सुरुवात केली. या माऱ्यामुळे किल्ल्याची जी तटबंदी 100 फुट उंच होती ती फोडण्यात जनरल लेक यशस्वी झाला. या तटबंदी मधून आपल्या सैन्याने प्रवेश करावा या हेतुने जनरल लेकने कॅप्टन टेलरच्या नेतृत्वाखाली सैन्यासह प्रवेश करावा हा आदेश त्यास देण्यात आला. कॅप्टन टेलर हा आपल्या सैन्यासह गतिमानतेने तटबंदीच्या आत प्रवेश करण्यासाठी प्रयत्नात होता.

### 6.24.15 **यशवंतरावांच्या व जाटांच्या सैन्याचा प्रतिहल्ला :-**

कॅप्टन टेलरच्या सैन्यावर यशवंतरावं व जाटाच्या सैनिकांनी तटबंदीच्या आत येण्या अगोदरच.[71] आक्रमकतेने किल्ल्याच्या बाहेर पडुन यशवंतराव आणि रणजित सिंहाचे घोडदळ कॅप्टन टेलरच्या सैन्यावर तुडुन पडले. बंदुकधारी दलाने गोळ्यांचा वर्षाव करत इंग्रजांचे सैन्य मारले. दुसरीकडे घोडदळाने आपल्या तलवारी व भाल्याच्या माध्यमातून धर्नुधारी दलाद्वारे इंग्रजांच्या सैन्यावर हल्ला चढवला होता. या युध्दात यशवंतराव आणि रणजिंतसिंहाच्या सैन्याने इंग्रजांच्या सैनिकांना आपल्या आक्रमक व गतिमानतेच्या जोरावर किल्ल्याच्या खंदकापर्यंत इंग्रजांच्या सैनिकांना घेऊन गेले त्यांच्या आखत्यारीत असणारा भागही यशवंतरावांच्या सैन्याने कब्जा मिळवला.

जनरल लॉर्ड लेक हा यशवंतराव आणि रणजित सिंहाच्या सैन्याच्या कॅप्टन टेलरच्या सैन्या विरुध्द चालणाऱ्या युध्दातील हालचाली पहात होता. त्यावेळी त्याने आपल्याकडे असणाऱ्या गोऱ्या सैन्याची बटालियनास आदेश दिला की यशवंतरावाच्या सैन्याला प्रखरपणे पाठीमागे ढकलत जावे जेणे करुन किल्ल्याच्या आत प्रवेश करता येईल परंतु यशवंतराव जाटाच्या सैन्याने केलेल्या आक्रमक हल्ल्यामुळे कॅप्टन टेलर व त्यांच्या सैन्याचे मनोर्धेर्य हे कमकुवत झाले होते. त्यावेळी इंग्रज सैन्यअधिकारी व सैनिकांनी जनरल लेकच्या आदेशाला नजुमानता यशवंतराव आणि रणजित सिंह यांच्या सैन्याला पाठीमागे ढकलत घेऊन जाण्यासाठी संमती दाखवली नाही तेंव्हा लेकने देशी सैन्याच्या पलटणीला पुढे जाण्यासाठी आदेश दिला होता. यादेशी सैन्याचा उपयोग यशवंतरावांच्या सैन्याविरुध्द करण्यात आल्याने यशवंतरावांच्या सैन्याला पाठीमागे ढकलण्यात या इंग्रजी देशी पलटणींना यश जरी आले तरी दुसरीकडे लेकच्या गोऱ्या सैन्याची बटालियन जी प्रशिक्षित आणि शिस्त प्रिय होती. त्या बटालियनच्या अंतर्गत असणाऱ्या सैन्य दलाचा शेवट यशवंतरावं आणि रणजितसिहांच्या सैनिकांनी केला होता. लॉर्ड लेकने भारतीय वंशाच्या सैन्यदलाचा वापर करुन यशवंतराव आणि रणजित सिंहच्या सैन्यावर हल्ला केला तरी लेक यास त्यात यश आले नाही. लॉर्ड लेकने गर्व्हनर जनरल वेलस्लीला जास्त सैन्याच्या बटालियन मागणीची पूर्तता केलेली असताना ही लेकला पराभव स्वीकारावा लागला लेकच्या आशेवर पूर्णपणे पाणी फिरलेले दिसुन येते. भरतपुर किल्ल्याच्या मैदानामध्ये मोठ्या प्रमाणात यशवंतराव व

जाटाच्या सैन्यानी केलेल्या हल्ल्यात जनरल लेकचे सैन्य मारले गेले. मैदानावर चारही बाजुला लेकचे जखमी अवस्थेतील सैन्याचा कल्लोळ माजला होता.

या युध्दामध्ये जनरल लेकच्या नेतृत्वाखाली सैन्य हे यशवंतरावांनी केलेल्या हल्ल्या मध्ये 1500 ते 3500 मारले गेले या युध्दात युरोपियन सैन्य अधिकाऱ्यांचाही समावेश होता. दोन्ही बाजुकडील प्रत्येक दिवशी शेकडो सैनिक मारले जात होते. यशवंतराव होळकर यांनी इंग्रजांच्या प्रशिक्षीत सैन्याचा मोठ्या प्रमाणात पराभव केला. यशवंतराव होळकर यांची कल्पना शक्ती, युध्द कौशल्य, युध्द नेतृत्व हे यशवंतरावांच्या सैन्याला, प्रोत्साहीत करत होते. त्यावेळी यांचे सैन्य गनिमीकावा युध्दतंत्राचा वापर करुन इंग्रजांच्या सैन्याला, जेरीस आणत, पराभव करत हे त्यांचे वैशिष्ट्ये होते.

### 6.24.16 **यशवंतराव होळकरांचे निष्ठावंत सैनिक** :-

यशवंतरावांचे नेतृत्व, सैन्य, तोफखाना दळ, धर्नुधारी दळ, बंदुकधारी दळ, घोडदळ, पायदळ इत्यादी सैन्यदलाचा सहभाग भरतपुरच्या युध्दात इंग्रजांच्या विरुध्द दिसुन येतो. यशवंतरावांच्या ध्येय, उदिष्टाप्रती त्यांचे सैनिक सातत्याने प्रेरणेने, आपल्या युध्द नेतृत्वावर विश्वास ठेवून इंग्रजांच्या विरुध्द लढताना दिसतात. भरतपुरच्या किल्ल्यावर यशवंतरावाच्या विरुध्द जनरल लेकने तीन वेळेस आक्रमण केले. परंतु तिन्ही वेळेस जनरल लेक अयशस्वी झाला या पराभवाचे प्रमुख कारण पाहिले असता. भरतपुरच्या किल्ल्यात यशवंतराव किंवा रणजित सिंह यांच्या सैनिकांमध्ये कुणीही यावेळी विश्वास घातक इंग्रजांना गुप्त बातम्या देणारा शोधुन ही सापडला नाही. परंतु इंग्रजी सैन्याचा नाश करण्याचा यशवंतरावांचे एक प्रमुख कारण होते. इंग्रजांच्या लष्करी सेवेमध्ये असणारे भारतीय वंशाचे सैनिक ज्यांनी महत्वाच्या वेळी आपल्या भारतीय सैन्यदलाच्या विरुध्द इंग्रजांना सहकार्य केलेले दिसुन येईल. एकंदरीत विचार करता या काळात विविध संस्थानिक विभागले असल्याने भारतामुळे यांच्यात राष्ट्रीय एकात्मता भावनेचा अभाव पहायला मिळतो. त्यादृष्टीने यशवंतराव होळकर यांनी भारतातील विविध लहान लहान गटा मध्ये विभागलेल्या संस्थानिकांना एकत्रीत करण्याचा प्रयत्न यशवंतरावांनी केलेला आहे. यशवंतराव या कालखंडात अखंड भारताची संकल्पना रुझवताना दिसतात. यशवंतरावांनी

आपल्या सैनिकांना दिलेल्या प्रशिक्षण, शिस्ती मुळेच त्यांच्या सैनिकांमध्ये आपल्या नेतृत्वावर निष्ठा ठेवताना दिसुन येतात.

### 6.24.17 **जनरल लॉर्ड लेकचे आव्हान :-**

लॉर्ड लेकने केलेल्या भरतपुरच्या किल्ल्यावरील हल्ल्यात त्याचा प्रत्येक वेळी पराभव होत असल्याने लेकच्या सैन्याचे मनोर्धेर्य कमकुवत झाले होते. त्यामुळे लॉर्ड लेक यास आपल्या सैन्याचे मनोर्धेर्य उंचाविण्यासाठी सैनिकांना उद्देशुन त्यांच्या समोर प्रोत्साहपूर्ण भाषण द्यावे लागले. जनरल लॉर्ड लेकने आपल्या सैनिकांना काल झालेल्या यशवंतरावांच्या सैन्याकडून पराभव हा विसरुन पुढील रणनिती ची योजना आखुन परत एकदा भरतपुरच्या किल्ल्यावर हल्ला करण्यासाठी, किल्ल्यावर प्रभुत्व स्थापित करुन विजय मिळविण्यासाठी लेकने आपल्या सैन्य बटालियनला आव्हान केले होते. त्यामुळे लेकच्या सैन्यामध्ये पुन्हा एकदा हल्ला करण्यासाठी त्यांच्यामध्ये उत्साह, निर्माण करण्याचा लेकचा प्रयत्न होता. त्याच्या प्रयत्नास यश येताना दिसेल.

### 6.24.18 **इंग्रजांचे पुन्हा एकदा संघटीतपणे आक्रमण :-**

जनरल लेकने आपल्या सैन्याला उद्देशुन केलेल्या आव्हाना समोर त्याच्या सैन्यात ऊर्जा निर्माण करुन सर्व शक्तिनिशी 21 तारखेला पुन्हा भरतपुरच्या किल्ल्यावर आक्रमण केले. परंतु तशाच प्रकारचा प्रतिहल्ला हा यशवंतरावांच्या व जाटाच्या सैनिकांनी लेकच्या सैन्यावर केला. मागच्या वेळी केलेल्या आक्रमणा पेक्षाही यावेळी मोठ्या प्रमाणात जनरल लेकने आक्रमण केले. पण त्याचा काही एक उपयोग झाला नाही. यशवंतरावाच्या व जाटाच्या सैनिकांनी भरतपुरच्या किल्ल्याच्या तटबंदीवरुन तोफा, बंदुका, धर्नुधारी दळ, त्याच बरोबर दगड धोंड्याचाही आक्रमकपणे जनरल लेकच्या सैन्यावर हल्ला चढवला या भीषण युध्दात मोठ्या प्रमाणात जनरल लेकचे सैन्य मृत्यु मुखी पडले. हे युध्द चार ते पाच तास चालले. या युध्दात जनरल लेकच्या नेतृत्वाखाली काम करणाऱ्या दोन युरोपियन सैन्य बटालियानने जनरल लेक आदेश नमानता या युध्दात उतरण्यास मनाई केली त्यामुळे लेकची सैन्य शक्ति कमकुवत झालेली पहायला मिळते. या युध्दात दोन्ही बाजुने जी पराक्रमाची शर्थ करण्यात आली होती ती आजपर्यंतच्या कोणत्याही युध्दामध्ये दिसुन आलेली नाही. यशवंतरावांच्या नेतृत्वाखाली कार्य करणाऱ्या सैन्यदलांनी इंग्रजांच्या शिस्त प्रिय सैन्यदलास या युध्दामध्ये मोडुन काढताना दिसुन येते. भरतपुर किल्ल्याच्या

खंदकामध्ये मोठ्या प्रमाणात इंग्रजी सैन्याच्या मृतदेहाचा खच पडलेला होता. इंग्रजांनी किल्ला हस्तगत करण्याच्या दृष्टीने करण्यात आलेले नियोजन हे अयशस्वी ठरले होते. तरीही एवढे होऊन सुध्दा इंग्रज सैन्य अधिकारी व सैन्याने यशवंतरावांच्या सैन्याविरुध्द लढले परंतु या युध्दामध्ये जे लेकचे सैन्य जखमी झाले त्यांना औषधोपचारासाठी ही सैनिकांना उचलुन घेऊन जाण्याची शुध्द ही राहिलेली दिसत नाही. या युध्दामध्ये यशवंतरावांच्या सैनिकांनी किल्ल्याच्या बाहेर पडून दिसेल त्या इंग्रज सैन्याला ठार करण्यात येऊ लागले. जनरल लेकचा त्याच्या आयुष्यामध्ये आजपर्यंत अशा पध्दतीचा पराभव त्याने पाहिलेला नव्हता.

भरतपुरच्या युध्दात यशवंतराव होळकरांचा पराभव करण्याच्या दृष्टीने इंग्रज सेनाधिकारी जनरल लॉर्ड लेकच्या नेतृत्वाखाली सैन्य या युध्दामध्ये 3292 सैन्य ठार झाले तर 103 युरोपियन सैन्याधिकारी मारले गेले. या युध्दात जनरल लेकचे सैन्याधिकारी लेफ्टनंट कर्नल डॉन, कॅप्टन ग्रांट इत्यादी या युध्दात मारले गेले. एकंदरीत पहाता या युध्दाला जगाच्या इतिहासामध्ये तोड नाही. भरतपुरच्या युध्दा मध्ये यशवंतरावांचा विजय झाल्याने त्यांच्या कार्यकर्तृत्वाची, युध्दनेतृत्वाची चर्चा अखंड भारतभर पसरली व यशवंतरावांना भारताचा नेपोलियन म्हणून युरोपखंडामध्ये ओळखले जाऊ लागले. भरतपुरच्या युध्दामुळे भारतातील इंग्रजांची सत्ता, साम्राज्य विस्ताराची ध्येय धोरणे, थांबतील की काय अशी भिती इंग्रजांना वाटत होती. इंग्रजांना भारताच्या बाहेर यशवंतराव होळकर हा एकमेव मराठेशाहीचा मराठा सरदार हाकलुन लावु शकतो अशी भावना देशांतर्गत असणाऱ्या लहान मोठ्या संस्थानिकांमध्ये निर्माण होणे स्वाभाविक होते.

### 6.24.19 **भरतपूर युध्दात विविध शस्त्रांचा उपयोग :-**

भरतपूर किल्ल्याचे सुरक्षा रक्षकांचे कार्य हे इंग्रजांच्या विरुध्द युध्दात प्रशसनीय कार्य राहिले आहे.[72] जनरल लेकच्या नेतृत्वाखाली इंग्रज सैन्यावर यशवंतराव होळकरांच्या जाटांच्या सैनिकांनी तोफगोळे, तेलात भिजवलेले कापसाचे बोळे, भाला, फर्सा, तलवार, धर्नुधारी दळ, बंदुकधारी दळ, पायदळ, घोडदळाच्या माध्यमातून विविध शस्त्रांचा उपयोग इंग्रजांच्या सैनिकांवर अविरतपणे करण्यात येत होते. त्यामुळे जनरल लेकचे सैन्य भयभीत झालेले दिसते काही सैन्य जखमी अवस्थेत होते. या युध्दा मध्ये इंग्रजांच्या सैन्यदलातील 3200 सैनिक यशवंतरावांच्या सैन्याने ठार केले होते. ज्या मध्ये 103 युरोपियन सैन्य अधिकाऱ्यांचा समावेश होता. लॉर्ड लेकने

एका पत्रा मध्ये मान्य केले आहे की भरतपूर किल्ल्याच्या बाजूने खंदक मोठ्या रुंदीचा आणि खोल होता की आम्ही प्रत्येक वेळी किल्ल्यात जाण्यासाठी सातत्याने प्रयत्न करायचो त्या त्यावेळी आम्हाला अपयश आले. किल्ल्याची सुरक्षा करणारे रक्षक आमच्यावर सातत्याने वेगवेगळया शस्त्राद्वारे मारा हा अचुकपणे करायचे त्यामुळे आमच्या सैन्याची हानी जास्त झाली आहे. भरतपुरचा किल्ला हा अभेघ होता. त्या किल्ल्याची रचना त्याच्या बाजुने खंदक होते चुकुन शत्रू आत आला तर आजुन त्यास दुसऱ्या दरवाजाला ओलांडून आत मध्ये यावे लागे. एक प्रकारे हा किल्ला म्हणजे स्वतंत्र रित्या बसवलेले एक गावच होते अशा पध्दतीची त्या किल्ल्याची रचना केलेली होती.

### 6.24.20 यशवंतरावांची भारतभर चर्चा :-

यशवंतराव होळकर यांनी इंग्रजांच्या विरुध्द सातत्याने विजय संपादन केल्याने मराठे व अन्य भारतातील लहान, मोठे संस्थानिक राजे, रजवाडे यशवंतराव होळकर यांच्याकडे अपेक्षेने पाहु लागले, की आपल्याला इंग्रजांच्या प्रभावा खालुन मुक्त करु शकतात व इंग्रजांना भारतातुन हाकलुन लावण्याची शक्ती यशवंतरावां मध्ये आहे श्री केळकर म्हणतात की, मराठ्यांचा महाराजा श्री यशवंतराव होळकर यांना विश्वास होता की ते कधी ही हार पत्करु शकत नाहीत. शेवटी ज्यावेळी यशवंतराव होळकर आणि इंग्रज यांच्यात युध्दाला प्रारंभ झाला तेंव्हा होळकरांच्या विजयाचे एका मागुन एक बातम्या पुण्याच्या बाजारामध्ये चर्चील्या जात होत्या जशा प्रकारे एक बातमी त्यावेळी पुण्यात पसरली होती की यशवंतराव होळकर यांनी 300 इंग्रज सैनिकांना बंदी बनवून त्या सैन्याची नाके कापली व त्यांना सोडुन दिले, ज्यामध्ये 200 इंग्रज सैन्य पुण्यात आले आहेत या नाक कापलेल्या सैनिकांना इंग्लंडला जाण्यासाठी पुण्याहुन मुंबईला पाठविण्यात आले आहे परंतु तेथील इंग्रजांनी आपली बदनामी इंग्लंड मध्ये होवू नये यासाठी या नाक कापलेल्या सैनिकांना इंग्लंडला जात असताना समुद्रात ढकलुन मारण्यात आले अशा प्रकारची चर्चा मराठेशाहीमध्ये चर्चीली जात होती यावरुन असे लक्षात येईल की यशवंतराव होळकर यांचे नेतृत्व भारतभर उदयास आलेले होते. बलाढ्य इंग्रजांनी भारतातील संस्थानिकांना आपल्या प्रभावाखाली घेत एक एक भारताचा भाग आपल्या साम्राज्य विस्ताराच्या दृष्टीने नियंत्रण मिळवीत असताना मराठेशाहीतील मराठा सरदार यशवंतराव होळकर इंग्रजांचा सातत्याने एका मागुन एक पराभव करत होता. इंग्रजांना यशवंतरावांच्या नेतृत्वामुळे भारतातील आपले साम्राज्य विस्तारा मध्ये अडथळा निर्माण होईल असे वाटले नव्हते.

### 6.24.21 **इंग्रज भयभीत झाले :-**

भरतपुरच्या शेवटच्या युध्दातही इंग्रजांचा पराभव झाल्याने इंग्रजांना मोठ्या प्रमाणात नुकसान सोसावे लागले इंग्रज या पराभवा नंतर एवढे भयभीत झाले होते की यशवंतराव होळकर विरुध्द आपल्याला युध्द जिंकता येणार नाही. त्यावेळी गर्व्हनर जनरल वेलसलीने लॉर्ड लेकला पत्र पाठवले की कोणत्याही परिस्थिती मध्ये यशवंतराव होळकर यांच्याशी करार करण्यात यावा नाही तर भारतातील संस्थानिक राजे, रजवाडे, नवाब आपल्या विरुध्द उभे राहतील, आपल्याला मग एका यशवंतराव होळकराशी नाहीतर अनेक यशवंतराव होळकराशी लढावे लागेल जाट राजा रणजित सिंहाला आमिषे दाखवून त्यास होळकरा पासून तोडावे आणि होळकराच्या अनेक सेनापती, सरदार यांना जहागिरीचे व धनसंपतीचे आमिशे देवून यशवंतराव होळकरा पासून तोडण्याचा प्रयत्न करावा नंतर होळकराच्या आशा आकांक्षावर पाणी फेरले जाईल व त्यास युध्दामध्ये विजय मिळविण्यासाठी अपेक्षा, शक्ती राहणार नाही" गर्व्हनर जनरल वेल्सलीने जनरल लेकला आपल्या योजने नुसार पत्र पाठवून यशवंतरावांची शक्ती कमकुवत करण्यासाठी आपण यशवंतरावाच्या विरुध्द युध्द जिंकु शकत नाही त्यावेळी इंग्रजांची कुटनिती फोडा आणि राज्यकरा या तत्वाच्या आधारे इंग्रजांनी यशवंतरावांच्या लष्करी दलामध्ये फुट पाडण्याचा प्रयत्न चालवला यशवंतरावांना सहकार्य करणारा भरतपुरचा जाटराजा रणजित सिंहाला यशवंतरांवा पासून फोडण्यासाठी इंग्रजांनी संपर्क चालु केला आमिषे दाखवण्यास सुरुवात केलेली पहावयास मिळते.

### 6.24.22 **रणजित सिंहाचा इंग्रजांशी तह :-**

भरतपुर शेवटच्या युध्दामध्ये यशवंतराव होळकर यांनी इंग्रजांच्या प्रत्येक हल्ल्याला प्रति उत्तर देऊन त्यांच्या विरुध्द विजय संपादीत केला. इंग्रजांच्या युध्द योजना अयशस्वी केल्या या युध्दातनंतर इंग्रजांमध्ये भयाचे वातावरण निर्माण झाले. त्यावेळी इंग्रजांनी रणजित सिंहाला आमिषे, आश्वासने, भय दाखवून त्याच बरोबर यशवंतरावांना दुसरे कोणतेही राजे, रजवाडे, सहकार्य करण्यास तयार नाहीत, हे रणजित सिंहाला इंग्रजांनी लक्षात आणून दिले, यशवंतरावांना आम्ही आज ना उद्या पराभुत करु त्यावेळी तुमची अवस्था काय असेल ही कल्पना न केलेली बरी अशा पध्दतीने इंग्रजांनी आभास निर्माण केला होता, यशवंतरावांना सहकार्य केले नाही. तर इंग्रज तुमच्याशी मैत्रीपूर्ण संबंध व भरतपुर राज्याची सुरक्षा करण्यासाठी तह करण्यास तयार आहे.

गर्व्हनर जनरल वेलस्लीने लॉर्ड लेकला 6 मार्च 1805 रोजी पत्र लिहुन कळवले की, “माझ्या हार्दिक शुभेच्छा आहेत की कोणत्याही नियमानुसार व अटी शर्तीद्वारे ताबडतोब युध्द थांबविण्यात यावे जेणे करुन आम्ही शत्रु होळकरास व या ठिकाणाला एवढे कमकुवत समजले परंतु आम्ही या दोघांना (यशवंतराव, रणजित सिंह) अजय बनवुन टाकले.” इंग्रजांना आता युध्द जिंकण्याची कोणत्याही प्रकारची आशा राहिली नव्हती. त्यामुळे इंग्रजांनी जाट राजास अनेक प्रकारे आमिषे दाखवले त्यावेळी त्यास त्याने नकार कळवला. परंतु शेवटी जाट राजाने पाहिले की, यशवंतरावांचा सेनापती आमीरखान व त्याचे सहकारी यशवंतरावांशी विश्वासघात करुन इंग्रजांशी हात मिळवणी करत आहेत. त्याच बरोबर दौलतराव शिंदे यशवंतरावांना सहकार्य करण्यास नकार दर्शवला त्यामुळे रणजित सिंहाने एकंदरीत परिस्थिती पहाता इंग्रजांशी तह करण्यास 17 एप्रिल 1805 रोजी संमती दर्शवून तह करण्यात आला या तहानुसार इंग्रजांनी जिंकलेला ढीगचा किल्ला हा परत भरतपुरचा राजा रणजित सिंह याला परत देण्यात आला. भरतपूर राज्याची सत्ता ही रणजित सिंहाची मान्य करण्यात आली. यशवंतरावांना या विषयी माहिती मिळाली व त्याच्या विरुध्द युध्द करणे हे यशवंतरावांच्या तत्वामध्ये बसत नव्हते यशवंतरावांनी भरतपुर सोडण्याचा निर्णय घेऊन यशवंतरावांनी शीख राजे, महाराजे आपल्याला इंग्रजांच्या विरुध्द लढण्यासाठी सहकार्य करतील अशी अपेक्षा होती.

**6.24.23 श्री चिंतामण लिहीतात की :-**

6 जोनवारी ते 21 फेब्रुवारी या कालखंडात इंग्रजांकडून भरतपुरच्या किल्ल्यावर आक्रमण करण्यात आले. परंतु प्रत्येकवेळी इंग्रजांना पाठीमागे यावे लागले.[73] लॉर्ड लेकला भरतपुरचा किल्ला जिंकणे फार कठीण झाले होते. त्यामुळे लॉर्ड लेक निराश होऊन भरतपुरच्या जाट राजा बरोबर तह करणे आवश्यक आहे त्या दृष्टीने रणजित सिंह लेकच्या दृढ निश्चयाने प्रभावीत झाला होता. रणजित सिंह हा पण तह करण्याच्या मनस्थिती मध्ये होता. तेव्हा लॉर्ड लेक व रणजित सिंह या दोघांमध्ये तह होऊन इंग्रजांना 20 लाख रुपये दिले आणि इंग्रजांच्या विरुध्द असणाऱ्या संस्थानिक, राजे, रजवाडे, यांच्याशी कोणत्याही प्रकारचे संबंध ठेवणार नाही अशा प्रकारचे वचन तहाद्वारे घेण्यात आले. सारण सांस, सहार चे परगणे, इंग्रजांना देण्यात आले रणजित सिंहाने केवळ गोवर्धन परगणा, आपला पुत्र लक्ष्मणसिंह याच्यासाठी राखुन ठेवण्यात आला होता.

### 6.24.24 **यशवंतराव होळकर एकाकी** :-

भरतपूर युध्दानंतर रणजित सिंहाने इंग्रजांशी तह करण्यात आला हे त्याचे कृत्य देशद्रोहाचे म्हणावे लागेल. यशवंतराव हे भरतपूर युध्दात अत्यंत प्रतिकुल परिस्थितीमध्ये असतानाही त्यांनी इंग्रजा विरुध्द युध्द लढले. भवानी शंकर खत्री ने विश्वासघात करुन यशवंतरावांना सोडून गेला. आमीरखान हा सेनापती इंग्रजांचा अंतर्गत हसतक बनला देशांतर्गत असणाऱ्या कोणत्याही संस्थानिकांनी यशवंतरावांना सहकार्य केलेले नाही, ज्या ज्यावेळी यशवंतरावांनी प्रत्येक राजे, रजवाडे यांना इंग्रजांच्या विरुध्द लढण्यासाठी तयार व्हा असे आव्हान करत त्यावेळी कोणत्याही भारतीय संस्थानिकांनी यशवंतरावांना सहकार्य केले नाही. त्यावेळी त्यांनी स्वत:च्या ताकदीवर इंग्रजांच्या विरुध्द लढा देण्यासाठी तयार झाले.

### 6.24.25 **यशवंतरावांचे संस्थानिकांना आव्हान** :-

भरतपुरचा जाट राजा रणजित सिंह याने इ.स. 17 एप्रिल 1805 रोजी इंग्रज सेनाधिकारी जनरल लॉर्ड लेक बरोबर लेखी स्वरुपात तह केल्याने यशवंतराव होळकर यांनी भरतपुर सोडण्याचा निर्णय घेतला त्या दृष्टीने त्यांनी भरतपुर हुन जिंद, पटियाला ठिकाणचे राजे, महाराजे यांना प्रत्यक्ष भेट देऊन इंग्रजांच्या विरुध्द युध्द करण्यासाठी सहकार्य व आव्हान करत होते. नवाब, राजे संस्थानिकांशी यशवंतरावांचा पत्र व्यवहार चालु होता त्यांच्या या आव्हाणाला शीख राजे मानसिंह आणि लाहोरचे महाराजे रणजित सिंह यांनी इंग्रजांच्या विरुध्द यशवंतरावांना सहकार्य करण्याचे सकारात्मक प्रतिसाद दिला. तेंव्हा यशवंतरावांनी सगळ्या संस्थानिकांना उद्देशुन आव्हान केले की सर्वांनी एकत्र आल्याशिवाय इंग्रजांना या देशातून हाकलून देणे शक्य होणार नाही इंग्रजांनी आपली सत्ता ही भारतातल्या विविध भागामध्ये कमी जास्त प्रमाणात विस्तारलेली होती.

### 6.24.26 **यशवंतरावांच्या विजयाची चर्चा** :-

भरतपुर किल्ल्यातील युध्दात यशवंतरावांच्या विजयामुळे यशवंतरावांना भारताचा नेपोलियन म्हणून युरोपमध्ये ओळखण्यात येऊ लागले. भारतात इंग्रजांच्या विरुध्द लढणारा, लढवय्या, योध्दा म्हणून त्यांचे नेतृत्व उदयास आले. संस्थानिक यशवंतराव एक शेवटची आशा म्हणून त्यांच्याकडे पाहु लागले. भरतपुरच्या युध्दामध्ये यशवंतरावांनी जनरल लेकचा चार वेळा पराभव केला. ही ऐतिहासिक घटना म्हणावी लागेल. इंग्रजांच्या बाजुने लढणाऱ्या गोऱ्या इंग्रज

सैनिकांनी भरतपूर च्या युध्दापेक्षा इ.स.1815 मध्ये झालेले वार्टलू चे युद्ध हे सोपे होते असे युध्दात सहभाग घेतलेल्या सैन्य अधिकाऱ्याने नमुद करुन ठेवले आहे. भरतपुरच्या युध्दात इंग्रजांचा मोठा पराभव एकदा नाही चार वेळेस झालेला पाहुन त्याची चर्चा इंग्लंड पर्यंत पोहचली होती. अखंड जगावर आपली सत्ता गाजवणाऱ्या इंग्रजांच्या सैनिकांना सळो की पळो करुन सोडले यशवंतरावांनी मोठया प्रमाणात इंग्रज सैन्य कापुन काढले. इंग्रजांचा एवढा मानहानीकारक पराभव झाला होता की इंग्लंड मधुन अशी चर्चा चालु झाली की गर्व्हनर जनरल वेलस्लीला परत इंग्लंडला बोलवा अशी चर्चा चालु होती.

## 6.24.27 **गव्हर्नर जनरल वेलस्लीला परत इंग्लंडला बोलावले :-**

यशतंतराव होळकर यांनी युद्धामध्ये जनरल लेकचा चार वेळा पराभव केल्याने इंग्रजांची बदनामी भारतात फार मोठ्या प्रमाणात तर झालीच परंतु इंग्लंडमध्ये सुध्दा झाली, इंग्लंडच्या संसदेमध्ये यशवंतराव होळकर यांच्या पराक्रमा बद्दल आणि इंग्रजांच्या पराक्रमा बद्दल चर्चा झाल्याने ईस्ट इंडिया कंपनीची बदनामी झाली व भारतात यशवंतराव होळकर यांचा दबदबा वाढला. यशवंतरावांच्या सततच्या विजयाने व इंग्रजांचा पराभव होऊ लागल्याने गर्व्हनर जनरल वेलस्लीचे नेतृत्वच इंग्लंडला भारतात नको वाटू लागले. भरतपूरच्या युद्धानंतर ईस्ट इंडिया कंपनी शासनाने पुन्हा मोठ्या प्रमाणात हालचाली चालु केल्या. मराठा राजमंडळ पुन्हा सक्रिय झाले तर आपल्या साम्राज्य विस्ताराच्या योजना ह्या मर्यादीत होऊ शकतात. असे ईस्ट इंडिया कंपनी शासनाला वाटू लागले होते. यावेळी इंग्रजांचे सैन्य नेपोलियनच्या युद्धामध्ये अडकून राहिले होते. त्यामुळे जर भारतात इंग्रजांच्या विरूद्ध वातावरण तापू लागले तर हा प्रश्न कशा पद्धतीने सोडवायचा असा प्रश्न ईस्ट इंडिया शासनास पडला. त्यामुळे त्यांनी गर्व्हनर जनरल पदावर कार्यरत असणाऱ्या लॉर्ड वेलस्लीला परत इंग्लंडला बोलावून घेतले. यशवंतराव होळकर इंग्रजांची सत्ता त्यावेळी उलथून टाकू शकत होते. इंग्रजांची भरतपूरच्या युद्धात मोठ्या प्रमाणात आर्थिक हानी झाली होती. तरीही त्यांना यशवंतरावांच्या विरुद्ध यश मिळवता आले नाही. त्यावेळी ईस्ट इंडिया कंपनीच्या संचालकांनी यशवंतराव होळकरांशी युद्धबंध करावे असा आदेश दिला होता. शेवटी कंपनी शासनाने गर्व्हनर जनरल वेलस्लीला इंग्लंडला परत बोलावून त्याच्या जागी कॉर्नवालिस यास नवीन गर्व्हनर जनरल म्हणून भारतात पाठविण्यात आले. गर्व्हनर जनरल लॉर्ड कॉर्नवालिसचे लॉर्ड लेकला पत्र 16 सप्टेंबर 1805 रोजी लिहिले.[74] मी यशवंतराव होळकरांचे सर्व प्रदेश जे

इंग्रजांनी ताब्यात घेतलेले आहेत. त्यास मी वापस करुन यशवंतरावा बरोबर तह करण्यास तयार आहे" ज्यावेळी यशवंतरावास ही बातमी कळाली त्यावेळी त्यांनी इंग्रजांशी तह करण्यास यशवंतरावांनी नकार दिला त्यावेळी प्राथमिक स्वरुपात तहाचे प्रयत्न चालु होते. तेंव्हा अचानक कॉर्नवॉलिसचा मृत्यू झाला. त्यामुळे पुढील गोष्टीवर पडदा पडलेला दिसुन येतो. भरतपुरचा किल्ला खरोखरच अजिंक्य होता.[75] तीन महिने सातत्याने प्रयत्न करुन ही इंग्रजांना हा किल्ला जिंकता आला नाही अशा परिस्थिती मध्ये लॉर्ड लेकने भरतपुरचा वेढा उठविला आणि एका दृष्टीने हा किल्ला सर्व गोष्टींनी अंजिक्य आहे यास इंग्रजांनी मान्यता दिली ही अप्रत्यक्ष कबुली दिसुन येते. इ.स. 1804 ते 1805 हे वर्ष इंग्रजांना फार अडचणीचे गेली.[76] भरतपुरच्या किल्ल्यावर यशवंतराव होळकर आणि जाटराजा रणजित सिंह यांनी एकत्रीत येऊन त्या दोघांनी इंग्रजांवर हल्ले करण्यास सुरुवात केली. त्यामुळेतर इंग्रजांची अवस्था ही अधिकच बिकट झाली होती, परंतु इंग्रजांची कुटनीती श्रेष्ठ दर्जाची असल्याने यशवंतराव होळकर यांना इतर संस्थानिकांचे सहकार्य कसे प्राप्त होणार नाही व यशवंतराव कसे एकटे पडतील याकडे इंग्रजांचे सातत्याने लक्ष होते. थोड्याच काळात इतर संस्थानिकही यशवंतरावांना सोडून गेल्याने यशवंतराव होळकर हे एकटे पडलेले दिसतात.

### 6.24.28 **भरतपूरचा किल्ला :-**



6.24.29




6.24.30 :-




6.24.31 :-

| Siege of Bharatpur | |
|---|---|
| Part of Second Anglo-Maratha War | |
| **Date** | 2 January – 22 February 1805 |
| **Location** | Bharatpur, Rajasthan |
| **Result** | Bharatpur and Holkars victory[1] |
| **Belligerents** | |
| Bharatpur State<br>Holkar Clan | East India Company |
| **Commanders and leaders** | |
| Maharaja Ranjit Singh Jat<br>Maharaja Yashwantrao Holkar | Gerard Lake |
| **Strength** | |
| 10,000 | 18,000 |
| **Casualties and losses** | |
| Unknown, but very less | 3,292 |

### 6.25 **यशवंतराव होळकर यांचा शेवट :-**

यशवंतराव होळकर यांनी इ.स. 1798 च्या उत्तरार्धा पासून ते इ.स. 1806 च्या प्रारंभीच्या कालखंडा पर्यंत.[77] आपल्या उमेदीची साडे सहा वर्ष साधारणपणे दिवस रात्र सैन्याच्या गर्दीमध्ये तोफा, बंदुकी, भाला, तलवारीच्या आवाजात, युध्दाच्या रणांगणातील गोंधळात, शत्रुवर आक्रमण करणे, लढणे, पाठलाग करणे, नवीन शस्त्रांची निर्मिती जमवाजमव, सैन्यदलाची निर्मिती, सैन्यसंख्या वाढविण्यात त्यांना प्रशिक्षीत, शिस्त लावण्यात अखंडपणे सातत्याने धावपळीत, परिश्रमा मध्ये स्वत:चे आयुष्य घालवलेले आहे. यशवंतराव होळकर यांनी इंग्रजांशी लढण्यासाठी तयारी केली ती मराठेशाहीच्या स्वातंत्र्यासाठी यशवंतरावांचा इंग्रजांच्या विरुध्द लढण्यासाठी त्या मध्ये त्यांचा किंवा त्यांच्या राज्याच्या दृष्टीने स्वार्थ हा नव्हता तसा प्रकारचा स्वार्थ त्यांना लढाई शिवाय साध्य करणे शक्य होते परंतु संपूर्ण मराठेशाहीच्या स्वातंत्र्य, सुरक्षेसाठीचे ध्येय सोडून आपल्या होळकरशाहीच्या राज्या पुरता स्वार्थ पाहिला असता तर आजपर्यंत केलेल्या युध्दानंतर यशवंतरावांच्या पदरा मध्ये जे पडले होते त्यापेक्षा कितीतरी जास्त फायदा हा इंग्रजांच्या अनुकुलतेने युध्द न करता त्यांनी साध्य केले असते. इंग्रजांचे प्रत्येकवेळी आश्वासने असायचे की आपण आपल्या जागी स्वस्थ रहा मग तुम्हाला जे पाहिजे ते मिळेल. अशा प्रकारचे आश्वासन सातत्याने यशवंतरावाना देण्यात येत. परंतु यशवंतरावांनी या आश्वासनाकडे दुर्लक्ष करुन मराठेशाहीच्या रक्षणासाठी याकडे दुर्लक्ष केले. या ठिकाणी यशवंतरावांच्या स्वार्थ, त्यागाचे पहिले लक्षण असून स्वत:चे सर्वस्व युध्दाच्या रणांगणामध्ये झोकुन दिलेले दिसुन येते. त्यामुळे यशवंतरावांच्या स्वार्थ, त्यागा बद्दल शंका घेण्याचे कारण नाही. यशवंतरावांच्या स्वार्थ त्यागाचे खरे मोल समजण्यासाठी पेशवे, शिंदे भोसले हे मराठेशाहीतील मातब्बर मराठा सरदारांचे धोरण पाहिल्यास लक्षात येईल.

समग्र राज्याची आस्था कोणासच राहीली नाही.[78] सर्व मराठेशाहीतील मराठा सरदारांनी एकत्रीतपणे इंग्रजांचा पाडाव करावा अशी महत्वकांक्षा सिध्दीस नेऊन अटीतटीने प्रयत्न करावे असे तोंडाने म्हणणारे प्रत्येक मराठेशाहीतील दौलतदार स्वत:च्या स्वार्थाचे नादास लागुन इंग्रजा कडून आपल्या स्वत:पुरती व्यवस्था लावुन घेण्यात मग्न असल्यामुळे यशवंतराव होळकरां सारख्या मराठा सरदारास इंग्रजाच्या विरुध्द लढण्यासाठी सहकार्य केलेले दिसत नाही यातुनच प्रत्येक दौलतदाराची आपल्या मराठेशाही राज्या बद्दल आस्था कोणालाच राहिली नाही हे यावरुन लक्षात येते गुवार वाहून संशयाने संशयाची वृध्दी होते. दौलती दोन्ही देशी बैठक पडल्यामुळे खराबीत

आल्या.[79] वरील यशवंतरावांचे वाक्य हे विचार करायला लावणारे असुन यशवंतरावाच्या या ठिकाणी कुशाग्र बुध्दीमत्तेची आकलन शक्ती किती मोठ्या प्रमाणात आहे ती याठिकाणी व्यक्त करणारी आहे मराठेशाहीत मराठा सरदार एकमेकांना संशय वृत्तीने पहाण्याने मराठेशाहीचे राज्य अडचणीत आले आणि प्रत्येक सरदाराने स्वत:चे अस्तित्व, संरक्षण मिळवण्यासाठी वैयक्तीक पातळीवर प्रयत्न करु लागल्याने मराठेशाहीचे स्वातंत्र्य धोक्यात आले. 18 व्या शतकाच्या उत्तरार्धात यशवंतराव होळकर यांनी मराठेशाही वाचविण्यासाठी आणि भारतातील लहान मोठे संस्थानिकांना इंग्रजांच्या प्रभावा पासून वाचविण्यासाठी इंग्रजांना हाकलून लावण्यासाठी सर्वांनी एकत्रीत होऊन मला सहकार्य केले तर ते शक्य आहे. परंतु त्यांच्या या आव्हानाला कोणीही सहकार्य केले नसल्याने यशवंतराव हे एकाकी पडताना या कालखंडात दिसुन येतात. मराठेशाहीतील सरदारांना एकमेकांविषयी संशय आसल्याने इंग्रजांच्या प्रभुत्वाखाली कालांतराने जावे लागले.

प्रो. इंद्रसिंह मेहता लिहीतात की, यशवंतराव होळकर यांनी केलेल्या इंग्रजांच्या विरुध्दच्या देशी संस्थानिकांचे सहकार्य प्राप्त करण्यात अयशस्वी ठरल्याने यश्वंतरावांनी इंग्रजांच्या प्रस्तावास 1805 सालच्या शेवटी तह करण्यास अनुमती दर्शवली.[80] यशवंतरावांनी इंग्रजांना ज्या प्रकारे जेरीस आणले होते. तशा पध्दतीने भारतातील कोणत्याही संस्थानिक, राजे, रजवाडे यांनी केलेले दिसत नाही. मुकुंदरा खिंडीतील कर्नल मॉन्सनचा पाठलाग करुन पळवुन लावणे आणि भरतपुरच्या जनरल लेकच्या विरुध्दचा विजय हा यशवंतरावांच्या शौर्य, पराक्रम धाडसाचे उदाहरण आहे.

हिंदु धर्मात मुख्य आपले इरादे नमुद असावे यशवंतराव होळकर यांनी इंग्रजांच्या विरुध्द केलेल्या मोहीमेस देशी संस्थानीकांनी सहकार्य करण्याचे अप्रत्यक्ष नाकरल्याने यशवंतराव उदासीन झाले होते. त्यावेळी त्यांच्या एकंदरीत वर्तणुकीतुन असे दिसुन येते की, हिंदु धर्माच्या लोकांमध्ये आपल्या प्रमुख संकल्पना निश्चित असायला हव्यात, परंतु त्या दृष्टीने दिसत नाही. उमेदीचा काळ, युध्दाचा अनुभव इत्यादी बाबतीत आपल्या इंग्रजांच्या विरुध्द चाललेल्या मोहीमेला प्रोत्साहन मिळेल असे स्वजनांच्या ठिकाणी काही दिसत नव्हते त्यावेळी इंग्रजांनी सातत्याने चालु केलेल्या तहाच्या बोलण्याला मान देणे भाग पडले, जमीनदारी पध्दतीने घर राखावे हाच एक भाग शेवटी नाईलाजाने पत्करण्याची वेळ आली या दैवयोगाशी यशवंतरावांनी आपल्यातील बदचालीशी संबंध जोडला, शिंद्यानी कारभाऱ्यांच्या मसलतीला अनुसरुन दगा दिला भोसले स्वत: आले नाहीत व

स्वत:चे सैन्य ही पाठवले नाही शिंद्यानी राजे, रजवाडे यांचे सहकार्य घेऊन दिल्ली वर चाल केली नाही आणि भोसल्यांनी ओरिसा कडे आपले सैन्यदल पाठवून इंग्रजांना शह दिला नाही या स्वजनांच्या बदचाली, स्वराज्याचे स्वातंत्र्य पुन: पुर्वस्थितीस आणण्याची अवस्था पेशव्यांसह इतर मराठा मंडळात कोणामध्ये नव्हती. जो तो आपल्या पुरते पहात होता मग एकट्याने जीवापाड परिश्रम करण्यात फायदा काय आहे. असा प्रश्न यशवंतरावांना सतावत होता. तेंव्हा इंग्रजांनी यशवंतरावांशी तहाचे बोलणे सातत्याने लावुन धरले होते, एकीकडे भारतातील लहान मोठे देशी संस्थानिक इंग्रजाबरोबर तह, करार करण्यात उत्सुक होते तर दुसरीकडे इंग्रज एकमेव मराठेशाहीतील मराठा सरदार यशवंतराव होळकराशी तह करण्यासाठी आतुर होते या वरुन यशवंतरावांचे लष्करी कार्य, ध्येय, धोरणे, इंग्रजांच्या स्वप्नांना अडथळे निर्माण करत होते. इंग्लंड मध्ये इंग्रजांची बदनामी होत होती त्या वेळी भारतातील गर्व्हनर जनरल हे यशवंतरावांच्या विरुध्द युध्द न करता कोणत्याही परिस्थिती मध्ये तह करण्यास उत्सकु होते त्यावेळी यशवंतरावांनी स्वकीय आणि देशातील संस्थानिक, राजे रजवाडे इंग्रजांच्या विरुध्द लढण्यासाठी सहकार्य करत नाहीत. त्यावेळी यशवंतरावांनी इंग्रजांच्या वतीने चालु झालेल्या समेटाला बोलणी सुरु करुन यशवंतरावा पेक्षा इंग्रजच जास्त उत्सुक होते हे या ठिकाणी दिसुन येते.

इंग्रजाला होळकर हा हिंदी इतिहासातुन कायमचा उपटुन टाकावयाचा होता, पणतो उपटला जाण्या ऐवजी इंग्रज घाबरुन जावा असे इंग्रज विरोधाचे रान होळकराने उठविले व गाजविले.[81] त्यामुळे इंग्रजांना अजून एकभीती जाणत होती की, भरतपूर युध्दाच्या उदाहरणावरुन वरुन यशवंतरावांना जर लवकरात लवकर रोखले नाहीत तर भारतातील लहान, मोठे देशी संस्थानिक, राजे, रजवाडे हे इंग्रजांच्या विरुध्द उठाव करतील व मग संपूर्ण भारत पुन्हा जिंकण्याच्या खटपटी आपल्याला कराव्या लागतील. या भीतीने इंग्रज अस्वस्थ झाले होते ही स्थिती तत्कालीन इंग्रजांच्या आपसातील पत्रव्यवहारातुन व्यक्त झालेली पहायला मिळते. त्यामुळे युध्दाच्या पूर्वी तह झाल्यास चांगले अशा प्रकारची चेतावणीचे निरोप शिखांकडे पाठविण्यात येत होते. ज्यावेळी सतलजनदीच्या किनाऱ्यावर इंग्रज आले त्यावेळी यशवंतराव अमृतसरकडे मार्गस्थ झाले होते. त्याठिकाणी रणजितसिंगाची व त्यांची भेट होऊन त्याच्या मार्फत यशवंतराव व इंग्रज यांच्या मध्ये समेटाचे बोलणे चालु झालेले होते.

### 6.26 **यशवंतराव होळकर आणि इंग्रज वकिलांची भेट :-**

यशवंतराव होळकर यांच्या सोबत जनरल लेकवर गर्व्हनर जनरल बार्लोचा दबाव वाढत होता.[82] तेव्हा जनरल लेक याने आपल्या वकिलांना यशवंतराव होळकरांच्या बरोबर शांतता करार करण्यासाठी अटी व शर्तीचे अधिकार देण्यात आले होते. यशवंतराव होळकर यांच्याद्वारे त्यांचे वकील शेख हबीबुल्ला आणि बाळाराम शेठ हे दोन वकील नेमण्यात आलेले होते. इंग्रजांचा प्रतिनिधी म्हणून माल्कम हजर होता. इंग्रज वकील आणि यशवंतरावांच्या वकिलांमध्ये चर्चेच्या फेऱ्या झाल्या या चर्चेमध्ये यशवंतरावांनी इंग्रजापेक्षा जास्त अटी व शर्ती घालण्यात आलेल्या होत्या ज्याकाही जाचक अटी यशवंतरावांनी घातलेल्या होत्या त्या अटींचा प्रस्ताव इंग्रजांनी गर्व्हनर जनरल बारर्लो याच्याकडे संमतीसाठी पाठविण्यात आला.

### 6.26.1 **यशवंतराव तहास अनुकुल :-**

यशवंतराव होळकर यांना इंग्रजाच्या विरुध्द लढण्यासाठी वेळ हवा होता.[83] देशातील संस्थाने, राजे, रजवाडे यांनी सहकार्य करण्यास असमर्थतता दाखविल्याने यशवंतराव होळकर यांना वैयक्तिक स्तरावर सैन्याची जमवा जमव मोठ्या प्रमाणात करावयाची होती. त्याचबरोबर शस्त्रांचासाठा करावयास वेळ हवा होता. तेंव्हा यशवंतरावांना माहित होते की इंग्रजांनी भारतातील फ्रेंचाचे अस्तित्व हे संपवले आहे. त्यावेळी फ्रेंचाकडून आपल्याला शस्त्रास्त्रे, बंदुका, तोफा मिळण्याचा मार्ग बंद झालेला असून त्या घ्याच्या तर इंग्रजाकडूनच त्या आपल्याला मिळणे शक्य नाही याची जाणीव यशवंतरावांना होती. त्यामुळे आपल्याला इंग्रजाविरुध्द लढा द्यायचा असेल तर स्वत:लाच तोफा बंदुका, शस्त्रास्त्रे, बनवावी लागतील या गोष्टींचा त्यांना अभ्यास होता. यशवंतरावांना हे ही माहीत होते की आपले एकुण सैन्य संख्याही भवानीशंकर खत्रीच्या विश्वास घातामुळे कमी झाले आहे, आमीरखान हा आपला सेनापती आपल्या सोबत शरीराने आहे मनाने ही त्याने इंग्रजांशी गुप्तपणे हात मिळवणी केलेली आहे. त्यामुळे आमीरखानाच्या नेतृत्वाखालील घोडदळ हे आपले आहे असे यशवंतरावांना वाटत नव्हते. तेंव्हा यशवंतरावांसमोर इंग्रजांनी शांततेचा करार करण्याचा प्रस्ताव ठेवला होता त्यास यशवंतरावांनी अटी व शर्तीच्या माध्यमातुन मान्य करण्याचे ठरवले होते.

24 डिसेंबर 1805 रोजी बियास नदीच्या काठी यशवंतराव होळकर आणि सर जॉर्ज बेली सोबत राजपुरच्या तहावर स्वाक्षऱ्या करण्यात आल्या यास राज घाटचा तह असे ही म्हणतात. या तहानुसार चंबळनदीच्या उत्तरेकडील आणि पश्चिमेकडील सर्व प्रदेशांचा यशवंतरावांनी त्याग केला. दक्षिणेकडे आणि पूर्वेकडे जो काही प्रदेश यशवंतरावांच्या ताब्यात होता तो सर्व प्रदेश यशवंतरावांकडे तसेच ठेवण्यात येईल असे इंग्रजांनी वचन दिले. नर्मदेच्या दक्षिणेकडील प्रदेश सुध्दा यशवंतरावांकडे कायम ठेवण्यात आलेला पहायला मिळतो.

### 6.26.2 होळकर-इंग्रज तहनामा 24 डिसेंबर सन 1805 :-

तहनामा सरकार श्री कंपनी इंग्रज बहादुर यांचे सरदारासी महराजांचे मवसुफयासी कित्येक प्रकारे जुदाई झाली.[84] सांप्रत उभयपक्षी दोस्ती मुकर जहाली त्यास गर्व्हनर जनरल सर जॉर्ज बार्लो बारोनेट साहेब बहादुर यांचेकडील मुखत्यार लार्डलिक साहेब बहादूर त्याजकडील मुख्त्यार कर्नल जॉन मालकम साहेब बहादुर यांचे विद्यमाने व महाराजे यशवंतराव होळकर यांजकडील सेख हबीबुल्ला व बालाराम शेट यांचे विद्यमाने करार ठरला. करार नामेची कलमे ठरली ती बी तफसील

### 6.26.3 कलम पहिले :-

सरकार कंपनी इंग्रज बहादुर यांजकडील सरदार करार करितात की महाराजे यशवंतराव होळकर यांसी लढाई- मोकुफ जाहली पुढे महाराजे मोसुफ करार करितात की सरकार कंपनी इंग्रेज बहादुर यासी व त्यांचे इलाखे दारासी व दोस्तासी कोणे प्रकारे शत्रुत्वाची मसलत करणार नाही व ज्यामध्ये त्यांचे नुकसान ते करणार नाही.

### 6.26.4 कलम दुसरे :-

महाराजे यशवंतराव होळकर करार करतात की रामपुरा व टोंक, बुंदी व लाखेरी व समधी, मालोंगाव, दतिया वगैरे मुलुख बुंदीचे पाहाडाचे उत्तरेस आहे तो आज पर्यंत सरकार दौलतमदार कंपनी इंग्रज बहादुर यांचे इलाख्यात कायम आहे त्या मुलकाचा दावा करणार नाही व आस्ता धरणार नाही.

### 6.26.5 **कलम तिसरे :-**

सरकार कंपनी इंग्रेज बहादुर यांचे सरदार करार करीत आहेत की होळकरांचे खानदानचा कदीम तालुका व मुलुख माळव्यांत व दुसरे राजे मेवाड व मारवाड व हाडोती, चंबळ नदीचे दक्षिणेस राजे आहेत त्यांचे मुलूखांत त्यांस उपद्रव देणार नाही व अंम्मल दाखल करणार नाही. आणखी दक्षिणेस व दक्षिण प्रांती आहे तो अद्याप सरकार कंपनी इंग्रेज बहादुर यांज कडील सरदाराचे हस्तगत आहे. तो महाराज यशवंतराव होळकर यांचे सरकारांत माघार द्यावा मग चांदवाडचा किल्ला व परगणा अंबाड व सेवगांव, गंगा गोदावरीचे दक्षिणेकडील गांव ही मकाने मात्र सरकार कंपनी इंग्रज बहादुर यांचे स्वाधीन राहतील. परंतु होळकराचे खानदानाचे थोरपणावर नजर देऊन करार केला जातो. महाराजे यशवंतराव होळकर यांजकडून दोस्ती कायम राहील व कोणे एक प्रकारे सरकार कंपनी इंग्रेज बहादुर व त्यांकडील इलाखेदार व दोस्त यांचे तालुक्यात उपद्रव न लागल्यास मुलुख मजकुरही दिढा वर्षांनी महाराजे यशवंतराव होळकर यांचे मुलुख स्वाधीन केला जाईल.

### 6.26.6 **कलम चवथे :-**

महाराजे यशवंतराव होळकर करार करीतात कि परगणे कोंच, बुंदेलखंडाचा जिल्हा आम्ही सोडला याचा दावा करणार नाही, परंतु सरकार कंपनी इंग्रेज बहादुर यांचे सरदार करार करीतात की महाराजे मवसुफ यांजकडील दोस्तीची मजबुती यथास्थित राहिल्यास ज्या प्रमाणे बाळाबाईस जहागीर दिल्ही आहे त्या प्रमाणे कोंच महाराजे मौसुफ यांची कन्या भीमाबाई यांस दोन वर्षानंतर कंपनी सरकारांतुन जाहगीर दिली जाईल.

### 6.26.7 **कलम पाचवे :-**

महाराजे यशवंतराव होळकर करार करितात की सरकार कंपनी इंग्रेज बहादुर यांचा मुलुख व यांचे सरदारांनी घेतलेला मुलुख व त्यांचे इलाखेदार व दोस्त यांचे तालुकियासी कोणोविसी दावा करणार नाही.

### 6.26.8 **कलम सहावे :-**

महाराजे यशवंतराव होळकर करार करिता की सरकार कंपनी इंग्रज बहादुर यांचे राजबंदी शिवाय कधीही कोणे येक फिरंगी यांचे मुलखांतील माणूस नोकर ठेवणार नाही.

### 6.26.9 **कलम सातवे :-**

महाराजे यशवंतराव होळकर करार करितात की सर्जेराव घाटगे यांनी लबाडी करुन मुलखाची खराबी केली त्यांही मध्ये सरकार कंपनी इंग्रज बहादुर यांसी लबाड्या बहुत अयोग्य केल्या याज करिता सरकार दौलतमदार कंपनी इंग्रेज बहादुर यांचे सरदारांनी त्या बदजाताचे लबाडीचा उस्तहारनामा लिहुन पाठविला यास्तव सर्जेराव मजकुर याजला आपले इलाख्याचे मुलखाचे मसलतीत घेणार नाही व चाकरीस ठेवणार नाही.

### 6.26.10 **कलम आठवे :-**

सरकार दौलत मदार कंपनी इंग्रज बहादुर यांजकडील सरदार करार करितात की, महाराजे यशवंतराव होळकर सलाह मुर करुन तहनामे दुरुस्त जाहल्यावर आपले तालुक्याकडे कुच करुन जातील त्यांस आम्हांकडून कोणही मुजाहिम होणार नाही कोणे गोष्टी विषयी अडथळा होणार नाही व त्यांचे कोणत्याही कामांत दखल करणार नाही परंतु यास शर्थ की त्यांनी आपला तहनामा दुरुस्त होतांच पटियाले व खटल वगैरे तालुके सरकार व जयपुरचे राजे डावेहाता कडे टाकुन दरकुच आपले तालुक्यात जावे मार्गामधी सरकार वगैरे मुलुख लागल्यास रयतीस कोणेविशी उपद्रव होऊन पावे आपले फौजे पासुन त्याची रखवाली करावी. 9 येणे प्रमाणे तहनामा नौ कलमाचा छ 2 शवाल ता 24 डिसेंबर 1805 रोजी इ.स. 1220 हिजरी, बियास नदीचे तीरी रायपुरचे घाटावर उभयपक्षी मसलितीने लिहीण्यात आला महाराजे यशवंतराव होळकर यांचे मुखत्यार शेख हबिबुल्ला व बाळाराम शेठ यांचे मोहर दस्तकानिशी लिहुन जनरल लार्ड लीक साहेब बहादुर यांचे हवाला केला व एक करणेल मालकम साहेब बहादुर यांचे मोहर दस्तखतीनिशी लिहुन होळकरांकडील मुखत्यारास दिला.

सरजॉर्ज बार्लो याने या तहनाम्यात काही बदल केले.[85] यशवंतराव होळकर यास टोकं रामपुरा आणि बुंदी पर्वताच्या उत्तरेस असणारा प्रदेश देण्यात आला. बुंदीराज्याचा प्रदेश

यशवंतरावास दिल्याने बुंदीचा राजा इंग्रजावर नाराज झाल्याचे समजते राजपुर घाटाच्या तहानंतर मराठ्यांच्या इतिहासातील तसेच भारताच्या इतिहासात असणारी सर्वात उत्कृष्ट लष्करी दलाचा पाडाव झाल्याने यशवंतरावांची सत्ता इंग्रजाच्या विरुध्दचे देशप्रेमा विषयी आसणारी आस्था व लढा हा मर्यादीत स्वरुपात आल्याने भारतातील इंग्रजांचे प्राबल्य यशवंतरावां बरोबर तह केल्याने एकहाती सत्ता संपादन करण्यास एकमेव त्या कालखंडात भारतातील देशी संस्थानिक व मराठेशाहीतील एकमेव मराठा सरदार यशवंतराव होळकर अडथळा होता तो बाजुला केल्याने इंग्रजांची सत्ता ही भारतभर विस्तारण्यास सुरुवात झाली. यशवंतरावांना जर त्यावेळी देशी संस्थाने व मराठेशाहीतील मराठासरदारांचे सहकार्य मिळाले असते तर भारतातील इंग्रजांची सत्ताही 150 वर्षे भारतात स्थिर झाली नसती यशवंतरावांच्या या भारतातील वेगवेगळ्या लहान मोठ्या संस्थाने राजे, रजवाडे, यांना इंग्रजांच्या विरुध्द लढण्यात एकत्रीत करण्याचा त्यांचा सातत्याने प्रयत्न होता. परंतु नियतीला दुसरेच मान्य होते. एक मराठेशाहीतील शुर योध्दा यांच्या कल्पनाशक्ती, युध्द नेतृत्व, रणनिती, मैदानी प्रदेशातील गनिमीकावा युध्द तंत्र, युध्दातील डावपेचामध्ये पारंगत असणाऱ्या यशवंतरावांचा उपयोग त्याकाळी करुन घेता आला नाही शेवटी सातत्याने इंग्रज करत असलेल्या तहनाम्यासाठी त्यांनी अनुमती दिलेली आपल्याला पहायला मिळते.

महाराज यशवंतराव होळकर तहाला का सिध्द झाले यासाठी त्यांनी भारमल होळकरास पत्राद्वारे लक्षात येईल. शत्रुचे प्राबल्य जाहले मुकाबल्याचे प्रसंग न पावता मसलतीचे अन्वये पगडीबंद वगैरे अनुकुल करुन एक दो जागा पायबंद होऊन त्यातला ओढ पाडावी तुमची रवानगी संस्थानी जाहली, तिकडोन समटाचा विचार करावा यात लढा राहुन आपले काबुतील हे सर्व तुमचे विद्यमाने बोलणे याचे भाव निश्चयात्मक त्यावर होते. वृश्चिक (इंग्रज) अग्रसर जाहले त्यांचा व्यत्यय दृष्टीस येऊ लागला. वास्तव अजमेरीकडे येणे जाहले त्याच कडोन पत्रे व बोलणे आजपर्यंत मसलतीचे मिळते आले त्यावरुन दिल्लीकडे जाण्याचा सुमार धरला सोबती मागे ओढ लावतील ही खातर जमा असोन कारभारी यांनी दुराशा दाखवून पुन्हा इंग्रजांशी समेट केला त्याच्या हुकुमा वरुन इकडील महालाच्या जप्त्या केल्या. स्वारी अमृतसर पावेतो आली परंतु घरफुटीमुळे याजलाही विचार पडून जमीनदारीचे काव्याने जलचर व आम्हासी बोलणे लागले, ज्यांनी स्वराज्याचे मसलतीस हमराह असावे ते आपले जीव रक्षितात ते पक्षी इतरांचे कारण काय? ये समई हिंदु धर्मास कोणाची ही हुशारी नाही आपले महाल मुलूख परस्वाधीन करुन फौज हातावर वागवून

मुकाबल्याचे मागे फिरावे, लाखो रुपयाचे पेचांत यावे इतक्याचे कारण नाही असे समजुन कळेल त्यारितीने अंग्रेजासी समेट करुन घेतले ते कूच करुन दिल्लीचे समोर गले. स्वारीचे कूच होऊन सत्वरच तिकडे येणे घडेल. स्वदेशातील महालाचे बंदोबस्त जाहले पाहिजे यास्तव चिरंजीव हरनाथ यांची रवानगी केली आहे. तांम्रांनी वसली साहेब यांचे नावे चकती दिली आहे तुम्हा पासी पावेल.”

### 6.27 ऑर्थर वेलस्लीचे जॉन माल्कमला लिहिलेली पत्रे :

होळकराला जिवंत ठेवले हे ठीक झाले नाही त्याच्या राज्यधारी अस्तित्वाने हिंदुस्थानात सर्वत्र तोच विजयी असा गैरसमज पसरेल.[86] त्याचा मुलुख आपल्या ताब्यात ठेवणे हा त्या गैरसमजावर उपाय होता. परंतु त्याची दखल तहात घेतलेली नाही. होळकरास नाकमुठीत धरायला लावून त्याच्या मुलखाचा इतका इतका हिस्सा इंग्रजाने आपल्या ताब्यात ठेवला असा प्रकार तहाच्या कलमांत दाखविला असता तर ती त्याच्या पराभवाची साक्ष होऊन राहिली असती असे आर्थर वेलस्लीने जॉन मालकमला पत्रामध्ये आपले मत व्यक्त केले.

ज्याने इ.स 1798 च्या उत्तरार्धापासून इ.स. 1806 च्या प्रारंभा पर्यंतची पहिल्या उमेदीची साडे सहावर्षे दिवस रात्र इंग्रजांच्या विरुध्द संघर्षामध्ये, सैन्याच्या गर्दी मध्ये, तोफा, बंदुकाच्या आवाजमध्ये, युध्दभूमीच्या गोंधळात, शत्रुचा पाठलाग करण्यात सातत्याने अखंड परिश्रमामध्ये यशवंतरावांनी आपले आयुष्य घालवले त्यास आता एकदम स्थिर व शांत पूर्ण वातावरणा मध्ये डोळया समोर कोणतेही ध्येय न ठेवता. मागच्या कित्येक वर्षाच्या अंगवळणी पडलेल्या व यामध्येच आपले मन रंगवलेल्या स्वभावाशी, राहाणीमाणाशी सर्वस्वी उत्तर आणि दक्षिण ध्रुवा सारख्या परस्पर विरुध्द दिशा आसल्याने यशवंतरावांची बुध्दी सवयीमुळे कावरी बावरी होत व अकल्पीत विश्रांती या स्थितीच्या अनुभवाचे लोक वरील वर्णनाची यथार्थता समजु शकतील अविरतपणे कार्यकरणाऱ्या व रुळलेल्या मेंदुला अचानकपणे काम न भेटल्यास नेमेके काय करावे हे सुचेनासे होते अशी मेंदुची क्षणिता ही यशवंतराव आणि इंग्रजामध्ये झालेल्या तहानंतर यशवंतरावांच्या वाटयास आली आसल्यास तो निसर्ग नियमच समजला पाहिजे. इंग्रजांशी तह करुन माळव्यातील स्वराज्यात यशवंतराव होळकर.[87] आपल्या शौर्य, धाडस, पराक्रमाचे एकमेकांच्या मधील संघर्षामुळे जे एक प्रकारे शोचनीय पर्यवसान यशवंतरावांच्या वाट्याला आले त्याचे चिंतन मनन करीत असता त्यांच्या मनामध्ये येणारा उदास विचार हा त्यांनी संयमपणे, स्पष्टपणे भोसले मराठा

सरदाराला लिहीलेल्या पत्रामध्ये व्यक्त होताना दिसतो. यशंतरावांच्या मनामध्ये उठलेल्या वादळास एका इंग्रज कवीच्या अनुवादाने या ठिकाणी दाखवता येईल. एका स्वातंत्र्य प्रेमीचे अंतकालीन शोक गीत या इंग्रज कवीने रचलेले आहे. स्वातंत्र्याच्या संगमाने देश उजळुन सोडल्याचे दिवस संपले, माझे देशबांधव आता नव्या नकली मनाच्या मागे लागले आहेत मग आता आपल्या अवनतीचे गाणे गाण्यात हशील काय? देशाच्या वातावरणामध्ये दु:खाचे उसासे भरले आहेत पण माझे देशबांधव त्यांच्या समोर आलेल्या नव्या आचार विचारांची उसनवारी करण्यात आज दंश झालेले आहेत. चालु गोंगाटात पंख्याच्या आवाजाने जोर धरल्याचे मोठ्याने ऐकु येते. आमच्यावर चढाई करणाऱ्या सैक्सन लोकांच्या गुळगुळीत मऊ चेहऱ्यामुळे देशाच्या स्वातंत्र्याचा शेवटचा किरण विराम पावत आहे ज्या ठिकाणी माझे पूर्वज कायमची विश्रांती घेत आहेत तेथेच मला जाऊ द्या त्याठिकाणी मला त्यांच्या पराक्रमाचे तसेच देशाच्या अधोगतीचे स्मरण होणार नाही.

मराठ्यांचा अंगस्वभावच भांडखोर अव्यवस्थित व फाटाफुटीचा आहे एवढ्या एकांत त्या सर्वांना समावेश होण्याजोगा आहे.[88] मराठेशाहीचे राज्य हे संस्था प्रधान पध्दतीचे कधी अस्तित्वात आले नाही. शेवट पर्यंत मराठेशाही चे राज्य हे व्यक्ति प्रधान राहिल्याने मराठेशाहीच्या राज्याची घटनाही निश्चित व टिकाऊ पध्दतीची झालेली आपल्याला दिसत नाही. ज्या ज्या वेळी मराठेशाहीच्या राज्यात प्रबळ व्यक्ती समोर आली व्यक्तीने आपल्या मनाप्रमाणे मराठेशाहीत चालणारे राज कारण पुढे तशाच पध्दतीने घेऊन जाण्याचा प्रयत्न चालविलेला आहे. पेशवा बाळाजी विश्वनाथा पासून ते माधवरावापर्यंत प्रत्येक पेशव्याने आपआपल्या कार्यकाळात एक विशिष्ट प्रभाव, मराठेशाहीच्या राज्य कारभारावर उमटवलेला दिसुन येतो. तदरान्त नारायणरावांच्या खुना पासून ते नाना फडणिसाने मराठेशाही राज्य चालकाचे काम परिस्थितीने जितके साधले तितके सिध्दीस घेऊन गेलेले पहावयास मिळेल. यशवंतराव होळकर यांनी आपल्या पूर्वजांचे राज्य हाती घेतल्यानंतर इतर देशी संस्थानिकाप्रमाणे आहे त्या मध्ये समाधान मानले असते परंतु ते स्वस्थ राहिले तर त्यांना स्वार्थी म्हणावे लागले असते. यशवंतरावांनी आपल्या पूर्वजांचे राज्य इंग्रजांच्या अधिपत्याखाली जाण्या पासून वाचवले परंतु हे राज्य मिळवणे हे त्यांचे साध्य नव्हते. पूर्वजांच्या राज्याचा त्यांनी साधना सारखा वापर करुन घेतला होता त्यांचे अंतिम ध्येय हे मराठेशाहीचे स्वातंत्र्य व आपण स्वतंत्र असावे ही इच्छा सर्व मानवी समुहा मध्ये जन्मत:च आसते.

इ.स. 1804 ते 1806 या दोन वर्षामध्ये त्यांना कोणत्याही ऋतुमध्ये घरातला विसावा किंवा आहार ठाऊक नव्हता.[89] यशवंतराव हे रानोमाळ ते हजारो आपल्या लष्करातील सैन्यदलाच्या गराड्या मध्ये रहात होते. दोरी ताणलेल्या धनुष्यासारखी त्यांची दशा होती. यशवंतरावांना त्यांच्या आजाराचा विचार करत इंग्रजांनी त्यांच्या दुखण्याची जी अर्वाच्च कारणे सांगितली आहेत. त्याविषयी त्यांचा भ्रमनिरास झाल्याशिवाय राहणार नाही. इ.स. 1809 च्या आसपास यशवंतरावांना डोके दुखी व स्मृती भ्रंशाचा त्रास होऊ लागला.[90] इ.स. 1797 ते 1809 पर्यंत यशवंतराव होळकर यांनी स्वकीयांच्या आणि इंग्रजांच्या विरुध्द सातत्याने संघर्ष केला. 1802 नंतर तर त्यांनी इंग्रजांच्या जाचातुन देशी संस्थानिक आणि मराठेशाहीचे स्वातंत्र्य अबाधित ठेवण्यासाठी इंग्रजांच्या विरुध मोठ्या प्रमाणात लष्करी मोहीमा काढल्या इंग्रजांचा सातत्याने एकामागून एक पराभव करत राहिले या धावपळीच्या काळात त्यांनी स्वत:च्या आरोग्याकडे लक्ष न देता अनेक ताणतणाव अंगावरच काढले याची परिणीती ही त्यांच्या शारीरिक मानसिक प्रकृतीवर होणे स्वाभाविक होते तरी यशवंतरावांचे मनोर्धेर्य व झुंझार वृत्ती, शौर्य, धाडस इत्यादी पाहिल्यास त्याचा त्यांच्या प्रकृतीवर परिणाम होण्याची अल्प शक्यता दिसत होती युवा अवस्थेतच त्यांना संघर्ष, युध्दाची सवय त्यांच्या शरिराला झालेली होती.

इंग्रजा विरुध्द आलेले अपयश, पुतण्या खंडेरावाचा मृत्यू आणि एकाकीपणा यामुळे यशवंतरावांचे मानसिक संतुलन या काळात बिघडत गेले. इ.स. 1809 ते 1811 पर्यंत यशवंतराव बेशुध्द अवस्थेत होते त्यांना मानसिक आघातावर आघात होत होते. वरिल कारणांमुळे यशवंतराव निराश झाले होते. त्यातुनच त्यांचे मानसिक संतुलन बिघडत चालले होते. तीन वर्षापर्यंत ते एका विशिष्ट धुंदीमध्ये वावरत होते. भानपुरे मुक्कामी यशवंत महाराजांचा काळ झाला. दि.31/01/1811 चे पत्र.[91] आज 27 आक्टोबर रोजी यशवंतराव महाराज सकाळी जागे झाले तेंव्हापासून त्यांची प्रकृती बिघडलेली होती. ताबडतोब तुळसाबाईकडे वर्दी गेली त्यांनी अत्यवस्थ स्थिती पाहुन सर्व कारभाऱ्यास बोलावून आणले. सकाळी 9 वाजता (एक प्रहर दिवसे येता) यशवंतरावाचे प्राणोत्क्रमण झाले असामान्य शक्तिशाली निसर्गाने यशवंतरावांकडून मागील दहा वर्षामध्ये अफाट परिश्रम करवून घेतले व रोग अपघातादिंकातुन त्यांना तारले तीच शक्तिशाली आरोग्य ऐन तरुणवयाच्या कालखंडात एकदम कोसळावी हा एक तिचा दुर्विलासच समजावा यशवंतरावांचे मृत्युच्या वेळी वय वर्षे चौतीस वर्षीचे होते. यशवंतरावांच्या मृत्युची बातमी समजताच इंग्रजांच्या

अधिकृत सरकारी पत्रकांमध्ये यशवंतरावांच्या वयाची नोंद चौतीस पस्तीस वर्षे अशा पध्दतीची नोंदलेली आहे.

कार्तिक शुध्द 11 शके 1733 या पवित्र दिवशी रविवार 28 आक्टोबर 1811 रोजी यशवंतरावांचे भानपुरा या ठिकाणी प्राणोत्क्रमण झाले.[92] ह्याच दिवशी त्यांचे चिरंजीव व त्यांच्या नंतर होळकरशाहीच्या गादीवर आलेले मल्हारराव यांनी भारमल होळकरास पत्र लिहुन पुढील प्रमाणे यशवंतरावांचे निधन झाल्याचे वृत्त कळविले, "तिर्थरुप बाबा साहेबांची प्रकृती बेआराम होतीच कार्तिक शुध्द 10 शनिवारी वायूचा प्रकोप जास्ती होऊन अंग ऊडू लागले यापूर्वी चार पाच वेळा या प्रमाणेच जाला श्री मार्तंडजीच्या कृपे आराम होत गेला ह्यासाठी जे उपचार होते ते जाले शेवट शनिवार सायंकाळी ज्वरांश वाढला मागील चार घटका रात्र राहता श्वासाचा उपद्रव पाहुन तुला गोदाने इत्यादी दान धर्म चालुन पोथी पुराणाचे पाठ व नामस्मरण त्यांत देवी मानवी उपचार ही जाहले परंतु गुणास न येता शुद्ध प्रथम घटका दिवस वाढता परलोक पावले, ह्याच दिवशीचे भानपुऱ्याहुन एका बातमीदाराचे पत्र उपलब्ध आहे. तो लिहितो "कालपासोन श्रीमंत राजश्री यशवंतराव महाराजास श्वास उठला होता. आज एकादशी शनिवार पावणे दोन प्रहरी महाराजांस देव आज्ञा जाली. मोठा अनर्थ जाहला." दुसऱ्या पत्रातला मजुकर "मोठी अनर्थाची गोष्ट जाली वाज सारखा वीर पराक्रमी जाहला नाही व पुढे ही व्हावयाचा नाही सर्वांवर जरब देऊन जलचारे आदि करुन सर्वास जेर करुन वडिलांचे नांवाची शर्थ केली गैर आरामात जरी होते तरी सर्वास दहशत होती."

28 आक्टोबर 1811 रोजी वयाच्या 34 व्या वर्षी होळकर घराण्यातील यशवंतराव या पराक्रमी तरुणाचा भानपुरा येथे मृत्यु झाला.[93] यशवंतरावांच्या मृत्यूमुळे मराठेशाहीच्या पायाचा शेवटचा चिरा ढासळला. आता उरला तो फक्त मराठेशाहीचा केवळ पोकळ डोलारा फुंकर मारण्याची देर की मराठेशाही ही दृष्टी आड पोहचणार होती जी इतक्या दुर आसमंतात उडून जाणार होती. यशवंतराव होळकर यांच्या पराभव मुळे दुसरे इंग्रज मराठा युध्दाला पूर्ण विराम मिळाला या युध्दामुळे मराठेशाहीचे भव्यदिव्य स्वरुप नाहीसे होऊन तिचे अनेक लहान, लहान तुकडे झाले. मोगल बादशहा पुन्हा एकदा इंग्रजांच्या आश्रयाखाली आला आणि इंग्रज हे भारतातील एकमेव शक्तिशाली सत्ता म्हणून भारताच्या राजकीय नकाशावर विराजमान झालेली पहावयास मिळते. यशवंतराव होळकरांचे अंतिम संस्कार हे भानपुरा स्थित रेवा नदीच्या किनाऱ्यवर करण्यात आले

यशवंतरावांनी स्वातंत्र्यासाठी जी आपली आहुती दिली. ती आपल्या देशाला इंग्रजांपासून मुक्त करणे आणि मराठेशाहीला पारतंत्र्यात जाण्यापासून वाचवणे यासाठी त्यांची धडपड होती. होळकरशाहीचे नाव संपूर्ण भारतभर आणि जगामध्ये उज्जवल केले. स्वत:चे नेतृत्व एक शुरवीर योध्दा, देशभक्त म्हणून ख्याती राहिले.

होळकरशाहीवर शिंद्याचा हल्ला, पेशव्यांचे होळकर जहागिरी जबतीचा प्रयत्न, स्वकियांचे अधुनमधून त्रास, इंग्रजांच्या विरुध्द उठाव.[94] अशा प्रकारे यशवंतरावांनी वेगवेगळ्या पातळयावर एकट्याला सामना करावा लागत होता. त्यामुळे त्यांना मोठ्या प्रमाणात मानसिक ताण-तणावातून जावे लागत होते. तरी त्यांनी इंग्रजांची कुटनीती ओळखून त्यांच्या विरुध्द लष्करी उठाव करुन त्यांना या देशातून हाकलून लावण्यासाठी शेवटच्या श्वासापर्यंत लढा दिला. होळकरशाहीच्या विस्तारलेल्या भागाला संरक्षण देता देता मानसिक थकवा त्यांना जाणवत होता. अशा या स्वाभिमानी, देशभक्त यशवंतरावास आजारी पणात कुलदेवतेच्या जेजुरी गडावर श्री मल्हारी मार्तंडाच्या दर्शनासाठी जावयाचे होते परंतु ती ही इच्छा पूर्ण झाली नाही. देशाच्या स्वातंत्र्यासाठी लढणारा वीर पुरुष दुरदृष्टी असणारा, परकियांच्या कुटनीतीला ओळखणारा असून त्यास स्वकियांनी ओळखण्यास उशीर केला. ऐन तारुण्यात या वीर पुरुषाने आपला देह स्वराज्यासाठी, मराठेशाहीसाठी, देशाच्या सुरक्षेसाठी अहोरात्र दौडी शत्रुच्या विरुध्द केल्या परंतु या तरुणाला शेवटी डोक्यात गाठ निर्माण झाल्याने ज्यास आजच्या काळात ब्रेन ट्युमर म्हणून ओळखले जाते त्या आजारात यशवंतरावांच्या मृत्यू झाला.

यशवंतरावांची भानपुरा स्थित विशाल छत्रीचे वर्णन.[95] यशवंतराव होळकरांचे ज्या ठिकाणी अंतिम संस्कार करण्यात आले होते त्याठिकाणी एक विशाल छत्रीचे त्यांच्या प्रित्यर्थ निर्माण करण्यात आली आज ही छत्री मोठ्या दिमाखामध्ये उभी आहे. भानपुरा पासुन दुर अंतरावर पश्चिमेकडे या छत्रीची निर्मिती करण्यात आलेली असून या छत्रीच्या चारही बाजुने भिंती उभारलेल्या आहेत. दरवाजा समोरच्या भीतीवर दोन 50-60 फुट उंचा वरती हत्तीचे चित्र रेखाटलेले आहे. दरवाजाच्या समोरुनच एक सुंदर वाटीका दृष्टीस पडते, त्याच बरोबर दरवाजातुन आत प्रवेश केल्यानंतर यशवंतरावांच्या मूर्तीचे दर्शन होते. त्यामुर्तीकडे एकचित्त पाहिल्यास असा भास स्वत:ला होतो की आपल्या शरिरामध्ये हा वीर पुरुष संचारला की काय असे जानवते त्यांच्या भुवया त्या उंचावलेल्या आणि तेजस्वी चेहरा दृष्टीस पडतो, उत्तर दिशेला तळ घर आणि विहीर आहे जी

छत्रीच्या समांतर भूभागापासून 20 ते 30 फुट खोल दिसुन येते. विहीरीच्या आतमधून तळ घरात जाण्यासाठी एक गुप्त मार्ग पण आहे. त्या तळ घरात अशा काही खोल्या बनवण्यात आलेल्या आहेत. ज्यांचा युध्दाच्या वेळी उपयोग करण्यात येत असे. पुढे गेल्यावर आतमध्ये राजदरबार आहे आणि अनेक प्रकारच्या वेगवेगळ्या मुर्त्या आहेत. यशवंतरावांचे स्मरण करण्यासाठी बांधण्यात आलेल्या छत्रीच्या बाजुलाच मोठे तलाव बांधण्यात आलेल्या आहे. या तळ्यामध्ये मोठ मोठाले स्तंभ उभे करुन त्यावर छत्रीची निर्मिती करण्यात आलेली आपल्याला पहावयास मिळते. महाराज यशवंतराव भानपुरा येथे निधन पावले, तेथे त्यांच्या स्मरणार्थ उत्तम कारागीरीची विस्तीर्ण छत्री बांधण्यात आली ती छत्री पहाण्या करिता गेलेल्या एका इंग्रजाने छत्रीचे व तेथील परिसराचे वर्णन केले. यशवंतरावांच्या स्मरणार्थ निर्माण केलेल्या छत्रीच्या आत या इंग्रज अधिकाऱ्याने प्रवेश करताच त्यास समोर यशवंतरावांची मूर्ती पाहिली आणि छत्रीच्या आजुबाजुच्या परिसरामध्ये गवताळ भागात यशवंतरावांचा आवडता घोडा हा चरत होता. या घोड्याचे डौलदार बांधा सुकुमार शरीर, पाणीदार डोळे, बारिक टोकाचे कळीदार कान इत्यादी विषयी माहिती सांगुन झाल्यावर या इंग्रज अधिकाऱ्याने यशवंतरावांच्या घोड्याच्या तोंडाबद्दल जे उदगार काढले ते विशेष कौतुकाचे होते. तो इंग्रज अधिकारी घोडयाकडे पहात म्हणतो, "घोड्याचे तोंडफार लाहन होते. इतके लहान होते की ते छोटयाशा कपांत शिरले असते तो खरा खरा मराठ्यांचा घोडा." A real Maratha charger होता. या इंग्रज अधिकाऱ्याच्या वक्तव्यावरुन असे लक्षात येते की इंग्रजांच्या विरुध्द यशवंतरावांनी दिलेला लढा हा इंग्रजांसाठी अडचणीचा ठरला होता. यशवंतरावांना इंग्रजांच्या विरुध्द बाकीच्या मराठा सरदार व देशी संस्थानिकांचे सहकार्य मिळू नये यामध्ये इंग्रज यशस्वी झाले होते. यशवंतरावांनी एकामागुन एक इंग्रजांचा केलेला पराभव हा त्यांच्या जिव्हारी लागला होत. इंग्रजांना माहीत होते की संपूर्ण भारतात आपल्या विरुध्द उठाव करणारा हा एकटाच यशवंतराव आहे. त्याच्या बाजुने जाणाऱ्यास आपण प्रभुत्वाखाली घेतलेले असुन सुध्दा हा मराठेशाहीतील मराठा शूरवीर, योध्दा शेवटच्या क्षणापर्यंत इंग्रजांच्या विरुध्द लढला त्यामुळेच या अधिकाऱ्याने यशवंतरावांना उद्देशुन घोड्याचे तोंडफार लहान होते. आणि तो खरा मराठ्यांचा घोडा होता हे त्यास इथे सांगावयाचे होते इ.स. 1799 ते 28 आक्टोबर 1811 पर्यत होळकर राज्याचे सर्वाधिकार यशवंतराव होळकर यांच्याकडे होते. या 13, 14 वर्षाच्या कालखंडात त्यांचे एकच ध्येय होते व शत्रुही एकच होता तो म्हणजे इंग्रज परंतु त्यांना समजुन घेणारा, व सहकार्य करणारा देशी संस्थाने, व मराठा सरदार एकही नव्हता ही मोठी शोकांतिका होती.

इ.स. 1797 ते 1811 असा चौदा वर्षाचा कालखंड यशवंतरावांच्या कर्तृत्वासाठी लाभला.[96] यशवंतराव होळकर यांना आपले होळकरशाहीचे राज्य व सर्वाधिकार स्थापीत करण्यासाठी, दौलतराव शिद्यांच्या कैदेतुन स्वत:ची पत्नी व कन्या भीमाबाई यास मुक्त करण्यासाठी इ.स. 1797 ते 1803 चा एवढा कालखंड खर्ची करावा लागला इ.स. 1803 पासून यशवंतराव होळकर यांनी इंग्रजांना भारतातुन हाकलुन लावण्यासाठी त्यांच्या विरुध्द लष्करी मोहिम उघडून इंग्रज सैन्याचा व त्यांच्या अधिकाऱ्यांचा सातत्याने पराभव करत चालले होते, त्यावेळी यशवंतरावांचा हा झंझावात रोखण्यासाठी व त्यांना आपल्याला पराभुत करता येत नाही. म्हणून त्यावेळी इंग्रजांचा भारतातील प्रमुख गर्व्हनर जनरल वेलस्लीची उचलबांगडी भारतातुन इंग्रजांना करावी लागली. त्याच बरोबर इंग्रजांनी जी ध्येय धोरणे आखली होती ती आता यशवंतरावांमुळे बदलावी लागली. संपूर्ण जगामध्ये अजिंक्य मानल्या जाणाऱ्या इंग्रज सैन्याची अब्रु ही यशवंतरावांच्या शौर्य, पराक्रमामुळे जगाच्या वेशीवर टांगली गेली. एवढ्या शौर्याने भरलेला यशवंतरावांचा कालखंड, जीवन, तेजस्वी नेतृत्व, आशावाद, हा कधीच मावळला नाही, इंग्रजांच्या मुख्य भूभागावर असलेल्या कलकत्त्यावर आक्रमण करुन स्वत:च्या कार्य कर्तृत्वावर परकीयांच्या जोखडातून आपला देश स्वतंत्र करण्याची उमेद असणारा हा यशवंतराव होळकर शेवटच्या क्षणापर्यंत आपल्या राज्याकडे, आरोग्यांकडे दुर्लक्ष करुन देशासाठी इंग्रजांच्या विरुध्द लढा देणारा हा एकमेव उत्तर मराठेशाहीतील मराठा शुरवीर योध्दा होता.

यशवंतराव होळकर हा मोठाशुर आणि मर्दानी सेनानी.[97] यशवंतराव होळकर यांनी मराठेशाहीच्या पडत्या काळामध्ये आपल्या युध्दकौशल्यपूर्ण बुध्दीमत्तेच्या जोरावर मराठेशाही असो की भारतातील इतर लहान मोठे संस्थाने, राजे रजवाडे असो आपल्या कार्यकर्तृत्व, युध्दकौशल्य, युध्दनेतृत्वाच्या जोरावर आपले अस्तित्व निर्माण करुन स्थान प्राप्त केलेले आहे. दुर्देवाने यशवंतराव होळकर हे अशा कालखंडात जन्माला आले की त्याकालखंडामध्ये कितीही शुर पुरुषाची कर्तबगारी व शहाण्याची मुत्सद्देगिरी ही इंग्रजांच्या समोर अयशस्वी ठरलेली दिसेल. पेशवा बाजीराव आणि मराठा सरदार दौलतराव शिंदे यांच्याशी वागताना यशवंतराव हा समंजस वाटतो परंतु त्या कालखंडामध्ये देशी संस्थाने व मराठा सरदारांचे वागणे आणि इंग्रजांच्या हालचाली पहाता असे लक्षात येते की, मराठेशाहीच्या कोसळण्याचा वेग इतका प्रचंड होतो की यशवंतरावा सारखा शुर वीर ही वाया गेलेला पहायला मिळतो.

जॉन मालकम म्हणतो, यशवंतराव होळकर यांच्यात एक अदभुत चैतन्य, उत्साह, असायचे.[98] निराशा, अपयश त्यांना कधी माहित नव्हते, वैयक्तिक पातळीवर मोठ्या प्रमाणात संकटे आलेली असताना ही यशवंतरावांनी कधी त्यांनी त्यांचे मनोधैर्य कमकुवत होऊ दिले नाही की आपले मानसिक संतुलन ढळु दिले नाही. त्यांनी युध्दाच्या रणांगणावर आपल्या सैन्य दलाच्या खांद्याला खांद्या लावुन शत्रुच्या सैन्यावर आक्रमकपणे तुटुन पडत युध्दात अनेक वेळा पराभव समोर दिसत असतानाही त्या पराभवाला विजयामध्ये रुपांतर करण्याची त्यांची युध्दनीती, तत्परता, धाडस या गुणांमुळे विजय मिळवला जायचा यशवंतरावांना भारताचा नेपोलियन म्हणून का संबोधण्यात येते हे त्यांच्या युध्द कौशल्य, युध्द नेतृत्व, डावपेच इत्यादीमुळे लक्षात येईल. मुळ सत्ता छत्रपतींची सर्वाधिकार पेशव्यांचा, मनसुबा फडणविसांचा व तलवार सरदारांची.[99] मराठेशाही राज्याच्या सत्तेची विभागणी ही चार ठिकाणी झाल्याने मराठे शाहीचा राज्यकारभार हा एकतंत्री चालणे अशक्य होते. मराठेशाहीतील मराठा सरदारांनी शत्रूच्या विरुद्ध लढाई जिंकून त्यास तहास आणावे, फडणविसांनी राज्याचे मुलकी धोरण पाहून तहाच्या अटी तयार कराव्यात पेशव्यांनी या तहावर मखलाशी करावी आणि सातारच्या छत्रपतींचे त्यावर शिक्का मोर्तब व्हावे असा चौतंत्री कारभार मराठेशाहीमध्ये चालत असून त्यापैकी प्रत्येकाला इतर तीन तंत्रे सांभाळावी लागत असे. हे जोपर्यंत सन्मानपूर्वक सांभाळली जात होती तोपर्यंतच मराठेशाहीमध्ये अंत:स्थ जोर जिवंत राहिलेला दिसतो. इंग्रज इतिहासकार मराठेशाहीचे वर्णन करताना मराठी राज्य न म्हणता मराठा संघ हा शब्द प्रयोग वापरत असत आणि त्यांचे बरोबरही होते. जोपर्यंत मराठा संघ मराठेशाहीमध्ये टिकला तोपर्यंत मराठ्यांची ही सत्ता सर्व हिंदूस्तानमध्ये विस्तारलेली होती. परंतु हा मराठा संघ मोडताच मराठ्यांची सत्ता ही नष्ट झाली.

पेशवा या पुरुषाबद्दल निष्ठा हा दोष मानला तर तो यशवंतरावांचा नसुन ते ज्या काळात जन्मले, ज्या संस्कारात वाढले त्या काळाचा व त्या संस्काराचा आहे.[100] यशवंतरावांनी त्या दोषाने आपली स्वराज्यनिष्ठा, मराठेशाही राज्याच्या स्वातंत्र्याची सुरक्षा प्रखरपणे करण्याची त्यांची महत्वकांक्षा काळवंडलेली नाही. इतका हा तो गुण यशवंतरावांच्या अंगी तेजस्वी आहे. त्यांचा विचार हाच यशवंतरावांच्या चरित्राची खरी सांगता आहे. यशवंतराव होळकर यांनी जे आपल्या आरोग्याकडे दुर्लक्ष करुन इंग्रजांच्या विरुध्द लढण्याचा जो क्लेशदायक प्रचंड उद्योग अविश्रांत आरंभिला होता. त्याचे मुळ हे त्यांच्या मराठेशाहीतील पेशवाईच्या प्रेमामध्ये पहायला मिळते.

पेशवाई ही मराठ्यांच्या स्वराज्याचे प्रतीक आहे. अशी यशवंराव होळकरांची श्रध्दा होती ते नेहमी आपल्या पत्रातुन "स्वराज्य" हा शब्द बहुतांश वेळा वापरताना दिसतात, स्वधर्म हिंदुधर्म हा शब्द क्वचित स्वराज्य या शब्दाला जोडून येतो. एक दोन वेळा मराठ्यांचे साम्राज्य या शब्दांचा उपयोग आपल्या पत्रामध्ये केलेला आढळुन येतो. एका पत्रामध्ये तर राजाधिराज राज राजेश्वर हे शब्द यशवंतरावांनी आपल्या मागे जोडलेले पाहुन इंग्रज बुचकळ्यात पडले होते. त्या शब्दामागे काही गुप्त संकेत आहेत का? अशी शंका इंग्रजांना त्यावेळी वाटत होती.

स्वराज्य म्हणजे संपूर्ण मराठेशाही, भोसले, पेशवे, शिंदे, होळकर आणि लहान मोठे आपल्या प्रभुत्वाखाली असणारे संस्थाने, रजवाडे इत्यादीच्या सहकार्याने हिंदुस्थानच्या दक्षिणोत्तर दिशांमध्ये पसरलेली मराठ्यांची स्वतंत्रसत्ता इतक्या व्यापक अर्थाने यशवंतराव होळकर स्वराज्य शब्दाचा वापर आपल्या पत्रव्यवहरातुन करीत होते. पेशवा हा या सत्तेचा मध्यवर्ती केंद्रबिंदु, स्वामी, नायक आसल्याने पहिल्या बाजीराव पेशव्याने होळकर, शिंदे, पवार, यांना मोठमोठ्या प्रदेशाचा सरंजाम देऊन महत्वाच्या पदांवर आरुढ केले. असल्यामुळे पेशव्या बद्दल कृतज्ञता मुलक तीव्र श्रध्दा ही वंश परंपरेनुसार होळकर, शिंदे या सरदारांमध्ये वास करित होती. त्यामुळेच होळकरशाहीची माळव्यात सुभेदार मल्हाररावांनी स्थापना करुन सुध्दा पेशवे आपल्या मराठेशाही राज्याचे नेतृत्व करीत आहेत आपण त्यांचे सेवक आहोत ही त्यांची भूमिका होती तीच भूमिका यशवंतराव होळकरांनी वंश परंपरेने पुढे चालवली होती. यशवंतराव हे शेवटपर्यंत मराठेशाहीवर निष्ठा कायम ठेवून होते.

यशवंतराव होळकर यांचे कर्तृत्व मोठे होते. सत्ता, संपत्ती ही त्यांनी स्वत:च्या कर्तृत्वावर जमविली होती.[101] यशवंतरावांनी शुन्यातुन आपले अस्तित्व निर्माण केले. एकएक सैन्य जोडत आपल्या लष्कराची उभारणी त्यांनी केली होती. स्वत: संघर्ष करुन सत्ता स्थापीत केली होळकर शाही दुसऱ्याच्या घशात जाण्यापासून वाचवली आणि होळकरशाहीला गत वैभव प्राप्त करुन दिले. होळकरशाहीच्या राज्याच्या सीमा वाढविल्या आर्थिक स्त्रोत निर्माण केले, लष्करी मोहीमा काढुन वसुली ही राज्याद्वारे करण्यात आली होती. मराठेशाही इंग्रजांच्या घशात दुसऱ्या बाजीरावांनी घालु नये यासाठी यशवंतरावांनी आटोकाट प्रयत्न केले होते परंतु या प्रयत्नास यशवंतरावांना यश आले नाही. शेवटी दुसऱ्याबाजीराव पेशव्यांनी इंग्रजा बरोबर तह केला. तरी यशवंतरावांची इंग्रजांच्या विरुध्द युध्द करण्याची त्यांची तयारी होती वसईच्या तहानंतर इंग्रजांच्या विरुध्द लढा देणाऱ्या

मराठेशाही राज्यातील मराठा सरदारांपैकी एकमेव शेवटचे सरदार हे यशवंतराव होळकर होते, दुर्देवाने पेशव्याने यशवंतरावांच्या गुणांचा राष्ट्र उभारणी मध्ये उपयोग करुन घेतला असता तर मराठोशाहीच्या राज्याला त्याची अतिशय मदत झाली असती दुर्देवाने मराठेशाहीतील अंतर्गत संघर्षामध्ये सर्व मराठा सरदारांची शक्ती खर्च होत चालली होती यशवंतराव होळकर हे आहिल्याबाई चे कारभारी तुकोजीराव होळकर यांचे पुत्र.[102] स्वराज्य टिकविण्यासाठी यशवंतराव होळकर यांनी सातत्याने प्रयत्न केले इंग्रज आणि मराठे यांच्या युध्दात प्रखरतेने लढणारे हे एक अत्यंत शुरवीर मराठा सरदार होते. यशवंतरावांनी मराठे, शीख, जाट, राजपुत या देशी संस्थानिकांची इंग्रजाच्या विरुध्द एकजुट करुन लढा देण्यासाठी प्रयत्न केला. परंतु दुर्देवाने यामध्ये त्यांना यश आले नाही. शौर्य, धैर्य साहसी वृत्ती, इत्यादी गुणांमुळे यशवंतरावांनी अनेक युध्दामध्ये युध्द कौशल्याच्या गुणांवर युध्द नेतृत्व करुन आपले नाव भारतभर गाजविले त्यांच्या गुणांची पारख करणारा, त्यांच्यागुणांना होणारा, चीज करणारा त्या कालखंडात पेशवा त्यांना लाभला नाही तेंव्हा त्यांची सर्व मेहनत, कष्ट वाया गेले असे म्हणावे लागेल.

यशवंतरावांच्या सर्वच साथीदाराची चरित्रे अनेक दृष्टींनी स्फुर्तिदायक आणि बहादुरीच्या दृष्टीने इतिहासामध्ये कायम स्थान मिळविण्यास पात्र आहेत.[103] यशवंतराव होळकर यांच्या लष्करी व्यवस्थेत आणि राज्याला, नेतृत्वाप्रती निष्ठा बाळगणारे शोभतील असे सहकारी त्यांना लाभले होते. लाला भवानी शंकर, मीरखान (आमीरखान) हरनाथ सिंग, शामराव महाडीक, अचबेसिंग, शहामतखान, बाळाराम शेट, विठ्ठल महादेव किचे, गणपतराव दिवाण इत्यादी प्रकारचे असे अनेक सहकारी यशवंतरावांच्या सोबत होते. अशा प्रकारच्या सहकाऱ्यांचे संघटन करुन त्यांच्या नेतृत्वाखाली वेगवेगळी सैन्य दलांची जबाबदारी देऊन त्यांना कार्यास लावले.

सर्व मराठेशाहीतील उत्तर कालखंडात मराठा सरदारांमध्ये सर्वात योग्य आणि सर्वात कर्तबगार यशवंतराव होळकर हे होते परंतु त्यांचे मानसिक असंतुलन उन्मादाच्या अवस्थे पर्यंत जाऊन पोहचले होते. त्यामुळे इंग्रजांना आपल्या ध्येयधोरणांना विस्तारण्यासाठी वाट मोकळी झालेली पहायला मिळते. मराठेशाहीच्या या विनाश कालखंडात स्वराज्याचे स्वातंत्र्य अबाधित राखण्यासाठी यशवंतराव होळकर यांनी रात्रं दिवस एक करुन आपल्या जीवाची, राज्याची पर्वा न करता अखंड भारत भूमीच्या रक्षणासाठी इंग्रजांच्या विरुध्द केलेल्या लष्करी मोहीमा, इंग्रजांची एका

मागुन एक पराभवाचा उद्योग केल्याने मराठेशाहीच्या उत्तर कालखंडातील अखेरचा स्वातंत्र्यवीर ही संज्ञा यशवंतराव होळकर यांना शोभणारी आहे.

श्री. सुंदरलाल म्हणतात की भरतपुरच्या युध्दातील शेवटच्या दिवसांमध्ये.[104] यशवंतराव होळकर आणि भरतपुरचा राजा रणजित सिंह यांचा इंग्रजांच्या विरुध्दचा आक्रमकपणा या युध्दामध्ये महत्वाचा ठरला या आक्रमक धोरणांमुळे इंग्रजांच्या विरुध्द लढा केला नसता तर भारतातील लहान, मोठे देशी संस्थानिक एकही इंग्रजांच्या तावडीतुन सुटली नसती त्यामुळे निसंकोच यशवंतराव आणि रणजित सिंह यांचे नाव सदैव भारतीय इतिहासामध्ये असणाऱ्या शुरवीर योध्दांच्या यादीत सर्वोच्च श्रेणीमध्ये सदैव राहतील.

## संदर्भ सूची


1. मधुसुदनराव होलकर; होलकरोंका इतिहास, प्रकाशन, आखिल भारतीय होलकर महासंघ, WB-19 गली नं.-1 शकरपुर दिल्ली 110092,1992 पृ-367.
2. डॉ. रघुबीरसिंह (संपा); वाकई होलकर, प्रकाशन स्किन 57 मिश्रा- राजाजिका रास्ता जयपूर-01 1998, पृ-82.
3. घनश्याम होलकर; महाराजा यशवंतराव होलकर, नेशन प्रेस, ओल्ड नं.-38, नवीन नं-6, मॅकनिकोलस रोड, चेटपेट, चेन्नई 2018, पृ-22,23.
4. डॉ. रघुबीरसिंह (संपा); वाकई होलकर, प्रकाशन स्किन 57 मिश्रा- राजाजिका रास्ता जयपूर-01 1998, पृ-103.
5. मधुसुदनराव होलकर; होलकरोंका इतिहास, प्रकाशन, आखिल भारतीय होलकर महासंघ, WB-19 गली नं.-1 शकरपुर दिल्ली 110092,1992 पृ-376.
6. कित्ता, पृ-376.
7. कित्ता, पृ-377.
8. गो.स. सरदेसाई; मराठों का नवीन इतिहास Vol-II, फोनिक्स प्रकाशन बेन हॅम हॉल लेन, गिरगांव बॉम्बे-4 1968, पृ-396.
9. घनश्याम होलकर; महाराजा यशवंतराव होलकर, नेशन प्रेस, ओल्ड नं.-38, नवीन नं-6, मॅकनिकोलस रोड, चेटपेट, चेन्नई 2018, पृ-37.
10. मधुसुदनराव होलकर; होलकरोंका इतिहास, प्रकाशन, आखिल भारतीय होलकर महासंघ, WB-19 गली नं.-1 शकरपुर दिल्ली 110092,1992, पृ-378.
11. कित्ता, पृ-379.
12. एम.डब्ल्यु बर्वे; हिज हाईनेस महाराजा तुकोजीराव होलकर द्वितीय, पृ-89,92.
13. मधुसुदनराव होलकर; होलकरोंका इतिहास, प्रकाशन, आखिल भारतीय होलकर महासंघ, wB-19 गली नं.-1 शकरपुर दिल्ली 110092,1992, पृ-379.
14. Jadunath Sarkar; fall of the Mughal empire vol-4, orient Longmans nicol road ballard Estate Bombay-1 1972, PN-194.
15. इंदौर दर्शन दिग्दर्शन,1977 पृ-45.

16. Jadunath Sarkar; fall of the Mughal empire vol-4, orient Longmans nicol road ballard Estate Bombay-1 1972, PN-181.
17. मधुसुदनराव होलकर; होलकरोंका इतिहास, प्रकाशन, आखिल भारतीय होलकर महासंघ, wB-19 गली नं.-1 शकरपुर दिल्ली 110092,1992, पृ. 388, 389.
18. घनश्याम होलकर; महाराजा यशवंतराव होलकर, नेशन प्रेस, ओल्ड नं.-38, नवीन नं-6, मॅकनिकोलस रोड, चेटपेट, चेन्नई 2018,पृ- 53.
19. संजय सोनवणी; यशवंतराव होळकर, पुष्प प्रकाशन, भारत बुक हाऊस, 1788, सदाशिव पेठ, देशमुखवाडी, पुणे-30, 2011, पृ-51.
20. डॉ. श्रीपाद दत्तात्र्य कुलकर्णी (संपा); हिंदू वर्चस्वासाठी लढा, प्रकाशन श्री भगवान वेदव्यास इतिहास संशोधन मंदीर बी, 7-8, श्रीपाल अपार्टमेंट आराधना चित्रपट गृहा जवळ, पाच पाखाडी, ठाणे-02, 1993, पृ- 342, 343.
21. डॉ. दीपा दिनेश सावळ/ गोरे; मराठ्यांचा इतिहास, एज्युकेशन ल. प्रकाशन, गोकुळवाडी, औरंगपुरा, औरंगाबाद-2013 पृ-459.
22. श.गो. कोलारकर; मराठ्यांचा इतिहास (1600-1818), मंगेश प्रकाशन श्री. शंतादुर्गा निवास 23 नवी रामदास पेठ, नागपुर- 10 1988,पृ-570.
23. संजय सोनवणी; यशवंतराव होळकर, पुष्प प्रकाशन, भारत बुक हाऊस, 1788, सदाशिव पेठ, देशमुखवाडी, पुणे-30, 2011, पृ-49.
24. कित्ता, पृ-50.
25. Jadunath Sarkar; fall of the Mughal empire vol-4, orient Longmans nicol road ballard Estate Bombay-1 1972, PN-188.
26. श.गो. कोलारकर; मराठ्यांचा इतिहास (1600-1818), मंगेश प्रकाशन श्री. शंतादुर्गा निवास 23 नवी रामदास पेठ, नागपुर- 10 1988, पृ-572.
27. Jadunath Sarkar; fall of the Mughal empire vol-4, orient Longmans nicol road ballard Estate Bombay-1 1972, PN-191.
28. मधुसुदनराव होलकर; होलकरोंका इतिहास, प्रकाशन, आखिल भारतीय होलकर महासंघ, WB-19 गली नं.-1 शकरपुर दिल्ली 110092,1992,पृ-395.
29. कित्ता, पृ-395.

30. श.गो. कोलारकर; मराठ्यांचा इतिहास (1600-1818), मंगेश प्रकाशन श्री. शंतादुर्गा निवास 23 नवी रामदास पेठ, नागपुर- 10 1988, पृ-572.
31. डॉ. दीपा दिनेश साबळे/ मोरे; मराठ्यांचा इतिहास, एज्युकेशनल प्रकाशन गोकुळवाडी, औरंगपुरा, औरंगाबाद 2013, पृ -462.
32. मधुसुदनराव होलकर; होलकरोंका इतिहास, प्रकाशन, आखिल भारतीय होलकर महासंघ, wB-19 गली नं.-1 शकरपुर दिल्ली 110092,1992, कित्ता, पृ-432.
33. संजय सोनवणी; यशवंतराव होळकर, पुष्प प्रकाशन, भारत बुक हाऊस, 1788, सदाशिव पेठ, देशमुखवाडी, पुणे-30, 2011, पृ-79.
34. मधुसुदनराव होलकर; होलकरोंका इतिहास, प्रकाशन, आखिल भारतीय होलकर महासंघ, wB-19 गली नं.-1 शकरपुर दिल्ली 110092,1992, पृ- 428.
35. गो.स. सरदेसाई; मराठी खंड-8, पॉप्युलर प्रकाशन 301 महालक्ष्मी चेंबर्स 22, भूलाभाई, देसाई रोड मुंबई-26,1993, पृ-326.
36. कित्ता, पृ-326.
37. मधुसुदनराव होलकर; होलकरोंका इतिहास, प्रकाशन, आखिल भारतीय होलकर महासंघ, wB-19 गली नं.-1 शकरपुर दिल्ली 110092,1992, कित्ता, पृ- 422.
38. गो.स. सरदेसाई; मराठी खंड-8, पॉप्युलर प्रकाशन 301 महालक्ष्मी चेंबर्स 22, भूलाभाई, देसाई रोड मुंबई-26,1993, पृ- 324.
39. मधुसुदनराव होलकर; होलकरोंका इतिहास, प्रकाशन, आखिल भारतीय होलकर महासंघ, wB-19 गली नं.-1 शकरपुर दिल्ली 110092,1992, कित्ता, पृ-429.
40. कित्ता, पृ- 429.
41. संजय सोनवणी; यशवंतराव होळकर, पुष्प प्रकाशन, भारत बुक हाऊस, 1788, सदाशिव पेठ, देशमुखवाडी, पुणे-30, 2011, पृ- 84.
42. मधुसुदनराव होलकर; होलकरोंका इतिहास, प्रकाशन, आखिल भारतीय होलकर महासंघ, wB-19 गली नं.-1 शकरपुर दिल्ली 110092,1992, कित्ता, पृ- 430.
43. W.H. Hutton; Rules of India, marquess wellesleys K.G S. Chand and Co Lumingtinon road Bombay, pn - 74.

44. बंडे शारदा गोविंदराव; मराठे कालीन होळकर संस्थान, कल्पना प्रकाशन 6 एच. आय.जी, कॉलनी, आयटी आय जवळ नांदेड, 02, 2009, पृ-260.

45. संजय सोनवणी; यशवंतराव होळकर, पुष्प प्रकाशन, भारत बुक हाऊस, 1788, सदाशिव पेठ, देशमुखवाडी, पुणे-30, 2011,पृ-87.

46. siralredlyall; British Dominrion in india, Oriental book publishers 54 Rani Jhansi road New Delhi-55, 1973, PN-260.

47. डॉ. बी.एल. ग्रोवर:- आधुनिक भारताचा इतिहास, एस.चाँद अॅण्ड कंपनी लि. 7361, रामनगर, नई दिल्ली 110055, पृ-144.

48. श.गो. कोलारकर; मराठ्यांचा इतिहास (1600-1818), मंगेश प्रकाशन श्री. शंतादुर्गा निवास 23 नवी रामदास पेठ, नागपुर- 10 1988, पृ-590.

49. संजय सोनवणी; यशवंतराव होळकर, पुष्प प्रकाशन, भारत बुक हाऊस, 1788, सदाशिव पेठ, देशमुखवाडी, पुणे-30, 2011, पृ-86.

50. मधुसुदनराव होलकर; होलकरोंका इतिहास, प्रकाशन, आखिल भारतीय होलकर महासंघ, wB-19 गली नं.-1 शकरपुर दिल्ली 110092,1992, कित्ता, पृ-433.

51. घनश्याम होलकर; महाराजा यशवंतराव होलकर, नेशन प्रेस, ओल्ड नं.-38, नवीन नं-6, मॅकनिकोलस रोड, चेटपेट, चेन्नई 2018, पृ-100.

52. कित्ता, पृ-105.

53. संजय सोनवणी; यशवंतराव होळकर, पुष्प प्रकाशन, भारत बुक हाऊस, 1788, सदाशिव पेठ, देशमुखवाडी, पुणे-30, 2011, पृ-90,91.

54. मधुसुदनराव होलकर; होलकरोंका इतिहास, प्रकाशन, आखिल भारतीय होलकर महासंघ, wB-19 गली नं.-1 शकरपुर दिल्ली 110092,1992, कित्ता, पृ-434,435.

55. Pratul Chandra Gupta; Bajirao II and the East India Company (1796-1888) Allied Publishers, Pvt ltd. 15 Graham Road Ballard Estate, Bombay-1, 1964, PN-32,33,34,37.

56. जेम्स ग्रँटडफ; हिस्ट्री ऑफ द मराठा- भाग-3, पृ-290.

57. घनश्याम होलकर; महाराजा यशवंतराव होलकर, नेशन प्रेस, ओल्ड नं.-38, नवीन नं-6, मॅकनिकोलस रोड, चेटपेट, चेन्नई 2018, पृ-113.

58. संजय सोनवणी; यशवंतराव होळकर, पुष्प प्रकाशन, भारत बुक हाऊस, 1788, सदाशिव पेठ, देशमुखवाडी, पुणे-30, 2011, पृ-91.

59. कित्ता, पृ-92.

60. कित्ता पृ-93.

61. Prof. K.B. Keswani; History of Modern India (1800-1984) Himalaya Publishing house, Ramdoot Dr Bhalerao Marg Girgaon (Kelewadi) Bombay-04,1984 PN-46.

62. मधुसुदनराव होलकर; होलकरोंका इतिहास, प्रकाशन, आखिल भारतीय होलकर महासंघ, wB-19 गली नं.-1 शकरपुर दिल्ली 110092,1992, कित्ता, पृ-437.

63. मधुसुदनराव होलकर; होलकरोंका इतिहास, प्रकाशन, आखिल भारतीय होलकर महासंघ, wB-19 गली नं.-1 शकरपुर दिल्ली 110092,1992, कित्ता, पृ-442.

64. घनश्याम होलकर; महाराजा यशवंतराव होलकर, नेशन प्रेस, ओल्ड नं.-38, नवीन नं-6, मॅकनिकोलस रोड, चेटपेट, चेन्नई 2018, पृ-115.

65. गो.स. सरदेसाई; मराठी खंड-8, पॉप्युलर प्रकाशन 301 महालक्ष्मी चेंबर्स 22, भूलाभाई, देसाई रोड मुंबई-26,1993, पृ-340.

66. श.गो. कोलारकर; मराठ्यांचा इतिहास (1600-1818), मंगेश प्रकाशन श्री. शांतादुर्गा निवास 23 नवी रामदास पेठ, नागपुर- 10 1988, कित्ता, पृ-591.

67. मधुसुदनराव होलकर; होलकरोंका इतिहास, प्रकाशन, आखिल भारतीय होलकर महासंघ, wB-19 गली नं.-1 शकरपुर दिल्ली 110092,1992, कित्ता, पृ-438.

68. संजय सोनवणी; यशवंतराव होळकर, पुष्प प्रकाशन, भारत बुक हाऊस, 1788, सदाशिव पेठ, देशमुखवाडी, पुणे-30, 2011, पृ-93.

69. कित्ता, पृ-94.

70. मधुसुदनराव होलकर; होलकरोंका इतिहास, प्रकाशन, आखिल भारतीय होलकर महासंघ, WB-19 गली नं.-1 शकरपुर दिल्ली 110092,1992, कित्ता, पृ-438.

71. डॉ. गणेश मतकर; वीरश्रेष्ठ प्रथम यशवंतराव होळकर, अहिल्या प्रकाशन 3104. सुदामानगर, ई सेक्टर, इंदौर-09, 1999, पृ-41.

72. कित्ता, पृ-42.

73. मधुसुदनराव होलकर; होलकरोंका इतिहास, प्रकाशन, आखिल भारतीय होलकर महासंघ, WB-19 गली नं.-1 शकरपुर दिल्ली 110092,1992, कित्ता,पृ-440.
74. कित्ता, पृ-438.
75. कित्ता, पृ-441.
76. कित्ता, पृ-445.
77. कित्ता, पृ-448.
78. कित्ता, पृ-450.
79. कित्ता, पृ-451.
80. श.गो. कोलारकर; मराठ्यांचा इतिहास (1600-1818), मंगेश प्रकाशन श्री. शंतादुर्गा निवास 23 नवी रामदास पेठ, नागपुर- 10 1988, कित्ता, पृ-591.
81. न.र. फाटक; श्रीमन्महाराज यशवंतराव होलकर, वि.पु. भागवत मौज प्रिंटिग ब्युरो, खटाववाडी, मुंबई-4,1967, पृ-136.
82. कित्ता, पृ-176.
83. न.र. फाटक; श्रीमन्महाराज यशवंतराव होलकर, वि.पु. भागवत मौज प्रिंटिग ब्युरो, खटाववाडी, मुंबई-4,1967, पृ-190.
84. मधुसुदनराव होलकर; होलकरोंका इतिहास, प्रकाशन, आखिल भारतीय होलकर महासंघ, wB-19 गली नं.-1 शकरपुर दिल्ली 110092,1992, कित्ता,पृ-456.
85. न.र. फाटक; श्रीमन्महाराज यशवंतराव होलकर, वि.पु. भागवत मौज प्रिंटिग ब्युरो, खटाववाडी, मुंबई-4,1967, पृ-187.
86. गो.स. सरदेसाई; मराठी रियासत खंड-8, पॉप्युलर प्रकाशन प्रा.लि. 301, महालक्ष्मी चेंबर्स, भुलाभाई देसाई रोड मुंबई-26, 2010, पृ-380,381.
87. न.र. फाटक; श्रीमन्महाराज यशवंतराव होलकर, वि.पु. भागवत मौज प्रिंटिग ब्युरो, खटाववाडी, मुंबई-4,1967, पृ-111.
88. डॉ. वीरेंद्र गोपालसिंह बैस; ब्रिटिश कंपनी राजवटीतील भारत (1757-1856) सर साहित्यकेंद्र, गणराज अपार्टमेंट राजापेठ बस स्टॉप, हुडकेश्वर रोड, नागपूर, 34, 2015.

89. न.र. फाटक; श्रीमन्महाराज यशवंतराव होलकर, वि.पु. भागवत मौज प्रिंटिग ब्युरो, खटाववाडी, मुंबई-4,1967, पृ-112,113,114.

90. डॉ. उमेश कदम; फ्रेंच मराठा संबंध (1668-1818), 12, विठ्ठल स्मृती कोकण एक्सप्रेस हॉटेल जवळ, कर्वे रोड, कोथरुड पुणे-38, 2011, पृ-200.

91. कित्ता, पृ-136.

92. कित्ता, पृ-182.

93. गो.स. सरदेसाई; मराठी रियासत खंड-8, पॉप्युलर प्रकाशन प्रा.लि. 301, महालक्ष्मी चेंबर्स, भुलाभाई देसाई रोड मुंबई-26, 2010, पृ-616.

94. प्रा.डॉ. सासवडकर; मराठी सत्तेचा विकास आणि ऱ्हास, प्रकाशन महारार्ष्ट विद्यापीठ, ग्रंथा निर्मिती मंडळ, विधी महाविद्यालय परिसर, महात्मा गांधी मार्ग नागपूर-01, 1974, पृ-305.

95. न.र. फाटक; श्रीमन्महाराज यशवंतराव होलकर, वि.पु. भागवत मौज प्रिंटिग ब्युरो, खटाववाडी, मुंबई-4,1967, पृ-137.

96. संजय सोनवणी; यशवंतराव होळकर, पुष्प प्रकाशन, भारत बुक हाऊस, 1788, सदाशिव पेठ, देशमुखवाडी, पुणे-30, 2011, पृ-111,112.

97. डॉ. दीपा दिनेश सावळे / मोरे; मराठ्यांचा इतिहास, एज्युकेशनल प्रकाशन गोकुळवाडी, औरंगपुरा, औरंगाबाद, 2013, पृ - 468.

98. Poona residency correspondence, vol-no.14, Article-76.

99. न.र. फाटक; श्रीमन्महाराज यशवंतराव होलकर, वि.पु. भागवत मौज प्रिंटिग ब्युरो, खटाववाडी, मुंबई-4,1967, पृ-144.

100. मदन मार्डिकर; मराठ्यांचा इतिहास, प्रकाशन पिंपळापुरे, 85 कॅनॉल रोड रामदास पेठ, नागपुर-12, पृ-341.

101. रामकृष्ण गोपाळ भिडे, वाईकर; इंग्रजांनी हिंदुस्थान कसा घेतला, चिरंजीव ग्रंथ प्रकाशन, सदाशिव पेठ, टिळक रस्ता पुणे-2 1963, पृ-60.

102. डॉ. गणेश मतकर; वीरश्रेष्ठ प्रथम यशवंतराव होळकर, नवीन फोटो कॉपी शिवविलास पॅलेस, राजवाडा परिसर इंदौर 1999, पृ-54.

103. कित्ता, पृ-55.

104. न.र. फाटक; श्रीमन्महाराज यशवंतराव होलकर, वि.पु. भागवत मौज प्रिंटिग ब्युरो, खटाववाडी, मुंबई-4,1967, पृ-183.

## परिशिष्ट

### संदर्भ ग्रंथ सूची

#### इंग्रजी


1. Jadunath Sarkar; fall of Mughal empire – vol-I orient congman 50, sunder nagar, New Delhi-3, 1966.
2. Col (Retd) NB Bhatanagar; the forgotten, general, shree sarvottavy prakashan, 132 tilak path indore-07, 2020.
3. W.H. Hutton; Rules of india the marques Wellesley, K.G. School and Co lamingation Road, Bombay 1961.
4. Jadunath Sarkar; fall of the Mughal expire vol-4] orient lougmun nicol road bullard estate Bombay-1 1972.
5. Grant Duff, History of the maratha's Part-II Associated Publishing house new delhis-1878.
6. John Malcam; Empire central india, part-I, Publication kingsbury Parbury and Allen ledden hall-Street 1824.
7. Sir Alfred Iyall; British Dominion in india oriental books reprient corporation book publishers, 54 Rani Jhansi road, New Delhi -55, 1973.
8. Poona residency Co-orrespondence, vol-No 14] Article.
9. C.V. Aitchison; Treaties, Engagemaents and sanads Vol-IV, Mittal Publications Delhi-03] 1929.
10. Paper relating and East india attach, Rajah of bharatpur 1805, Vol-2.
11. Colonel Hugh Peare; The memoir of the life and military services of services of uiscount lake (1744-1808), publication William blulk wood and sons, edinburgn and London MCMV III.
12. Montgomery Martin (ed); The despatches Minutes and correspondence of the marquress welesly K.G. Vol-IV, Publisher, Nicol 51, Pall Mall, London.

13. Major Evansbell (ed); Last counsels of unknown counsellor publication Macmillan and co London 1877.
14. Rajkumar (ed); Marutha Military Systems, Common welth Publishers 4831/24 Prahlad Spreet, Ansari road Darya Ganj New Delhi-02, 2004.
15. G.S. Sardesai; New Histary at the Marathas Vol-II (1772-1848), Phonenix Publications Bombay-1968.
16. Dr. B.R. Andhare; Bundelkhand under the marathas, Shrikrishna, Printing press raut chowk lelgans pagur-2 1984.
17. Rajaram Vyankatesh Nadkarni; The rise and fall of the Maratha empire, popular prakashan Bombay 1888.
18. J.P. Guha; The Decisive Battels of india (1746 to 1849) Associated Publishing House New- Delhi-5.
19. K.S. Gupta; Mewar and the Maratha Relations, (1735-1818 AD) S Chand and Copvt Ltd Ram Nagar, New Delhi-55.
20. Dr. S.G. Vaidya; Peshwa Bajirao II and The Down Fall at the Maratha Power, Pragati PRakashan 87-A Dhautoli Nagapur- 12,1976.
21. J.P. Guha (ed); James Grant Duff History of the Marattas Vol-II Associated Publishing House New Delhi-5, 1971.
22. Pratual Chandra Gupta; Bajirao II and The East India Company (1796-1818) Allied Publishers, Pvt ltd 15 Gradhm road Ballard, Estate, Bombay-1, 1964.
23. Prof K.B. Keswarj, History at Modern India (1800-1984) Himalaya Publishing House, Ramdoot Dr Balerao Marg Giragon (Kelewadi) Bombay-04, 1985.

**मराठी**

1. गो.स. सरदेसाई; मराठी रियासत खंड-8, पॉप्युलर प्रकाशन,301 महालक्ष्मीचेंबर्स 22, भुलाबाई-देसाई रोड-मुंबे 1993.
2. प्रा.डॉ. राम इंगळे; होळकर शाहीचा संस्थापक, प्रकाशन विश्वभारती, सिताबर्डी नागपूर- १२, 1992.
3. प्रा.डॉ. राम इंगळे; मावळते मल्हारराव उदयोन्मुख महादजी शिंदे (1722-1794) प्रकाशन विश्वभारती धनवटे चेंबर्स सीताबर्डी नागपूर-12, 1986.
4. डॉ. यादव गुजर; मल्हारराव होळकर आणि त्यांचा काळ, प्रकाशन श्रीराम प्रिंटर्स, गांधी बाग नागपूर -1991.
5. वा.वा. ठाकुर (संपा); होळकरशाहीचा इतिहास भाग-1 (इ.स. 1693 ते 1797) प्रकाशन, होळकर गर्व्हेमेंट प्रेस इंदुर-1944.
6. भागवत; होळकरशाहीच्या इतिहासाची साधने खंड-1.
7. न.र.फाटक वि.गो. खोबरेकर (संपा); भारतीय इतिहास आणि संस्कृती प्रकाशन मुंबई मराठी ग्रंथालय, 1976.
8. डॉ. रघुबीर सिंह, मालवा मे युगान्त (हिंदी).
9. तर्कतीर्थ श्री लक्ष्मण शास्त्री (संपा); मराठी विश्वकोष खंड-18, प्रकाशन महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोष निर्मिती मंडळ, डी ब्लॉक एन्साइटमेंट, आझाद मैदान मुंबाई-01, 1985.
10. न.र.फाटक वि.गो. खोबरेकर (संपा); भारतीय इतिहास आणि संस्कृती, जुलै 1976, मुंबई मराठी ग्रंथ संग्रहालय, इतिहास संशोधन मंडळाचे गैमासिक.
11. घनश्याम होलकर; महाराजा यशवंतराव होलकर, नेशन प्रेस ओल्डनं -38, न्युनं-6 मॅकनिकोल्स रोड, चेटपेट- चेन्नई-31.
12. रामसिंह शेखावत सुभेदार मल्हारराव होळकर, प्रकाशन छत्रपती इंदौर 190, उषानगर एक्स टेंशन इंदौर-09, 2012.
13. गोविंद शुरनर; आद्य क्रांतीकारी राजे छत्रपती यशवंतराव होळकर, शब्दवेध बुहाऊस, कॉर्नर, गारखेडा परिसर औरंगाबाद, 2018.
14. न.र.फाटक; श्रीमन्महाराज यशवंतराव होळकर, वि.पु. भागवत मौज प्रिंटिंग ब्युरो खटाववाडी मुंबई-10.

15. अ.रा. कुलकर्णी, ग.ह.खरे; मराठ्यांचा इतिहास खंड-3.
16. महाराष्ट्र विद्यापीठ ग्रंथ निर्मिती मंडळ, कॉन्टी नेतृल प्रकाशन, विजयानगर, पुणे-30 1985.
17. सरदेसाई, कुलकर्णी काळे; ऐतिहासिक पत्र व्यवहार, समर्थछापखाना पुणे, 1993.
18. अनिल मिसाळ; रणझुंजार महाराजा, यशवंतराव होळकर, ज्ञानकुंज प्रकाशन, मिलिंद निवास, विद्यानगर, जत जि. सांगली- 2016.
19. प्रा. गणेश मतकर; इंदुरच्या राज्यकर्त्यांचा परिचय, श्री अहिल्या प्रकाशन, सौ. कलावती मतकर 135/2 मोती तबेला नं-1 इंदुर-04, 1978.
20. डॉ. राम इंगळे; अहिल्याबाई होळकर, विश्वभारती प्रकाशन धनवटे चेंबर्स नागपुर-12, 1994.
21. यशवंत नरसिंह केळकर; होळकरांची कैफियत, हनुमान छापखाना 300, सदाशिव पेठख पुणे-2, 1954.
22. संजय सोनवणी; भारतीय स्वातंत्र्याचा प्रणेता महाराजा यशवंतराव होळकर, प्रकाशन पुष्प, भारत बुक हाऊस,1788 सदाशिव पेठ, देशमुखवाडी पुणे-30.
23. राम सेवक गर्ग- अहिल्या स्मारिका -1971.
24. मधुसुदनराव होलकर; होलकरोंका इतिहास, महासंघ, डब्ल्यु बी-19, गली नं-1 शकरपुर, दिल्ली-110092.
25. न.चि. केळकर; मराठे व इंग्रज, प्रकाशन मॉडर्न बुकडे पो, बाजीराव रास्ता पुणे-2,1918
26. डॉ. गणेश मतकर; वीरश्रेष्ठ प्रथम यशवंतराव होलकर नवीन फोटो कॉपी शिवविलास पॅलेस राजवाडा परिसर इंदौर 1999.
27. डॉ. सोमनाथ रोडे, मराठ्यांचा इतिहास 1600 ते 1818, मनोहर पिंपळापुरे, पिंपळापुरे ॲण्ड कंपनी, प्रकाशन हिंदु मुलींचे शाळे जवळ महाल, नागपुर-02, 1998.
28. श्रीकांत बरिंगे, क्रांतीची मशाल पेटवा, ब्लु कॅनन प्रकाशन, नागपुर-2015.
29. जयसिंग भाऊसाहेब पवार; मराठी साम्राज्याचा उदय आणि अस्त, प्रकाश अनिल मेहता अजब पुस्तकालय भाऊसिंगजी रोड, कोल्हापुर.
30. श.गो. कोलारकर; मराठ्यांचा इतिहास 1600-1818, श्रीमंगेश प्रकाशन, श्री. शांता दुर्गा निवास 23, नवी रामदास पेठ, नागपुर-10, 1988.
31. डॉ. गणेश मतकर; सांस्कृतिक इतिहास आणि होळकर राज्य प्रकाशन नवीन फोटो कॉपी शिवविलास पॅलेस राजवाडा परिसर इंदौर 1999.

32. न.र.फाटक; मराठेशाही अखेरचा अद्वितीय स्वातंत्र्यवीर श्रीमन्महाराज यशवंतराव होळकर, वि.पु. भागवत मौजे प्रिंटिग ब्युरो, खटववाडी, मुंबई-4, 1967.
33. शिवराम महादेव परांजपे; मराठ्यांच्या लढायांचा इतिहास 1802 ते 1818 रा.रा. शंकर नरहर जोशी, चित्रशाळा प्रेस 1026. सदाशिव पेठ, पुणे-1934.
34. डॉ. गणेश मतकर; वीर श्रेष्ठ प्रथम यशवंतराव होळकर, अहिल्या प्रकाशन 3104, सुदामानगरा, ई-सेक्टर इंदौर-1999.
35. रघुबीरसिंह (संपा); वाकई होलकर, प्रकाशन स्कीन 57, मिश्रा- राजाजीका रास्ता जयपुर-01, 1998.
36. जोशी सु.ह. व इतर; डायमंड इतिहास माहिती कोश, डायमंड, प्रकाशन-1255, सदाशिव पेठ, लेले संकुल पहिला मजला निंबाळकर तालमी समोर, पुणे-30.
37. पोतदार, मुजुमदार; भारतीय इतिहास संशोधन मंडळ, पुणे-1933.
38. सौ. विजया कुलर्णी (संपा); मराठ्यांची प्रशासन व्यवस्था महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ मुंबई-2003.
39. शिवराम महादेव परांजपे; मराठ्यांच्या लढायांचा इतिहास- 1802 ते 1818, चित्रशााळा प्रेस 1026, सदाशिव पेठ, पुणे-1934.
40. पुराणीक शं. श्री; मराठ्यांचे स्वातंत्र्य समर (उत्तरार्ध).
41. दि. वी. गोखले; युध्दमीमांसा, मौजे स्टीक प्रकाशन 8, फिनिक्स ३ रा मजला 457 एस.व्ही. पी रोड मुंबई-4,2000.
42. कर्नल जेम्स टॉड; राजस्थान का इतिहास भाग-1 साहित्य- सागर, धामाणी मार्केट की गली, चौडा रास्ता, जयपुर-2008.
43. बंडे शारदा गोविंदराव; मराठेकालिन होळकर संस्थान, कल्पना प्रकाशन-6, एच.आय.जी. आय.टी. आय. जवळ नांदेड -02, 2009.
44. गो.स. सरदेसाई; मराठोंका नवीन इतिहास Vol-II फोनिक्स प्रकाशन बेन हॅम हॉल लेन, गिरगांव बॉम्बे-4 1968,
45. डॉ. श्रीपाद दत्तात्रय कुलकर्णी; हिंदु वर्चस्वासाठी लढा, साहित्य सागर प्रकाशन, धामाणी मार्केट की गली चौडा रस्ता, नागपुर -2008.

46. गो.स. सरदेसाई; मराठों का नवीन इतिहास, शिवकाल अग्रवाल ॲण्ड कंपनी प्रा.लि. दुर्गा प्रिंटिग वर्क्स आगरा-1964,
47. संजय सोनवणी; ब्लॉग स्पॉट इन 2011.
48. के.एम. गुप्ता; मेवाड आणि मराठा संबंध (1735 ते 1818) एस. चाँद आणि को. प्रा.लि. रामनगर, नवी दिल्ली-55.
49. डॉ. सुमन वैद्य; अखेरचा पेशवा, प्रगती प्रकाशन 87 अ, धांतोली नागपुर-12, 1994.
50. प्रा. ए. पी. चौधरी ; युध्दविज्ञान संरक्षण व सामरिक शास्त्र, दत्तात्रय पाष्टे, डायमंड प्रकाशन 1691, सदाशिव पेठ, शंकर प्रसाद को. हौ.सो. तिसरा मजला टिळक रोड, पुणे-30, 2008.
51. प्रा. महेश चौरे; युध्द आणि युध्द पध्दती, अरुणा, प्रकाशन 103, ओमकार कॉम्पलेक्स खर्डेकर स्टॉप औसा रोड, लातूर-2011.
52. श्रीपाद रामचंद्र टिकेकर (संपा); सरदेसाई स्मारक ग्रंथ प्रकाशन बॉम्बे वैभव प्रेस, गिरगाव, बॉम्बे, 1938.
53. शं. गा. कोलारकर; मराठ्यांचा इतिहास, श्री. मंगेश प्रकाशन श्री. शांतादुर्गा निवास, 23 नवी रामदास पेठ-10, 1987.
54. तर्कतीर्थ श्री. लक्ष्मणशास्त्री जोशी (संपा); मराठी विश्वकोष खंड-14, प्रकाशन महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोष निर्मिती मंडळ डी ब्लॉक, एन्साईटमेंट, आझाद मैदान मुंबई -01, 1989.
55. डॉ. बी.एल. ग्रोवर; आधुनिक भारताचा इतिहास, प्रकाशन एस चाँद ॲन्ड कंपनी लि. 7361-रामनगर नई दिल्ली-55.
56. डॉ. श्रीपाद दत्तात्र्य कुलकर्णी (संपा); हिंदु वर्चस्वासाठी लढा, प्रकाशन श्री भगवान वेदव्यास इतिहास संशोधन मंदिर, बी-78 श्रीपाल अपार्टमेंटस, आराधना चित्रपट गृहाजवळ पाच पारवाडी ठाणे-02.
57. तर्कतीर्थ श्री लक्ष्मणशास्त्री जोशी (संपा); मराठी विश्वकोष खंड-1 प्रकाशन महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ, मुंबईख 1976.
58. गो.स. सरदेसाई; मराठोंका नवीन इतिहास भाग-3, शिवलाल अग्रवाल ॲन्ड कंपनी, दुर्गा प्रिंटिग वर्क्स आगरा 1964.
59. गायकवाड, सरदेसाई, थोरात, होनमाने; मराठेकालीन संस्था व विचार, प्रकाशन एम व्ही फडके आणि कंपनी महाद्वार रोड कोल्हापुर 12,1982.

60. न.र.फाटक; यशवंतराव होळकर, मौज प्रिंटीग ब्युरो खटाववाडी, मुंबई-4.
61. चौधरी, पाटील, सैंदाणे, ढाके, चौधरी; संरक्षण शास्त्र, प्रकाशन निराली, 119 बुधवार पेठ, जोगेश्वरी मार्ग पुणे-02, 2002.
62. रामकृष्ण गोपाळ भिडे, वाईकर; इंग्रजांनी हिंदुस्थान कसा घेतला चिरंजीव ग्रंथ प्रकाशन सदाशिव पेठ, टिळक रस्ता पुणे-2, 1963.
63. डॉ. विरेंद्र गोपालसिंह बैस; ब्रिटीश कंपनी राजवटीतील भारत (1757-1856) प्रकाशन सरसाहित्य केंद्र, गणराज अपार्टमेंट राजापेठ, बसस्टॉप हुडकेश्वर रोड, नागपुर -34 2015.
64. एस.एस. त्यागी; आधुनिक भारत (1707-1857) राधा प्रकाशन अंसारी रोड, दरियागंज नई दिल्ली-02.
65. डॉ.उमेश कदम; फ्रेंच मराठा संबंध (1668-1818) प्रकाशन पुष्पनंद 12, विठ्ठल स्मृती कोकण एक्स प्रेस हॉटेल जवळ कर्वे रोड, कोथरुड पुणे-38, 2011.
66. डॉ. स्टुअर्ट गार्डन; द मराठाज (1600-1818) डायमंड प्रकाशन, 26413 शनिवार पेठ, 302 अनुग्रह अपार्टमेंट ओंकारेश्वर मंदीराजवळ पुणे-2016.
67. शरद कोलारकर; मराठ्यांचा इतिहास, श्री मंगेश प्रकाशन 23, फार्म लॅंड, नवी रामदास पेठ नागपुर-10, 1987.
68. ज.द. जोगळेकर; भारतातील युध्दशास्त्राची उपेक्षा मनोरमा प्रकाशन 1021/सी माधववाडी, खोली क्र. -11 नायगाव क्रॉस रोड, दादर मुंबई-14, 1996.
69. गो.स. सरदेसाई; ब्रिटीश रियासत खंड-2, पॉप्युलर प्रकाशन प्रा.लि. 35-सी. पंडित मदन मोहन मालवीय मार्ग, ताडदेव मुंबई-34, 1993.
70. गो.स. सरदेसाई; मराठी रियासत खंड-8 नवीन आवृत्ती पॉप्युलर प्रकाशन प्रा.लि. 301, महालक्ष्मी चेंबर्स - 22, भुलाभाई देसाई रोड, मुंबई-26, 2010.
71. डॉ. दीपा दिनेश सावळे /मोरे; मराठ्यांचा इतिहास, एज्युकेशनल प्रकाशन, गोकुळवाडी औरंगपुरा, औरंगाबाद 2016.
72. नवभारत टाईम्स प्लस; सोमवार 17 फरवरी 1997.
73. वा.वा. ठाकुर; होळकरशाहीचा इतिहास भाग-2 प्रकाशन होळकर गर्व्हमेंट प्रेस इंदुर-1.
74. गो.स. सरदेसाई; ब्रिटीश रियासत खंड-2, पॉप्युलर प्रकाशन प्रा.लि. 35 सी. पंडित मदन मोहन मालवीय मार्ग ताडदेव मुंबई-34, 1993.

75. डॉ. अ.रा. कुलकर्णी डॉ. अ.न. देशपांडे; मराठ्यांचा इतिहास भाग दुसरा (1707 ते 1818) स्नेहवर्धन प्रकाशन 863, सदाशिव पेठ, महात्मा फुले सभाग्रहामागे ज्ञान प्रबोधिनी जवळ, पुणे-30.
76. यशवंत वासुदेव शास्त्री खरे; ऐतिहासिक लेखा संग्रह, खंड-15.
77. कर्नल जेम्स टॉड; राजशास्त्र का पुरातत्व एवं इतिहास भाग-2 प्रकाशन साहित्यगार धामाणी मार्केट की गली चौडा रस्ता जयपुर -2008.
78. डॉ. सुमन वैद्य; अखेरचा पेशवा प्रगती प्रकाशन, 87- अ धंतोली नागपुर-12, 1994
79. एम. डब्ल्यु बर्वे; हिज हाईनेस महाराजा तुकोजीराव होलकर द्वितीय.
80. इंदौर दर्शन दिग्दर्शन.
81. जेम्स ग्रँटडफ; हिस्ट्री ऑफ द मराठा भाग-3.
82. प्रा. आठवले, डॉ. सासवडकर; मराठी सत्तेचा विकसा आणि ऱ्हास, प्रकाशन महाराष्ट्र विद्यापीठ, ग्रंथ निर्मिती मंडळ, विधी महाविद्यालय परिसर, महात्मा गांधी मार्ग नागपुर-01, 1974.
83. मदन मार्डीकर; मराठ्यांचा इतिहास, प्रकाशन पिंपळा पुरे, 85, कॅनॉल रोड, रामदास पेठ, नागपुर-12.
84. हेमचंदराय चौधरी; फ्लोअर्स ऑफद हिंदु शिवर्ली प्रकाशन एच एल ओ. गॅरेट प्राचार्य गर्व्हेमेंट कॉलेज लाहोर, जाने -1932.
85. डॉ. वि.गो. खोबरेकर; महाराष्ट्राचा इतिहास मराठा कालखंड भाग-2 (1707 ते 1818) प्रकाशन महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ मुंबई.
86. प्रा.सु.ह. जोशी; मराठेकालीन शौर्यकथा डायमंड प्रकाशन 1691 सदाशिव पेठ शंकरप्रसाद को.हौ.सो. तिसरा मजला टिळक रोड पुणे-30.

**इंटरनेट**

1. www.google.com.in (मराठ्यांचा इतिहास).
2. www.Wikipedia, Sanjay Sonwani 6109 Spot in 2011.

स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ नांदेड,

मानव्य विद्याशाखे अंतर्गत सैनिकशास्त्र विषयात

विद्यावाचस्पती (Ph.D.) पदवीसाठी सादर केलेला शोध प्रबंध




प्रबंधाचे शीर्षक

# मराठेकालीन यशवंतराव होळकरांचे लष्करी कार्य : एक चिकीत्सक अभ्यास

संशोधक

महेशकुमार भगवानराव चौरे

मार्गदर्शक

प्रोफेसर.डॉ. चंद्रकांत बन्सीधर भांगे

संशोधन मार्गदर्शक व विभाग प्रमुख

सैनिकशास्त्र,

श्री. शिवाजी महाविद्यालय, परभणी

जानेवारी 2023

## प्रकरण सातवे

## मुल्यमापन आणि निष्कर्ष

छत्रपती शिवाजी महाराजांनी स्थापन केलेल्या स्वराज्याचा विस्तार त्यांच्या नंतर ही मराठेशाहीच्या नावाने अस्त्विात ठेवण्याचे कार्य त्या त्या कालखंडात मराठेशाहीचे नेतृत्व करणाऱ्यांनी ठेवले. भारतभर मोगलांची सत्ता त्यांचे वाढते प्रस्थ, प्रभाव, वाढताना जाणवत होते की मराठेशाही राज्याचे अस्तित्व धोक्यात येते की काय? परंतु मराठेशाहीच्या पडत्या काळामध्ये पेशवा बाळाजी विश्वनाथ यांनी मराठेशाहीला संजीवनी दिली. मराठेशाहीचे नेतृत्व हे साहजिकच पेशव्यांकडे आले. बाळाजी विश्वनाथ पेशव्यांनी बलाढ्य असणाऱ्या मोगल साम्राज्या पासुन मराठेशाहीला वाचविण्याचे कार्य केले. कालांतराने मोगल साम्राज्याच्या मावळतीला सुरुवात झाली आणि मराठेशाही ही उदयोन्मुख होऊ लागली होती. बाळाजी विश्वनाथांच्या पश्चात थोरले बाजीराव पेशवा यांच्या नेतृत्वाखाली मराठेशाहीच्या साम्राज्य विस्ताराला मोठ्या प्रमाणात चालना मिळालेली आपल्याला पहावयास मिळते.

थोरले बाजीराव पेशवे यांच्या कालखंडात मराठेशाही ही संपूर्ण भारतामध्ये नावारुपास आली, साहजिकच बाजीराव पेशव्यांच्या आखत्यारीत त्यांनी निवडलेल्या मराठा सरदारांचाही सिंहाचा वाटा आहे. बाजीराव पेशव्यांनी उत्तरेकडे मराठेशाहीचा विस्तार वाढविण्यासाठी आणि दिल्लीच्या सत्तेवर मराठेशाहीचा दबदबा रहावा यासाठी बाजीराव पेशव्यांनी मल्हारराव होळकर यांच्याकडे माळव्याची जबाबदारी दिली तर राणोजी शिंदे यांच्याकडे ग्वाल्हेर, धारची जबाबदारी पवार यांच्याकडे दिली होती. या तिघांनाही सुभेदारीची वस्त्रे देऊन बाजीरावाने मराठेशाहीच्या उत्तरेकडील विस्ताराची जबाबदारी देण्यात आल्याने या मराठा सरदारांनी मराठेशाहीचा विस्तार मोठ्या प्रमाणात उत्तरेकडे वाढवून मराठेशाहीला आर्थिक संपन्न करण्यामध्ये यांचे सहकार्य मिळत होते.

सुभेदार मल्हारराव होळकर यांनी माळवा प्रांताची जबाबदारी स्वीकारुन मराठेशाहीचा विस्तार वाढविण्यामध्ये यांचा मोठा हातभार त्या कालखंडात आहे. त्यामुळे कालांतराने थोरले बाजीराव पेशव्यांनी माळवा प्रांताची सुभेदारी "खासगी" देण्याचा त्यांचा निर्णय योग्य राहिला. यातुनच होळकरशाही ही जन्माला आली. सुभेदार मल्हारराव होळकर यांनी एकनिष्ठेने मराठेशाहीची सेवा केल्याने त्याचे फळ त्यांना होळकरशाही राज्याच्या माध्यमातून मिळालेले दिसते. सुभेदार मल्हारराव होळकर यांच्या पश्चात होळकरशाहीच्या राज्याची धुरा देवी श्री अहिल्याबाई

होळकर यांच्याकडे आली यांनी संपूर्ण भारता मध्ये होळकरशाहीच्या माध्यमातून मराठेशाहीचे नाव लौकिक केले.

अहिल्याबाई यांच्या पश्चात होळकरशाही राज्याची सुत्रे ही तुकोजीराव होळकर यांच्याकडे आली. तुकोजीरावांना दोन वर्षाचा कालावधी राज्य चालविण्यासाठी मिळालेला होता. तुकोजी रावानंतर, मराठेशाहीच्या उत्तरार्धाथ यशवंतराव होळकर, दौलतराव शिंदे, दुसरा बाजीराव पेशवा यांचा हा कालखंड आपल्याला पहावयास मिळेल. मराठेशाहीचे नेतृत्व करण्यासाठी दौलतराव शिंदे आणि पेशवा बाजीराव दुसरा यांच्यामध्ये अंतर्गत छुपे युध्द चालत असल्याने मराठेशाही राज्याचा कारभार पहाण्याकडे यांचे दुर्लक्ष होत गेले, त्यातच भारतामध्ये त्यावेळी इंग्रज एका बाजुला आपल्या साम्राज्य विस्तारवादी धोरणाला लहान, मोठ्या संस्थानिकांना एक, एक करुन आपल्या नियंत्रणाखाली आणत होते. परंतु मराठेशाहीचे नेतृत्व करणाऱ्यांनी याकडे दुर्लक्ष केले. उद्या आपल्या राज्यावरही हीच वेळ येऊ शकते. परंतु होळकरशाहीच्या राज्याची सुत्रे आपल्या हाती घेवून कारभार पहाणारा यशवंतराव होळकर यांच्याकडे असणाऱ्या दुरदृष्टीच्या नजरेतुन त्यांनी पाहिले की एक दिवस आपल्या राज्याच्या दरवाजावर इंग्रज येऊन आपल्याला आव्हान देणार आहेत. त्या दृष्टीने यशवंतरावांनी मराठेशाहीतील मराठा सरदार असो की भारतातील लहान मोठे संस्थानिक असो त्यांना इंग्रजांच्या विरुध्द युध्द करण्यास आणि सर्वांनी एकत्रीतपणे इंग्रजांचा पाडाव करु यासाठी आव्हान केले होते. परंतु याकडे भारतातील व मराठेशाहीतील कोणत्याही जबाबदार व्यक्ती, नेतृत्वाने सहकार्य करण्यास प्रतिसाद दिला नाही आणि शेवटी यशवंतरावाना इंग्रजांच्या विरुध्द एकट्याला लढावे लागले. होळकरशाहीची स्थापना मल्हाररावांनी केली. ही होळकरशाही भारताला 15 ऑगस्ट 1947 रोजी स्वातंत्र्य मिळेपर्यंत अस्तित्वात होती. होळकरशाहीच्या गादीवर वेगवेगळ्या कालखंडात वेगवेगळे नेतृत्व आले. त्यांनी होळकरशाहीची सेवा केलेली पहावयास मिळते.

यशवंतराव होळकर यांच्या युध्दविषयक धोरणांचा, डावपेचांचा, अभ्यास करताना लक्षात येईल की, यशवंतरावांनी एवढ्या प्रखरतेने युध्दधोरणांचा अभ्यास का केला असेल तर त्यांना त्यांच्या मराठेशाहीच्या उत्तरार्धातील काळामध्ये भारतामध्ये इंग्रजांनी लहान मोठ्या संस्थानिकांना ईस्टइंडिया कंपनीच्या माध्यमातुन त्यांच्यावर नियंत्रण स्थापीत करण्याचा प्रयत्न दिसतो. इतर संस्थानिकांना इंग्रजांच्या साम्राज्य विस्तार धोरणाकडे दुर्लक्ष करुन आपल्या स्वत:च्या राज्याचे संरक्षण कशा पध्दतीने करता येईल. याकडे लक्ष होते, तर यशवंतराव इंग्रजांच्या चाललेल्या

हालचालीवर लक्ष ठेवून होते. त्यांच्या दुरदृष्टी व अनुभवातुन असे लक्षात आले की इंग्रज हे ईस्टइंडिया कंपनीच्या माध्यमातून आपल्या राज्यापर्यंत एकना एक दिवस येऊन पोहचणार आणि मराठेशाहीराज्य हे धोक्यात येवू शकते त्या दृष्टीने यशवंतराव होळकर यांनी इंग्रजांच्या विरुध्द आपले लष्करी धोरण, भूमिका घेताना दिसतात.

यशवंतरावांच्या लष्करी कार्याची व्याप्ती ही संपूर्ण भारतभर दिसुन येते. यशवंतरावांच्या कार्यकाळात इंग्रजांच्या वाढणाऱ्या लष्करी कारवाया आणि युध्दजन्य परिस्थितीचा विचार करुन त्यांनी इंग्रजांच्या विरुध्द आपले युध्दविषयक धोरण, डावपेच, भूमिका, सैन्य दलांना प्रोत्साहन, गनिमीकावा युध्द तंत्राद्वारे हल्ले, शस्त्रास्त्रे, तोफा निर्मिती इत्यादी विषयी इंग्रजांच्या विरुध्द युध्द विषयक धोरण ठरवलेले दिसते. कोणत्याही राज्याचा इतिहास पाहिला असता प्रथम त्या राज्याच्या लष्करी ध्येय धोरणे, सामर्थ्याकडे आणि लष्करी विभागातील असणाऱ्या विविध सैन्य दलाच्या पराक्रम, शौर्य, धाडस याकडे पहावे लागते. त्यावरुनच त्या राज्याचा गौरवपुर्ण इतिहास आणि आपल्या राज्याची सुरक्षा राखण्याच्या कामी जी साधने उपयोगी पडतात. त्यामध्ये त्या राज्याच्या नेतृत्वाचा, लष्करी सामर्थ्याचा दर्जा हा पाहिला जातो त्यातच मराठेशाही आणि होळकरशाहीच्या स्वकर्तृत्वावर नेतृत्व करणारा यशवंतराव होळकर यांच्या लष्करी सिध्देतेची कसोटी दिसुन येते.

यशवंतरावांनी आपल्या लष्करी व्यवस्थेत आसणाऱ्या विविध सैन्य दलांना शस्त्रसज्ज करण्याचा निर्णय घेतला त्यावेळी यशवंतराव हे इंग्रजांच्या विरुध्द युध्द पुकारणार हे सहज लक्षात येईल. मराठेशाहीमध्ये पारंपारिक पध्दतीने पायदळा पेक्षा घोडदळास अधिक महत्व होते. परंतु यशवंतराव होळकर यांनी घोडदळा बरोबरच पायदळ, सैन्यदलही प्रामुख्याने ठेवले होते. इंग्रजांची युध्द निती ही पायदळाच्या माध्यमातून युध्द करण्याची होती. आणि मैदानी प्रदेशातील भूभागावर युध्द लढले जात त्यामुळे यशवंतरावांनी घोडदळाबरोबरच पायदळाचाही इंग्रजांच्या विरुध्द काही काळ युध्द लढण्यासाठी उपयोग केला. परंतु कालांतराने आपले लष्करी धोरण, युध्दनिती, डावपेच हे घोडदळाच्या माध्यमातून इंग्रजांच्या विरुध्द गनिमी कावा युध्द तंत्राचा मैदानी प्रदेशात वापर केला तो यशस्वीही ठरल्याने यशवंतरावांकडे मोठ्या प्रमाणात घोडदळाची संख्या जास्त आसल्याचे दिसुन येते.

यशवंतराव होळकर यांची युध्दा विषयीची भूमिका ही अभ्यासपूर्ण दिसते, शत्रुची इतंभूत माहिती आपल्या गुप्तहेरा द्वारे आली असता त्यावर शत्रुच्या विरुध्द कोणती युध्दनीती अवलंबवावी या विषयी नियोजन करत शत्रुला कशा पद्धतीने कोंडीत पकडुन त्याचा पराभव करावा ही भूमिका

यशवंतराव आखत यशवंतरावांना इंग्रजांच्या विरुध्द लढताना आपल्या शस्त्रास्त्रा विषयीच्या मर्यादा माहिती असताना सुध्दा इंग्रजांच्या विरुध्द आपल्या घोडदळाच्या सैन्य संख्येवर इंग्रजांचा युध्दात पराभव करु शकतो. हे त्यांच्याकडे असणाऱ्या उच्चप्रतिच्या मनोर्धेर्यावर अवलंबून होते. यशवंतरावांच्या अनुपस्थितीमध्ये इंग्रजांनी हिंगलाजगडावर हल्ला केला त्यावेळी यशवंतरावांचे सरदार हे किल्ला सोडून निघुन गेले असता यशवंतरावांनी आपल्या सरदारांना उद्देशुन सांगितले की, युध्दातुन शुरवीर, शौर्य गाजविणाऱ्यांनी रणांगण सोडून जाणे त्यास शोभत नाही. आलेल्या प्रसंगाला सामोरे जाणे हे खऱ्या योद्ध्याचे लक्षण आहे. यशवंतरावांच्या या वक्तव्यावरुन असे निदर्शनास येते की रणांगणात सैनिकांनी त्यागाची भावना ठेवली पाहिजे. स्वत: चे मनोधैर्य हे कमकुवत होऊ दिले नाही पाहिजे. शत्रु सैन्यावर शेवट पर्यंत लढा दिला पाहिजे शत्रुचा पराभव करणे हे खरे योद्ध्याचे लक्षण मानले जाते.

आजपर्यंत मराठेशाहीच्या कालखंडामध्ये कोणत्याही नेतृत्वाने किल्ल्याचा आश्रय घेऊन शत्रुच्या विरुध्द युध्द लढलेले नाही. मराठेशाहीच्या उत्तर कालखंडातही यशवंतराव होळकर यांनी किल्याचा आश्रय घेऊन इंग्रजांच्या विरुध्द एकही युध्द लढले नाही, यशवंतरावांनी जी काही युध्दे केली ती घोडदळाच्या माध्यमातून मैदानी प्रदेशातील गनिमीकावा युध्द तंत्राचा वापर करुन युध्दे लढलेली आहेत. यशवंतरावांची रणनिती ही युध्दामध्ये सर्वांनी एकाच ठिकाणी गोळा होवुन शत्रुसैन्यावर आक्रमण करण्यासाठी नव्हती तर शत्रूच्या सैन्याला वेगवेगळे करुन आपल्या सैन्यदलास विभागण्यात येत असे जरी या युध्दात आपल्या एका सैन्यदलाचा पराभव झाला तरी दुसरे सैन्यदल हे युध्दासाठी तयार असावे ही थकण्याची रणनिती शत्रुच्या विरुध्द यशवंतराव अवलंब करताना दिसुन येतात.

यशवंतरावांना ज्या दिशेला जाऊन शत्रुवर आक्रमण करावयाचे असेल त्या दिशेला कधी जात नसत आपल्या गुप्तहेराद्वारे दुसरीकडे जाण्याची अफवा पसरवत परंतु ज्या दिशेकडे यशवंतरावांना जायचे त्या दिशेची बातमी बाहेर फुटू देत नव्हते हा गनिमीकावा युध्दतंत्राचा वापर यशवंतराव करत ज्यामुळे शत्रु हा बेसावध राहत असे त्यावर अचानकपणे आक्रमण करुन त्याचा पराभव करावयाचा ही रणनिती यशवंतरावांची होती. यशवंतराव होळकर एकीकडे इंग्रजांना मैत्रीपूर्ण पत्र व्यवहार करुन दुसरीकडे संस्थानिकांना इंग्रजांच्या विरुध्द युध्द करण्यासाठी पत्र व्यवहार चालु होता. यशवंतरावांनी शत्रुला गाफिल ठेवून आपली शक्ति व सर्वांना एकत्रीत करुन हल्ला करण्याचे त्यांचे नियोजन दिसते. ज्या भागातुन इंग्रजांचे सैन्य जायचे तो भाग अगोदरच

यशवंतरावांचे सैन्य उजाडुन टाकावयाचे जेणे करुन इंग्रजांच्या सैनिकांना अन्न-धान्य, घोड्यांना चारा, वैरण मिळु नये जेणे करुन यांचे सैन्य अन्न पाण्याविना तडफडून मरावे अशा प्रकारची रणनिती ही यशवंतरावांची होती.

यशवंतरावांचे युध्दातील आक्रमण हे अशा पध्ततीचे होते की, शत्रुच्या सैन्यावर गतिमानतेने तुटून पडणे, आक्रमकपणे हल्ला करणे शत्रुसैन्याच्या मनामध्ये भयाचे वातावरण निर्माण करणे जेणे करुन हे सैन्य युध्दाचे रणांगण सोडून पळुन जावे. त्याच बरोबर युध्दात जर आपला पराभव समोर दिसत असला तरी शत्रुवर रणांगणात सातत्याने हल्ला करुन पराभवाचे रुपांतर विजयामध्ये करण्याची जिद्द होती यशवंतरावांचे सैन्यदल विशेषत: घोडदळ मैदानी प्रदेशातील गनिमीकावा युध्द तंत्रामध्ये तरबेज होते. शत्रुचे जेवढे नुकसान करता येईल तेवढे जास्त नुकसान करावे आणि ते ठिकाण सोडून जावे. अशा प्रकारे आक्रमण करण्याची त्यांची युध्दनीती होती. “यशवंतराव युध्दाच्या वेळी आपल्या सैन्य दलाची लहान लहान गटामध्ये विभागणी करुन दुर दुर अंतरावर जात असत. शत्रु सैन्यास पेच पडे की हल्ला नेमका कुणावर करावा? जर एखाद्या सैन्य दलाच्या गटावर शत्रुने हल्ला करण्यास पुढे आला असता त्या सैन्य दलास आपल्या पाठलाग करण्यास लावत जेणे करुन शत्रु सैन्याची एकत्रीत सैन्य संख्या कमी होत आणि दुसऱ्या गटाने शत्रुच्या दुसऱ्या सैन्य दलावर हल्ला करावा त्यामुळे शत्रुची शक्ति कमी, कमकुवत व्हावी, त्यांच्यात विस्कळीपणा यावा आणि शत्रुचा रणांगणात पराभव करावा अशा पध्दतीने यशवंतराव होळकर शत्रुवर आक्रमण करण्याची त्यांची भुमिका या ठिकाणी दिसुन येते.

यशवंतराव होळकर यांनी ज्या ज्या वेळी इंग्रजांच्या विरुध्द युध्द केले त्या-त्या वेळी ते स्वत: प्रत्यक्ष रणांगणावर उपस्थित राहिलेले आहेत. आपल्या सैन्याचे मनोर्धेर्य वाढविण्याचे कार्य त्यांनी केले आहे. युध्दाच्या रणांगणात स्वत: आपल्या सैन्याच्या ठिकाणी जाऊन त्यांचे मनोधैर्य व त्यांना युध्दात लागणारी आवश्यक साधन सामग्री आहे का नाही याची काळजी घेत व त्यांना कमी असणाऱ्या साधन सामग्रीचा तात्काळ पुरवठा करण्यावर त्यांचा भर होता. मराठेशाहीच्या उत्तरार्धात एकमेव मराठा सरदार होते जे आपल्या सैनिकांची काळजी आणि युध्दावर प्रेम करणारे यशवंतराव होळकर होते. यशवंतराव हे युध्दाला सुरुवात होण्या अगोदर आपल्या सैन्य दलाचे तीन विभाग करत आणि शत्रुच्या सैन्यावर रणांगणामध्ये तिन्ही बाजुने प्रत्यक्ष कारवाई करत ज्यामुळे शत्रु सैन्याला रणांगणातुन सैरावैरा पळत सुटण्या खेरीज पर्याय नव्हता अशा पध्दतीने यशवंतराव प्रत्यक्ष कारवाई करताना दिसतात.

यशवंतराव होळकर ज्या वेळी लष्करी मोहीमेवर जात असत त्यावेळी यांच्या लष्करी छावण्या ह्या वेळेनुसार करत यांच्या लष्करी छावण्या ह्या अत्यंत साध्या व अवजड साहित्य सोबत नसायचे. बिन लढाऊ सैन्याचा अभाव असायचा, सरदारांना व सैनिकांना सोबत स्त्रियांना घेऊन जाण्याची परवानगी नसे, नाच गाणे वगैरे त्यांच्या लष्करी छावण्या मध्ये मनाई होती. यशवंतरावांच्या लष्करी मोहीमा ह्या कोसो दुर अंतरावर आणि महिनो-महिने असायचे. त्यामुळे यशवंतरावांचे सैनिकांना हाल अपेष्टा, कधी कधी उपाशी पोटी राहावे लागत असल्याने यांच्या सैन्याला सुखासीन जीवन जगण्याची सवय नव्हती. यांच्या गरजा कमीत कमी असायच्या यशवंतरावांच्या लष्करी व्यवस्थेमध्ये असणाऱ्या विविध सैन्य दलांना शिस्तीचे कडक नियम पाळण्याची सवय आणि नेतृत्वाचा दरारा या सैन्यदलावर आसल्याने लष्करी छावण्या ह्या अशा प्रकारच्या दिसुन येतात. यशवंतराव होळकर लष्करी मोहीमेवर निघण्यापूर्वी आपल्या गुप्तहेराद्वारे ज्या भागात लष्करी मोहीमा काढावयाच्या आहेत किंवा युध्दाच्या दृष्टीने शत्रुवर आक्रमण करावयाचे आहे. तेव्हा आपल्या गुप्तहेराद्वारे त्या ठिकाणाची, परिसराची भौगोलिक घटकांची, रचनांची, इंग्रजांच्या, संस्थानिकांच्या हालचालीची माहिती मिळवून लष्करी मोहिमा व शत्रुच्या विरुध्द युध्द करण्याची तयारी यशवंतराव करीत असत. यशवंतरावांचे गुप्तहेर हे इंग्रजांच्या सैन्य दलात कार्यरत होते. इंग्रजांची यशवंतरावांच्या विरुध्द चालणाऱ्या हालचाली विषयीची माहिती यशवंतरावांना गुप्तपणे खात्रीशीर मिळत होती त्यामुळेच यशवंतराव इंग्रजांच्या विरुध्द युध्दनीतीद्वारे त्यांचा पराभव करत.

यशवंतराव होळकर यांच्या सैन्य दलांना लागणारी रसद पुरवठा व्यवस्था ही यशवंतराव युध्दाच्या रणांगणातुन शत्रुची रसद पुरवठा लुटून आपल्या सैन्य दलास देत त्याच बरोबर होळकरशाहीच्या आखत्यारीत असणाऱ्या प्रांतातुन मागवत किंवा इतर मित्र संस्थानिकाद्वारे रसद पुरवठा करण्यात येत असे. यशवंतरावांचे सैन्य उपाशी पोटी राहिले, रसद पुरवठा नसल्याने पराभव झाला. अन्नधान्या वाचुन सैन्य यशवंतरावांना सोडून गेले असे कधीही झालेले दिसत नाही.

यशवंतरावांनी जितक्याही लष्करी मोहीमा केलेल्या आहेत त्यांनी आपली पारंपारिक पध्दतीने लष्कराची गनिमीकावा युध्दतंत्राची पध्दत सोडलेली नाही यशवंतरावांनी गनिमीकावा युध्दतंत्राच्या लढण्याच्या पध्दतीमध्ये भौगोलिक रचनेनुसार थोडा बदल केलेला आहे. गनिमीकावा युध्दतंत्र हे दऱ्या, खोऱ्यात, डोंगर भागात लढण्याची ही कला यशवंतरावांनी उत्तर भारतातील मैदानी प्रदेशातील सपाट भूमीवर घोडदळाच्या माध्यमातुन गनिमीकावा युध्दतंत्राचा वापर करुन

इंग्रजांचा सातत्याने पराभव केला व त्यांना हतबल केले. यशवंतराव होळकर यांच्या उत्तम प्रकारच्या लष्करी व्यवस्थेसह त्यांनी मैदानी प्रदेशातील गनिमीकावा युध्दतंत्राचा उपयोग हा इंग्रजांच्या विरुध्दच्या युध्दात यशस्वी ठरलेले पहावयास मिळते. यशवंतरावांनी इंग्रजांना दाखवून दिले की मराठेशाहीचे आस्तित्व अजुन जिवंत आहे.

यशवंतराव होळकर यांनी गनिमीकावा युध्दतंत्राच्या पध्दतीमध्ये इंग्रजांच्या विरुध्द हल्ला करण्यासाठी त्यांच्या सैनिकांना अचानकपणे हल्ला करुन धक्का देणे, त्यांना चकित करुन सोडणे, समोरचा शत्रु सावरायच्या आत त्यांच्यावर तुटुन पडणे, मैदानी प्रदेशात शत्रुच्या सैन्याला आपला पाठलाग करण्यास लावुन थकण्याची युध्दनीती त्यांच्या विरुध्द वापरणे, शत्रुच्या सैन्य दलात फुट पाडून त्यांच्यावर एकएकट्याने हल्ला करणे त्यांना हतबल करणे त्यांना रणांगण सोडून जाण्यासाठी प्रवृत्त करणे अशा प्रकारे यशवंतरावांनी मैदानी प्रदेशामध्ये घोडदळाच्या माध्यमातून गनिमीकावा युध्दतंत्राचा वापर केलेला पहावयास मिळतो. यशवंतराव होळकर यांचे जीवन कार्य हे संघर्षमय राहिलेले आहे. यशवंतरावांच्या उत्कर्षाचा कालखंड हा मल्हार गर्दीच्या नंतर झालेला पहावयास मिळतो. यशवंतरावांनी होळकर शाहीला पुनर्जिवित करण्यासाठी आणि दुसऱ्याच्या हातचे बाहुले न बनु देण्यासाठी यशवंतरावांना स्वकियांशी संघर्ष करावा लागलेला आहे.

यशवंतराव होळकर हे मराठेशाहीच्या उत्तरार्धातील कालखंडामध्ये एक कर्तबगार वीर पुरुष म्हणून त्यांची ओळख संपूर्ण भारतभर त्यावेळी झालेली पहावयास मिळते. तुकोजीराव होळकर यांच्या पत्नी राणी राधाबाई उर्फ यमुना बाई यांच्या पोटी यशवंतरावांचा जन्म झालेला असुन तुकोजीरावांना एकुण चार मुले होती त्यापैकी एक यशवंतराव होय. महादजी शिंदे यांच्या पश्चात मराठेशाहीच्या उत्तरार्धातील मराठा सरदार म्हणून पराक्रमी, धाडसी शौर्य गाजविणारा म्हणून यशवंतरावांची ओळख होती.

यशवंतरावांनी मराठेशाहीच्या उत्तर कालखंडात संपूर्ण भारतात व लहान मोठ्या संस्थानिक आणि जागतीक स्तरावर आपले युध्दातील गुण कौशल्याच्या आधारावर इंग्रजांना सातत्याने पराभव पहावा लागला. एक वेळ अशी आली होती की भारतातुन इंग्रजांना हाकलुन देण्यात यशवंतराव यशस्वी होतात की काय अशी परिस्थिती निर्माण झाली होती. इंग्रजांना वाटत होते की, आपल्या साम्राज्य विस्ताराच्या ध्येय धोरण स्वप्नांमध्ये यशवंतराव अडसर ठरत आहे. भारतातील इंग्रजांचा गव्हर्नर मार्क्विस वेलस्ली यास यशवंतरावांच्या भारतभर झंझावातामुळे इंग्लंडला परत

बोलावुन घेण्याची नामुष्की इंग्लंडच्या संसदेवर आली होती. एवढा पराक्रमी, धाडसी यशवंतरावांचे नेतृत्व त्या काळी इंग्रजांच्या विरुध्द प्रभावी ठरले होते.

यशवंतरावांनी जे काही युध्द कौशल्य गुण प्राप्त केले होते ते त्यांना लहानपणी देण्यात आलेल्या “कायथा” सारख्या लहान गावामध्ये लष्करी प्रशिक्षणाचा, भाषेचे ज्ञान इत्यादींचा त्यांच्यावर प्रभाव व आत्मसात केलेले पहायला मिळते अशा प्रकारचे शिक्षण त्यांना देण्यात आलेले होते. यशवंतराव ज्या ज्या वेळी लष्करी मोहीमेवर जात त्यावेळी आपल्या कुलदैवत मल्हारी मार्तंडाचे दर्शन घेऊन लष्करी मोहीमेस जात, दक्षिणेमध्ये यशवंतराव आले असता. जेजुरी गडावर मल्हारी मार्तंडाच्या दर्शनासाठी आवर्जुन जात, यशवंतरावांची वेशभुषा ही सातत्याने लष्करी मोहीमेवर असल्याने त्यांची वेशभुषा सर्वसाधारण असेल असे वाटते परंतु एखाद्या राजाला शोभेल असे त्यांचे राहणीमान होते.

यशवंतरावांचे एकंदरीत कार्य कर्तृत्व हे होळकरशाही राज्याचा प्रमुख या नात्याने त्यांनी आपले कार्य केले आहे. आपल्या पूर्वजांची परंपरा त्यांनी पुढे चालु ठेवली होती. जुने व नवीन किल्ल्यांची निर्मिती, डागडुजी, मंदिरांचा जीर्णोधार, यशवंतरावांद्वारे आर्थिक सहकार्य प्राप्त करण्यासाठी त्यांच्याकडे भारतातुन लहान मोठ्या संस्थानिका मधील साधु संत येत असत, आपले कुलदैवत जेजुरी मल्हारी मार्तंड गडाच्या पायथ्याशी छत्री, तलाव इत्यादींचा जीर्णोध्दार करण्यासाठी पत्र व्यवहार केलेला पहावयास मिळतो. होळकरशाहीच्या राज्याला साजेल अशा प्रकारचे कार्य भानपुरा या ठिकाणी सामरिक दृष्टीने बांधलेले किल्ले, लष्करी छावणी, त्याच बरोबर, आपल्या राज्याच्या लष्करी व्यवस्थेत इंग्रजांच्या तोडीस-तोड, नावली या ठिकाणी तोफा ओतण्याचा निर्माण केलेला कारखाना असो की आपले विविध सैन्य दलास लागणारी अत्याधुनिक प्रकारची शस्त्रास्त्रे निर्मिती करण्याकडे त्यांचा कल होता. यशवंतरावांनी होळकरशाहीच्या माध्यमातुन आपल्या राज्याच्या अंतर्गत आर्थिक कारभार चालण्यासाठी व नागरीकांना खंडेराव होळकर आणि कालांतराने स्वत:च्या नावे नाणी पाडण्यात आली होती. राज्या-राज्यामध्ये पत्र व्यवहार चालावा यासाठी डाक व्यवस्थेची निर्मिती त्यांच्या कार्यकाळात चालु केली होती. एकंदरीत विचार करता यशवंतराव होळकर यांनी होळकरशाही राज्याला लागणारे आवश्यक विभाग चालु केलेले होते.

यशवंतराव होळकर यांनी होळकरशाही राज्याच्या आखत्यारीत असणाऱ्या 80 परगण्यांच्या संरक्षणाची जबाबदारी यांच्यावर येवून पडली होती. होळकरशाहीला अबाधित व दुसऱ्याच्या हातात जाऊ न देण्यासाठी त्यांनी सातत्याने परकियांशी आणि स्वकियांशी संघर्ष

केलेला पहावयास मिळतो. त्याच बरोबर होळकरशाहीच्या अंतर्गत असणाऱ्या वेगवेगळया परगणा मधून एक निश्‍चित आर्थिक उत्पन्न हे कोटीच्या घरामध्ये वाढवले होते. यशवंतराव होळकर यांचे तारुण्य हे पाहिले असता भारताच्या वेगवेगळ्या भौगोलिक घटकांना आपल्या घोड्याच्या टापुखाली तुडवण्यात आणि इंग्रजांचा सातत्याने पराभव करण्यात युध्दाच्या रणांगणात आपल्या सैन्य दलांच्या सहवासामध्ये गेलेले पहायला मिळते. सैन्य दलांच्या सहवासामध्ये राहिल्याने त्यांचे मनोधैर्य, शौर्य, धाडस, गतिमानता, वाऱ्याच्या वेगाने घोडस्वारी इत्यादी विषयी यशवंतराव हे आपल्या सैन्य दलांचे ऊर्जास्थान राहिलेले आहे.

यशवंतराव होळकर यांनी आपले संपुर्ण आयुष्य हे घोड्याच्या खोगीरावर घालवले. जो पर्यंत माझ्या अंगाखाली घोडा आहे तो पर्यंत संपूर्ण जग हेच माझे घर आहे. अशा पध्दतीची त्यांची घोडदौड, संपूर्ण भारतभर त्याकाळी इंग्रजांच्या विरुध्द दिसुन येते. यशवंतरावांनी इंग्रजांच्या विरुध्द भारतातील लहान मोठ्या संस्थानिकांना आव्हान केले होते की, भारतातुन इंग्रजांना हाकलुन लावण्या शिवाय पर्याय नाही. त्यांच्या जोखडातून त्याशिवाय मुक्ती नाही यासाठी राजे, रजवाडे संस्थानिकांनी इंग्रजांच्या विरुध्द युध्दाला सुरुवात करावी व मला त्यांच्या विरुध्द लढण्यासाठी सहकार्यही करावे अशा प्रकारचे आव्हान यशवंतराव संस्थानिकांना सातत्याने करताना दिसतात. त्यांच्यातील राष्ट्र भक्ती, राष्ट्राभिमान, आपल्या मातृभूमीच्या संरक्षणासाठी सातत्याने इंग्रजांचा पराभव केला. त्यांची असणारी दुरदृष्टी पहाता इंग्रजांना भारतातुन हाकलुन लावल्या शिवाय आपली राज्ये ही सुरक्षित राहु शकत नाहीत. या परकियांना आपल्या भूमी वरुन हद्दपार करावेच लागेल. या उद्देशाने यशवंतरावांनी आपली लष्करी सैन्य दले शस्त्रास्त्रांनी, तोफखाना दलांनी अत्याधुनिक केलेल्या होत्या. परंतु दुर्देवाने यशवंतरावांना एखाद दुसऱ्या संस्थानिकां शिवाय कोणत्याही भारतीय संस्थानिकांनी त्यांना इंग्रजांच्या विरुध्द लढण्यासाठी सहकार्य केलेले नव्हते. प्रत्यक्ष, अप्रत्यक्ष हे संस्थानिक इंग्रजांच्या अधिपत्याखाली गेलेले होते इंग्रजांनी भारतभर आपल्या कवायती फौजेच्या माध्यमातून संस्थानिकावर आपले प्रभुत्व स्थापीत केलेले असताना यशवंतरावांनी आपल्या स्वत:च्या हिंमतीवर इंग्रजांचा सातत्याने पराभव करुन त्यांचा नक्षा उतरविण्याचे कार्य हे फक्त मराठेशाहीच्या उत्तरार्धातील कालखंडात मराठा सरदार यशवंतराव होळकर यांनी केलेले पहावयास मिळेल.

यशवंतराव होळकर यांनी आपल्या कारकीर्दी मध्ये आपल्या राज्याची आर्थिक घडी व महसुल गोळा करण्याकरिता आपल्या राज्याचे चलन त्यांनी खंडेराव होळकरांच्या नावे नाणी

पाडली होती. कालांतराने त्यांनी आपल्या नावे नाणी पाडलेली ही दिसतात. यशवंतराव होळकर यांचे सैन्य संघटन हे विविध संस्थानिकांमधील कार्यरत सैन्य यशवंतरावांच्या सैन्य दलामध्ये भरती होण्यास उत्सुक असत कारण यशवंतराव ज्या वेळी लष्करी मोहीमेवर जात त्यावेळी आपल्या सैन्य दलांना मिळालेल्या संपत्तीतील वाटा देण्यात येत असे त्यामुळे यशवंतरावांना सैन्याची कमतरता कधी जाणवली नाही यशवंतराव आपल्या युध्दनिती, डावपेच यामध्ये गतिमानतेने शत्रुच्या सैन्यावर तुडुन पडत त्यामुळे त्यांच्या सैन्याला आपला सेनापती हा प्रभावशाली वाटत होता.

यशवंतराव होळकर यांनी आपल्या लष्करी व्यवस्थे अंतर्गत असणाऱ्या विविध सैन्य दलापेक्षा घोड दळास जास्त महत्व दिले. कारण शत्रुवर मैदानी प्रदेशात घोड दळाच्या माध्यमातून गनिमीकावा युध्दतंत्राचा वापर मोठ्या प्रमाणात करण्यात येत होता. यशवंतरावांनी आपल्या सैन्य दलामध्ये पेंढारी, पठाण, मुसलमान सैन्याचा अधिक भरणा केला होता. जेणे करुन भारतावर होणाऱ्या परकिय आक्रमणाद्वारे सैन्य दलातील हे सैनिक असत, तुटपुंज्या वेतनावर, काटक, अनुभवी असणारे हे सैनिक होते. यशवंतराव होळकर हे आपल्या सैन्य दलामध्ये काम करण्यासाठी येणाऱ्या सैनिकांना एक, दोन, तीन महिने एक वर्ष या कालावधीसाठी करार करण्यात येत.

यशवंतराव होळकर यांनी आपल्या सैन्य व्यवस्थेमध्ये आधुनिकता व शिस्त यावी यासाठी स्वदेशी आणि युरोपियन सैन्य व्यवस्था केली होती. यशवंतरावांनी सुभेदार मल्हारराव होळकर यांच्या पासुन पारंपारिक पध्दतीने चालत आलेल्या सैन्यातील पदे रिसालदाराची नावे, कामविसदारांच्या जबाबदाऱ्या इत्यादी लष्करी व्यवस्था चालु ठेवलेल्या होत्या. यशवंतराव होळकर छत्रपती शिवाजी महाराजांनी ज्या प्रकारे स्वत:च्या सुरक्षेसाठी अंगरक्षक दलाची निर्मिती केली होती तशा प्रकारे आपल्या संरक्षणासाठी अंगरक्षक दलाची स्थापना करण्यात आली होती. यशवंतराव भौगोलिक प्रदेशानुसार घोड्यांची निवड करत, मैदानी प्रदेशासाठी दक्षिणेकडे येत असताना वेगवेगळी घोडे असायचे या घोड्यांची निवड ही अरब, तुर्क, इराक या भागातुन घोडे मागवत त्याच बरोबर अरब आणि तुर्क यांच्या संक्रमणाने तयार झालेला भीमथडी तट्टे नावाचा घोडा हा महाराष्ट्रामध्ये उदयास आलेला होता. उत्तर मराठेशाहीच्या सरदारांमध्ये यशवंतराव होळकर यांच्या एवढा घोड दळाचा प्रवास दुसऱ्या कोणी सरदाराने केला हे संदर्भ सापडत नाही. यशवंतरावांनी घोड दळास प्रथम प्राधान्य दिले होते. यशवंतरावांनी घोड दळाच्या खोगिरावर आपले राज्य आणि लष्करी मोहिमा दुर अंतरावर काढलेल्या आहेत. यशवंतरावांकडे घोड दळाची संख्या ही अन्य मराठा सरदार, इंग्रज यांच्या पेक्षा जास्त होती. त्यांचा खर्चही त्या प्रमाणात करावा लागत असे.

यशवंतरावांची धारणा ही होती की, पायदळा पेक्षा घोड दळाच्या माध्यमातुन एखादी क्रिया ही शत्रुच्या विरुध्द लवकरात लवकर करता येते.

मराठ्यांच्या विरुध्द प्रथमच तोफांचा वापर हा पहिल्या पानिपतच्या युध्दामध्ये बाबराने केलेला संदर्भ आढळतो त्याच बरोबर म्हैसुरचा टीपु सुलतान याने इंग्रजांच्या विरुध्द अग्निबाणांचा उपयोग केला. महाराष्ट्र भूमीवर छत्रपती शिवाजी महाराजांनी भौगोलिक रचनेनुसार शत्रुविरुध्द गनिमीकावा युध्दतंत्राचा उपयोग केला परंतु मराठेशाहीच्या उत्तरार्धातील कालखंडात यशवंतराव होळकर यांनी छत्रपती शिवाजी महाराजांचा गनिमीकावा हा मैदानी प्रदेशात घोड दळाच्या माध्यमातून गनिमीकावा युध्दतंत्र उपयोगात आणले यशवंतरावांनी आपल्या लष्करी व्यवस्थेमध्ये एक रॉकेट दलाचा विभाग स्थापन केला होता. यशवंतरावांनी इंग्रजांच्या विरुध्द आपल्याला जिंकायचे असेल तर तोफा बनविण्याचा कारखाना आवश्यक आहे. त्यादृष्टीने त्यांनी नावली या ठिकाणी तोफा ओतण्याचा कारखाना स्थापुन 100 ते 125 तोफा निर्माण केल्या एकंदरीत विचार करता यशवंतराव होळकर यांची दुरदृष्टी म्हणा किंवा लष्करी प्रेम यांनी आपल्या मराठेशाही मध्ये पारंपारिक पध्दतीने चालणाऱ्या काही घटकांना आपल्या लष्करी ध्येय धोरणांमध्ये अंमलात आणले होते.

यशवंतराव होळकर यांच्या कालखंडात संपूर्ण भारतातील लहान मोठ्या संस्थानिकांच्या मनामध्ये विचारही आला नाही की, आपल्याकडे उच्च प्रतिचा तोफखाना असावा जे यशवंतरावांना सुचले होते. यशवंतरावांकडे असणारा तोफखाना हा दुसऱ्या संस्थानिकापेक्षा श्रेष्ठ होता स्वत: यशवंतराव तोफा ओतण्याच्या कारखान्यात काम करत होते. एवढी निष्ठा, प्रामाणिकपणा, प्रेम, साहस, दुसऱ्या कोणत्याही सरदार, राजा व संस्थानिक, मराठा सरदारांमध्ये दिसत नाही यशवंतरावांनी दोन प्रकारच्या तोफा बनविल्या होत्या. या तोफावरती त्यांनी उर्दु भाषेमध्ये आपले नाव कोरलेलेही दिसुन येते. आज घडीला या तोफा इंदौर संग्रहालया मध्ये पहावयास मिळतात. तोफा ओढण्यासाठी लाकडी आणि लोखंडाची चाके बनविण्यात आली होती. युध्दाच्या रणक्षेत्रात तोफांचा मारा योग्य पध्दतीने आणि लवकरात लवकर चारही बाजुने शत्रुच्या विरुध्द करता यावा हा त्यांचा उद्देश होता. भारतातील त्यावेळी संस्थानिक असो की मराठेशाहीतील सरदार असोत त्यांना कधी तोफा निर्माण करण्याचा विचार, दुरदृष्टी ही महादजी शिंदे यांच्या नंतर दिसत नाही जी यशवंतराव होळकर यांच्याकडे दिसते.

यशवंतराव होळकर यांनी आपल्या लष्करी व्यवस्थेमध्ये धनुर्धारी दलाची निर्मिती केली होती. यशवंतरावांनी या दलाचा उपयोग हा भौगोलिक रचना, शत्रु सैन्याची संख्या, ठिकाणावर धर्नुधारी दलाचा उपयोग युध्दात करताना दिसतात. त्याच बरोबर रॉकेट दलाची निर्मिती ही मर्यादीत सैन्य संख्येच्या स्वरुपात करण्यात आली होती. मराठेशाहीच्या उत्तर कालखंडात यशवंतरावां एवढी लष्करी व्यवस्था, सैन्य दलांवर प्रेम करणारा दुसरा कोणी मराठा सरदार दिसत नाही. मराठेशाही अंतर्गत कार्य करणाऱ्या मराठा सरदारांनी पेशव्यांनी राज्याच्या संरक्षणासाठी किंवा आपले सैन्य दले आधुनिक शस्त्रास्त्रांनी सुसज्ज करण्याचा प्रयत्न हा दुसऱ्या व परकियांकडून शस्त्रे खरेदी करण्याचा प्रयत्न केला. परंतु यशवंतरावांनी परकियांकडून व स्वकीयाद्वारे शस्त्रास्त्रे खरेदी केलेच पण स्वत:च्या सैन्य दलास इतरांपेक्षा वेगळ्या शस्त्रास्त्रांनी सुसज्ज करण्यासाठी स्वत:चे शस्त्रास्त्रे निर्मितीचे कारखाने निर्माण केलेले पहावयास मिळतात. यशवंतरावांनी इंग्रजांकडे असणाऱ्या बंदुका तशा प्रकारच्या आपल्या सैन्य दलाकडे असाव्यात व त्या वजनाने हलक्या असल्या पाहिजे एवढे सुक्ष्म निरीक्षण यशवंतरावांचे होते. त्या दृष्टीने त्यांनी बंदुकीमध्ये बदल करुन वजनाने हलक्या असाव्यात या दृष्टीने निर्माण केल्या व आपल्या सैन्य दलात एक बंदुकधारी दल निर्माण केले होते. उंट दलाचाही वापर यशवंतरावांनी वाळवंटी प्रदेशात केलेला संदर्भ आढळुन येतो.

यशवंतराव होळकर यांनी आपल्या सैनिकांना उत्तम प्रकारचे सैनिकी प्रशिक्षण देण्यासाठी प्रशिक्षण केंद्राची निर्मिती केली. यशवंतरावांना भारतातील सर्वोत्कृष्ट सेनापती म्हणावे लागेल कारण त्यांनी विविध सैन्य दलांना त्यांच्या विभागानुसार सैनिकांना प्रशक्षिण देण्याची व्यवस्था केलेली होती. स्वत: यशवंतराव लष्करी प्रशिक्षण केंद्रात जाऊन सैनिकांना लष्करी प्रशिक्षण देत. सैनिकांमध्ये बनावटी युध्दाद्वारे त्यांच्याकडून युध्दाच्या रणांगणातील शत्रुच्या विरुध्द लढण्याचा सराव करुन घेत तर दुसरीकडे आपल्या सैन्य दलांना तोफांच्या आवाजाचा सराव व्हावा यासाठी तोफा चालविण्यात येत तोफांच्या आवाजा शेजारी सैन्याला युध्दाचा सराव करण्यात सांगत एकंदरीत यशवंतराव हे आपल्या सैन्य प्रति, युध्दाच्या प्रशिक्षणा प्रति, सैन्याची प्रामाणिकता, एकनिष्ठपणा, चपळता, गतिमानता, शत्रु सैनिकांवर आपल्या सैन्य दलांचा प्रभाव असावा त्यांचे मनोधैर्य हे उच्च प्रतिचे असावे यासाठी यशवंतरावांनी आपल्या लष्करी व्यवस्थे अंतर्गत असणाऱ्या विविध सैन्य दलांना प्रशिक्षण देण्याचे कार्य केले.

यशवंतराव होळकर यांनी आपल्या विविध सैन्य दलांना लष्करी प्रशिक्षण तर दिलेच त्या बरोबर या सैन्याला शिस्तीचे धडेही दिले आहेत. लष्करी मोहीमे दरम्यान एखाद्या संस्थानिकांवर

आक्रमण केले असता त्या ठिकाणच्या सर्वसामान्य नागरिक असो की, महिला असो त्यांना कोणत्याही प्रकारचा त्रास झाला नाही पाहिजे अशी सक्त ताकीद यशवंतरावांनी आपल्या सैनिकांना दिली होती. यशवंतरावांकडे असणारे पेंढारी सैन्य हे लुटपाट व स्थानिकांवर अन्याय अत्याचार करणे पळुन जाणे ही त्यांची पारंपारिक संस्कृती होती. परंतु यशवंतरावांचे नेतृत्व, शिस्तीचे उपभोक्ता असल्याने तसा प्रकार करण्याची हिंमत या पेंढारी सैन्याची झाली नाही. परंतु हडपसरच्या युध्दात यशवंतरावांनी विजय मिळविल्यावर पुण्यात काही दिवस विसावले होते त्यावेळी पेंढारी सैनिकांनी सर्व सामान्यांवर अत्याचार केला ही बातमी कळताच यशवंतरावांनी त्या दोन पेंढारी सैनिकांना शिक्षा म्हणून एकाचा हात आणि दुसऱ्याचा पाय तोडला होता अशा प्रकारे आपल्या सैन्यातील सैनिकांनी असे कृत्य केले तर त्यास शिक्षा कशा प्रकारची होईल हे वरील घटनेवरुन लक्षात येते. विश्वास घात करणाऱ्या सैनिकांना मृत्युदंडाची शिक्षा देण्यात येत होती. उदाहरणा दाखल कॅप्टन टॉड आणि रायन यांची मुंडकी उडवून यशवंतरावांनी आपल्या सैन्य दलामध्ये भाल्यावर लटकवून विश्वासघात करणाऱ्या सैन्यास अशा प्रकारची शिक्षा देण्यात येईल. अशा पध्दतीने कडक शिस्त यशवंतरावांच्या लष्करी व्यवस्थे अंतर्गत होती.

यशवंतराव होळकर यांच्या लष्करी व्यवस्थे अंतर्गत असणाऱ्या विविध सैन्य दलांच्या सैन्याचे वेतन यशवंतराव दर 20 दिवसांनी राज्याच्या संरक्षणासाठी आहेत त्यांना द्यावयाचे आणि ज्यावेळी यशवंतराव लष्करी मोहीमवर असायचे त्यावेळी सोबत असणाऱ्या विविध सैन्य दलाचे वेतन हे दर दोन महिन्यांनी द्यावयाचे असा नियम होता. एखाद्या मोहीमे दरम्यान संपत्तीची लुट अधिकची मिळाली तर यशवंतराव हे त्या संपत्तीतील काही भाग हा आपल्या सैन्य दलामध्ये वाटुन टाकावयाचे जेणे करुन आपल्याला सैन्याची कमतरता राहु नये, सैन्य दले ही खुष रहायचे अशा प्रकारे यशवंतराव वेतन देत परंतु जी सैन्य दले, त्याचे अधिकारी यांचे वेतन देण्यासाठी जबाबदार व्यक्तिची निवड करुन त्या त्या सैन्य दलाच्या सेनाधिकाऱ्या समक्ष त्या सैन्याची नोंदणी पाहुन अंगठयाचा ठसा घेऊन त्या सैनिकाचे वेतन देण्याची पध्दत होती. यशवंतरावांच्या विविध सैन्य दलामध्ये कार्य करणाऱ्या प्रत्येक सैनिकाची नोंदणी एका वहीवर करुन ठेवण्याची पध्दत होती. जेणे करुन राज्याचा पैसा हा योग्य सैन्याला पोहचावा अशा प्रकारचे शिस्तबध्द नियोजन यशवंतरावांनी आपल्या लष्करी व्यवस्थे अंतर्गत विविध सैन्य विभागाचे केले होते. राज्याचे पत्र व्यवहार दुसऱ्या राज्याशी चाले त्यावेळी सांडणी स्वारास त्याच्या अंतरावर त्यास वेतन देण्यात येत होते.

यशवंतरावांनी आपल्या सैन्य विभागातील सैनिकांना युध्दाच्या रणक्षेत्रात उच्च प्रतीची कामगीरी केली असेल त्यास सर्व सैन्य दलाच्या समोर त्याचा सन्मान व सैन्य विभागातंर्गत बढती देण्यात येत होती. यशवंतरावांनी युध्दासाठी लागणारी वेगवेगळया प्रकारची शस्त्रास्त्रे, तोफा निर्माण केल्या होत्या. ज्या यशवंतरावांच्या समकालीन असणाऱ्या इतर संस्थानिकांमध्ये दिसत नाही. यशवंतरावांनी विविध शस्त्रांमध्ये आधुनिकता आणण्यासाठी त्या शस्त्रांमध्ये स्वत:च्या कारागिरांच्या माध्यमातुन कलात्मकता आणण्याचा सातत्याने प्रयत्न केला होता. मराठेशाहीच्या संपूर्ण कालखंडाचा विचार करता स्वत:च्या संरक्षणा करिता चिलखतधारी पोशाख, शिरस्त्राण कवच युध्दात वापरण्यासाठी निर्माण केलेला एकमेव मराठा सरदार, होळकरशाही चा राजा यशवंतराव होळकर हे दिसतात. युध्दावर प्रेम करणारा हा अवलिया मराठेशाहीमध्ये एकटेच यशवंराव होते.

इंग्रजांनी भारतात आपला प्रवेश हा व्यापारी म्हणून केला आणि भारतातील विविध प्रांतामध्ये जाऊन संस्थानिकांच्या राज्यकारभारामध्ये अप्रत्यक्ष तर कधी प्रत्यक्षपणे हस्तक्षेप करण्यास सुरुवात केली. इंग्रजांनी भारतातील विविध लहान, मोठ्या संस्थानिकांना कालांतराने आपल्या नियंत्रणाखाली आणले आणि दक्षिणेकडील मराठेशाहीला त्यांना लवकर हात घातलेला दिसत नाही. काळानुसार त्यांनी मराठेशाही कमकुवत होण्याची वाट पहात होते. म्हैसुरचा टिपू सुलतान आणि हैद्राबादचा निजाम या संस्थानिकांना इंग्रजांनी आपल्या अंकीत करुन मराठेशाहीवर आपले नियंत्रण मिळविण्यासाठी सातत्याने प्रयत्न चालवले होते. उत्तर आणि दक्षिणेच्या कारभारा मध्ये वाढत जाणारे अंतर आणि इंग्रजांनी प्रमुख संस्थानिकांचा अस्त टप्प्या टप्याने केला. त्यामुळे भारतातील इतर संस्थानिकांनी इंग्रजासोबत तह करण्यास सुरुवात केली होती. इंग्रजांनी सातत्याने भारतातील एका मागून एक संस्थानिक हस्तगत करित चालले असता त्यांनी पाहिलेले स्वप्न पूर्णत्वास जात आहे असे त्यांना वाटत होते, परंतु भविष्य काळात मराठेशाहीतील मराठा सरदार यशवंतराव होळकर हे इंग्रजांनी पाहिलेल्या स्वप्नांवर पाणी फिरवतील की काय अशा प्रकारच्या घडामोडी यशवंतरावांनी इंग्रजांच्या विरुध्द चालवल्या होत्या.

यशवंतराव होळकर यांनी इंग्रजांच्या चालणाऱ्या घडामोडीवर लक्ष ठेवून होते. विविध राज्यातील संस्थानिकांना इंग्रज आपल्या नियंत्रणाखाली आणून मराठेशाहीवर कुटनितीच्या माध्यमातून आपले प्रभूत्व स्थापीत करण्याचा उद्देश यशवंतरावांच्या लक्षात आल्याने त्यांनी इंग्रजांच्या विरुध्द भारतातील विविध लहान मोठ्या संस्थानिकांना इंग्रजांच्या विरुध्द एकत्रीत येण्यासाठी प्रथम पत्र व्यवहार चालवला होता. परंतु त्यास कोणत्याही संस्थानिकांनी प्रतिसाद दिला

नाही. तेंव्हा यशवंतरावांनी इंग्रजांच्या विरुध्द एकट्याने लढा देण्याचे ठरवले त्यानुसार इंग्रजांचा सातत्याने यशवंतरावांनी पराभव केला. यशवंतराव मराठेशाहीतील अन्य मराठा सरदारांना आव्हान करत होते की इंग्रजांच्या विरुध्द लढण्यासाठी सर्वांनी एकत्रित यावे. परंतु त्यांच्या या आव्हानाला इथेही मराठेशाहीतील अन्य मराठा सरदारांनी प्रतिसाद दिला नाही. मराठेशाही ही बुडत चालली आहे. सर्वांनी एक विचारे यावे तरच मराठेशाही वाचू शकेल. परंतु कोणीही मराठेशाही बद्दल विचार न करता स्वत:च्या आखत्यारित असणाऱ्या प्रदेशांना वाचविण्याच्या पलीकडे काही केलेले दिसत नाही.

यशवंतरावांच्या प्रत्येक योजनेला अयशस्वी करण्याचा सातत्याने प्रयत्न केला. परंतु इंग्रजांना त्यामध्ये यश आलेले दिसत नाही. इंग्रजांची कुटनीती फोडा आणि राज्य करा या तत्वांवर भारतातील विविध संस्थानिकांमध्ये कृत्य चालू होते. त्यास अयशस्वी करण्यात यशवंतराव होळकरांना प्रत्येक वेळी यश येत गेले. यशवंतरावांना माहित होते की जर इंग्रजांना योग्य वेळी रोखले नाही तर कायमचे ते या भूमीवर आपले प्रभूत्व निर्माण करतील आणि मराठेशाही सुध्दा यातून वाचणार नाही ही भूमिका यशवंतराव होळकर यांची या ठिकाणी निदर्शनास पडते.

यशवंतराव होळकर यांनी स्वकियांशी होळकरशाही वाचविण्यासाठी आणि मातृभूमीच्या रक्षणासाठी इंग्रजांशी मराठेशाहीच्या उत्तर काळखंडात संघर्ष करताना दिसतात. इंग्रजांचा वाढता प्रभाव लक्षात घेता यशवंतरावांनी संपूर्ण भारतभर घौडदौड केली परंतु त्यात त्यांना यश येताना दिसत नाही. नाऊमेद न होता यशवंतरावांनी आपल्या स्वत:च्या कार्य कर्तृत्वावर होळकरशाही आणि मराठेशाहीचे संरक्षण करण्यासाठी सातत्याने प्रयत्न केलेले दिसतात.

**निष्कर्ष :-**

१. सुभेदार मल्हारराव होळकर अहिल्यादेवी होळकर, तुकोजीराव होळकर यांच्या नितीनियमानुसार यशवंतरावांनी होळकरशाही राज्याचा कारभार चालवला आहे.

२. यशवंतराव होळकर यांना बालपणापासुन लष्करी प्रशिक्षण मिळालेले होते. त्यांनी बालवयातच प्रत्यक्ष युध्दात सहभाग घेतला होता.

३. यशवंतरावांनी स्वत:च्या कर्तृत्वावर आपली लष्करी फौज निर्माण केलेली होती.

४. यशवंतराव होळकर यांनी ६ जानेवारी 1799 रोजी स्वत:चा राज्याभिषेक करवून घेतला होता. यशवंतराव अधिकृत पणे तेंव्हा पासुन होळकरशाही राज्याचे छत्रपती, राजे म्हणून उदयास आलेले आहेत.

५. मराठेशाहीच्या उत्तरार्धात यशवंतरांवाचे नेतृत्व उदयास आले.

६. यशवंतरावांनी आपली लष्करी व्यवस्था आधुनिक पद्धतीची करण्यासाठी फ्रेंच, इंग्रज, ख्रिस्ती इत्यांदी सैन्य यांच्या दलामध्ये कार्यरत होते

७. यशवंतरावांच्या सैन्यामध्ये मराठा, धनगर, राजपूत, जाट, आहिर, पंजाबी, ब्राम्हण, भिल्ल, पेंढारी, पठाण, बंगश, रोहीले, मुसलमान, वैरागी, लोहार, तेलंग इत्यादी जाती धर्माचे सैनिक भरती करण्यात येत.

८. यशवंतराव होळकर यांनी आपल्या लष्करी व्यवस्थेमध्ये वेगवेगळया सैन्य विभागात सैनिकांची भरती ही तीन महिने, सहा महिने, एक वर्षे या कालावधीसाठी करण्यात येत होती.

९. यशवंतराव आपल्या सैन्य दलामध्ये सैनिकांची भरती करत असतांना त्या सैन्याचा पराक्रम, धाडस, शौर्य इत्यादी पाहून वेगवेगळया सैन्य विभागामध्ये त्याच्या कर्तृत्वानुसार भरती करण्यात येत होती.

१०. यशवंतरावांच्या सैन्यदलामध्ये राम, लक्ष्मण, खंडोबा अशा वेगवेगळया नावाने सैन्याच्या पलटणी तयार करण्यात आलेल्या होत्या. त्याचबरोबर या सैन्यदलाची जबाबदारी ही रिसालदार, कामविसदार, यांच्या नेतृत्वाखाली देण्यात आली होती.

११. यशवंतराव होळकर यांच्याकडे कायमचे घोडदळ बाळगण्यापेक्षा आवश्यक्यतेनुसार घोडदळाची भरती करण्यात येत असत.

१२. यशवंतराव यांच्याकडे काठेवाडी, भिमथडी तट्टे, गंगथडी अशाप्रकारचे घोडे होते.

१३. यशवंरावांच्या दुर अंतरावरील लष्करी मोहीमा ह्या घोडदळाच्या माध्यमातून करण्यात येत होत्या. त्याचबरोबर मैदानी प्रदेशात गनिमी कावा युध्दतंत्राचा उपयोग हा घोडदळाच्या माध्यमातून केलेला आहे.

१४. यशवंतरावांच्या लष्करी व्यंवस्थेमध्ये पायदळापेक्षा घोडदळांची संख्या जास्त होती. तसेच यांच्या लष्करी व्यवस्थेत तोफखाना दळ, पायदळ हा सरंजाम होताच परंतू घोडदळ हे त्यांचे प्रमुख दळ होते. यशवंतरावांच्या घोडदाळाचे नेतृत्व फतेहसिंह माने, भवानी शंकर बक्षी, अमीर खान, शहामत खान यांच्याकडे होते.

१५. यशवंतरावांनकडे लंका, महुआ, विरा या नावाचे घोडे होते.

१६. यशवंतराव होळकर यांचे तारूण्य हे युद्धाच्या रणांगणावर आपल्या सैन्याच्या सहवासामध्ये जास्तीत जास्त गेलेले पाहावयास मिळते.

१७. मराठेशाहीच्या उत्तर कालखंडात यशवंतराव होळकर यांच्या सारखा भालाफेकीमध्ये दुसरे कोणी नव्हते. तसेच युद्ध कौशल्यामध्ये निपुण. युद्धनिती, रणनिती, गतीमानता, मैदानी प्रदेशातील गनिमीकावा युद्धतंत्रामध्ये पारंगत होते.

१८. यशवंतरावांच्या लष्करी नेतृत्वाचा भारतातील लहान मोठ्या संस्थनिकांवर प्रभाव पडलेला दिसतो.

१९. तैनाती फौजेच्या माध्यमातून सत्ता गाजविणाऱ्या इंग्रजांचा सातत्याने पराभव करून त्यांना हतबल करण्याचे कार्य भारतातील एकमेव मराठा सरदार यशवंतराव होळकर यांनी केले.

२०. यशवंतरावांच्या सैन्यदलात स्वदेशी आणि पाश्चिमात्य असे दोन प्रकारचे सैन्यदल होते.

२१. यशवंतरावांनी नावली या ठिकाणी तोफा ओतण्याचा कारखाना उभारला व या तोफखान्यात रात्रंदिवस तोफा बनविण्यासाठी स्वत: कार्य केले. यशवंतरावांकडे घोड्यावरून भरधाव तोफा ओढण्याचे दल होते. तोफा ओतण्याच्या कारखान्यातून दोन प्रकारच्या तोफा बनविण्यात आलेल्या होत्या.

२२. यशवंतराव होळकर यांच्या लष्करी विभागामध्ये धर्नुधारी दळाची एक तुकडी स्थापन करण्यात आली होती. शत्रुच्या सैन्यसंख्येवर व शस्त्रात्रांवर धर्नुधारी दलाचा उपयोग करावयाचा की नाही हे भौगोलिक घटक आणि परस्थितीनुसार ठरविण्यात येत होते.

२३. यशवंतरावांच्या धर्नुधारी दलामध्ये बहुसंख्येने भिल्लांचा समावेश असे या दलाचे नेतृत्व गोवर्धन नायक, झुंजारसिंह यांच्याकडे देण्यात आले होते.

२४. यशवंतरावांनी आपल्या सैन्य विभागामध्ये रॉकेट दलाचाही समावेश केलेला होता. व भरतपूरच्या युद्धामध्ये रॉकेट दलाचा उपयोग इंग्रजांच्या विरूद्ध केलेला दिसतो.

२५. यशवंतरावांच्या लष्करी विभागात बंदुकधारी दलाचे सैन्यदल होते., भौगोलिक रचनेनुसार मैदानी प्रदेशात बंदुकधारी घोडदळांचा वापर करण्यात येत. तसेच वाळवंटी प्रदेशामध्ये बंदुकधारी उंटाचा वापर करण्यात येत होता.

२६. यशवंतरावांनी हिंगलाजगड, चंबळनदीच्या किनाऱ्यावर लष्करी प्रशिक्षण केंद्र उभारले होते. व आपल्या सैनिकांना बनावटी युद्धाच्या माध्यमातून लष्करी प्रशिक्षण हे विविध प्रकारचे देत होते.

२७. यशवंतराव आपल्या सैन्यविभागातील कार्य करणाऱ्या सैन्य, सैन्याधिकारी यास पदानुसार वेतन देण्यात येत होते. तसेच युद्धामध्ये उत्कृष्ठ कार्य, पराक्रम, शौर्य गाजविल्यास त्या सैनिकांचा पुरस्कार देवून सन्मान करण्यात येत असे.

२८. यशवंतराव होळकर यांच्यावर इंग्रजांच्या आधुनिक शस्त्रांचा प्रभाव होता. त्यामुळे यशवंतरावांनी शस्त्रास्त्रांच्या बाबतीत परकीयांकडून घेण्याऐवजी स्वत:निर्माण करण्याकडे त्यांचा जास्त कल होता.

२९. यशवंतराव होळकर यांनी युद्धात स्वत:च्या संरक्षणासाठी चिलखतधारी पोशाख बनवला होता.

३०. यशवंतरावांनी स्वत:ची लष्करी व्यवस्था पाहण्यासाठी स्वतंत्र लष्करी विभाग स्थापीत केले होते.

३१. यशवंतराव होळकर यांनी भौगोलिक रचनेनुसार कोणत्या सैन्यदलाचा शत्रुच्या विरूद्ध वापर करावा याचे नियोजन करत होते.

३२. यशवंतराव होळकर यांनी त्यांच्या एकूण कार्यकाळात किल्ल्याचा आश्रय घेवून युद्ध लढले आहे असे एकही उदाहरण सापडत नाही.

३३. यशवंतरावांनी इंग्रजांच्या विरूद्ध घोडदळाच्या माध्यमातून गनिमीकावा युद्धतंत्राचा वापर मोठ्या प्रमाणत केला.

३४. यशवंतरावांची युद्धनिती ही आपल्या सैनिकांनी एका ठिकाणी सर्वांनी एकत्रीत न राहता इंग्रजांच्या कवायती कंपुना रोखण्यासाठी वेगवेगळ्या ठिकाणी आपल्या सेनापतीची लष्करी ठाणी उभारली होती.

३५. यशवंतरावांची युद्धनिती ही जर एखादे युद्ध झेपत नसेल त्यावेळी आपल्या सैन्य दलानी रणांगण सोडावे आणि ठरवून दिलेल्या वेगवेगळ्या संकेत स्थळावर येवून एकत्रीत व्हावे. अशा प्रकारची युद्धनिती होती.

३६. यशवंतरावांची रणनिती ही शत्रुला थकवणारी होती.

३७. यशवंतराव युद्धाच्या रणांगणामध्ये शत्रुच्या कारवाया, हालचाली पाहून आपल्या सैन्यदलास स्वत: आखून दिलेल्या रणनितीद्वारे हल्ला करण्यास सांगत. त्यामुळे त्यांच्या आक्रमणात प्रखरता जास्त दिसुन येते. त्याचबरोबर यशवंतरावांची युद्धाची आक्रमकता ही शत्रुच्या सैन्यास गोंधळात टाकणारी असायची.

३८. यशवंतरावांना लष्करी मोहीमेच्या माध्यमातून उत्तरेकडील भौगोलिक परिस्थितीचा अभ्यास झालेला होता.

३९. यशवंतरावांच्याा त्यांच्या गुप्तहेरांद्वारे मिळणाऱ्या माहितीच्या आाधारे युद्धनिती, प्रत्यक्ष कारवाई, लष्करी मोहिमा आखल्या जात.

४०. यशवंतराव आपल्या सैन्यदलाच्या संचालनासाठी प्रमुख केंद्राच्या स्वरुपात प्राकृतिक, धार्मिक, प्राचीन ठिकाणांचा उपयोग करत.

४१. यशवंतराव होळकर यांच्या सैन्यदलांना लागणारी रसद पुरवठा ही युद्धाच्या मैदानातूनच शत्रूद्वारे मिळवत.

४२. यशवंतराव होळकर यांनी आपल्या सैन्यदलाची उभारणी करताना आर्थिक पाठबळासाठी वेगवेगळया प्रांतातील चौथाई, सरदेशमुखी, खंडणी वसूलीचा आधार घेतलेला दिसतो.

४३. यशवंतराव होळकर यांना आप्त स्वकियांशीच जास्त संघर्ष करावा लागल्यामुळे त्यांना इंग्रजांशी एकटेच लढावे लागले.

४४. मराठेशाहीच्या आजूबाजूच्या संस्थानिकांवर इंग्रजांनी आपले प्रभुत्व निर्माण केल्याने पुढील कारवाई ही मराठेशाहीवर करणार असे भाकित यशवंतरावांनी केले होते.

४५. यशवंतरावांना भारतातील इंग्रजांच्या चालणाऱ्या कारवाया बद्दलची सत्य परिस्थिती माहिती होती. त्यामुळे इंग्रजांच्या विरुद्ध त्यांना युद्धाला सुरूवात करावी लागली.

४६. इंग्रजांच्या लष्करी सामर्थ्यामध्ये तोफा, बंदूका होत्या. तशाच पद्धतीचे यशवंतराव होळकर यांनी तोफा, बंदूका विविध शस्त्रास्त्रे निर्माण करण्याचे कारखाने स्थापित केले होते.

४७. यशवंतराव होळकर यांचे एकमेव ध्येय होते की, इंग्रजांचा भारतातून प्रभाव कमी करावा व त्यांना या भूमिवरून हाकलून लावावे अशी त्यांची योजना होती.

४८. यशवंतरावांची इंग्रजांच्या विरुद्ध सातत्याने घोडदौड चालू असताांना. इंग्रजांना यशवंतराव हा हिंदी क्रांतीकारक कायमचा उपटून टाकावयाचा होता. परंतु त्यात इंग्रजांना यश आलेले दिसत नाही.

४९. इंग्रजांनी यशवंतरावांच्या विरुद्ध सगळे पर्याय वापरुन पाहिले होते. तरी त्यांना यशवंतराव शरण येत नाहीत. तेंव्हा इंग्रजांना यशवंतरावांच्या विरुद्धचे युद्ध थांबवावे लागले.

५०. यशवंतराव होळकरांची दुरदृष्टी ही परकिय शक्तीच्या नियंत्रणखाली राहण्यापेक्षा आपण आपल्या मातृभूमीवर स्वतंत्र राहू ही होती.

५१. यशवंतरावांचे शौर्य, पराक्रम, धाडस, निष्ठा, देशप्रेम, अखंड भारताची संकल्पना त्यांनी प्रथम रुजवलेली दिसते.

५२. यशवंतराव होळकर यांनी प्रत्येक युद्धामध्ये युद्धनिती ही वेगवेगळी वापरताना दिसतात.

५३. यशवंतरावांमुळे इंग्रज गर्व्हनर मार्किवीस वेलस्लीला इंग्लंडला परत जावे लागले. त्याचबरोबर उत्तरेकडील प्रदेशात मराठेशाहीचा दबदबा वाढलेला दिसतो.

५४. यशवंतराव होळकर यांनी दिल्लीला सात दिवस वेढा दिला होता, यशवंतरावांचे नेतृत्व हे संपूर्ण भारतीय संस्थानिकांमध्ये चर्चेस आले ते ढीग व भरतपूरच्या युद्धात इंग्रजांचा दारून पराभव केल्यामुळे.

५५. यशवंतराव होळकर यांना देशी संस्थानिकांनी इंग्रजांच्या विरुद्ध सहकार्य केले असते तर, इंग्रजांना आपली सत्ता स्थापित करता आली नसती.

५६. यशवंतरावांचा इंग्रजांच्या विरुद्धचा लढा हा स्वत:साठी कधीच नव्हता. तर तो मराठेशाही वाचावी आणि देशी संस्थानिकांचे स्वातंत्र्य अबाधित रहावे यासाठी त्यांचा लढा होता.

५७. यशवंतराव होळकर यांनी शेवटी देशी संस्थानिक व मराठेशाहीतील सरदार सहकार्य करत नाहीत असे लक्षात आल्यावर आपले राज्य सुरक्षित ठेवून यशवंतराव होळकर आणि इंग्रज यांच्यामध्ये करार झाला.

५८. यशवंतरावांना इंग्रजांच्या विरुद्ध आलेले अपयश पुतन्या खंडेरावाचा मृत्यू, एकाकीपणा इत्यादीमुळे यशवंतराव निराश झालेले दिसतात. इ.स. 1797 ते 1809

पर्यंतचा कालखंड हा स्वकियांशी संघर्ष लष्करी मोहिमा इंग्रजांच्या विरुद्ध युद्ध इत्यादी परिस्थितीशी त्यांनी लढा दिला.

५९. यशवंतराव होळकर यांच्या सारखा शुरवीर मराठा सरदार मराठेशाहीच्या उत्तरार्धात होणे नाही. वयाच्या चौतीस व्या वर्षी चिरा निखळला.

६०. यशवंतराव होळकर यांची छत्री भानपुऱ्यापासून काही मैल अंतरावर उत्तर – पश्चिम दिशेला निर्माण करण्यात आलेली आहे.

**शिफारशी :-**

१. यशवंतराव होळकर यांचा अभ्यास करताना तो धर्माच्या मराठेशाहीच्या पलिकडे जाऊन अभ्यासण्यात यावा.

२. यशवंतराव होळकर यांची लष्करी व्यवस्था व त्यांच्या कार्याबद्दलची माहिती अभ्यास क्रमामध्ये समाविष्ट करावी.

३. यशवंतराव होळकर आणि तत्कालीन इंग्रज यांच्यामध्ये झालेला संघर्ष हा वैयक्तिक यशवंतरावांसाठी नसून मातृभूमीतील, संस्थानिक, राजे, रजवाडे, यांचे संरक्षण व्हावे, परकीय सत्ता भारतात नको यासाठी यशवंतरावांचा संघर्ष होता. ही माहिती देणे आवश्यक आहे.

४. यशवंतराव होळकर यांच्या युध्दतत्वांचा, युध्दनीती, रणनिती चा स्वतंत्रपणे पोलीस व लष्करी अभ्यासक्रमामध्ये समावेश करण्यात यावा.

५. यशवंतराव होळकर यांच्या कार्यकर्तृत्वाकडे आणि लष्करी दृष्टीकोनातुन केलेल्या नवनिर्मिती, विविध सैन्यदलांकडे लक्ष देऊन अभ्यास व्हावा जो येणाऱ्या नवी पिढीला यशवंतरावांचा इतिहास हा प्रेरणादायी ठरेल.

६. होळकरशाहीतील सेनापतींच्या कार्यकर्तृत्वाचा स्वतंत्रपणे अभ्यास क्रमाध्ये समावेश करण्यात यावा.

७. शालेय विद्यार्थ्यांना शैक्षणिक सहलीच्या माध्यमातून यशवंतराव होळकर यांच्या जन्म स्थळास भेटी देण्यात याव्यात जेणे करुन विद्यार्थ्यांना प्रेरणा मिळेल.